






संपादकीय सल्लागार:
डां. चि द दाते.
डॉ वा चु. श्रीश्रीमल

प्रकाशक :
गणेश स शेंडुर्णीकर
२१५ नेताजी सुभाषरोड
मुंबई.

मुद्रक :
खेमराज श्रीकृष्णदास
श्रीवेंकटेश्वर प्रेस
७ वी खेतवाडी, मुंबई ४

प्रकाशन :
७ सप्टेंबर १९६२

संपादक :
गणेश स शेंडुर्णीकर

मुखपृष्ठ
श्री. द ग. गोडसे

सजावट :
श्री गोलिथिडेकर

व्यवस्थापक
श्री एम दत्ताराम

किंमत दहा रुपये फक्त



# सहकारी चळवळीचे पंचप्राण

मा. वैकुंठभाओी मेहता

डॉ. धनंजयरावजी गाडगीळ

श्री. रमणलालजी सरैय्या

प्रा. दत्तोपंत कर्वे

श्री. वामनरावजी वर्दे





" देशातील सहकारी चळवळीत महाराष्ट्र राज्य आघाडीवर आहे. देशातील एका भागात असलेले सहकारी वळणसुद्धा, संपूर्ण राष्ट्राचे स्वरूप बदलून टाकते म्हणूनच माझी इच्छा आहे की, महाराष्ट्रातील सहकारी चळवळीतील काही क्षेत्राचे अनुकरण इतर राज्यानीसुद्धा करावे"

" नवीन समाजरचना, जी राजकीय, सामाजिक आणि आर्थिक समानतेवर आधारित आहे, आणि जीत स्त्री–पुरुषाला, प्रगतीची समान संधि आहे ती फक्त सहकारी चळवळीच्या द्वाराच यशस्वी होऊ शकते, हे फक्त भारतानेच सिद्ध केले आहे "

" सहकारी संघराज्य स्थापन करण्याचे दृष्टीने, ग्रामपंचायत व स्वयंस्फूर्त विविध सहकारी संस्थांच्या वाढीच्या दृष्टीने, आपण क्रांतिकारक पाऊल उचलले आहे. सहकार हा समानतेवर व न्यायावर आधारित आर्थिक आणि सामाजिक स्थैर्य प्राप्त करून देणारा जीवनाचा मार्ग आहे. "

पंतप्रधान नेहरू
२८ आक्टोबर १९६१,मुंबई



"सहकारी चळवळीचे यश सोसायट्यांची संख्या किती वाढली यावर ठरावयाचे नसते तर ते सभासदांच्या नैतिक अधिष्ठानावरूनच ठरवावयाचे असते सहकारी चळवळीचा हेतु मुख्यत्वे करून शेतकऱ्यांची आर्थिक उन्नति हा जरी असला तरी ह्या चळवळीला नैतिक अधिष्ठान असणे अत्यंत आवश्यक आहे ही चळवळ समाजोन्नतिद्वारे राष्ट्रोन्नतिसाठी नव-चैतन्य निर्माण करील जेणे करून आदर्श मानव, आदर्श समाज व आदर्श राष्ट्र निर्माण होऊ शकेल. मानवामानवात एकमेकाचे सहाय्याने, न्याय व नीति, बंधुभाव व स्नेह निर्माण करून आपसातील वर्ग विग्रह, तेढ आणि संघर्ष टाळून सुखी जीवन निर्माण करणे हा सहकारी चळवळीचा आत्मा होय. भेदापेक्षा अभेदावर विश्वास ठेवून सामुदायिक जीवन यशस्वी, संपन्न व सुखमय करणे हे सहकारी चळवळीचे अंतिम उद्दिष्ट असावे"

—राष्ट्रपिता महात्मा गांधी,
१७ सप्टें., १९१७ मुंबई.










श्री वैकुंठभाई मेहता.  डॉ. धनंजयराव गाडगीळ  श्री. आर्.जी.सरैय्या  प्रा. डी. जी. कर्वे




# श्रेयस्








- ग्रामीण विकास व सहकारी संघटना.
- राज्यसत्तेचे विकेंद्रीकरण व सहकारी अर्थव्यवस्था.
- महाराष्ट्रांतील ग्रामीण कर्जपुरवठा व रिझर्व्ह बँक.
- देशविदेशची सहकार मंडळे व पतपेढ्या.
- सहकारी संघटना व स्टेट बँक ऑफ इंडिया.
- सहकार व सरकार, अन्योन्य संबंध : मीमांसा.
- सहकारी चळवळीतील दोषस्थळें.
- सहकारी प्रक्रिया संस्था.
- शेतीविकास व लॅण्ड मॉर्गेज बँकांचे कार्य
- सहकारी योजना व कार्यक्रम अंतर्गत निधी जमविण्याचा प्रश्न.
- सहकारी औद्योगिक संस्था आणि त्यांचे प्रश्न.
- सहकारी कर्जव्यवस्था; काही प्रचलित प्रवाह
- भूतारण बँकांची भूमिका
- सहकारी चळवळीत रजिस्ट्रारचे स्थान
- शेतीसुधार, सहकार व सरकार









डॉ. सी. डी. दाते  श्री. एस्. एस्. महाबळ  डॉ. वी. ए. जागडे  डॉ. एस्. डी.


श्री. बी. व्यंकटअप्पय्या


श्री. एम्. मुखर्जी


श्री. व्ही. पी. वर्दे


श्री. जे. सी. रायन्


श्री. बी. पी. पटेल


श्री. टी. एम्. सारंदे


श्री. डी एस्.


श्री एल् एन् बोगीर

* सभासद शिक्षणाची भारतातील व परदेशांतील योजना.
* सहकारी चळवळीतील नवप्रवाह व महाराष्ट्रातील तिचे स्थान.
* लघुउद्योगाचा विकास व नागरी सहकारी बँका.
* सहकारी शेती.
* सहकारी संघटनेची भाग्यरेषा : महाराष्ट्राची सहकारी साखर कारखानदारी.
* सहकारी खरेदी-विक्री संघाचे सक्षमीकरण.
* विदर्भातील विणकर सहकारी संस्था
* विदर्भातील सहकारी घरबांधणी.
* सहकारी संघाचे स्थान व मूलगामी प्रभाव
* सहकारी विचाराची उत्क्रान्ति.
* सहकारी चळवळ व अनुसूचित प्रदेश आणि वन्य टोळ्या.
* व्यापारी बँका व सहकारी बँका : परिसंवाद.
* सहकार मंदिरे.
* सहकार तीर्थे.
* सहकार राउळे


श्री. सी जे राम.


श्री. के. सुब्रह्मण्यम् नायडू


डॉ डब्ल्यू. सी. धौधीमल


श्री. बापू बी. गावतोंडे


श्री. एम्. के. फिरोदिया


श्री. के. माधवराव


श्री एम् आर. पाळंदे


श्री बी. एस्. पागे



सहकारी संघटनेची संजीवनी !

# सहकार त्रिमूर्ती



सहकारी संघटनेची
पुण्यप्रभावी प्रेरणा !



सहकारी संघटनेच्या संवर्धनाचे सह्याद्रि !



भारताचे अर्थमंत्री मा. मोरारजीभाअी देसाअी
'महाराष्ट्र सहकार दर्शन' स्मृतिग्रंथाच्या
प्रकाशन समारंभाचे प्रमुख पाहुणे





श्री. भाअूसाहेब हिरे,
महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. चे
अुपाध्यक्ष, यांच्या सहकारी सेवेस हा
स्मृतिग्रंथ सादर समर्पित !

# संपादकीय



हाराष्ट्र सहकार दर्शन स्मृतिग्रंथ आपल्या सेवेस सादर करीत असतांना अत्यंत आनंद होत आहे. वास्तवत: "महाराष्ट्र राज्य सहकारी बँक" चा सुवर्णमहोत्सव २४ आक्टोबर १९६१ रोजीं पंतप्रधान नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा झाला त्याच वेळीं, सुवर्णमहोत्सव चिरस्थायी करण्याचे दृष्टीनें हा स्मृतिग्रंथ प्रकाशित करण्याची योजना होती. त्या सुमारास, इगतपुरी येथील रेल्वे अपघातांत, माझा उजवा हात जायबंदी होऊन, 'हॉस्पिटलायझेशन्' झाल्यानें ह्याचें प्रकाशन लांबणीवर पडलें. आज ह्या स्मृतिग्रंथाचें प्रकाशन, भारत भाग्योदयासाठीं भगीरथ प्रयत्न करणारे, सहकारी संघटनेची श्रद्धाशील प्रेरक शक्ति, भारताचे अर्थमंत्री श्री० मोरारजीभाई देसाई याचे शुभहस्तें होत आहे हें मोठेंच सौभाग्य होय ! शेतकऱ्याला सावकारी पाशातून सोडविण्यासाठीं सुरू झालेल्या चळवळीचे, प्रक्रियेच्या संस्करण स्वरूपातील रुपान्तरानें, कास्तकाराला कारखानदार करून, समृद्ध अन् संपन्न करणारे, क्रांतिकारक अशा आधुनिक सहकार युगाच्या पुण्यप्रभावी प्रेरणेचे नेते, डॉ. धनंजयरावजी गाडगीळ ह्यांनी ह्यासमारंभाचे अध्यक्षस्थान सुशोभित करावे हे खरोखरच सद्भाग्य होय ! मी उभयतांचा अंत:करणपूर्वक ऋणी आहे. हा 'अमृतयोग' सहकारी संघटनेचें संवर्धन व समृद्धीच्या दृष्टीनें शुभसूचक सुयोग ठरेल अशी माझी श्रद्धा आहे.

पत्रकार म्हणून जीवनास सुरुवात केल्यावर, सहकारी संघटनेच्या कार्यास लिखाण व साहित्य प्रकाशन याद्वारें मदत करण्याचेकार्यीं सतत प्रयत्नशील राहून, त्यादृष्टीनें १९५६ व ५७ सालीं "श्रीसंपरस्वती" मधून महाराष्ट्रांतील सहकारी साखर कारखानदारी व मध्यवर्ति सहकारी जिल्हा बँका याबाबत विशेष 'पुरवण्या' प्रसिद्ध केल्या होत्या. 'महाराष्ट्र राज्य सहकारी बँके"च्या सुवर्णमहोत्सवाची सुसंधि साधून मी स्मृतिग्रंथ प्रसिद्ध करावा अशी इच्छा, बँकेचे मॅ. डायरेक्टर डॉ. सी. डी. दाते व मॅनेजर डॉ. वा. चु. श्रीश्रीमल यांनी व्यक्त केली असतां आनंदानें मी तिचा स्वीकार केला. ही योजना आजच्या स्वरुपांत साकार करण्यासाठीं डॉ. दाते व डॉ. श्रीश्रीमल यांनीं जें सहाय्य केलें त्याबद्दल मी कृतज्ञ आहे. विशेषत: डॉ. दाते यांचें आपुलकीनें सक्रीय सहकार्य लाभलें म्हणूनच ह्या स्मृतिग्रंथाची मौलिकता वाढली. सहकारी व आर्थिक क्षेत्रांतील, थोर, नामवंत व्यक्तींनी, उदारतेनें लेखन सहाय्य करून विचारधनाच्या समृद्धीनें त्याची उपयोगिता वाढविली याबद्दल मी त्याचा चिरऋणी आहे.

ह्या सुप्रसंगी, ह्या बँकेचे उपाध्यक्ष सहकाराग्रणि श्री० भाऊसाहेब हिरे यांचा वियोग हृदयविदारक वाटतो. जनहिताची प्रामाणिक तळमळ असलेला नेता, राजकीय सत्ता नसताही, आपल्या समाजसेवेमुळें, जनतेच्या हृदयसिंहासनावर कसा आरुढ होतो ह्याचे श्री० हिरे हें मूर्तिमंत प्रतिक होत. निष्ठावंत सेवकाला समाजसेवेचीं अनेक दालनें उघडीं असतात. तळमळ मात्र हवी ! हे श्री० भाऊसाहेब यांनी गेल्या पाच वर्षांत, महाराष्ट्रांतील सहकारी चळवळींत आत्मीयतेनें भाग घेऊन, तिच्यांत नवचैतन्य निर्माण करून तिला जी गति आणि प्रेरणा दिली त्यावरून सिद्ध होत आहे. त्यांच्या अमरस्मृतीस ऋणाईत भावनेनें हा स्मृतिग्रंथ अर्पण करिताना मला कर्तव्यपूर्तिचे समाधान होत आहे !

सहकारी संघटनेची जो पुण्यशील परंपरा, थोर सहकार महर्षिनीं, महाराष्ट्रांत निर्माण करून, जे सहकारी चळवळीच्या प्रगतिचे प्रतिकात्मक संगीत निर्माण केलें आहे, ते असेंच अखंड चालू ठेवण्यास, त्या सर्वांच्या आशीर्वादें, आम्हांस स्फुरण व सामर्थ्य प्राप्त होवो हीच प्रभुप्रार्थना !!

गणेश स. शेंडुर्णीकर










# ग्रामीण विकास व सहकारी संघटना

श्री वैकुंठभाई मेहता



शाच्या प्रशासनासाठी लोकशाही विकेंद्रीकरणाच्या तत्त्वाचा स्वीकार, ही राजकीय क्षेत्रातील अलिकडील एक उल्लेखनीय घटना मानावी लागेल. देशाच्या बहुतेक राज्यात सध्या पंचायत राज्याच्या विचारसरणीचा प्रसार चालू आहे. सरकारी यंत्रणेची खेड्यांतील प्रतिनिधि असलेली ग्रामसंचालन, स्वायत्त शासन-संस्था म्हणून परिणामकारक व्हावी, हाच या विचारसरणीच्या प्रचाराचा उद्देश. खेड्यांबाबतची शासन-यंत्रणा त्रिसूत्री राहील. तळाशी ग्रामपंचायती रहातील. सामान्यतः विकासखंडांच्या विभागांत ( ब्लॉक ) प्रदेशात ह्या पंचायत समित्या एकत्र केल्या जातील व जिल्हा परिषदा किंवा जिल्हा कौन्सिलें यांच्यामार्फत त्यांना मार्गदर्शन मिळून त्यांच्यात सुसूत्रता निर्माण होईल. यापुढे अधिकाधिक सरकारी शासन या संस्थामार्फत चालविले जाईल. आपल्याला नेमून दिलेल्या क्षेत्रात, या तीन संस्था, राज्य व केंद्र, सरकारची बाहुलीं म्हणून काम न करता, राज्याच्या लोकसत्ताक स्वायत्त प्रतिनिधि म्हणून काम करतील.





चालू वर्षाचे प्रारंभी, सामूहिक विकास व सहकार खात्याने, एका अभ्यास मंडळाची नेमणूक केली. पंचायत-पद्धति व सहकारी आंदोलन यांच्या संबंधाच्या विविध पैलूंचा अभ्यास करणे हे या मंडळाचे कार्य आहे. या मंडळाची नेमणूक हे योग्य दिशेने टाकलेलें अतिशय रास्त पाऊल आहे. कारण, काही राज्यात पंचायत राज्य अस्तित्वात आल्यापासून, काही चुकीच्या उपाययोजनाचा प्रचार करण्यात येत आहे. या संदर्भात असे आढळून येत आहे की, पंचायत व सहकारी आंदोलन यांची कार्यक्षेत्रे कोणती, याबाबत चुकीच्या व भ्रामक कल्पना आहेत. ग्रामपंचायती सरकारच्या प्रतिनिधि आहेत तर सहकारी संस्था, कायद्याने निर्माण केलेल्या संस्था नसून स्वयस्फूर्त रीतीनें अस्तित्वांत आलेल्या कायदेशीर संस्था आहेत, हा मूलभूत सिद्धान्त लक्षात राहिलेला दिसत नाहीत.





पंचायती व सहकारी संस्था यांची कामें अगदी वेगवेगळी आहेत व त्यांच्यातील फरक न ओळखणें चूक ठरेल. आधी उल्लेख केल्याप्रमाणे पंचायती सरकारच्या प्रतिनिधि असतात तर काही विशिष्ट आर्थिक स्वरूपाची कामें पार पाडण्यासाठी लोकांनी स्वखुषीनें, स्वयस्फूर्त स्नेहभावनेने एकत्र येऊन, सहकारी संस्था स्थापलेल्या असतात. अर्थात् पंचायती व सहकारी संस्था यांच्यात विविध पातळ्यावर सहकार्य व सुसूत्रता असणें आवश्यक आहे. विकास व नियोजन या बाब-









तीत तर हें सहकार्य व सुसूत्रता यांची विशेष आवश्यकता आहे. जिल्हा परिषदेनें सहकारी संस्थाच्या प्रगतीवर लक्ष ठेवून, वार्षिक आढाव्या-नंतर सूचना करणें उपयुक्त ठरेल.

लघु उद्योग कामगार अगर मजूर सहकारी संस्था व खरेदी-विक्री संघटना, यांचेबाबतीत पंचायती व सहकारी संस्था यांच्यातील सह-कार्य व मदत विशेषेकरून हितप्रद ठरेल. अशा स्थानिक सहकारी संस्थांना, मालाचा पुरवठा होण्याबाबत व काम पार पाडण्याबाबत, पंचायतींनी अग्रहक्क दिला पाहिजे. घरासाठी जागा मिळविणें, जना-वराचे सागाडे गोळा करण्याची केंद्रें निवडणें व सागाड्याची विल्हे-वाट लावणें याबाबत पंचायतींनी, योग्य सहकारी संस्थाना, आपल्या यंत्रणेचा भाग म्हणून मान्यता दिली पाहिजे. वर उल्लेखिलेली कामे अंगावर घेण्यासाठी, पंचायतीना जादा अधिकार देण्याचे कारण नाहीं नव्या पंचायत कायद्यान्वये त्याना सामान्यत. मिळणारे अधिकार पुरेसे आहेत.

आतापर्यंत, परस्पराना छेदक अशी कामे झालेलीं नाहींत हें खरें आहे. पण, कांहीं क्षेत्रांत आज जी चर्चा चालली आहे ती पाहून अशी परिस्थिति निर्माण होणारच नाहीं, असे निश्चित सागता येणार नाही. नियोजन व विकास कार्य याबाबत सुसूत्रतेला भरपूर वाव आहे. खासगी व्यक्ति व कंपन्या नि सिंडिकेट यांचेपेक्षा सहकारी संस्थांना अधिक चागली वागणूक मिळाली पाहिजे. हें उद्दिष्ट साध्य होण्या-साठी, ज्या योगें परस्परांना विचारविनिमय करता येईल व पर-स्परांशी संबंध राखले जातील अशा प्रथा निर्माण केल्या पाहिजेत. एकमेकांच्या सभाना परस्पराचे प्रतिनिधि हजर राहू शकतील, अशी व्यवस्था करता येईल.

यासाठी, पंचायती व सेवा सहकारी संस्था याच्या कार्यक्षेत्राच्या मर्यादा एकच असण्याची आवश्यकता नाही. सामान्यत पंचायती व सहकारी संस्था यानी कामासाठी संयुक्तपणें नोकरवर्ग ठेवणे इष्ट नव्हे तसेंच, पंचायतींना सहकारी संस्थावर व सहकारी संस्थांना पंचायतीवर प्रतिनिधित्व देण्याचीहि जरूरी दिसत नाहीं तसें प्रतिनिधित्व न देताहि, संबंध राखता व वाढविता येतात सहकारी संस्थाचे स्वयंस्फूर्त व स्वायत्त स्वरूप आदरणीय मानलें जाणें आवश्यक आहेच पण वर सुच-विलेल्या धर्तीवर, सुसूत्रता निर्माण केली तर सहकारी संस्थाची स्वायत्तता नष्ट होण्याची शक्यता नाहीं

आता संपूर्ण शासनसंस्थेचे विकेंद्रीकरण करण्यात येणार असल्या-मुळें, एक अशी सूचना करण्यात आली आहे कीं, सहकारी संस्था काय-द्यान्वयें सहकारी संस्थाच्या रजिस्ट्रारना देण्यात आलेली सत्ता पंचा-यत समित्याकडे देण्यांत यावी. यापैकीं बहुतेक अधिकार न्यायविष-यक व निमन्यायविषयक आहेत इतर अधिकाराचे स्वरूप अशा तऱ्हेचे आहे की, ज्या देशात सहकारी आंदोलनाचा विकास एक चैतन्यपूर्ण चळवळ म्हणून झाला आहे, त्या ठिकाणी हे अधिकार विविध पातळीवर व उद्दिष्टासाठी फेडरल सहकारी संस्थाकडून वाप-रले जातात. रजिस्ट्राराचे हे अधिकार कोणाला द्यायचेच असतील, तर ते फेडरल सहकारी संस्थांना देणें योग्य ठरेल. रजिस्ट्रारचे न्याय-विषयक व निम-न्यायविषयक अधिकार त्याच्याकडेच ठेवले पाहि-जेत व बाकीचे अधिकार राज्यातील सहकारी कार्याचे स्थैर्य व विविध धता व दर्जा पाहून अधिकाधिक फेडरल संस्थाकडे सोपविले पाहिजेत.

धोरणाचा भाग म्हणून, सहकारी संस्थाच्या भाग-भांडवलाला सरकारनें जी मदत करावयाची, ती योग्य फेडरल सहकारी संस्था-मार्फतच केली पाहिजे. मात्र ज्या प्राथमिक सहकारी संस्थेच्या भाग भांडवलाला सरकार प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत करील, त्या संस्थेच्या-चालक मंडळावर पंचायतींचा एक सभासद असणें उपयुक्त ठरेल. पंचायतींचे निधि सहकारी संस्थानच ठेवण्याची व्यवस्था झाली पाहिजे. संबंधित विभागामध्यें सुस्थापित सेवा सहकारी संस्था किंवा मध्यवर्ती बँकेच्या शाखा असणें आवश्यक आहे.

अद्याप अनेक राज्यांतील कायद्यात, तपासणीच्या कामाचा उल्लेख देखील नाहीं पण हे कायदे दुरुस्त होतील, त्यावेळीं त्याबाबतची व्यवस्था होईल. देखरेखीची व्यवस्था राज्याराज्यातून वेगवेगळी आहे. एकाच राज्यातहि देखरेखीची यंत्रणा संस्थानुरूप विविध प्रका-रची आहे. सहकारी चळवळींत अग्रेसर असलेल्या बहुतेक सर्व देशात फेडरल सहकारी संस्थामार्फतच काम चालते. भारतांतल्या कांहीं राज्यात, प्राथमिक शेतकी सहकारी संस्थांची आर्थिक देखरेख मध्य-वर्ती बँकानी करण्याची पद्धत आहे. या फेडरल संस्था, प्राथमिक संस्थाना लागणारा बहुतेक पैसा पुरवीत असल्यामुळें, रुरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनें, ही पद्धत चालू रहावी, अशी शिफारस केली आहे. ज्या ठिकाणी, देखरेखीचे स्वरुप प्राथमिक हिशेब तपासणीचें असतें, त्या ठिकाणी सहकारी खात्याच्या नोकरवर्गाहि देखरेखीचे काम करूं शकतो. मात्र, यापैकी कोणत्याहि स्वरूपाच्या तपासणीचे वा देख-रेखीचे काम पंचायत संघटनावर सोपविण्याची जरूरी नाहीं

आरंभीच सुचविल्याप्रमाणे, आपापल्या क्षेत्रात सहकारी चळ-वळीचा विकास करण्याचे कार्यात पंचायत संघटनानी भाग घ्यावा. को–ऑपरेटिव्ह युनियन्स किंवा बोर्डस् याच्या या क्षेत्रातील हाल-चालींना पूरक कामें पंचायती करू शकतील विशेषतः सभासदांच्या शिक्षणाबाबत, पंचायतींनी सहकार्य केल्यास, ग्रामीण जनतेंत सह-काराबाबतची माहिती व ज्ञान पसरण्यास खूपच मदत होऊ शकेल.

वरिष्ठ पंचायत संघटनानी, योजना आखण्याचे व सहकारी संस्थाच्या प्रगतीवर लक्ष ठेवण्याचे काम प्राधान्येंकरून करावे. खेड्याचे उत्पादन वाढविण्याची योजना बनविण्याचे कामी, पंचायत व सहकारी संस्था याचे निकटचे सहकार्य असणें अत्यंत आवश्यक आहे. योजून आखलेलें कार्यक्रम पार पाडण्यासाठी मार्गदर्शन करणें माहितीची देवाण–घेवाण करणें येथपर्यंत सहकार्याचा विस्तार व्हावा सहकार विकास कार्यक्रम किंवा उत्पादन योजना निर्मिती याचेसाठी सहकारी खातें, जिल्हाधिकारी व ब्लॉक् विकास अधिकारी याचे-पाशी जो जो निधि असेल तो तो त्यानी योग्य पंचायत अधिकाऱ्याना उपलब्ध करून द्यावा

★★★










# राज्यसत्तेचें विकेंद्रीकरण व सहकारी अर्थव्यवस्था

*डॉ. धनंजयराव गाडगीळ*






ज्यसत्तेचे विकेंद्रीकरण करण्याच्या योजनांचा आजकाल फार उत्साहानें पुरस्कार केला जात आहे. या योजनाचे स्वरूप सर्वत्र सारखें नसलें तरी तद्भूत अनेक प्रश्न सगळीकडे महत्त्वाचे समजले जातात. यापैकी एक प्रश्न म्हणजे राज्यसत्तेच्या विकेंद्रीत घटकाचा, ग्राम पंचायती, जिल्हा बोर्ड इत्यादिकाचा, निरनिराळ्या प्रकारच्या व निरनिराळ्या स्तरावरच्या सहकारी संस्थाशी किती व कोणत्या प्रकारचा संबंध असावा हा आहे. विकेंद्रीत राज्यसत्ताघटक हे स्थानिक सार्वजनिक कारभारांतील मुख्य कार्यवाह व सहकारी संस्था या स्थानिक अर्थव्यवहार चालविणाऱ्यांत प्रमुख असें मानल्यास या दोहोंचे संबंध निकट व सहकार्य संपूर्ण हवे हें उघड आहे; नियोजित अर्थव्यवस्थेंत असें असणें विशेषच महत्वाचें. हें सर्वमान्य झालें तरी हे संबंध कशा प्रकारचे असावे याबाबत आज मतभेद दिसून येतात. या विषयीच्या विवाद्य प्रश्नाचा तपशिलात विचार येथें करण्याचा विचार नाही. परंतु कोणत्या तात्त्विक बैठकीवरून त्या सर्वांचा विचार झाला पाहिजे हे थोडक्यात येथे निर्देशावयाचे आहे

महकारी चळवळीच्या पुरस्कर्त्यांचे एक पुरातन तत्त्व या चळवळीस राज्यसत्तेपासून अलिप्त राखणे असें होतें व कांही देशात हा विचार अढळ सिद्धांतरूप होऊन बसला होता. इतर ठिकाणी सरकारी मदत थोडी बहुत स्वीकारली तरी सहकारी सस्थावर सरकारी नियंत्रण नसावे याविषयी आग्रह होता. या देशातील तत्कालीन राज्यसरकार भांडवलशाहीचा पुरस्कार करणारे व मजूर-शेतकरी इत्यादींच्या सहकारी हालचालींस विरोधक अगर त्याविषयी उदासीन असें असल्यामुळे हा विचार व आग्रह दृढ झाला होता परंतु ज्या नवोदित समाजांत सहकारी चळवळ बाह्य पुरस्काराशिवाय व सरकारी पाठपुराव्याखेरीज मूळ धरू शकत नव्हती तेथे हा जुना विचार बदलणे प्राप्त ठरलें व सरकारी मदत व मार्गदर्शन या दोहोंचा स्वीकार करावा लागला. विशेषतः नियोजित आर्थिक विकासाच्या कार्यक्रमात सहकारी संस्थास मध्यवर्ति स्थान देऊन सार्वत्रिक सहकारी अर्थव्यवस्था निर्माण्याचा विचार जेथे मान्य झाला तेथें या संबंधीचा दृष्टिकोन पुरा बदलणें आवश्यक झाले.

असें असलें तरी सहकारी अर्थसंस्था व सरकार यांचे बदललेल्या परिस्थितीत संबंध काय असावे हें ठरविताना सहकारी संस्थांचे मूळ सहकारी स्वरूप कायमचे बदलणार नाही याची काळजी घेणें आव-

श्यक आहे. सहकारी अर्थव्यवस्थेचे दोन मुख्य विशेष म्हणजे स्वावलंबनाकरितां सहकारी व्यवहार व त्याचे स्वनियंत्रण हे होत. सरकारी मदत घेतली असता स्वावलंबनास बाध येतो व प्राथमिक अवस्थेत न घेतली तर प्रगति होऊं शकत नाही हा अवघड पेच गरीब अविकसित देशांत निर्माण होतो. म्हणून सर्वमान्य मार्ग म्हणजे प्राथमिक अवस्थेत आवश्यक तेवढी मदत जरूर घ्यावी पण ती घेतांना व पुढील प्रगति साधताना बाह्य मदतीवर नेहमी अवलंबून राहावे लागणार नाही व पूर्ण स्वावलंबनाची अवस्था शक्य तितक्या लवकर गाठतां येईल असें धोरण ठेवावें हा आहे.

तसेंच नियोजित अर्थव्यवस्थेत सहकारी संस्था पूर्णपणें स्वनियन्त्रित असणें शक्य नाहीं. नियोजनाच्या आराखड्याप्रमानें त्यांनीं ज्या प्रकारचें कार्य करावयाचे आहे व जी मजल गाठावयाची आहे ती स्पष्ट दिशेनें गाठली जात आहे हें पाहणें, त्याबाबत नियमन करणें हें केव्हांही शासन संस्थेनें केलें पाहिजे. पण या बाह्य मर्यादा संभाळल्यास इतर बाबतीत स्वनियन्त्रणाचा आग्रह धरला पाहिजे; नाहीतर संस्थेचे सहकारी स्वरूप नष्ट होईल.

स्वावलंबन व स्वनियंत्रण केवळ सहकारी संस्थांनीच इष्ट मानले आहेत असें नाही. प्रत्येकानें शक्यतों स्वतःच्या पायावर उभे रहावें, इतरावर, समाजावर आपला भार पाडू नये हें सर्व अवस्थेतील समाजांत सर्वमान्य तत्त्व आहे. स्वावलंबनाचा अर्थ समाजाची विशेषतः अर्थव्यवहाराची बैठक ज्याप्रमाणें बदलेल त्याप्रमाणें बदलत असणें. सर्व अर्थव्यवहार व्यक्तिनिष्ठ असावे व सामाजिक, सामूहिक अर्थव्यापाराचे क्षेत्र अगदी संकुचित असावें ही विचारसरणी मान्य असली म्हणजे व्यक्तिव्यवहार अनिर्बंध चालूं देणे असा स्वावलंबनाचा अर्थ ठरतो. समाजवाद मान्य करणाऱ्या राज्यात स्वावलंबनाचा अर्थ अगदी निराळा होतो. समाजानें नियुक्ति केल्याप्रमाणे झटून उद्योग करणें यांतच स्वहित व स्वावलंबन आहे असें येथे समजलें जाते.

स्वावलंबनाची इष्टता तत्त्वतः सर्व समाज मान्य करितात; स्वनियमनाचे तसें नाही. लोकशाही, गणराज्य, अशा प्रकारची राज्यव्यवहाराची घडी जेथें आहे तेथेंच फक्त समाजव्यवहारात व्यक्तिगत किंवा सामूहिक स्वनियमनाची इष्टता किंवा शक्यता मानली जाते, पण हे ही सर्व क्षेत्रात किंवा सर्व थरावर नेहमीच मानली जाते असें नाहीं. याकरितां ज्या प्रमाणात सर्व बाबतीत अगदी लहान–लहान गटानासुद्धा इष्ट रीतीनें स्वयंशासित राहता येतें त्याप्रमाणात लोकशाही प्रत्यक्षात उतरली आहे असा सिद्धांत बरेचजण मांडतात आणि विकेंद्रीकरणास मिळत असलेला प्रचलित पाठिंबा या सिद्धांतावरच मुख्यतः आधारित आहे.

परंतु कोणत्याही समूहानें किंवा सबंध समाजानें स्वनियमन करणें याचा अर्थ काय, याचा व्यावहारिक मार्ग कोणता हें समजावणें किंवा व्यवहारात उतरविणें यात अनेक अडचणी उत्पन्न होतात सगळेच नियंते कसे होऊं शकतील? पण एकानें दुसऱ्याचे, काहींनी इतरांचे नियमन केलें, त्यावर हुकमत चालविली, म्हणजे हे स्वनियमन कसें मानावयाचे? असल्या प्रश्नास तात्त्विक उत्तर देणें कठीण आहे. तसा अर्थी, स्थूल मानानेंसुद्धां सर्वांचे स्वतःवरचे नियमन व्यवहारात होईल, सत्ता थोड्यांच्या हातात जाणार नाही, हें प्रत्यक्षात साधणें तितकेंच कठीण आहे. याबाबत अनेक कल्पना पुढें मांडल्या जातात, अनेक यद्युक्त्या सुचविल्या जातात. यांतील सर्वमान्य विचार–व्यवहाराची दिशा म्हणजे सत्तेचें शक्य तेवढें विभाजन करावे, निरनिराळ्या प्रमाणें निरनिराळ्या कारभारातील सत्ता-वापरांत अनेकांस जितकें सहभागी करिता येईल तितकें करावे ही आहे.

ज्या प्रश्नांचा विचार आपण करीत आहो त्यासंबंधीत या सत्ता-विभाजनाची दोन अंगे महत्त्वाची आहेत. समाजाचे सामूहिक व्यवहार अनेक प्रकारचे असतात. कौटुंबिक, व्यावहारिक, धार्मिक असे अनेक भेद त्यात असतात. शिवाय सर्व प्रकारच्या सामूहिक कारभाराच्या विस्ताराचे क्षेत्रही विशिष्ट कार्यपरत्वें स्थूल, विभाग, अखिल समूह असें विभिन्न असतें. सर्व समाजसत्तेचे विभाजन या दोन्ही प्रकारे होऊ शकते. सामाजिक व्यवहार अनेक प्रकारचें असलें तरी या सर्व व्यवहारांचे सुसूत्र सार्वत्रिक नियमन व्हावे याकरिता सर्वांचा समावेश करणारी एक चौकट आवश्य आहे. पूर्वकालापासून दंडधारी राज्यसत्ता ही सार्वत्रिक नियमन करीत आली आहे पण याचा अर्थ राज्यसत्तेचा अबाधित अधिकार सर्व क्षेत्रात चालतो अगर चालावा असे नाही. एका क्षेत्रानें दुसऱ्यावर अतिक्रमण करु नये, एकमेकाच्या कारभारांत फार विसंगती उत्पन्न होऊं नये, इतपत सामान्य सर्वव्यापी नियमन सर्व क्षेत्राचे राज्यसत्तेनें करणें हें उचित असलें तरी मूलतः सर्व निरनिराळे समाजव्यवहार स्वायत्त समजले जावे. विभाजनाबाबत हा विचार फार महत्त्वाचा आहे. धर्मकारण, राजकारण, अर्थकारण याची वल्हशी फारकत असावी व प्रतिष्ठा, राज्यसत्ता व पैसा ही एकाच वर्गाच्या हाती केंद्रीत नसावी हें तत्त्व आपल्याकडेही पूर्वापार मान्यता पावलें आहे. राज्यकारभाराच्या, हुकूमशाहीच्या आधुनिक अनुभवावरूनही हा सिद्धांत आज तत्त्वतः सर्व स्वीकारतात.

अर्थ व्यवहारापुरता विचार करताना स्वायत्ततेचा अर्थ कसा लावावयाचा ते आता पाहिले पाहिजे अनिर्बंध व्यक्तिव्यवहार जेथें प्रचलित आहे तेथें स्वायत्तता व पूर्वी वर्णिलेले स्वावलंबन यात फारसा फरक नाही कारण येथें राज्यसत्तेनें लादलेल्या व्यापक चौकटीत सर्व व्यक्तिव्यवहार अनियंत्रीत असून अमूक थरावर अमूक प्रकारच्या समूहाचे म्हणून ते व्यवहार एकत्रित होतील असें निश्चित सांगता येत नाही ते असें होणें न होणें केवळ व्यक्तिस्वभावावर व निर्णयावर अवलंबून. तेव्हां व्यक्तिस्वातंत्र्य व स्वावलंबन याहून निराळा अर्थ स्वायत्ततेला या समाजात उरत नाही उलट जेथे अर्थव्यवहारात सामूहिक व्यवस्थेचे किंवा कारभाराचे महत्त्व विशेष तेथें स्वावलंबनाचा विचार सामाजिक किंवा सामूहिक दृष्टीतून करावा लागतो व स्वायत्ततेला निराळे महत्त्व प्राप्त होते. सहकारी कार्यकर्त्यांचा दावा असा की, सहकारी व्यवस्थेस संपूर्ण स्वावलंबी स्वयंशासित व्यवस्थेचे स्वरूप देता येईल किंबहुना तिचे खरे स्वरूप असेंच आहे.

लोकशाही व विकेंद्रीकरण या दोन्ही कल्पना सहकारी व्यवस्थेत मूलतःच समाविष्ट आहेत. स्थानिक प्राथमिक संस्था या समग्र सहकारी व्यवस्थेस पायाभूत आहेत. व्यक्तिसभासद मुख्यतः प्राथमिक संस्थांचेच असतात. यांचा कारभार स्वायत्त असला म्हणजे अर्थव्यवहाराचे शक्य तेवढें विकेंद्रीकरण झाले असें म्हणता येते. अनेक प्राथमिक संस्था विशिष्ट कार्याकरितां एकत्र येऊन इतर सहकारी संस्था काढू शकतात. तसेंच निरनिराळ्या प्रकारच्या सर्व प्राथमिक संस्थांची थरायरानें संघात्मक व्यवस्था बनते. याप्रमाणें विविधांगी, विकेंद्रीत परंतु व्यापक सुसूत्र व एकात्म अशी सहकारी व्यवस्था बनविता येते. अशा व्यवस्थेनें जेवढें क्षेत्र व्यापलें तेवढ्यापुरतें लोकशाही व विकेंद्रीकरण याबाबतचे प्रश्न उरण्याचें कारण नाही.

अशा सहकारी व्यवस्थेबरोबर विकेंद्रीत राज्यसंस्थांचे संबंध कसे असावे हा या लेखाचा मुख्य विषय आहे. निरनिराळ्या स्तरावरील सहकारी संस्थांचे त्या त्या स्तरावरील शासन संस्थांबरोबर निकट संबंध असावे याबद्दल वाद नाही. अनेक गोष्टी या दोहोंच्या विचार विनिमयानें व सहकार्यानें कराव्या लागणार हेही सर्वमान्य आहे. प्रश्न येतो या दोहोंत मतभेद झाल्यास काय करावयाचे? सर्वव्यापी नियमन करण्याचा राज्यसत्तेचा अंतीम राखीव हक्क कोणी बजावाव-याचा याविषयीचा. राज्यकारभाराचे विकेंद्रीकरण झालें म्हणजे प्रत्येक थरावरच्या शासन संस्थेनें त्या थरावरच्या सहकारी संस्थावर हुकमत चालवावयाची असा अर्थ अनेक जण करतात व तो सर्वमान्य होऊं पहात आहे. सहकारी कार्यकर्त्यांच्या व तज्ञांच्या मतें हें पूर्णपणें चूक आहे. सहकारी व्यवस्था ही एकजिनसी स्वयंशासित मानली तर तिचें व्यापक-दृष्ट्या मार्गदर्शन करणें व तिच्या कार्याच्या अंतिम मर्यादा ठरविणें हें कार्य सर्वश्रेष्ठ राज्यसत्तेनेंच केले पाहिजे; आणि ठरविलेल्या मर्या-देत व आखलेल्या पद्धतीत सर्व तपशीलवार कारभार व त्याची विभा-गणी या गोष्टी सहकारी व्यवस्थेवर सोपविल्या पाहिजेत. नहून प्रत्येक स्तरावर व प्रत्येक संस्थेचे वेगवेगळें नियमन होऊं लागल्यास सहकारी व्यवस्थेच्या स्वायत्तेस कांही अर्थ उरणार नाही. संलग्न कार-भार व सहकार्य हे स्तरास्तरावर अवश्य घडेल परंतु नियमन करावयाचे तें फक्त समग्र सहकारी व्यवस्थेचे, राज्य यंत्रणेनें ठरलेल्या बाबीत ठर-लेल्या अर्थानें विशिष्ट सहकारी संस्था किंवा कोणत्याही स्तरावरील संस्थांचा गट यांचे नियमन राज्यसत्तेनें करावयाचे नसून ते सहकारी व्यवस्थेनेंच स्वतः करावयाचें आहे नियोजित पद्धतीनें नियोजित दिशेनें सर्वांचा कारभार चालतो हें तपशिलात पाहण्याची जबाबदारी सहकारी व्यवस्थेची हाच खरा स्वायत्ततेचा अर्थ आणि वर सांगि-तल्याप्रमाणें सत्तेचे फाजिल केंद्रीकरण शासन संस्थेत होऊं नये या-करिता क्षेत्रशः सत्तेचे विकेंद्रीकरण म्हणजे क्षेत्राक्षेत्रांची स्वायत्तता रक्षिणें हेंच होय !

नवीन कायद्यानुसार करण्यात येत असलेला लोकशाही विकेंद्री-करणाचा प्रयोग हा फार महत्त्वाचा प्रयोग आहे पण त्याहीपेक्षां समाज-सत्तेच्या विकेंद्रीकरणाचा विचार हा माझ्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. महत्त्वाचा या अर्थानें—व्यापक अर्थानें की—आपला भविष्यांतील समाज दुर्बळ राहणार की, सबळ होणार, तो स्वायत्त, स्वयंशासित खऱ्या अर्थानें होणार की, न होणार हे याच्यावर अवलंबून आहे, आणि शेवटी तें कोणत्याहि रीतीनें कायद्यावर अवलंबून नाही ! कायदे वाईट असले तरी वाईट फारसे होणार नाही, चांगले असले तरी त्यानें आपो-आप चांगले घडून येईल असे नाही. कोणतीहि आपोआपची प्रक्रिया येथें होऊं शकत नाही. आपण किती स्वयंशासित आहोत, आपण सगळे सत्ताव्यवहारात किती सहभागी होतो, आपआपल्या ठिकाणी आपले बळ आपण किती प्रस्थापित करतो, राज्यसत्तेवरसुद्धां किती प्रभाव टाकूं शकतो, आणि सत्ताधाऱ्यांना सांगू शकतो की, आपलें हें कार्य आहे, आपले हे स्थान आहे, नोकरांचेहि हें स्थान आहे, आम्ही कोण-तरी समाजातले आहोत. आमचेहि प्रत्येकाचे असे स्थान आहे. आम्हें हि आपल्या तऱ्हेने कारभार करणार—असाच हा स्वतंत्र, स्वायत्त समाज असूं शकतो, एरवी नाही. हें जेव्हां आपल्या सगळ्यांना कळायला लागेल, ब्रिटिश अमदानीतील परंपरा विसरून जाऊन जुने काही संकेत, पण नव्या अर्थानें मनात बाळगूं शकू, ज्यावेळी असा विचार करू शकू, आचरणांत आणू शकूं तेव्हांच खऱ्या अर्थानें सत्तेचे, समाजसत्तेचे विकेंद्रीकरण होईल व स्वयंशासित—स्वावलंबी आणि म्हणून समर्थ असा समाज आपल्याला दृष्टीस पडेल.

समाजसत्तेच्या विकेंद्रीकरणाची इष्टता व आवश्यकता अनेक दृष्टीनें सांगता येते. सत्ता केंद्रित होणे अनिष्ट म्हणून खऱ्या अर्थानें लोकशाही प्रस्थापित करावयाची तर जितक्या अधिक अंशानें अधिक लोकांस समाजकारभारात प्रत्यक्ष भाग घेता येईल तितका इष्ट म्हणून सर्व कारभार जितका निकट संबंधीत लोक हाताळतील तितका तो लोकहितकारी व लोकमतानुवर्ती पद्धतीनें चालविला जाईल म्हणून समाजसत्ता खऱ्या अर्थानें फार व्यापक आहे. सर्वच समाजाचे विविध व्यवहार व त्याचे नियमन याचा यांत समावेश होतो आपल्याकडे ब्रिटिश पूर्वकालात समाजसत्तेचें विकेंद्रीकरण बऱ्याच प्रमाणात झालेले होते. राज्यव्यवहार भौगोलिक आदि कारणामुळें फार केंद्रित नसत. प्रादेशिक विशेषतः ग्रामसमाज याबाबत मोठ्या अंशी स्वायत्त होते. तसेंच आर्थिक, धार्मिक, सामाजिक इत्यादि अलग क्षेत्रातील व्यव-हाराचे नियमन त्या त्या क्षेत्रातील संस्था व अधिकारी यावरच बहु-तांशी सोंपविलेले होते ब्रिटीश आमदानीत हें सगळें बदलले. स्थानिक ग्रामस्वायत्तता नष्ट झाली. इतर क्षेत्रांत स्वायत्तता राखून सुसूत्रता आणणें हें कार्य राज्यसत्ता करीनाशी झाली व नोकरशाहीखेरीज इत-रांचे अधिकार व प्रतिष्ठा नाहीसे झाले. यामुळें समाज अनेकशः विभा-गला गेला, त्याची स्वयशासन करण्याची संवय मोडली, त्यातील पुढारीपण नाहीसे झाले. आज या हीन स्थितीपासून वर येण्यास सुरवात करावयाची आहे. म्हणून काय करावयाचे आहे, त्याचे स्वरूप ओळखून घेणें फार महत्त्वाचे आहे. आज चर्चा राज्यसत्तेच्या विकेंद्रीकरणाच्या कायद्याबाबतच मुख्यतः होते. समाजसत्तेचे क्षेत्रवार विकेंद्रीकरण हें त्याहूनही महत्त्वाचे आहे. हे कायद्यापेक्षा राज्यसत्ताधारी व प्रत्येक

क्षेत्रांतील कार्यकर्ते यांची वृत्ति व यांच्या दरम्यानचे सबंध यावर अवलंबून आहे. तसेच विकेंद्रीकरण राज्यसत्तेचे झाले तरी प्रत्यक्ष लोक व लोकनेते किती व कसा प्रत्यक्ष कारभार करतात, जबाबदारी उचलतात त्यावरच खरें फलित अवलंबून. राज्यसत्ता व तिचे नोकर यांचीच प्रतिष्ठा राखणें, त्यावर भिस्त व भार टाकणें याऐवजी प्रत्येकानें आपापल्या ठिकाणी निग्रहानें व निर्भीडपणें काम करणें, जबाबदारी घेणें व अनिष्टपणाला धीरानें प्रतिकार करणें यांची संवय समाजास लागली तरच खऱ्या अर्थी समाजसत्तेचे विकेंद्रीकरण होऊं शकेल व ते सुफलदायी ठरेल.

सहकाराची साध्या वाटणाऱ्या बाबांची तात्विक भूमिका ही अशी आहे. दूरवर विचार करता ही पट्ट टिकविणे महत्त्वाचें आहे. म्हणून सर्व सहकारी कार्यकर्त्यांनी व राजकारणातील पुढाऱ्यांनी ही नीटपणें समजावून घेतली पाहिजे. हें सुकर करणें एवढाच या छोटेक लेखाचा हेतू.

★ ★ ★



सहकार आणि सहजीवनाची कल्पना भारत देशाला नवीन नाही. हजारों वर्षापासून चालत आलेली ती आमच्या दैनंदिन जीवनाची रीतच आहे. एकता, प्रेम व सहकार्य हे आमच्या जीवनाचे स्थायीभाव आम्ही दुसऱ्यांना आमच्यात सामावून घेतले आणि बंधुभावाने, एकदिलानें नांदलो याची साक्ष आमचा तेजस्वी इतिहास देत राहील. "सर्वं खल्विदं ब्रह्मं", सर्व ठिकाणी ब्रह्म आहे अशी आमची श्रद्धा आहे. महाराष्ट्रांतील संतांनी, एकतेची आणि दुसऱ्यासाठी त्याग करण्याची शिकवण मराठी माणसास दिली. "एकाकरतां सर्व, आणि सर्वांकरितां एक" या सहकारी भूमिकेला योग्य असें वातावरण निर्माण करण्याचें कार्य ह्या महान् संतांनी केलें. समर्थ रामदासांनी दुसऱ्याच्या सुखांत सुख मानावें, दुसऱ्याचें दुःख जाणून वांटून घ्यावे आणि समुदायाच्या बरे वाईटपणात सहभागी व्हावें असें सांगितले सत शिरोमणी तुकाराम यांनी " एक मेकां करूं साह्य । अवघे धरूं सुपथ ।" असा सहकार युगाचा आदेश दिला. भारतांत वेदकालापासून सहजीवनाचा व सहकाराचा सिद्धांत मानण्यांत आला असून ह्या सिद्धांताचा उल्लेख वेदग्रंथांत सांपडतो

सहना ववतु, सहनौ भुनवतु, सहवीर्य करवावहै ।<br>
तेजस्विना वधीतमस्तु । मा विद्विषावहै ।।








# महाराष्ट्रांतील ग्रामीण कर्ज-पुरवठा रिझर्व्ह बँक

श्री. बी. व्यंकटप्पय्या ......
चेअरमन स्टेट बँक ऑफ इंडिया



शेती मालाचे उत्पादन आणि त्याची विक्री करण्यासंबंधीची तरतूद १९३४ च्या रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया ॲक्टमध्ये करण्यात आली. तसेच शेतीसाठीं कर्जपुरवठा करण्याबाबत सरकार, सहकारी बँका व इतर बँका यांना सल्ला देण्याकरितांहि एक स्वतंत्र खातेंच बँकेने चालवावें अशी तरतूद करणारे खास कलमच या कायद्यात आहे. तथापि शेतीकरिता कर्ज देण्याबाबत बँकेचे धोरण प्रारंभी उपकारक असलें तरीहि तें विशेषत्वानें चोखंदळ आणि आणि अलिप्ततेचेंच होतें. शेतीची पुनर्घटना करण्याचे आणि ती बळकट करण्याचें काम बरेंचसे पार पडल्याखेरीज देशातील केंद्रीय बँकेला कर्जपुरवठा करणें अशक्य आहे अशी ह्या बँकेची भावना होती आणि म्हणूनच सल्लागाराचीच भूमिका प्रथम तिनें घेतली होती. शेतीसाठी पुरेसें कर्ज देण्याकरिता सहकारी संस्थेखेरीज दुसरी कोणतीहि संस्था कार्यक्षम होणार नाही हे रिझर्व्ह बँकेस पूर्ण माहीत होते. परंतु अगदी शेवटचा उपाय म्हणून कर्ज देणाराची जी परंपरागत भूमिका बँकेने घेतली होती ती सोडण्यास बँक तयार नव्हती. सरकारला सादर केलेल्या अहवालातील पुढील परिच्छेद बँकेच्या प्रारंभीच्या पर्वाची कल्पना आणून देईल. हा परिच्छेद असा :

" रिझर्व्ह बँक वर दिलेल्या तत्त्वावर इतर राज्य सहकारी बँकांबरोबर व्यवहार करील परंतु मोठ्या प्रमाणावर कर्ज पुरवठा करणें तिला शक्य नाही. तसेच प्रत्येक बँकेची परिस्थिति लक्षात घेण्याचे स्वातंत्र्य रिझर्व्ह बँक राखून ठेवीत आहे. शिवाय हेहि लक्षात घेतले पाहिजे की, राज्य सहकारी बँकेला जर पैशाची गरज भासली तर तात्पुरत्या काळापुरती ही गरज भरून काढण्याचे काम रिझर्व्ह बँक करील पण कायद्याने निर्देशित केलेल्या मुदतीत सहकारी बँकांनी रिझर्व्ह बँकेकडून घेतलेले कर्ज परत केलें पाहिजे. या पैशाचा उपयोग राज्य सरकारी बँकेला कायमचा वा सततचा निधि म्हणून करता येणार नाही. "

### स्वातंत्र्यानंतर

तथापि सहकारी तत्त्वावर शेतीसाठी कर्ज देण्याची जी व्यवस्था होती ती बाहेरून आर्थिक मदत मिळाल्याखेरीज विशेष काही साध्य करूं शकणार नाही हे लवकरच लक्षात आलें. बाहेरून आर्थिक मदत मिळण्याच्या साधनांपैकी एक साधन म्हणजे रिझर्व्ह बँक. तेव्हा राज्य



सहकारी बँकाना सवलतीच्या व्याजाच्या दरानें कर्ज देण्याचें धोरण रिझर्व बँकेनें सन १९४२ मध्यें जाहीर केलें. परंतु त्यासाठी जी कार्यपद्धति स्वीकारण्यात आली होती ती फार काटेकोर होती व सुकर नव्हती. त्यामुळें या सवलतीचा फारसा फायदा राज्य सहकारी बँकाना घेतां आला नाही. पण १९४७ साली स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर रिझर्व बँकेच्या धोरणात व कार्यपद्धतीत खरा फरक पडला. तत्पूर्वी ही बँक अलिप्त राहून निव्वळ सहानुभूतिच दाखवित होती, पण आता सहकारी चळवळीच्या वाढीस व विकासास प्रत्यक्ष हातभार लावण्याचे काम ती करूं लागली.

(१) शेतीला कर्जपुरवठा करण्यासाठी सहकारी संस्था याच उत्तम साधन होत, (२) सहकारी तत्त्वावर कर्ज देणाऱ्या संस्थाना रिझर्व बँकेने सुलभ व सवलतीनें कर्जपुरवठा केला पाहिजे, (३) आणि यासाठी बँकाची पुनर्घटना करून त्या समर्थ बनविल्या पाहिजेत, तसेंच रिझर्व बँकेपासून तों थेट प्राथमिक पतपेढीपर्यंत सर्व कर्जपुरवठा करण्याच्या पद्धतीची पुनर्रचना केली पाहिजे. हें धोरण सर्वसाधारण रीत्या मान्य झालें. ही विकासानुकूल दृष्टी रिझर्व बँकेसारख्या केंद्रीय बँकेच्या बाबतीत कांहीशी अभिनव होती. पण १९५२ साली बँकेच्या केंद्रीय संचालक मंडळानें याच दृष्टीचा पुरस्कार आपल्या वार्षिक अहवालांत केला. त्यानी म्हटलें आहे की, ' ग्रामीण कर्जपुरवठा करण्याची जी पद्धति औद्योगिक दृष्ट्या अतिशय पुढारलेल्या अशा पाश्चात्य राष्ट्रातील केंद्रीय बँका अवलंबितात तीच मार्गदर्शक म्हणून आपल्या देशात मानणें हिताचे होणार नाही.' अखिल भारतीय ग्रामीण कर्ज पुरवठा पाहणी समितीनें रिझर्व बँकेच्या या नव्या धोरणास पुढील शब्दांत पाठिंबा दिलेला आहे.

> ही समिति म्हणते, " आमचा असा विश्वास आहे की, रिझर्व बँकेनें विकासशील असें ( पूर्वीच सूचित केलेलें ) जें कार्य अंगिकारिलें आहे तें अगदी वेगळ्या परिस्थितीतील देशामधील केंद्रीय बँकाच्या परंपरागत पद्धतीपेक्षा वेगळ्या प्रकारचे आहे हें सत्य असलें तरी या देशातील मध्यवर्ति बँकेनें जें करणें आवश्यक आहे. ती जबाबदारी व कर्तव्य पार पाडणें मात्र यामुळें तिला जवळपास शक्य होणार आहे "

## : दोन मतें :

आता १९४४ ते १९५० या दरम्यान रिझर्व बँकेच्या धोरणात कसकसा फरक झाला हे पाहणें उद्बोधक ठरेल प्रथम बँकेचे देशव्यापी धोरण काय होतें तें पाहून तदनतर पूर्वीच्या मुंबई राज्यापुरतें कोणतें धोरण होतें त्याची तपासणी करू शेती, जंगलें, मच्छिमारी याबाबतच्या शेतीकर्जपुरवठा उपसमितीच्या धोरण समितीनें म्हणजेच गाडगीळ समितीनें १९४४ साली असें मत व्यक्त केलें होतें की, शेतीला कर्जपुरवठा करण्याचे कार्य सहकारी पतपेढ्याकडून अनेक राज्यात काहीं विशेष प्रमाणात पार पडत नाही. आणि नजिकच्या काळात शेतीला कर्जपुरवठा करण्याचे एकमेव साधन या पतपेढया बनतील असें मानतां येणार नाही. तेव्हा ज्या राज्यात सहकारी पतपेढया पुरेशा समर्थ नसतील त्या राज्यात स्वतंत्रपणे शेतीकर्जपुरवठा मंडळ स्थापन करावें. परंतु सरकारकडून भरपूर मदत देऊन अशा प्रकारे मंडळ स्थापन करण्यास १९४६ साली श्री. आर. जी. सरैय्या यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या सहकारी नियोजन समितीनें विरोध दर्शविला. या समितीचें मत असें पडलें की याच प्रकारचे सहाय्य राज्य सहकारी बँकाना दिले तर सहकारी बँका इष्ट तें कार्य करूं शकतील.

मुंबई सरकारनें सहकाराच्या विकासाबाबत नेहमीच आस्था बाळगली होती. तेव्हा दोन समितीच्या या परस्पर विरोधी शिफारसीबाबत मतप्रदर्शन करण्याची सूचना मुंबई सरकारनें ' बॉम्बे ' को–ऑपरेटिव्ह बँकस् असोसिएशन 'ला केली. केंद्रीय सहकारी बँका आणि राज्यातील अर्बन बँका यांच्या प्रतिनिधींची मग संयुक्त बैठक झाली आणि गाडगीळ समितीनें शिफारस केल्याप्रमाणें शेतीसाठी कर्जपुरवठा करण्यासाठी स्वतंत्र मंडळ स्थापन करण्याची आवश्यकता नाही असें मत या बैठकीत व्यक्त झालें. त्याचप्रमाणें गाडगीळ समितीनें मंडळाकरिता ज्या प्रकारच्या साहाय्याची सूचना केली होती तेंच सहाय्य राज्यातील सहकारी बँकांना देण्यात आलें आणि या बँकाच्या घटनेंत काही सुधारणा करण्यात आल्या तर पतवान शेतकऱ्यांच्या कर्जासंबंधीच्या गरजा भागविणे त्यांना शक्य होईल असा अभिप्राय देण्यात आला म्हणून या असोसिएशननें उपस्थित केलेल्या मुद्याचा विचार करण्यासाठी सरकारनें श्री. मणीलाल नानावटी यांच्या अध्यक्षतेखाली एका समितीची स्थापना केली.

## सरकारी सहभाग

या समितीनें असोसिएशनच्याच मतास पाठिंबा दिला. त्याचप्रमाणें समितीनें काही शिफारसी केल्या त्यात बँकाच्या भागभांडवलात सरकारनें भागीदार व्हावे अशी एक शिफारस होती. तसेंच गाडगीळ समितीनें सुचविलेल्या तत्त्वानुसार पतवान शेतकऱ्याना कर्जपुरवठा करण्याची जबाबदारी या बँकाना उचलता यावी म्हणून भागभांडवलात सहभागी होऊन शिवाय या बँकाच्या संचालक मंडळाशी सहकारी व्हावें अशीहि शिफारस नानावटी समितीनें केली होती. सरकारनें समितीच्या शिफारसी १९४८ साली स्वीकारल्या, आणि अपेक्स बँकाचे ५० लाख रुपयापर्यंत व मध्यवर्ति बँकाचे २५ लाख रुपयापर्यंत भाग भांडवल घेण्याची तरतूद करण्यात आली. सरकारी प्रतिनिधि संचालक मंडळावर घेता यावेत म्हणून बँकाच्या घटनेत दुरुस्ती करण्यात आली.

नतर अखिल भारतीय ग्रामीण कर्जपुरवठा समितीच्या मार्गदर्शक समितीनें या गोष्टी आपला अहवाल तयार करताना मूलाधार म्हणून मान्य केल्या कारण मुंबई राज्यच नव्हे तर एकदर देशाच्या दृष्टीनेंहि त्या दूरगामी परिणाम करणाऱ्या अशाच होत्या या समितीनें आपल्या शिफारसीमागील तात्त्विक दृष्टी पुढील शब्दात स्पष्ट केली आहे

" सहकारी तत्त्वावरील कर्जपुरवठ्याच्या पद्धतीची पुन-

रचना करणें हें या प्रश्नाचें स्वरूप नाही, तर परिणामकारक रीतीनें सहकारी कर्जपुरवठा वाढा होईल आणि दुर्बलांना तो उपयुक्त ठरेल अशी परिस्थिति निर्माण करणें हें महत्त्वाचें आहे जे दलित आहेत, दडपले गेले आहेत, ते आपल्या परिस्थितींत बदल करू शकत नाहीत. कारण या प्रतिगामी परिस्थितीमुळेंच ते दुर्बल बनले आहेत. ज्या शक्तींशी मुकाबला करावयाचा, त्यांच्या इतक्या तरी या प्रगत सुधारणावादी शक्ति प्रबल असणें जरूर आहे. ही प्रभावी शक्ति केवळ सहकारी चळवळीनें निर्माण होणार नाही, तर सहकारी चळवळ आणि सरकार यांच्या संयुक्त प्रयत्नांतून ती उत्पन्न होईल. '

इतर बऱ्याच राज्यांत सरकारनें सहकारी क्षेत्रात सहभागी होण्याची कल्पना नवीन होती. १९५५ च्या मार्चमध्यें पाटणा येथें सहकारी परिषद भरली होती आणि तीत या प्रश्नावर तपशिलवार चर्चा झाली. सरकारच्या सहकार्याचा सहकारी तत्त्वावर कर्जपुरवठा करण्याच्या चळवळींवर मुंबई राज्यात किती परिणाम झाला हें ग्रामीण कर्जपुरवठा पहाणींत स्पष्ट झालें आहे. अधिकाधिक लोकांना सहकारी तत्त्वावर कर्जपुरवठा करण्याच्या बाबतींत आणि शेतकऱ्यांच्या जास्तीत जास्त गरजा भागविण्याच्या बाबतीत मुंबई राज्य अग्रेसर होतें हें या पाहणींतून स्पष्टपणे आढळून आलें होतें. पाटणा येथील परिषदेंत सरकारी भागीदारीला काही अटींवर व काही विशिष्ट परिस्थितींत मान्यता देण्यांत आली. पुढें नवी दिल्ली येथें राज्यांच्यासरकार मंत्र्यांची बैठक होऊन तीत या निर्णयावर शिक्कामोर्तब झाले आणि सहकारी चळवळीच्या विकासासाठी दुसऱ्या योजनेंत जो कार्यक्रम आहे त्यांत हें तत्त्व अंतर्भूत करण्यात आलें. सहकारी संस्थांचे हिस्से खरेदी करणें शक्य व्हावें म्हणून राज्य सरकारांना दीर्घ मुदतीची कर्जे रिझर्व बँकेकडून मिळावी यासाठी रिझर्व बँकेबाबतच्या कायद्यांत दुरुस्ती करण्यात आली आणि राष्ट्रीय शेतकी कर्जपुरवठा निधी स्थापन करण्याची मुभा बँकेला मिळाली.

### मुंबई बँकेचें धोरण

१९५० मध्यें मुंबई राज्य सहकारी बँकेनें आपल्या धोरणाचा खुलासा करणारें एक पत्रक प्रसिद्ध केलें होतें सर्व पतदार शेतकऱ्यांना कर्जपुरवठा करण्याची जी जबाबदारी बँकेवर आली होती ती पार पाडण्याबाबत बँकेनें या पत्रकात खुलासा केला होता. या धोरणाची दोन वैशिष्ट्यें उल्लेखनीय आहेत.

> हंगामातील शेतींच्या कामासाठी अल्प मुदतीचें वर्षभरात परतफेड करावयाचें कर्ज आणि बैल, विहिरींची दुरुस्ती इत्यादिसाठी तीन वर्षांच्या मुदतीत परतफेड करावयाचें मध्यम मुदतीचें कर्ज मान फरक करण्यात यावा
>
> निरनिराळ्या पिकांखाली प्रत्यक्षात किती क्षेत्रफळ आहे हें लक्षात घेऊन कर्जाची रक्कम ठरविण्यात यावी. म्हणजेच उत्पादनावी कर्जे निगडीत ठेवावें, मालमत्तेशी नव्हे.

### पीक कर्ज

ग्रामीण कर्जपुरवठा पाहणी समितीच्या अहवालात पीक-कर्जाची फार जोरदार शिफारस करण्यात आली होती. १९५० साली मुंबई राज्य सहकारी बँकेने याच स्वरूपाची शिफारस केली होती. समितीनें ' पीक-कर्ज ' पद्धतीची खालील वैशिष्ट्ये सांगितली आहेत.

> अधिक उत्पादन हेंच कर्जपुरवठ्याचें मुख्य उद्दिष्ट आहे.
> अल्प मुदतीची कर्जे पुढें येणाऱ्या अंदाजानें दिली जावी.
> मालकी हक्क असणाऱ्या जमिनींच्या आधारावर देऊं नये.
> उत्पादित मालाची विक्री झाली की त्यांतून कर्जाची वसूली केली जावी.

ग्रामीण कर्ज–पुरवठा पाहणी अहवालात ज्या पीक–कर्ज पद्धतीची सूचना करण्यात आली होती तिच्या यशासाठी पतपेढ्या आणि सहकारी विक्री संस्था यांची योग्य ती सांगड घालणें आवश्यक आहे. तेव्हा सहकारी विक्री संस्था जेथें अस्तित्वात नसतील वा जेथें त्यांचें कार्य योग्य प्रकारे चाललें नसेल तेथे त्यांच्या विकासावर भर देण्यात आला. याचा अर्थ मुंबई राज्यात सहकारी बँका कित्येक वर्षे कर्जपुरवठ्याचे जे प्रयत्न करीत होत्या तेच प्रयत्न अधिक जोमदारपणें करणें आवश्यक झालें.

### कर्जाची वाढती मर्यादा

रिझर्व्ह बँकेनें आर्थिक सहाय्य उदारपणानें केल्यामुळें सर्व देशभर सहकारी तत्त्वावर कर्जपुरवठा करण्यास बरीच मदत झाली १९४६–४७ साली शेतीच्या हंगामातील कामे व पिकांची विक्री याच्यासाठी राज्यातील सहकारी बँकांना रु. ६ लाख ६५ हजार च्या कर्जमर्यादा रिझर्व्ह बँकेनें मंजूर केल्या होत्या त्यापैकी १ लाख ५० हजार रुपयांची रक्कम उचलली गेली. पुढे कार्यपद्धतीत सुधारणा झाल्या बँकेनें इतरहि बऱ्याच सुधारणा केल्या, जेणें करून स्वातंत्र्यानंतरच्या काळांत विकासशील कार्य करण्याची भूमिका बँकेनें घेतली यामुळें स्वातंत्र्योत्तर काळात अधिक प्रमाणात सहकारी कर्ज–पुरवठा होऊं लागला १९६०–६१ मध्ये शेतीसाठी लागणाऱ्या अल्प मुदतीच्या कर्जासाठी ११२ कोटी रुपयांच्या कर्जमर्यादा राज्य सहकारी बँकांना रिझर्व्ह बँकेने मंजूर केल्या होत्या ३० जून १९६१ रोजी १०० कोटि रुपये येणें होते वैकुंठ मेहता समितीनें आपल्या अहवालात म्हटलें आहे की, 'सहकारी संस्था स्वनःकडील ठेवी व निधि यातून आवश्यक तेवढा पैसा नजिकच्या काळांत उभा करू शकतील अशी अपेक्षा करणें अव्यवहार्य आहे आणि याच साठी रिझर्व्ह बँकेला यापुढे बरीच वर्षे कर्जपुरवठा करण्यासाठी आर्थिक सहाय्य मोठ्या प्रमाणावर द्यावें लागेल. अर्थात सहकारी तत्त्वावरील कर्जपुरवठ्याची पद्धति समर्थ बनत जाऊन स्वतःची साधनसामग्री वाढवील आणि मग तिला फार थोडी बाह्य मदत लागेल वा बिलकुल लागणार नाही ' या दीर्घकालीन उद्दिष्टाशी सुसंगत अशा प्रकारचीच ही व्यवस्था असावयास हवी हें मेहता समितीनें प्रतिपादिलें आहेच.

### साधनसामग्रीच्या वाढीवर भर

केंद्रीय सहकारी बँका स्वत:च्या पायावर उभ्या राहण्याइतक्या समर्थ बनण्याची गरज मुंबई राज्य सहकारी बँकेनेहि १९६० मध्यें ' एकत्रित दराची ' पद्धति स्वीकारून मान्य केली. सध्या ही पद्धति अस्तित्वांत आहे. या पद्धतीनुसार राज्य सहकारी बँक मध्यवर्ती सहकारी बँकेच्या अल्प मुदतीच्या शेतीच्या कर्जांपैकी ७५ टक्के व मध्यम मुदतीच्या कर्जापोटी शिलकबाकी रकमेचा भरणा करण्यास बांधलेली आहे. याचा अर्थ असा की, शेतीसाठी मध्यवर्ती बँक जें कर्ज देतें त्यापैकी निदान २५ टक्के कर्ज तिला आपल्या साधनसामग्रीतूनच द्यावें लागतें. सरोच रिझर्व्ह बँकेकडून किती रक्कम मिळते हे ध्यानात न घेता मध्यवर्ती बँकांच्या कर्जापोटी ७५ टक्के रकमेचा भरणा राज्य सहकारी बँक करीत असल्यानें आपल्या ठेवी व निधी यातून पुरेशी साधनसामग्री या बँकेलाहि उभी करावी लागते. मध्यवर्ती सहकारी बँकांनी अधिक ठेवी मिळविल्या व भागभांडवल उभे केले तर या वाढत्या निधीच्या प्रमाणात या बँकांना अधिक मर्यादेपर्यंत कर्ज देण्याची शिफारस वैकुंठ मेहता समितीनें केली आहे. ही रक्कम शेतीसाठी कर्ज म्हणून गुंतविणें या बँकांना शक्य होईल.

### बोलके आंकडे

एकदरीत विचार करतां महाराष्ट्रांतील मध्यवर्ती सहकारी बँकांची प्रगति सड न पडता चालू आहे. पुढील आकडेवारी पश्चिम महाराष्ट्रांतील १७ मध्यवर्ती सहकारी बँकांची आहे.

(आकडे लाखात)

| संस्था | १९५९-६० | १९६०-६१ |
|---|---|---|
| संस्था | १७ | १७ |
| सभासदसंख्या ———— | १३११९ | १५१६० |
| व्यक्तिगत | | |
| भागभांडवल | ३०० ३६ | ४३६ १३ |
| राखीवनिधि | ८५ १२ | १००.१९ |
| ठेवी | १८६४ ७२ | २२७९.२६ |
| उभारलेलें कर्ज | ९३१ ४२ | १६४२ ६७ |
| दिलेलें कर्ज | २३४३ २५ | ३२५९ ११ |
| खेळतें भांडवल | ३३८७ ०८ | ४६७५ ८९ |

१ मे १९६१ रोजीं नागपूर येथील विदर्भ सहकारी बँक व मुंबईची महाराष्ट्र राज्य सहकारी बँक यांचे विलिनीकरण होवून सान्या महाराष्ट्रासाठी एकच एक राज्य सहकारी बँक अस्तित्वात आली. या विलिनीकरणामुळे राज्य सहकारी बँक आर्थिक दृष्ट्या बळकट झाली आणि सान्या देशात ती अग्रेसर बनली आहे. या बँकेचे भरणा केलेले भांडवल ३ कोटी ७६ लक्ष आहे. राखीव इतर निधी ९९ लक्ष रुपये व ठेवी २१.३५ कोटी रुपये अशी सुदृढ आर्थिक परिस्थिती आहे.

३० एप्रिल १९६० रोजी म्हणजे महाराष्ट्र व गुजरात यांच्या विभाजनाचे वेळी आणि महाराष्ट्रांतील दोन बँकांचे ३० एप्रिल १९६१ रोजी विलीनीकरण होण्याचे वेळी बँकेची आर्थिक परिस्थिती काय होती हे पुढील तुलनात्मक आकडेवारीवरून कळून येईल.

(लक्ष रुपयात)

| | मुंबई राज्य स. बँक ३०-४-१९६० (विभाजनापूर्वी) | महाराष्ट्र राज्य स. बँक ३०-४-६१ (विलीनीकरणापूर्वी) |
|---|---|---|
| | रु. | रु. |
| (१) भरणा केलेले भांडवल | १५१.९६ | १८९.६१ |
| (२) कायद्यानुसार राखीव निधि | २३.२५ | ४३.२५ |
| (३) इतर निधी | ४२.१२ | ३४.६७ |
| (४) ठेवी | १८३६.०६ | १९४६.४८ |
| (५) रिझर्व्ह बँकेकडून कर्ज | १११५.१९ | १०५२.५२ |
| (६) इतर घेतलेले कर्ज | ३१.५८ | १३.५० |
| (७) खेळते भांडवल | ३६२०.४४ | ३५६६.६४ |
| (८) सी. एफ. असोसिएशनला कर्ज | १०८२.१९ | ११८८.०२ |
| (९) इतर कर्ज | ८४५.६४ | १३७७.३० |
| (१०) सरकारी व ट्रस्टी कर्जरोख्यांतील भरणा | ७१८.१५ | ७०२.७० |

राज्यातील सहकारी चळवळीला योग्य ती चालना देऊन आवश्यक ते सहाय्य करावयास लागून बँकेला नुकतीच ५० वर्षे झाली आहेत. महाराष्ट्रातील सहकारी पतपेढयांना रिझर्व्ह बँकेने बरेच सहाय्य आजवर केलेलें आहे. परंतु गेल्या ५० वर्षांच्या काळात बिन सरकारी सहकारी कार्यकर्त्यांनी निष्ठेने अविरत कार्य करून, सहकारी चळवळ सुदृढ करून जो भरभक्कम पाया घातला त्यातच ह्या यशाचे श्रेय आहे. हें यश त्यांच्या श्रद्धाशील सेवेनेंच साध्य झालें.

कर्ज आणि विक्री यांची सांगड घालणें ' पॅकेज ' योजना लागू असलेल्या जिल्ह्याप्रमाणें कर्ज व उत्पादन यांची सांगड घालणें इत्यादि महत्वाचे प्रश्न अद्याप समाधानकारकपणें सुटावयाचे आहेत. आता-पर्यंत महाराष्ट्रातील सहकारी कार्यकर्त्यांनी ज्या श्रद्धेने, उत्साहानें व व्यवहारचातुर्यानें कार्य केले तेच गुण ते हे प्रश्न सोडवितानाहि प्रकट करतील अशी उत्कट आशा आहे.

★★★








# देशविदेशांची सहकारी मंडळें व पतपेढ्या

डॉ. डी. जी. कर्वे
डेप्युटी गव्हर्नर रिझर्व्ह बँक





मापासून तो राज्यापर्यंत भारतांत सहकारी पतपेढ्यांची जी घटना आहे ती सर्व देशांत वरवर दिसण्यांत सारखी असली तरी एका महत्त्वाच्या बाबतीत निरनिराळ्या राज्यात बरासचा फरक आढळतो. परस्पर साहाय्याकरितां नियमित किंवा अनियमित जबाबदारीच्या करारावर सहकारी मंडळ्यांच्या कायद्याखाली ज्या-ज्या कर्जांचा व्यवहार करणाऱ्या मंडळ्या स्थापन झाल्या त्या-सर्वांसच आपण सामान्यपणें सहकारी पतपेढी म्हणतो. परंतु पतीचा सहकारी अर्थ पूर्णपणें अंमलांत यावयाचा असेल तर पेढी किंवा बँक जेवढे व्यवहार सामान्यपणें करते ते बहुतांशानें करणाऱ्या सहकारी पतपेढ्या किंवा सहकारी बँका फार थोड्या आहेत. आपल्याकडे प्राथमिक मंडळ्याही आता नियमित जबाबदारीच्या होऊं लागल्या आहेत, व मध्यवर्ती आणि प्रांतीय पतपेढ्या तर नेहमीच नियमित जबाबदारीच्या आहेत. सहकारी अगर परस्पर अवलंबनाचा भाग अशा पेढ्यांच्या व्यवहारात यावयाचा असेल तर त्यांच्या व्यवहाराच्या सर्व भागात हें परस्परावलंबन दिसून आलें पाहिजे, म्हणजे सामान्यतः पेढीच्या व्यवहाराच्या मानानें तिचे जेवढे भांडवल असावयास पाहिजे तेवढें तिच्या भागीदारांनी स्वतः उभारलेलें असावें. तसेच, भागीदार सभासदाकडून मिळणाऱ्या ठेवींचा, पेढीच्या साधनात मोठा भाग असावा, व सामान्यतः सभासदाचे ठेवीचे व्यवहार पेढीच्या मार्फत व्हावे. सभासद नसणाऱ्या ठेवीदाराच्या रकमा ह्याही एका अर्थानें सभासदांच्या सामुदायिक पतीवर घेतलेल्या असल्यामुळें त्याही सभासदांनी परस्पर सहकार्यानें उभारल्या असें म्हणण्यास हरकत नाही. सभासद नसलेल्या व्यक्ती किंवा संस्था ह्यांच्याकडून घेतलेल्या ठेवीप्रमाणेंच इतर कर्जेंही जर सहकारी पेढीच्या पतीवर उभारलेली असली तर तीही परस्पर सहकार्यानें उभारली असें म्हणण्यास हरकत नाही. मात्र ज्या प्रमाणात अशी कर्जें अगर ठेवी मिळण्यास सरकारच्या किंवा इतर एखाद्या सहकारी घटनेचा भाग नसलेल्या संस्थेच्या हमीचा उपयोग केला असेल त्या प्रमाणात पेढीचा सहकारी किंवा परस्परावलंबनाचा गुण कमी झाला असें म्हणावे लागेल. तसेच सरकार अगर इतर संस्था ज्या प्रमाणात सहकारी पेढ्यांशी इतर पेढ्यांपेक्षा अधिक अनुकूलतेनें व्यवहार करीत असतील तेवढ्या प्रमाणात सहकारी पेढ्या ह्या व्यवहारी किंवा व्यापारी संस्था न समजता समाजकल्याण साधणाऱ्या सोयी समजल्या पाहिजेत

स्वतंत्र पेढ्या म्हणविणाऱ्या सहकारी मंडळ्या परस्परास कर्जें देणें किंवा कर्जें घेणें ह्यांखेरीज पेढ्यांच्या सामान्य सोयींपैकी किती सोयी आपल्या सभासदास उपलब्ध करून देतात त्यावरून त्या पेढ्या हें नाव धारण करण्यास किती लायक आहेत हेंही ठरेल. व्यवहारात पेढ्यांचे सर्वसामान्य व्यवहार किती प्रमाणात सापडतात, व हे व्यवहार करण्यात परस्पर स्वावलंबनाचे तत्त्व किती प्रमाणांत अंगिकारिलें जातें ह्या दोन प्रश्नांच्या उत्तरावरून जर भारतातील सहकारी पतपेढ्यांचे मूल्यमापन केले तर त्यांपैकी एकही पतपेढी सर्वस्वी सहकारी नाही, व ज्या निरनिराळ्या प्रमाणात सहकारी आहेत त्यांपैकी फारच थोड्या पेढ्यांचे सामान्य व्यवहार, बहुतांशानें करताना दिसतात. जुन्या मुंबई राज्यातल्या पतपेढ्या अशा निवडक सहकारी मंडळ्यात प्रमुख होत्या असें म्हणण्यांत काही अतिशयोक्ती नाही. भारतांतील इतर दोन-तीन राज्यातही काही अंशी मुंबई राज्यातील सहकारी पेढ्या प्रमाणें स्वावलंबन व पूर्ण सोयी ह्या दोन्ही क्षेत्रात प्रगती केलेल्या काही पेढ्या आहेत, परंतु आजही त्यामानानें त्यांची प्रगति मर्यादित असून इतर बहुतेक सहकारी पेढ्या, सहकारी, व पेढ्या, ह्या दोन्ही अुपनांवास अजून.च पात्र आहेत असें दिसून येईल.

मुंबई राज्यांतील अनेक मध्यवर्ती सहकारी पेढ्या, व मुंबई राज्य सहकारी पेढी ह्या दोहोंची घटना अधिक प्रमाणात स्वावलंबी व व्यवहार प्रवण राहण्याचे मुख्य कारण हे की मुंबई शहरांत, व थोड्या कमी प्रमाणात जिल्ह्यांच्या प्रमुख ठिकाणी, ह्या पेढ्यास जे कार्यकर्ते लाभले ते स्वत. व्यापारधंद्यात वाकबगार होते. संयुक्त भांडवलाच्या ऐवजी सहकारी संघटना स्वीकारली तरी व्यवहाराचे बाबतीत जो भक्कमपणा व कार्यक्षमता पाहिजे त्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले नाही. किंबहुना सहकारी क्षेत्रातील विशिष्ट गरजा व उणीवा ध्यानात घेऊन त्यांचे निराकरण व्यवहारी दृष्टीनें कसें करता येईल इकडे त्यांनी विशेष लक्ष्य पुरविलें. सहकारी पेढी झाली तरी ती पेढी आहे आणि तिचे व्यवहार चोख व समाधानकारक कार्यक्षमतेने झाले पाहिजेत अशा निग्रहानें त्यांनी पेढ्यांचे व्यवहार चालविले. मुंबई राज्य सहकारी पेढीचे मुंबई राज्यात पेढी म्हणून असलेलें स्थान दुसऱ्या कोणत्याही समाईक भांडवलाच्या पेढीपेक्षा कमी दर्जाचे नव्हतें ह्यावरून त्या पेढीच्या सहकारी कार्यकर्त्यांनी सुरुवातीपासून किती काटेकोरपणें व दूरदर्शीपणें काम केले असेल, हे दिसून येईल. आतां मुंबई राज्य पेढीच्या दोन पेढ्या झाल्या, व विदर्भ मध्यवर्ती पेढी व महाराष्ट्र राज्य पेढी ह्यांच्या एकीकरणानें मुंबईत एक केंद्रीय पेढी चालू राहिली तरी तिच्या व्यवहाराची घडण व कार्यकर्त्यांचे धोरण ह्या जुन्या परंपरेस धरून राहील असे मानण्यास हरकत नाही.

मुख्यत. सहकारी स्वरूपाची संपूर्ण सोयी देणारी पेढी असणें हें भारतातही अपवादात्मक आहे. बहुतेक राज्यात ह्या पेढ्या मुख्यत: रिझर्व्ह बँक व सरकार ह्यांकडून मिळणारी कर्जेंच आपल्या संघटक संस्था व सभासद व्यक्ति ह्यांस देत आहेत. आंतरराष्ट्रीय अनुभवाशी तुलना करता ही परिस्थिति असामान्य नाही. मात्र, त्यांच्या मुळाशी असलेल्या तत्त्वाचे इतर देशात अधिक विश्लेषण झालेलें आहे. इंग्लंडमध्यें सहकाराचे पेढीच्या क्षेत्रात पदार्पणच झालें नाही असें म्हटलें तर चालेल. आपापसात देवाण-घेवाण करून सहकारी संस्थांना आपल्या कर्जव्यवहाराबद्दलच्या ज्या गरजा भागविता येत नाहीत त्या त्यांनी सामान्य पेढ्यांच्या मार्फत भागवाव्या असाच तेथें प्रघात आहे. कॅनडामध्यें सहकारी पेढ्या ह्या मुख्यत. सभासदामध्यें बचत करण्याची संवय वाढविण्याकरितां आहेत. जमेल तेवढी मदत त्या आपल्या सभासदास करितात, व त्या सभासदांना अधिक गरज लागली तर त्यांनी सामान्य पेढ्यांकडे जावें, किंवा सरकारी मदतीनें अशा परिस्थितीतील सामान्य दर्जाच्या सभासदाकरिता, विशेषत: शेतीविषयक धंदे करणाऱ्या लोकांकरितां, ज्या विशिष्ट निम-सरकारी संस्था निर्माण केल्या आहेत त्यांकडे जावें अशी अपेक्षा असते. सहकारी मंडळींचा चांगल्या प्रकारचा दाखला असणें हें अशा सभासदांना इतरत्र मदत मिळण्यास जवळ जवळ आवश्यक साधन समजलें जातें. अमेरिकेंत, म्हणजे युनायटेड स्टेट्समध्यें, शेती मालाचे उत्पादन करणारास कर्ज देणाऱ्या ज्या संस्था आहेत त्या आपलें भांडवल, लांब मुदतीच्या व क्रमश: विसर्जन पावणाऱ्या सभासदांच्या ठेवी मधून मिळणाऱ्या रकमांतून शक्य तो आपल्या गरजा भागवितात. अधीक पैसा लागल्यास सभासदांची कर्जपत्रें इतर सामान्य व काही विशेष सरकारी हमीनें निर्माण झालेल्या पेढ्यांकडें कसरतीनें विकतात. गेल्या पन्नास वर्षांत ज्या-ज्या वेळी काही आर्थिक विघटनेमुळें शेतकरी सभासद व त्यांच्या संस्था ह्यांजवर आपत्ती आल्या त्यावेळी सामुदायिक मध्यवर्ती सरकारनें त्यांना सर्व तऱ्हेनें पूर्ण मदत केलेली आहे. देणगी व अल्प व्याजाचीं कर्जें ह्या मार्गानें मदत करून न थांबता सरकारनें कित्येक वेळी भांडवल वाढविण्यासही मदत केली आहे. आजही सर्व प्राथमिक सहकारी संस्थांना कर्ज देण्याकरिता स्थापलेल्या मध्यवर्ती पेढ्यात संयुक्त सरकारचे भांडवल आहे. पण एवढ्या मदतीनें सहकारी संस्था समृद्ध केल्या म्हणजे त्यांनी सामान्य पेढ्यांच्या मदतीनें आपला कारभार पार पाडावा अशी अपेक्षा असते. प्राथमिक श्रेणीच्या संस्थांतील सरकारी भांडवल आता पूर्णपणें परत जमा झालेलें आहे, व मध्यवर्ती पेढ्यांतील सरकारी भांडवलही हळुहळू कमी होत आहे. प्राथमिक मंडळ्यांची काही कर्जें पेढ्या सामान्यत ज्या धोरणाप्रमाणें कर्जें देतात त्याला सोडून असतात, परंतु ज्या सभासदाकडून ह्या कर्जांची मागणी झालेली असते त्याच्या एकंदर विश्वसनीयतेबद्दल व ते ज्या विशिष्ट सुधारणेकरता कर्ज मागत आहेत त्याबद्दल संस्थेची व सरकारी तज्ज्ञांची चांगली शिफारस असते अशा होतकरू व उत्तेजनार्ह सभासदास कर्जें देता यावीं ह्याकरता संयुक्त सरकारच्या शेतकी खात्यांत " शेतकऱ्यास घरगुती तऱ्हेनें कर्जें " देणारे स्वतंत्र खातें आहे. ही कर्जें शेतकऱ्यांच्या प्राथमिक संस्थेमार्फत दिली जातात. ह्यात दोन हेतु आहेत. लायख व सहकार्यानें वागणारांसच सरकारची खास मदत मिळावी हा तर एक हेतु आहेच, पण दुसरा महत्त्वाचा हेतु हा की जसजशी त्या सभासदांची परिस्थिति सुधारत जाईल तसतसें त्यांचे सरकारच्या खास खात्यातील कर्जावरील अवलंबन कमी व्हावें, व त्यानें

शक्य तो लवकर प्राथमिक संस्थेच्या इतर सभासदाच्या ओळीत जाऊन बसावें. ज्या शेतकऱ्यांची स्थिति ह्या अल्पकालीन सुधारणेच्या मर्यादेपलीकडील असते त्यांना मदत करण्यास सरकारी, सहकारी अगर सामान्य कोणतीच संस्था तयार नसते. किंबहुना ह्या तिन्ही प्रकारच्या संस्थांचे कार्य इतक्या काटेकोरपणें चालते की संशयित कार्यक्षमता असणाऱ्या शेतकऱ्यांस त्यांचीही मदत मिळणें दुर्घट असते. असे धोरण अवलंबिण्यात कोणत्याही तऱ्हेची बेपर्वाई असते असे नाही. सर्वांची अपेक्षा ही की, अशा शेतकऱ्यांनी अधिक दिवस शेतीत न घुटमुळता इतर धंद्यात सामील व्हावें. देशात आर्थिक वाढ सारखी चालू असल्यानें व रोजगाराचा सहसा अभाव नसल्यानें हें धोरण व्यक्तींच्या व देशाच्या हिताचेच ठरतें. सर्वसामान्य शेतकऱ्याचे अमेरिकन वर्णन हें आपल्याकडील मोठ्या शेतकऱ्यास लागू पडणारे असतें. अगदी निकृष्ट शेतकरी, की ज्याला नुकत्याच सुरू झालेल्या ग्रामीण सुधारणा मंडळातर्फे मदत मिळू शकते त्याचे वार्षिक उत्पादन ८–१० हजार रुपयापेक्षां कमी असू नये असा नियम आहे. दोन्ही देशांतील सरासरी उत्पन्नाच्या मानानें तुलना केल्यास ही मर्यादा फार उच्च आहे असें नाही पण ह्या मर्यादेनुसारही मदत फक्त अशा लोकांना दिली जाते की, जे मदत योग्य काळ मिळाल्यानंतर आपल्या पायावर उभे राहूं शकतील.

अगदी अलीकडे, म्हणजे गेल्या ८–१० वर्षांत, इजिप्तसारख्या काही नवोदित राष्ट्रात झालेल्या घटना सोडल्या तर इतर पुढारलेल्या जगात सहकारी पेढ्यांची वाढ वरील दोन तीन प्रकारांत सांगितल्याप्रमाणें आहे. अमेरिकेखेरीज इतर देशांतील ह्या पेढ्या अगर कर्जसंस्था अधिक " सहकारी " आहेत, पण परम्परावलंबनानुसार पेढ्यांचे व्यवहार करण्याच्या दृष्टीनें अप्रगल्भ आहेत. किंबहुना, सभासद पेढ्यांच्या धोरणानुसार मदत मिळण्यास लायक झाला म्हणजे त्यानें सामान्य पेढीचे आश्रयदाते व्हावें अशी त्यांची अपेक्षा असते. समाजांतही सामान्यपेढीचा ग्राहक असणाराचें स्थान सहकारी संस्थेमार्फत मदत मिळविणारापेक्षा अधीक उच्च समजलें जातें अमेरिकन धोरणाचे अनुकरणीय वैशिष्ट्य हें की, लायक शेतकऱ्यास प्रतिकूल परिस्थितीमुळे धंद्यांतून उठण्याचा अगर पिळवणूक करणाऱ्या धंदेवाल्यांच्या हातात जाण्याचा प्रसंग येऊं नये ह्याकरिता शक्य तो सामान्य संस्थास उत्तेजन देऊन जरूर तर शेतकऱ्यांच्या संस्थास मदत करून, आणि निकराच्या परिस्थितीत स्वतः पैशाच्या रूपानें कर्ज देऊन संयुक्त सरकार आवश्यक साधनें घेऊन सज्ज असतें प्रामाणिक व उद्योगी शेतकऱ्यांच्या अडचणीबद्दल न्याय्य ती सामाजिक जबाबदारी अंगावर घेण्यास तयार असण्याचे हेच धोरण भारतात गेल्या दहा बारा वर्षांत अंगिकारिलें जात आहे. परंतु आपल्या आर्थिक प्रगतीची आज जी पायरी आहे ती ध्यानांत घेता ह्या धोरणाचा प्रत्यक्ष अंमल करताना अनेक बाबतीत पुष्कळ भिन्न दिसणाऱ्या मार्गाचे अवलंबन करावे लागतें

ज्यांना अल्पकाळांत आपल्या पायावर उभें राहणे शक्य नाही त्यांना कोणीतीही सहकारी अगर सरकारी मदत करणें व्यर्थ आहे हा अमेरिकन किता गिरवावयाचा म्हटले तर निम्म्याहून अधिक हिंदी शेतकऱ्यास ह्या दोन्ही मार्गांचा आधार नाही असे होईल आजच्या परिस्थितीत त्यांना आणि त्यांच्या मुलाबाळांना इतरही क्षेत्रात पुरेसा वाव नाही हा त्यांचा दोष नव्हे! प्रामाणिक व उद्योगी नागरिकाच्या अपरिहार्य अडचणीत त्याला शक्य तो मदत देऊन त्याजकडून त्याच्या व समाजाच्या आर्थिक बळकटीस पोषक असे अधिकात अधिक काम करून घेण्याचे धोरण सर्व राष्ट्रास लावले म्हणजे मर्यादित साधनसामुग्री असलेल्या शेतकऱ्यास दीर्घकाल सामाजिक हातभार लावणें कां न्याय्य व जरूर आहे तें दिसेल मात्र सामाजिक पाठबळाचे मूळ समर्थन व्यक्तीच्या अपरिहार्य असमर्थतेत आहे हे ध्यानांत घेऊन सहकारी पेढ्यांच्या सर्व व्यवहारात सामाजिक मदत जरूर तेथेच द्यावी व द्यावी हें पथ्य काटेकोरपणें पाळणे जरूर आहे स्वावलंबन व परस्परावलंबन हें सहकाराचे आद्य तत्त्व संस्थेच्या सर्व कारभारात पाळलें न गेलें तर सामाजिक मदतीवर पोसलेली अकार्यक्षम मक्तेदारी निर्माण होईल. व्यक्ती व संस्था दोहांनीहि सामाजिक मदतींच्या देवाण-घेवाण संबंधात आपल्याकडून देवाण कशी अधिक होईल व घेवाण करण्याचे प्रसंग कसे कमी होतील हे पाहिले पाहिजे. वाढीस योग्य तो काळ मिळाला पाहिजे हे खरे, पण त्याच त्या व्यक्ती समाजनिर्मित लाभावर दीर्घकाळ अवलंबून राहाणे हें देशाच्या वाढीस अगर सामाजिक न्यायास धरून नाही. समाज-पोषित सहकारी पेढ्यांमार्फत कर्ज कोणास मिळावें ह्याबद्दलच्या पात्रतेत कार्यक्षमतेबरोबरच वास्तविक निकडीचाही अंतर्भाव केला पाहिजे. मोठाल्या रकमांचे कर्ज व्यक्तिशः देऊं नये आणि ज्यांना सामान्य पेढ्यांकडून वाजवी शर्तीवर कर्जे मिळणे शक्य आहे त्यांची गरज भागविण्यास सामाजिक मदतीचा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष उपयोग होऊं देऊं नये हे समाज-नीतीस धरून आहे. इतक्या काटेकोरपणानें वागले तरच सामाजिक मदतीवर चालणाऱ्या सहकारी पेढ्यांचे स्थान दीर्घ काळ टिकेल

मुंबई राज्य सहकारी पेढीसारख्या सर्व तऱ्हेचे व्यवहार करणाऱ्या संस्थांची सधी व जबाबदारी मोठी आहे भारतीय विकास योजना व आताच्या महाराष्ट्रीय विकास योजना ध्यानात घेतल्या तर वरील धोरणास अनुसरूनही नव्या क्षेत्रात किंवा नव्या प्रकारच्या सभासदात पेढीचे कार्य पुष्कळ वाढण्यासारखें आहे महाराष्ट्र राज्य सहकारी पेढी ही राज्यातील सर्व सहकारी पतपेढ्यांची संयुक्त घटना आहे तिचे स्वतःचें बळ वाढेल त्या प्रमाणात सामाजिक ऋणातून मुक्त होऊन व आपल्या सभासद असलेल्या सर्व संस्था व व्यक्ती ह्यांच्या पेढीच्या व्यवहारासबंधी सर्व गरजा वाजवी रीतीनें भागवून पेढीच्या क्षेत्रात स्वावलंबी आणि कार्यक्षम असा तळापासून वरपर्यंत एक स्वतंत्र विभाग उभारता येईल. ह्या विभागाच्या जोमावर सहकारी प्रगतीचे इतर मार्ग आक्रमणेंही सोपें होईल महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखाने व मध्यवर्ती सहकारी पेढ्यांची वाढती संख्या व कामगिरी ध्यानात घेतली तर येत्या १५–२० वर्षांत महाराष्ट्राच्या व भारताच्या आर्थिक संघटनेत एक मोठा स्वावलंबी, कार्यक्षम व प्रगमनशील भाग निर्माण करण्याचे श्रेय आजच्या महाराष्ट्र सहकारी पेढीस मिळेल.

राष्ट्रीय प्रगतीचा एखादा नवा भार उचलल्यामुळे अधिक सामाजिक मान्यता व पोषण मिळावयाचे असेल तर मिळालेल्या सवलतींचा हिशेब चुकवून स्वावलंबनाचे क्षेत्रही एकसारखे वाढत ठेवले पाहिजे. सहकारी संस्थांना समाजवादी संघटनेत आपले स्थान टिकविण्यास पेढीच्या प्रया-सील असा तऱ्हेची याद फार उपयुक्त ठरेल. आद्य संस्थापक व आज सरकारने सर्व बाजूंनी समाजनिष्ठ व प्रगतीपर धोरण स्वीकारले ते तृतीय व त्याच्या पुढील पंचवार्षिक योजनांच्या काळात अधिक जोमदारपणे चालू राहील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. ★



" आपल्या राष्ट्राच्या नियोजनांत सहकारी चळवळीला प्राधान्य देण्यांत आलेले असून, नियोजनपूर्वक विकासाचा एक भाग म्हणून सहकारी क्षेत्राची उभारणी करणें हें भारताच्या राष्ट्रीय धोरणातील एक अत्यंत महत्त्वाचे उद्दिष्ट आहे. सहकारी संघराज्य राज्यघटनेत अभिप्रेत आहे. सर्वसाधारण समाजाच्या हिताच्या दृष्टीने आणि परस्पर महा-य्यावर आधारलेली आर्थिक आणि सामाजिक समाजरचना निर्माण करण्याची सहकारी चळवळीवर जी मोठी जबाबदारी आहे, त्यासाठी शक्ति एकवटली पाहिजे. प्रत्येक प्रकारच्या सहकारी व्यवसायाची कार्यक्षमता वाढविणें, सर्व सामान्य लोकाचे राहाणीमान वाढविणें यासाठी नेटाने प्रयत्न करावयास पाहिजेत. यासाठी सहकारी संस्थातील सभासदामधील वैचारिक जागृति ही एक फार महत्त्वाची बाब समजली पाहिजे संस्थेच्या व्यवस्थापक मण्ड-ळाचा कारभार कार्यक्षम, चोख, राखून व्यवहारांत चिकाटी व सचोटी, सर्व सभासदाचे हित साधण्यासाठी असणें अत्यावश्यक आहे व्यक्तिगत स्वार्थ व समाजहिताचा परमार्थ याचे सुंदर मीलन सहकारी संस्थाच्या यंत्रणेंत आढळले पाहिजे सहकारी चळवळीच्या नैतिक मूल्यांना व्यावहारिक प्रामाणिकपणाची जोड मिळाली पाहिजे. भेदापेक्षा अभेदावर जोर देऊन सामुदायिकजीवन यशस्वी करण्याचा प्रयत्न व्यक्तींनी केला पाहिजे असे झाले तरच अधिक फायदेशीर शेती, अधिक चागला व्यापार, व अधिक संपन्न व सुखमय जीवन हे सह-कारी चळवळीचें अंतिम उद्दिष्ट साध्य होऊं शकेल. "

मा. मोरारजीभाई देसाई






# सहकारी संस्था व स्टेट बँक ऑफ इंडिया

श्री. बी. मुकर्जी
मॅ.डा. स्टेट बँक ऑफ इंडिया



अखिल भारतीय ग्रामीण कर्ज-पुरवठा पहाणीच्या मार्गदर्शक समितीच्या शिफारसीनुसार स्टेट बँकेची स्थापना १ जुलै-१९५५ रोजी झाली. व्यापारी बँकांपैकी प्रभावशाली व महत्त्वाच्या अशा गटाची पुनर्रचना करून, सहकारी संस्थाच्या कार्यास विशेषत: शेतमालाची विक्री आणि संस्करण याबाबत हा गट उपयोगी ठरावा हें स्टेट बँक स्थापण्यामागील प्रमुख उद्दिष्ट होतें बँकेच्या शाखांचे जाळे देशव्यापी केल्यानें व्यापक क्षेत्रात सहकारी व व्यापारी बँकाच्या वाढीला, अधिकाधिक प्रमाणात चलनविप्रेषणाची (remittance facility) सोय उपलब्ध करून ही बँक उत्तेजन देईल अशी अपेक्षा होती. कर्ज देण्याच्या बाबतीत ग्रामीण कर्ज-पुरवठ्यावर भर देणें हें या बँकेचें कर्तव्यच आहे. तथापि बँकाच्या व्यवहाराची जी मूलभूत तत्त्वें असतात, ती न सोडता भारत सरकार व रिझर्व्ह बँक यांच्या द्वारा जाहीर होणाऱ्या राष्ट्रीय धोरणांशी सुसगत होईल अशा प्रकारें स्टेट बँकेनें कर्ज-पुरवठ्याबाबतचे धोरण अगिकारावे हें प्रथमपासून ठरून गेलें होतें. सहकारी चळवळीबाबत स्टेट बँकेने दोन प्रकारची उद्दिष्टे ठेवावी असें ग्रामीण कर्ज-पुरवठा पाहणी समितीनें प्रतिपादिले होते ती उद्दिष्टे अशी – (१) या बँकेनें सहकारी बँकाच्या वाढीला चालना द्यावी, (२) शेतमालाची विक्री व संस्करण सहकारी संस्थास आर्थिक सहाय पुरवावें

## सहकारी बँका

व्यापारी वा सहकारी मार्फत कोणत्याहि बँक पद्धतीचा विकास व्हावयाचा असेल तर पुरेशा प्रमाणात व माफक दराने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पैसे पाठविण्याची सोय असणें अगत्याचे असतें अशा प्रकारे चलनविप्रेषणाच्या सोयी अधिकाधिक प्रमाणात उपलब्ध करण्याच्या हेतूने स्टेट बँकेनें ग्रामीण व निमशहरी विभागांत गेल्या साडेपाच वर्षात साडेचारशेंच्या वर नवीन शाखा उघडल्या आहेत. अशा रितीनें देशातील बँक-व्यवस्थेच्या विकासाला स्टेटबँक हातभार लावीत आहे रिझर्व्ह बँकेच्या चलनविप्रेषण योजनेखाली स्टेट बँकेमार्फत सहकारी संस्थाना मिळणाऱ्या सवलतीमध्ये गेल्या कांही वर्षात बरीच वाढ आली आहे उदाहरणार्थ, निरनिराळ्या राज्याच्या राज्य सहकारी बँकाच्या शाखा आणि त्याच्याशी संलग्न असलेल्या मध्यवर्ती व औद्योगिक बँकांना, स्टेट बँकेच्या कुठल्याही शाखेतून रिझर्व बँकेकडे

असलेल्या राज्यसहकारी बँकेच्या मुख्य शाखेत जमा करण्यासाठी मोफत पैसे पाठविण्याची सोय आठवड्यात एकदाच मिळे ती आता सात वेळा मिळू शकते. तसेच अशाच सवलतीत राज्य सहकारी बँकांच्या स्टेट बँकेतील मुख्य खात्यात पैसा भरणा करण्याच्या बाबतीतही देण्यात येत असते. शहर भागांतून ग्रामीण भागाकडे पैशाचा ओघ सुलभपणे जावा म्हणून मध्यवर्ती सहकारी कर्जपुरवठा संस्थांस आपल्या ग्रामीण भागांतील शाखांना पैसे पाठविण्याची व्यवस्था स्टेट बँकेनें स्वतः पुढाकार घेऊन केली आहे. आठवड्यातून एकदा अशा रीतीनें विनामूल्य पैसे पाठविता येतात. या शिवाय स्टेट बँकेमार्फत सहकारी बँकांना ठराविक दरानें कितीही रकमा पाठविता येतात.

स्टेट बँकेनें स्थापनेपासून पाच वर्षांच्या आत ४०० शाखा स्थापन कराव्यात अशी कायदेशीर तरतूद करण्यात आली होती आणि ती गेल्या वर्षी बँकेने पुरी केली. एवढेंच नव्हे तर कायद्यानें ४०० शाखांचीच तरतूद असताना प्रत्यक्षात ४१६ शाखा स्थापन केल्या. या नव्या शाखांपैकी बहुसंख्य शाखा बँकिंगच्या सोयी जेथें अस्तित्वात नाहीत वा पुरेशा प्रमाणात नाहीत अशा ग्रामीण व निमशहरी विभागात स्थापन केल्या गेल्या आहेत.

चलनविप्रेषणाच्या सवलतीत झालेली वाढ व बँकेचा शाखाविस्तार यामुळें स्टेट बँकेनें सहकारी संस्थांच्या वतीनें पाठविलेल्या एकूण रकमांमध्यें गेल्या पाच वर्षांत बरीच वाढ झाली आहे. रिझर्व्ह बँकेच्या चलनविप्रेषण योजनेखाली १९५७–५८ साली स्टेट बँकेनें सहकारी संस्थांच्या वतीनें ५४ कोटी ४० लक्ष रुपये पाठविले तर १९६०–६१ साली ही रक्कम १७३ कोटी ६० लक्ष इतकी वाढली. स्टेट बँकेच्या स्वतःच्या योजनेखाली पाठविलेली रक्कम या काळात २९ कोटी ९० लक्ष रुपयांपासून १०२ कोटी ७० लक्ष लक्ष रुपयापर्यंत वाढली.

चलन विप्रेषणाच्या सवलतीखेरीज स्टेट बँक सहकारी बँकांना सवलतीच्या दरात अनेक सोयी उपलब्ध करून देत आली आहे. स्टेट बँकेचा व्याजाचा दर आहे त्यापेक्षा अर्धा टक्का कमी दरात सहकारी बँका सरकारी कर्जरोख्यांच्या तारणावर कर्ज घेऊं शकतात वा त्यांना ओव्हरड्राफ्टस् घेता येतात. त्याचप्रमाणे मध्यवर्ती सहकारी कर्ज पुरवठा संस्थास संलग्न अशा सहकारी संस्थांना कर्जपुरवठा करण्यासाठी सरकारी हमीवर स्टेट बँक कर्जाऊ रकमा देत असते. सहकारी बँकांचे स्वतःचे चेकस् सवलतीच्या दरानें घेतले जातात सहकारी बँकांनी स्वतःचा निधि वाढविण्यासाठी राज्य सहकारी बँकांवर काढलेले चेक वा ड्राफ्टस् सवलतीच्या दराने जमा केले जातात सरकारी कर्जरोख्यांच्या तारणावर ३० सप्टेंबर १९५७ ला ८ कोटी ५० लाख रुपयापर्यंत बँकेनें सहकारी बँकांना कर्ज मंजूर केली होती तर १९६१ च्या अखेरीस ही मर्यादा ११ कोटी ९२ लाख रुपयापर्यंत गेली

या सर्व गोष्टीवरून स्टेट बँकेने देशात सहकारी बँकांची वाढ व्हावी म्हणून अनेक प्रकारची उपाय-योजना केली आहे हें स्पष्ट होईल या-खेरीज स्टेट बँकेनें सरकारी सहकार्यानें चाललेल्या आठ बँका ताब्यात घेतल्या असून या बँका स्टेट बँकेच्या दुय्यम बँका म्हणून कार्य करीत आहेत. यामुळे या सर्व मिळून स्टेट बँक स्वतःच्या ९७५ व दुय्यम बँकांच्या ५७८ शाखातून सहकारी बँकांना देत असते. शिवाय शाखा विस्तार योजनेखाली १९६०–६५ या पाच वर्षांच्या काळात स्टेट बँक व तिच्या दुय्यम बँका देशात आणखी ३०० शाखा उघडणार आहे. अशा प्रकारें देशात एकूण १७०० कार्यालयातून या शाखातून स्टेट बँक सहकारी बँकांच्या विकासासाठी सवलती देऊ शकेल.

## लँड–मॉर्गेज बँका

लँड-मॉर्गेज बँकांची वाढ व्हावी यासाठीहि स्टेट बँक अनेक प्रकारे मदत करीत असते. विशेषतः देशांतील मध्यवर्ती लँड मॉर्गेज बँक जी डिबेंचर्स काढतात, त्यांपैकी विशिष्ट भाग स्टेट बँक विकत घेते १९५५ च्या अखेरीस ५ लाख रुपयांची डिबेंचर्स बँकेने घेतली होती तर १९६१ च्या अखेरीस या डिबेंचर्संमधील बँकेची गुंतवणूक १ कोटी ४१ लाख रुपयापर्यंत वाढली. या डिबेंचर्सची बाजारातील पत वाढावी म्हणून स्टेट बँक सहकारी संस्थांना व इतरांना या डिबेंचर्सच्या तारणावर कर्जाऊ रकमा देत असते. लँड मॉर्गेज बँकांच्या डिबेंचर्सच्या तारणावर स्टेट बँकेने १९६१ अखेर एक कोटी ७१ हजार रुपयांची कर्जे मंजूर केली. याखेरीज लँड मॉर्गेज बँकांना डिबेंचर्सद्वारा त्यांचा निधि उभारला जाईपर्यंत, त्यांच्या नेहमीच्या कर्ज देण्याच्या व्यवहारासाठी स्टेट बँक हंगामी काळासाठी आर्थिक सहाय्य देते. सरकारी हमीवर असे सहाय दिलें जातें. उदाहरणार्थ ३१ डिसेंबर १९६१ रोजी देशातील चार लँड मॉर्गेज बँकांना स्टेट बँकेनें एक कोटी ४० लक्ष रुपये यासाठीच दिले. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत लँड मॉर्गेज बँकांची मोठ्या प्रमाणावर वाढ करण्याचे योजिलें आहे. साहजिकच या बँकांना स्टेट बँकेकडून वर उल्लेखिलेल्या विविध प्रकारांनी सहाय्य अधिक प्रमाणात मिळू लागेल

## विक्री आणि संस्करण

आपल्या देशातील सहकारी चळवळीची प्रगती सर्व आघाडींवर झालेली नसल्यानें ही चळवळ सम-प्रमाणांत वाढलेली नाही हें सर्वश्रुतच होय. पतपेढ्या सोडल्या तर ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या अनेक महत्त्वाच्या क्षेत्रात सहकारी संस्थांनी फारशी प्रगति केलेली नाही. उदाहरणार्थ सहकारी खरेदी विक्री पद्धतीचा विकास समाधानकारकरीत्या झालेला नाही आणि शेती मालावरील संस्करण हें प्राय खाजगी व्यापाऱ्यांच्यात होतात आहे. याचा परिणाम असा झाला आहे की, सहकारी पतपेढ्यासुद्धा पुरेशा जोमानें चालत नाहीत सहकारी चळवळ संतुलित आणि विविध अंगांनी वाढली पाहिजे म्हणजे विविध घटकाचा विकास एकमेकांच्या साह्यानें होईल आणि ही सारी प्रक्रिया एकजीव होईल तसें झालें तर ग्रामीण समाजाच्या आर्थिक सुधारणेसाठी सहकारी चळवळ ही एक प्रभावी शक्ति ठरेल यासाठीच विक्री व संस्करण सहकारी संस्थावर दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत एवढा भर देण्यात आला शेतकऱ्याकडून विकल्या जाणाऱ्या शेतमालाच्या १० टक्के माल सहकारी विक्री व्यवस्थेखाली आणण्याचें उद्दिष्ट दुसऱ्या योजनेने आपल्यापुढें ठेवलें होतें. या उद्दिष्टाच्या पूर्तिसाठी १८०० प्राथ

मिक विक्री सहकारी संस्था स्थापन करण्याचा कार्यक्रम आखण्यांत आला तसेंच ३५ सहकारी साखर कारखानें व इतर प्रकारच्या १६६ सहकारी संस्करण संस्था स्थापन करण्याचें दुसऱ्या योजनेनें ठरविलें होतें. ही लक्ष्यें प्राय: गांठली गेली आहेत.

ग्रामीण कर्ज–पुरवठा पाहणी समितीनें स्टेट बँकेकडून ज्या प्रकारच्या कामगिरीची अपेक्षा व्यक्त केली होती ती पुरी करण्यासाठी विक्री व संस्करण संस्थाना आर्थिक मदत देण्याची योजना स्टेट बँकेनें अंमलांत आणली. या योजनेनुसार स्टेट बँक या संस्थाच्या शेती मालाच्या तारणावर खेळतें भांडवल पुरविण्याची गरज भागविते. कांहीं योग्य संस्थांना बँक विनातारण ( clean ) कर्जाची सोय करते. विक्री संस्थाना दिलेल्या कर्जावर स्टेट बँक आपल्या व्याजाच्या दरापेक्षा अर्धा टक्क्याहून अधिक दर आकारत नाही. तसेंच, गुदामाचें भाडें, विमा व इतर खर्च या सर्वांचा भार ऋणकोवर शक्य तितका कमी पडेल अशी काळजी घेतली जाते. उदाहरणार्थ पाच लाखाहून कमी रक्कम ज्यास कर्जाऊ दिली असेल त्यास गुदाम मुनिमाचे भाडें आकारलें जात नाही. फक्त गुदामावरील नोकरवर्ग अपुरा असल्यानें जर जादा नोकरवर्ग लावावा लागला तच गुदाम मुनिमाचे भाडे या ऋणकोकडून घेतलें जातें.

पक्का माल तयार करणाऱ्या संस्करण संस्थापैकी साखर कारखान्याना काही खास सवलती स्टेट बँक देत असते. इन्डस्ट्रिअल फायनान्स कॉर्पोरेशनकडून मान्य झालेली रक्कम या कारखान्याना मिळावयाच्या पूर्वी संबंधित राज्य सरकारानी हमी दिल्यास स्टेट बँक सहकारी साखर कारखान्यांना हंगामी स्वरूपाचे कर्ज देते. खेळत्या भांडवलाची गरज भागविण्यासाठी या कारखान्यांना साखरेचे सांठे, तसेच ताबडतोब विक्रीस योग्य असे स्टोअरमधील माल याच्या तारणावर आर्थिक साहाय्य व कर्जाऊ रकमा दिल्या जातात. या कारखान्यांच्या मालमत्तेच्या तारणावर किंवा संबंधित राज्य सरकारच्या हमीवर त्याना यंत्रसामुग्री व भांडवली मालाच्या आयातीसाठी आवश्यक ते ऐपतीचे दाखले दिले जातात.

सहकारी विक्री व संस्करण संस्थास अर्थसाहाय्य करण्याची स्टेट बँकेची योजना १९५८ साली सुरू करण्यात आली या योजनेखाली गेल्या चार वर्षात बँकेनें दिलेल्या साहाय्यामध्यें बरीच वाढ झाली आहे १९६१ अखेर, सहकारी विक्री संस्था व सहकारी साखर कारखान्याव्यतिरिक्त इतर संस्करण संस्था अशा १६३ संस्थास स्टेट बँकेनें २ कोटी ४२ लक्ष रुपये कर्जरीत्या मंजूर केले होते व त्यापैकी ३० लक्ष ४१ हजार रुपये बाकी होते. याशिवाय, १९६१ अखेर पाच सहकारी साखर कारखान्याना, इंडस्ट्रियल फायनान्स कॉर्पोरेशनकडून त्याना मंजूर झालेली कर्जाची रक्कम मिळेपर्यंत, हंगामी स्वरूपाची १ कोटी ४७ लक्ष रुपयाची कर्जें मंजूर केली होती व त्यापैकी ९६ लक्ष ३८ हजार रुपये बाकी होते; दोन सहकारी साखर कारखान्याना, खेळत्या भांडवलाची गरज भागविण्यासाठी, राज्य सरकारच्या हमीवर, बँकेनें ४० लक्ष रुपयाची कर्जें मंजूर केली होती व त्यापैकी ३९ लक्ष ७५ हजार रुपये बाकी होते; आणि ९ सहकारी साखर कारखान्याना साखरेचा सांठा वगैरेच्या तारणावर बँकेने एकूण ३ कोटी ५० लक्ष रुपयाची कर्जें मंजूर केली होती व त्यापैकी २ कोटी ११ लक्ष रुपये बाकी होते. या व्यतिरिक्त अनेक सहकारी साखर कारखान्याना त्याच्या प्राथमिक अवस्थेमध्यें बँकेनें, यंत्रसामुग्रीच्या आयातीसाठी लागणारे ऐपतीचे दाखले व आयात मालाची किंमत कालांतरानें देण्यासंबंधी आवश्यक ती हमी देऊन साहाय्य केले आहे.

सहकारी संस्थांना –विशेषत: शेतमालाची खरेदी–विक्री करणाऱ्या–खेळतें भांडवल पुरविण्यासाठी स्टेट बँकेनें कांही राज्य सहकारी बँकास कर्जें दिली आहेत. त्याचप्रमाणें गुदामाची वाढ करण्याच्या योजनेशी बँक सहकार्य करीत असते. गुदामांत उत्पादकानें शेतीचा माल ठेवल्यावर त्या गुदामाचा प्रमुख जी पावती देतो तिच्या तारणावर बँक कर्जपुरवठा करते. शाखा विस्तार योजनेखाली नवीन शाखा उघडताना जेथें केंद्र सरकारतर्फें वा राज्य सरकारतर्फें गुदाम स्थापन झालें असेल तेथें शक्य तो शाखा स्थापन करण्याचे स्टेट बँकेचे धोरण असतें; १९६१ च्या अखेरीस गुदामाच्या पावतीवर २६५० प्रकरणात बँकेन आर्थिक सहाय्य केले. त्याची मंजूर झालेल्या कर्जाची रक्कम एकूण ४ कोटी २९ लक्षापर्यंत असून त्यापैकी १ कोटी ४५ लक्ष रुपये बाकी होते. या सवलतीचा अनेक व्यक्ती व सहकारी संस्था फायदा करून घेत आहेत. केन्द्रीय व राज्य वेअर हौसिंग कॉर्पोरेशन ज्या प्रमाणात गुदामांची संख्या वाढवतील आणि या गुवादामाचा व्यवहार वाढेल त्या प्रमाणांत या क्षेत्रात प्रगती होईल.

सहकारी विक्री व संस्करण संस्थाची मोठी संख्या लक्षांत घेता बँकेतर्फें होणारें आर्थिक सहाय्य कदाचित् अल्प वाटेल. परंतु या संबधातील बँकेच्या कर्जाचें मूल्यमापन करण्यापूर्वी इतरहि गोष्टीचा विचार करणे अगत्याचे आहे. पहिली गोष्ट ही की, सर्व प्रकारच्या सहकारी संस्थांना आर्थिक सहाय्य देण्याची जबाबदारी मुख्यत: मध्यवर्ती सहकारी अर्थपुरवठा संस्थावर असते. सहकारी चळवळीतील वेगवेगळे घटक एका सूत्रात गोवून ही चळवळ एकसंध करण्याचे पद्धतशीर प्रयत्न चालू आहेत. गरजू सहकारी विक्री व संस्करणसंस्थाना साहाय्य करीत असताना सहकारी चळवळीतील अंतर्गत नाजूक हितसंबंध आणि शिस्त बिघडणार नाही याचीहि बँकेला काळजी घ्यावी लागते. या संदर्भात १९५७ च्या मार्चमध्यें रिझर्व्ह बँकेनें स्टेट बँक आणि सहकारी व शेती अर्थ–व्यवस्था संबंध याबाबत नेमलेल्या अॅड-हॉक समितीनें व्यक्त केलेले विचार महत्त्वाचे आहेत. या समितीची शिफारस अशी आहे :–

"आंध्र, मद्रास, मुंबई वगैरे ज्या राज्यांतील सहकारी बँकाजवळ सहकारी विक्री व संस्करण संस्थाना आर्थिक साहाय्य करण्याकरता पुरेशी साधनसामुग्री आहे व ज्या राज्यात विशेष अडचण न पडता या कार्यासाठी आर्थिक साहाय्य दिले जातें अशा राज्यात स्टेट बँकेच्या कार्याची कक्षा मर्यादित स्वरूपाची राहाणें स्वाभाविक आहे. म्हणजे स्टेट बँकेचें कार्य सहकारी विक्री व संस्करण यासाठी उपलब्ध असलेल्या साधनसामुग्रीत भर घालण्याच्या स्वरूपाचे असून अशा पूरक साहा-

त्याची गरज स्वाभाविकत: मध्यवर्ति अर्थपुरवठा संस्था ज्या राज्यांत शेतमालाचें उत्पादन, विक्री व संस्करण यासाठी पुरेसा अर्थपुरवठा करण्यास असमर्थ आहेत अशा राज्यांत विशेषेंकरून निर्माण होते.

यावरून हें स्पष्ट होईल कीं सहकारी विक्री व संस्करण संस्थांना आर्थिक साहाय्य करण्याचें स्टेट बँकेचें कार्य हें प्राय: पूरक स्वरूपाचें आहे. सहकारी क्षेत्रांत मागें असलेल्या राज्यांत सहकारी विक्री व संस्करण संस्थाना बँक प्रत्यक्षरीत्या कर्जाऊ रकमा देते तर सहकारी क्षेत्रांत पुढारलेल्या राज्यांत अशा प्रकारचें सहाय्य बरेंच मर्यादित असते. बँकेनें दिलेल्या सवलतीचा फायदा घेण्यासाठी या राज्यातील सहकारी संस्थाना सहकारी संस्थाचे रजिस्ट्रार आणि संबंधित मध्यवर्ती अर्थपुरवठा संस्थांची परवानगी घ्यावी लागते.

तसेंच बँकेच्या या सवलतींची माहिती बऱ्याचशा सहकारी संस्थांना नसण्यासाचहि संभव असतो. तेव्हां आपल्या योजनेच्या प्रसिद्धीची तजवीज स्टेट बँकेनें केली आहे. सहकारी संस्थांचे रजिस्ट्रार, राज्य सहकारी संघ वगैरेंना बँक वरचेवर साहित्य पुरवीत असते. सहकारी विक्री संस्करण, गुदाम इत्यादिबाबत होणाऱ्या बैठका व परिसंवाद यांना बँकेचे प्रतिनिधी हजर राहतात, आणि बँकेचें धोरण स्पष्ट करतात. बँकेच्या विभागीय प्रमुख कार्यालयांत (Local Head offices) विभागीय सुसूत्रीकरण समित्या स्थापन केलेल्या आहेत. राज्यातील सहकारी खात्यांतील अधिकारी, राज्य सहकारी संघाचे बिनसरकारी पदाधिकारी तसेंच सहकारी विक्री संस्थांचे प्रतिनिधि यांचें बँकेच्या या योजनेच्या अंमलबजावणीत सहकार्य मिळावें हा या समित्यांच्या स्थापनेमागील हेतू आहे. सहकाराचें शिक्षण घेणारे जे अनेक विद्यार्थी स्टेट बँकेला मधून मधून भेट देतात त्यांनाहि बँकेची भूमिका व कार्य यांची माहिती दिली जाते.

सहकारी विक्री संस्थांना स्टेट बँक जें आर्थिक साहाय्य करते त्यापेक्षां अधिक साहाय्याची त्यांना कदाचित गरजहि वाटत नसेल. याचे एक कारण म्हणजे सहकाराच्या बाबतीत पुढारलेल्या राज्यातील अर्थ-पुरवठा करणाऱ्या संस्थाची साधनसामुग्री या विक्री संस्थांची गरज भागविण्यास पुरेशी असेल वा दुसरे कारण म्हणजे सहकारी विक्री व्यवहार पुरेसा प्रगत झालेला नसावा. बऱ्याचशा राज्यात सहकारी विक्रीचा विकास होण्याच्या मार्गात अनेक अडचणी येत असतात. लेव्ही, सरकारी व्यापाराबाबतची बदलती धोरणें, विक्रीकर, सहकारी क्षेत्रात साठा व संस्करण करण्याबाबतच्या सवलतींचा अभाव, खाजगी व्यापाऱ्यांकडून होणारी जोरदार स्पर्धा आणि सहकारी संस्थांतील सभासदांमधील निष्ठेचा अभाव या व अशाच कारणाचा या संदर्भात उल्लेख करता येईल.

कर्जाबाबतच्या अटी स्टेट बँकेनें बऱ्याच सैल केल्या असल्या तरीही कांही सहकारी विक्री संस्थाना बँकेच्या योजनेचा फायदा घेणें शक्य होत नसेल. तथापि येथें हें स्पष्ट केलें पाहिजे की, सहकारी विक्री संस्थाकडून कर्जासाठीं २१६ अर्ज आले, त्यापैकीं, फक्त ९ अर्जच नाकारण्यात आले. कांही वेळां बँकेच्या कार्यपद्धतीमुळें कर्ज मान्य होण्यास विलंब लागला असेल किंवा कांही थोडे अर्ज यामुळेंच नाकारले गेले असतील परंतु अर्जतपासणीच्या कार्यपद्धतीमध्यें सुधारणा व तांत्रिक अडचणी दूर होऊन कर्ज त्वरित मंजूर व्हावे यासाठी बँकेचे सतत प्रयत्न चालू आहेत. त्याचबरोबर सहकारी रीत्या कर्ज काढणाऱ्या ऋणकोनींही स्वत: प्रयत्न करून, या सर्व गोष्टी लवकरच पार पडतील हें पाहिलें पाहिजे. तथापि बँकेनें अटी सैल केल्या असल्या तरी औदार्याच्या धोरणालाहि दोन प्रकारच्या मर्यादा आहेत. एक म्हणजे बँकेचा कारभार योग्य व्यवहाराच्या तत्त्वावर चालला पाहिजे आणि म्हणून सहकारी संस्थाना बँक फार मोठ्या प्रमाणात सवलती देऊं शकणार नाही. दुसरे म्हणजे बँकेचा व्याजाचा दर तुलनात्मकदृष्ट्या वाजवी असला पाहिजे. एरवीं सहकारी संस्था त्याना अर्थपुरवठा करणाऱ्या मध्यवर्ति स्वरूपाच्या संस्थांपासून बाजूला पडतील आणि सहकारी पद्धतीशी असलेल्या त्यांच्या निष्ठेला बाधा येईल. हें होणार नाही अशा प्रकारें व्याजाचा दर ठेवला गेला पाहिजे. सहकारी चळवळीला आर्थिक मदत करण्याच्या कामीं बँक नेहमीच तयार असते व तयार राहील. व सहकारी क्षेत्रातीलच अर्थपुरवठा करणाऱ्या संस्था अधिकाधिक समर्थ बनण्याच्या मार्गात बँक कधीच आड येणार नाहीं

आजच्या स्थितीत सहकारी विक्री संस्थाच्या वाढीला तिसऱ्या योजनेंत बराच वाव ठेवला आहे हें उत्साहवर्धक आहे. तिसऱ्या योजनेच्या अखेरीस विक्रीस योग्य अशा अतिरिक्त धान्यापैकी २० टक्के धान्य आणि पैशाच्या पिकांपैकी ( Cash crops ) ३० टक्के पिक या विक्री संस्था विकूं लागतील अशी अपेक्षा आहे. यासाठी साऱ्या देशातील महत्त्वाच्या बाजारपेठांना व्यापणाऱ्या अशा ६०० सहकारी विक्री संस्था स्थापन केल्या जाणार आहेत. संस्करणाच्या पक्क्या मालाच्या उत्पादनाच्या क्षेत्रांत २५ सहकारी साखर कारखाने आणि इतर ७८३ संस्करण संस्था स्थापन करण्याचा संकल्प आहे. शेतीमालाचें उत्पादन वाढल्यानें आणि या मालाची विक्री करणाऱ्या सहकारी संस्थांचीहि वाढ झाल्यानें उत्पादन आणि विक्री यासाठी कर्जपुरवठा करणें मध्यवर्ति कर्जपुरवठा संस्थांस जरा जड जाईल असें वाटतें. सहकारी क्षेत्रांतील विक्री संस्थांची वाढ होत गेली की, या संस्था स्टेट बँकेकडून मिळणाऱ्या सवलतीचा वाढत्या प्रमाणावर फायदा उठवतील अशी अपेक्षा आहे. तसेंच कर्ज-पुरवठा करणाऱ्या मध्यवर्ति स्वरूपाच्या संस्थानाहि स्टेट बँकेकडून अधिक मोठ्या प्रमाणात आर्थिक सहाय्य लागेल. तेव्हां यावरून, हें स्पष्ट होईल की, सहकारी विक्री व संस्करण संस्था यांना आजच्यापेक्षा पुढील काळात स्टेट बँकेकडून बऱ्याच प्रमाणात आर्थिक साहाय्याची आवश्यकता वा ेल. या कामी स्टेट बँकेचे कार्य सध्यापेक्षा विशेष भरीव स्वरूपाचें राहील असें वाटतें. तसेंच सहकारी संस्थाहि आपली वाढ व उत्कर्ष साधण्याकरितां स्टेट बँकेच्या साहाय्याचा व सवलतीचा पुरेपूर लाभ घेतील अशी आशा आहे.

★★★






# सहकार व सरकार अन्योन्य संबंध: मीमांसा

श्री बाळासाहेब भारदे
सभापति महाराष्ट्र राज्य





सहकारी चळवळीच्या वाढत्या महत्वाचें आकलन सर्वांना होऊं लागलें आहे. सहकारी चळवळ म्हणजे केवळ कांही संस्था चालविणें नसून ती नवसमाज निर्मितीची चळवळ आहे हा दृष्टिकोन प्रभावी होत आहे. सहकारी समाजवादी रचनेवर आधारलेलें संघराज्य निर्माण करणें हें उद्दिष्ट या देशानें मंजूर केलें आहे. समाज परिवर्तनाचें हे कार्य लोकशाहीच्या आधारानें करावयाचें आहे. अर्थात् शासनसंस्था ही लोकांचीच संस्था आहे आणि सहकारी संस्था याही लोकांच्याच संस्था आहेत. अर्थात् क्षेत्रपरत्वें व कार्यपरत्वें त्यांचा अधिकार, महत्त्व व कार्य यामध्यें फरक आहेच. खुद्द शासनसंस्थेच्या बाबतीतही शासन संस्था केवळ केंद्रित राहिली तर लोकशाही सुस्थिर होणार नाहीं हें जाणून विकेंद्रित शासकीय लोकशाहीचा आविष्कार पंचायत राज्यामार्फत देशभर होऊं लागला आहे. लोकशाही पद्धतीनें आर्थिक नियोजन यशस्वी करावयाचे आहे. त्यासाठी औद्योगिक कार्यक्षमता आणि सामाजिक समता यांचा समन्वय होणें अवश्य आहे. हा समन्वय सहकारी आर्थिक प्रक्रियाच्या मार्गानें प्रभावीपणें होऊं शकेल याबद्दलहि फारसें दुमत नाही कल्याणकारी राज्याची प्रस्थापना करण्यासाठी सरकार आहे आणि कल्याणकारी ग्राम समाज प्रस्थापित करण्यासाठी सहकार आहे. हें सर्व लक्षात घेतलें म्हणजे सरकार आणि सहकार यांच्या परस्पर संबंधाची भूमिका, अपेक्षा, मर्यादा व रूपरेषा निश्चित करणें फारसें कठीण जाणार नाही त्यासंबंधी काही विचार प्रस्तुत लेखात मी व्यक्त करीत आहे.

**अधिक उत्तेजन कमी नियंत्रण !**

सहकार हा मानवांचा स्थायीभाव आहे आणि मानवसमाज च सहकारी मूल्यावर अधिष्ठित आहे यात शंका नाहीं. म्हणून मानवाच्या अनेक प्रक्रियामध्ये, सहकार दिसून येतो. त्याच्या आर्थिक प्रक्रियामध्यंही सहकार कमीअधिक प्रमाणांत असतो. पूर्वीं खेडे गावांत सुद्धां शेती, धान्यपुरवठा, श्रमदान वगैरे क्षेत्रांत सहकारी पद्धतीचा प्रत्यय कांहीं ठिकाणी आढळून येतो पंचायत कल्पना लोकसहकारावर आधारलेली आहे. तथापि आज सहकारी चळवळ या शब्दाचा जो अभिप्रेत अर्थ आहे त्या अर्थानें या चळवळीची सुरुवात पन्नाससाठ वर्षांपूर्वी झाली. शेतकऱ्याच्या कर्जाच्या भेसूर प्रश्नामुळ

सरकारचें लक्ष सहकारी चळवळीकडे गेलें. कर्जपुरवठ्याची काहीतरी व्यवस्था केल्याशिवाय शेतीचा परिपोष होणार नाही आणि शेतकऱ्याचा असंतोष जाणार नाही या जाणिवेनें सहकार विचार करूं लागलें व सहकारी संस्थांच्या मार्फत कर्ज पुरवठा करण्याची कल्पना सरकारनें उचलून धरली व सहकारी चळवळीचें लोण खेड्यापाड्यापर्यंत पोंहोचलें. या सर्व काळांत सहकारी चळवळीला प्रवर्तन, उत्तेजन, नियंत्रण इत्यादि प्रकारानें सरकारनें जास्त हातभार लावला. अर्थात् या चळवळीचें स्वरूप लोकसंस्थांचें असल्यानें सहकारी कार्यकर्ते पुढें येऊं लागले व सहकारी क्षेत्रातील सरकारी पुढाकाराची जागा कार्यकर्त्यांच्या पुढाकारानें घेतली. सहकारी चळवळ ही लोकांची चळवळ असल्यानें तें क्षेत्र अधिकाधिक प्रमाणात लोकांकडे म्हणजेच सहकारी संस्थांकडेच सुपूर्द करण्यांत यावें हा विचार तत्वतः मंजूर होऊं लागला. प्रवर्तन, देखरेख वगैरे कामें सहकारी संघ संस्था करूं लागल्या. सरकारचें उत्तेजन जास्तीत जास्त असावें पण नियंत्रण कमीत कमी असावें हा विचार सहकारी व सरकारी या दोन्हीही पातळीवर वळावत गेला. मात्र सहकारी पैसा हा जनतेचा पैसा असल्यामुळें त्याचा गैरवापर होऊं नये व सहकारी तत्त्वालाच मूठमाती मिळूं नये यासाठी सरकारनेंही जागरूक राहून योग्य ती उपाययोजना केली पाहिजे हीही गोष्ट सर्वांनी मान्य केली. सरकारनें सहकारी संस्थांच्या दैनंदिन कामात हस्तक्षेप करूं नये, मात्र त्या संस्थातील पैसा सुरक्षित राहील आणि गैर प्रकार होणार नाहीत यासाठी उपाययोजनेस सिद्ध रहावें या गोष्टीबद्दल फारसें दुमत नाही.

**सहकारी क्षेत्रांत सरकारी भागीदारी. (State Partnership)**

सहकारी क्षेत्राकडून जर शेती उत्पादनासाठी भरपूर कर्जपुरवठा आणि उद्दिष्टपूर्तीच्या दृष्टीनें तयारी व्हावयाची असेल तर तें क्षेत्र बलिष्ठ केलें पाहिजे. सहकारी संस्थांचे भांडवल, ठेवी, पतवाढ इत्यादि मार्गानें त्यांना बलिष्ठ केल्याशिवाय त्यांना प्रभावी होता येणार नाही. *यासाठीं सरकारी भागीदारीची कल्पना पुढें आली व ती स्वीकृत झाली.* सरकारनें भाग भांडवल घेतल्यास संस्थेची कर्ज उचलण्याची पत एकदम वाढते. शिवाय सरकार भागीदार आहे या जाणिवेनें ठेवीदारांना व इतरांनाही संस्थेबद्दल अधिक विश्वास वाटतो. शिवाय सरकारलाही भागीदारीच्या जबाबदाऱ्या ओळखून अधिक आत्मीयतेनें व जबाबदारीनें सहकारी कार्यांत सहभागी होता येते. म्हणून सरकारी भागीदारी आवश्यक आहे—श्री. वैकुंठभाई मेहता यांनी म्हटल्याप्रमाणें –

"Resourceless as these sectors of the community are, it is only the State initiative and State partnership that can bring them into the cooperative fold and make it possible for them to take advantage of the institutional facilities for agricultural credit and marketing as also where needed for their supplementary or subsidiary occupations".

रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनें सरकारी भागीदारीचा जोरदार पुरस्कार केला. *सरकार आणि सहकार यांची भागीदारी हें क्रांतिकारक तत्व आहे.* सहकारी चळवळ बलिष्ठ करण्यासाठी त्याची आवश्यकता आहे असें असूनही काही विचारवंतांनी त्यावर आक्षेप घेतले. सरकारी भागीदारी आली की सरकारी हस्तक्षेप वाढेल व सहकारी स्वरूपावरच *आक्रमण होईल अशा भीतीनें काही लोकांना पछाडलें. खुद्द पंडितजींना* सुद्धा या प्रयोगाबद्दल शंका वाटूं लागली. पंडितजींनी को–ऑपरेटिव्ह काँग्रेसपुढें बोलताना ही भावना व्यक्त केली :

"There was a tendency on the part of the committee to distrust our people, to think that they were not competent enough, that *they could not do a job by themselves; therefore* the Government officials must come in to help. Government money should push them up. If Government money comes that money is followed by Government officials. Because the small co-operative has not enough resources in *money or competent technical personnel* there should be large co-operatives which can be started and helped by the Government. Now I believe that the approach was a wrong one and it has given a wrong turn to our cooperative movement."

सरकारी भागीदारीबरोबरच सरकारी अधिकाऱ्यांना वर्चस्व येतें *या समजुतीवर या सर्व शंका आधारल्या आहेत. वस्तुतः दुबळ्या* सहकारी संस्थाच अधिक परावलंबी बनून त्यांना कायद्याच्या वा अधिकाऱ्यांच्या कच्छपी जावें लागतें. संस्था बलिष्ठ असतील, तर त्या अधिक *स्वावलंबी बनतात व सरकारी अधिकाऱ्यांच्या हस्तक्षेपालाही तेथें वाव* रहात नाही. दुबळ्या संस्थांना समर्थ बनविण्यासाठी भांडवल-भागीदारी अवश्य आहे. या भांडवल भागीदारीमुळें त्या संस्था परावलंबी बनण्याऐवजी स्वावलंबी बनतील या गोष्टीकडे जावें तितकें लक्ष गेलें नाही. खुद्द रूरल क्रे. स. कमिटीनें असें स्पष्ट म्हटलें आहे की,

"The routine administration dispensation not unknown to some States whereby the District Collector is almost invariably the chairman of the Central Cooperative Banks would be far from our idea of the contract or form of State Partnership. *The aim of State partnership* would be to provide adequate, suitable and powerful support to the primary society. *In this connection we further emphasize the* need for non interference by Government in the day-to-day working of the institutions. It is

equally important that participation by the State should not imply any interference with sound banking principles ".

यावरून भागीदारीच्या कल्पनेत हस्तक्षेपाला वाव नसून सरकारी मदतीनें संस्था बलिष्ठ करण्यावर भर आहे हें स्पष्ट होतें. सरकारी भागीदारीचा हस्तक्षेपाशी बादरायण संबंध लावला गेल्यानें अनेक वर्षे सहकारी संस्थाना सरकारी भाग भांडवल नाकारण्यात आले. त्यामुळें त्यांना बलिष्ठ करण्याचें कार्य लांबणीवर पडलें हें नाकबूल करता येणार नाहीं. पुढें महाराष्ट्र राज्यातर्फे सहकार मंत्री या नात्यानें मी, काही राज्य मंत्र्यांनी व सहकारी कार्यकर्त्यांनी हा प्रश्न धसास लावला. मेहेता कमिटी नियुक्त झाली तिचा अहवाल सरकारने मंजूर केला सरकारी भांडवलाची योजना, अर्थक्षम ( Viable ) संस्थाची त्यासाठी योजना इत्यादि गोष्टी आता सरकारनें मंजूर केल्या असून या प्रश्नावर पडदा पडला आहे. जास्तीत जास्त सहकारी संस्थाना जास्तीत जास्त भाग भांडवल पुरवून त्याना बलिष्ठ करून दुबळ्या थराना समर्थ करण्याचें कार्य त्याच्याकडून करवून घेणें हें सरकारचें कर्तव्य आहे. सहकारासंबंधींचे हें कर्तव्य सरकार जेवढ्या प्रमाणात बजावील तेवढ्या प्रमाणात सहकारी प्रयत्नाच्या सिद्धीला अधिक गती मिळेल यात शंका नाही. एका बाजूला सर्वांनी सभासद व्हावे असा आग्रह धरावयाचा आणि त्याच्या गरजा पूर्ण करण्याची ताकद सहकारी संस्थाना आणून देण्याच्या कामामध्ये त्या मानानें वेग नसावयाचा ही गोष्ट सहकारी प्रगतीच्या दृष्टीने इष्ट नाही. सहकारी चळवळीकडून ज्या उद्दिष्टपूर्तीची अपेक्षा सरकार बाळगून आहे त्या पूर्तीसाठी जरूर ती ताकद सहकारी चळवळीला देणें हाच सरकारी जबाबदारीचा व भागीदारीचा अर्थ आहे.

**मदतीचा हात म्हणजे हस्तक्षेप नव्हे !**

सहकारी चळवळीत सरकारनें हस्तक्षेप करावा की नाही ? हस्तक्षेप कशाला म्हणावे ? हे प्रश्न वारंवार चर्चिले जातात. सहकारी संस्था सभासदाची आहे, पैसा त्यांचा आहे मग ते वाटेल तें करोत, सरकारला मध्यें पडून काय करावयाचे, वाटलें तर सरकारनें मदत करू नये असें एका बाजूनें म्हणता येईल पण कोणताही विचारी मनुष्य असें म्हणणार नाही. कारण सहकारी चळवळ ही सामाजिक उद्दिष्टपूर्तीसाठी चाललेली सामाजिक चळवळ आहे ती केवळ काही लोकांची खाजगी बाब नव्हे. संस्था बुडली आणि सभासदाचे पैसे बुडले म्हणजे ते नागवले जातात आणि शेती वगैरे उत्पादक गोष्टींना धोका पोहोचतो संस्थेला धोका पोहोचणें म्हणजे महत्त्वाच्या उत्पादन कार्याला धोका पोहोचणे आहे. खाजगी बँक बुडाली तरी अनेकाचे संसार उध्वस्त होतात हें पाहून तर त्यासाठी ही सरकारी पातळीवर उपाय योजना चालू आहेत सहकारी चळवळीचे तर अनन्य साधारण महत्त्व आहे तेव्हा सहकारी चळवळ चांगली चाललीच पाहिजे याबद्दल दुमत नाही ती चांगली चालण्यासाठी कांही विधिनिषेध मान्य केलेच पाहिजेत. भागभांडवल, मदत, (Subsidy) सवलती या मार्गानें सरकारला ती चांगली करण्यास मदत करता येईल त्याचप्रमाणें ती संस्था गैरमार्गानें चालून जर तिला धोका उत्पन्न होत असेल तर या गैरप्रकारास पायबंद घालण्यासाठींही सरकारला पुढें यावें लागेल या दोन्ही गोष्टी तत्वत मान्य होण्यासारख्या आहेत. व्यवहारत: परिस्थिति पाहूनच या परस्परासंबंधाचें मूल्यमापन करावें लागेल. एखाद्या सहकारी संस्थेत सरकारी अधिकाऱ्यानीं हात घातला तर दांडगाई आणि न घातला तर बेपर्वाई असें म्हणण्याचा संभव अधिक. वेळीच अधिकाऱ्यानी आळा घातला तर पुढचें नुकसान टळतें. बरे माहिती चुकीची निघून जर आळा घालण्याचा यत्न झाला तर कार्यकर्त्यांना ती अरेरावी वाटणार म्हणून सहकारी संस्थेमध्यें हस्तक्षेप झाला की नाही हे सैद्धांतिक ठोकताळ्यानें ठरणार नाही तर त्या संस्थेच्या परिस्थितीनुसार योग्य तें झालें की नाहीं यावरच तें अवलंबून आहे. दैनंदिन कामांत सरकारी अधिकाऱ्यांनी हस्तक्षेप करूं नये, निवडणुकात भाग घेऊं नये, संचालक मंडळावर सरकारी प्रतिनिधि असू नये, सहकारी तत्त्वानुसार काम चाललें असेल तर त्या संस्थेच्या कामकाजाबाबत संस्थेला पूर्ण स्वातंत्र्य द्यावें आणि थोडक्यांत सांगावयाचें तर लोकांच्या उत्स्फूर्त सहकारी संस्था या नात्याने त्या संस्थांना नि संकोच वाढूं द्यावें हीच सरकारची नीति असली पाहिजे व ती अन्याच प्रांतांत व विशेषत: महाराष्ट्र राज्यात अंमलांत आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. महाराष्ट्र सरकारनें तर भाग भांडवल देतांना सरकारी प्रतिनिधींची अट मुद्दा काढून टाकली आहे. पण त्याबरोबरच सहकारी संस्थाचा दुरुपयोग कोणी करू नये, पैशाबाबत गैरवापर होऊं नये संस्थेला हानि पोहोचूं नये, संस्थेच्या चालकांकडून सभासदाच्या वा जनतेच्या हिताला धोका होऊं नये यासाठी जरूर ती उपाययोजना सरकारनें केलीच पाहिजे. सहकाराच्या वाढत्या प्रचंड व्यापामध्ये जागरूक राहून सहकारी चळवळीतील अनिष्ट गोष्टींना आळा घालण्याचे कामही सरकारने केले पाहिजे.

**सहकार आणि अधिकार**

सरकारी संस्था म्हणजे सभासदाची संस्था, केवळ मूठभर पंचाची नव्हे म्हणून जेथें पंच अधिकाराचा दुरुपयोग करून सभासदाचेच हक्क डावलतील तेथें पंचाच्या कर्तव्याची पूर्तता करून घेतली पाहिजे. सर्वसाधारण सभा बोलावणें, हिशोब चोख ठेवणें, पैशाचा योग्य वापर करणे वगैरे बाबतीत हयगय झाल्यास सहकारी खात्याला इलाज करण्याचे अधिकार असले पाहिजेत दुसरी गोष्ट ही की, सहकारी संस्था केवळ सभासदाची नसून जनतेची आहे हा विचार सर्वमान्य झाला आहे. म्हणून सभासद करून घेण्याच्या बाबतीत वा जनहिताचा पोट नियम स्वीकारण्याच्या बाबतीत संस्थेकडून हयगय झाली तर त्याची पूर्तता करण्याचा अधिकार सरकारी खात्याकडे असला पाहिजे. तिसरी गोष्ट सहकारी चळवळ ही केवळ सवलतीची चळवळ नाही, पतीची आहे म्हणून कर्जाचा योग्य उपयोग, परतफेड, सहकारी शिस्त इत्यादि गोष्टींची अमलबजावणी होणें जरूर आहे त्यासाठीही जरूर ते अधिकार सरकारला असले पाहिजेत. चवथी गोष्ट ही की, सहकारी चळवळ म्हणजे सहकारी पद्धतीवर सर्व आर्थिक जीवन उभारण्याचा महाप्रयत्न आहे. उत्पादन, कर्जपुरवठा, विक्री, माल प्रक्रिया, वितरण इत्यादि विविध आर्थिक प्रक्रिया-

मध्ये सहकारी साखळी निर्माण झाल्या शिवाय, सहकारी समाज निर्माण होणार नाहीं. त्यासाठीं जरूर तर सक्तीचा या कांहीं परिणामकारक उपाययोजनांचा अधिकार सरकार वा बँक याना असल्याशिवाय ही सांखळी निर्माण होणार नाही. सारांश, सहकारी समाजाच्या निर्मितीसाठीं सहकारी संस्थांकडून किमान गोष्टीची तरी पूर्तता व्हावी असे अधिकार सरकारला असणें अवश्यक आहे.

### अधिकाराचें विकेंद्रीकरण

हे अधिकार सहकारी संस्थांकडे सुपूर्द केले म्हणजे सहकारी चळवळीचें विनसरकारीकरण झालें असें म्हणतां येईल. त्यासाठी सहकारी संस्थांच्या ज्या संघसंस्था ( Fedual Socitis ) आहेत त्यांच्याकडे आज ना उद्यां अधिकार सुपूर्द करणें श्रेयस्कर ठरेल. तशा प्रकारची तरतूद महाराष्ट्र सहकारी कायद्यांत आहे. प्रवर्तन काही मर्यादेपर्यंत नोंदणी, सभासद प्रवेश, सर्वसाधारण देखरेख या बाबी जिल्हा परिषदेकडे सुपूर्द करण्यांत आल्या आहेत. सहकारी संस्थाची निकोप वाढ, सहकारी शिस्तीचा कडक अवलंब, आणि सहकारी साखळीचा आग्रह या तिन्हीं गोष्टीकडे लक्ष देऊन, सहकारनिष्ठेनें व धडाडीनें अधिकारांचा वापर करणारी जी सुयोग्य यंत्रणा वाटेल त्याकडे हे अधिकार सुपूर्द करणें सोयीस्कर ठरेल.

### सहकारी समाजरथाची दोन चाकें

सरकार म्हणजे कोणी हुकूमशहा आहे असें सहकारानें म्हणू नये. आणि सहकार म्हणजे अव्यवस्था असें सरकारनें मानूं नये. दोन्हीही लोकनियुक्त संस्था आहेत. दोन्हीही परस्परपूरक आहेत असें जाणून परस्पर संबंध ठरले तर ते सर्वांनाच उपकारक होणार. अर्थात् अर्थव्यवहाराबाबतची सरकारची सर्वंकष नीति सहकाराला पूरक आहे कीं नाहीं, यावरही सरकाराचें भवितव्य बरेंच अवलंबून आहे हें सांगणें नकोच.



"सहकारी क्षेत्रांत काम करणाऱ्या लहान संस्थांना एकत्रित येण्यास बराच अडथळा येतो, पण हा अडथळा विशालतेचा व्यापक दृष्टिकोण ठेऊन निवारण करण्यास प्रयत्नशील राहिलें तरच सहकारी चळवळ व त्यावर अवलंबून असलेली लोकशाही यशस्वी होईल. सहकारी चळवळींत व्यक्तिश: काम करण्याची अभिलाषा असतें पण स्वार्थ न मिळविण्याची अपेक्षा बाळगली तर ह्या व्यक्तिनिरपेक्ष भावनेच ही चळवळ यशस्वी होईल."

—डॉ. धनंजयराव गाडगीळ












# सहकारी चळवळींतील दोषस्थळें

श्री. जे. सी. रायन

माजी प्रमुख शेतकी कर्जपुरवठा रिझर्व्ह बँक





















तकी पतपेढी हा सहकारी चळवळीचा भारतांत पाया होय. ह्या शेतकी पतपेढीवरच मुख्यत्वेंकरून ह्या चळवळीची शक्ति अवलंबून आहे. ३० जून १९६० पर्यंत एकूण २,०३,१७२ पतपेढया होत्या. दोन पंचवार्षिक नियोजनांतील आंकडेवारी पाहिली तर असें आढळून येतें, कीं पहिल्या पंचवार्षिक योजनेंत पतपेढयांचा आंकडा १,०५,००० होता. तो दुसऱ्या योजनेंत २,१०,००० पर्यंत गेला व सभासदांची सख्या ४.४ दशलक्षपासून ते १७ लक्ष लक्षपर्यंत गेली. त्याच काळात पतपेढयानी जी कर्जें दिली त्यांचा आंकडा रु. २३ कोटी पासून रु. २०० कोटीपर्यंत वाढत गेला. नियोजकाना ही प्रगति समाधानकारक वाटेल कारण, ह्यामध्यें त्यांच्या योजना पुष्कळ फलदायी झाल्या आहेत. सहकार खात्यानाहि ही प्रगति पाहून समाधान वाटेल कारण, ह्या पतपेढयांमुळें जी काही उद्दिष्टें सफल व्हावीत अशी त्यांची इच्छा होती ती सर्व सफल झाली आहेत. पण प्रश्न असा आहे की, ही प्रगति पाहून सहकारी चळवळीतील निष्ठावंत कार्यकर्त्यांचें समाधान होईल की नाहीं ? कारण, त्याना हवा असतो दर्जा, गुणवत्ता ! नुसती संख्यात्मक प्रगति नव्हे !

दरवर्षीच्या वार्षिक हिशेब तपासणींत ह्या पतपेढ्याचा दर्जा ठरविला जातो. परंतु दुर्दैवानें सर्व पतपेढ्यांची दरवर्षी हिशेव–तपासणी केली जात नाही व ज्या पतपेढ्याची हिशेबतपासणी केली जाते त्यांचें वर्गीकरण त्याच्या दर्जाप्रमाणें केलें जात नाही. ह्या दर्जाबाबत उपलब्ध असलेली अद्यावत आकडेवारी १९५८–५९ सालांतील आहे. त्यावेळी; ३,७५० पतपेढ्यांना ' अ ' वर्ग ( फार चांगल्या पतपेड्या ) देण्यांत आला होता. २३,१९७ पतपेढ्याना ' ब ' वर्ग ( चांगल्या पतपेढ्या ), १,०३,५८९ पतपेढ्याना ' क ' वर्ग ( सामान्य पतपेढ्या ) देण्यांत आला होता. तर १८,६४३ पपपेढ्याना ' ड ' वर्ग ( सुधारणा न घडल्यास विसर्जन करण्यात यावें ) देण्यांत आला होता, तर २,९४० पतपेढ्याना ' ई ' वर्ग देण्यांत आला ( म्हणजे या विसर्जित करण्यास योग्य समजल्या गेल्या ) तात्पर्य हें कीं जितक्या पतपेढ्या विसर्जित करण्याच्या अवस्थेंत होत्या तितक्याच चागल्या आणि फार चागल्याहि पतपेड्या होत्या. बहुतांश पतपेढ्या बऱ्याही नव्हत्या व वाईट नव्हत्या. मेहता कमिटीनें अशा सामान्य सोसायटींच्या पतपेढ्यांची शेंकडेवारी १९५६–५७ सालाच्या ऑडिट रिपोर्टावरून ६०.०३ टक्के ठरविली

आहे आणि पुढील काळांत ती संख्या वाढतच गेली आहे हें खालील कोष्टकावरून दिसून येईल.

| वर्ष | क वर्ग सोसायटया |
|---|---|
| १९५७–५८ | ८१,०७३ |
| १९५७–५८ | ८९,१४० |
| १९५८–५९ | १,०३,५८९ |

सगळयांत वाईट हें की, १९५९–६० सालाच्या भारतातील सहकारी चळवळीसंबंधीच्या आकडेवारीत असें म्हटले आहे की, शेतकी पतपेढयांच्या संख्येपैकी २१,३०५ पतपेढया एक वर्षभर काम करीत नव्हत्या आणि २२,५९४ दोन आणि अधिक वर्षे काम करीत नव्हत्या.

**१९६० मधील तोटयांतील सोसायटया—**

३० जून १९६० ला ४१,९५५ पतपेढया नुकसानीत काम करीत होत्या. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत अशा सोसायटया २१ टक्के तरी असतील असें मान्य केलें आहे. आंध्र, आसाम, बिहार, गुजरात, केरळ, मद्रास, ओरिसा, म्हैसूर, आणि पं. बंगाल या नऊ राज्यांत तर ही शेंकडेवारी २१ पेक्षांहि अधिक होती. खालील आकडयांवरून असें दिसून येतें की, नुकसानीत काम करणाऱ्या पतपेढयांची संख्या वर्षानुवर्ष सारखी वाढतच आहे.

| वर्ष | नुकसानीत चालणाऱ्या पतपेढयाची संख्या. |
|---|---|
| १९५६–५७ | २५,१४६ |
| १९५७–५८ | ३५,४९९ |
| १९५८–५९ | ३४,९४९ |
| १९५९–६० | ४१,९५५ |

**थकबाकी :–**

१९५९–६० च्या अखेरीस शेतकी पतपेढयाचें येणें ३७ ७० कोटी होतें. ही थकबाकी १९५८–५९ सालावरून १९५९–६० सालाला शेंकडा २० वरून २१ वर गेली. हे प्रमाण मागणीशी नसून एकंदर येणे असलेल्या कर्जावरील आहे. मागणीशी जर थकबाकीचें प्रमाण काढलें तर खासच आणखी वाढेल. महाराष्ट्रात सोसायटयांचे येणें ३३ ८५ कोटी आहे. तर थकबाकी ९·०७ कोटी आहे. म्हणजे ती एकूण कर्जाऊ रकमेच्या शेंकडा २७ आहे. बिहारची कहाणी तर करुणास्पद आहे तेथें १.९३ कोटी पैकी रु १.०६ कोटि थकबाकी आहे.

**यावर उपाय :–**

मेहता कमिटीनें शेतकी पतपेढयांची १९६० मध्यें पहाणी केली, *तेव्हां त्यांनी काढलेल्या निष्कर्षावरून या गोष्टीकडे डोळेझाक करता* येत नाही. यामुळें चळवळ कमकुवत झाली असल्याचे स्पष्ट दिसून येतें आणि मी दिलेल्या माहितीमुळें तर चळवळीमध्यें आत्मीयतेनें व निष्ठेनें काम करणाऱ्या लोकानी शांतपणें विचार केलाच पाहिजे. गेल्या सात वर्षांमध्यें ग्रामीण भागामध्यें जास्त पैसा गुतविण्यात आला नाही —? दुसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें या पतपेढयाना २०० कोटीपर्यंत कर्ज मिळावें यावरच सर्वांचा कटाक्ष होता ना ? आणि तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ही रक्कम ५३० कोटीपर्यंत न्यायी असेच सर्वांचे प्रयत्न चालले नाहीत का ? अधिकारीवर्ग जर या पंचवार्षिक योजनेमध्यें दिलेल्या उद्देशा पाठीमागें धावत राहिला तर तें एक समजू शकेल. सर *माल्कम डार्लिंग यांनीं म्हटल्याप्रमाणें ह्याला अधिकाऱ्याचा फाजील* उत्साह जितका कारणीभूत आहे तितकाच उद्दिष्टें न गाठलीं तर नोकरीत प्रगति खुंटेल ही भीतिही कारणीभूत आहे. परंतु सहकारी चळवळीत पडणाऱ्या बिनसरकारी लोकाना भिण्याचें कारण काय ? ते *सहकारी पतपेढयांचे हक्कदार सभासद असतात.* त्यांनी आपला पैसा त्यात गुतविलेला असतो आणि काहींनी पतपेढयाच्या भरभराटीसाठी मेहनत केलेली असते. त्याचीही मनोवृत्ति सरकारी अधिकाऱ्याप्रमाणेंच असावी काय ? त्याती सहकारी चळवळीची अधोगति अशीच चाल *यावी काय ? तसें झाल्यास वर सोन्याचें डोके आणि खाली मातीचे पाय* अशी सहकाराची मूर्ति तयार होईल ! अशा रीतीने सहकारचीजी अधोगति होत आहे ती थांबविण्याची आणि तिचा पाया भक्कम करण्याची वेळ आता निश्चितच आली आहे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ४२ हजार पतपेढयांमध्यें जिवंतपणा आणण्याची भाषा *बोलली* जात आहे. परतु यापैकी दुसऱ्या योजनेंत काम कित्ती झालें याचा कोठें उल्लेख नाही. तिसऱ्या योजनेत हा आकडा ५२ हजारांचा आहे. परंतु जिवतपणा आणणें म्हणजे सरकारी पैशांनी पतपेढीला एक कारकून देणें यापेक्षा जास्त *काही दिसत नाही. जिवंतपणा आणणें म्हणजे दोष नाहीसे* करणें, फायद्याची व्यवस्था लावणें आणि मजबूत पायांवर पतपेढयांची उभारणी करणें ही कामें करण्याकरितां बिनसरकारी कार्यकर्त्यांनी कष्ट घेऊन सारखे प्रयत्न करावयास पाहिजे.त

**कर्ज आनि काटकसर यांची सांगड :–**

काटकसर करायला शिकविणे हा सहकारी पतपेढीचा खरा हेतू आहे परंतु अलीकडील काळात याच्याकडेच दुर्लक्ष होत आहे. पूर्वी *आपल्या भागाचे पैसे भागीदारानी भरल्याखेरीज सोसायटी रजिस्टर* होत नसे. पण अलीकडे भागीदारांना ही विवंचना करावी लागत नाही. सध्या सरकारच हे पैसे भरतें. कित्येक संस्थापक असे सागतात की, भागीदारानी कर्ज घ्यावे आणि त्यातूनच आपल्या भागाचे पैसे भरावे म्हणजे पैसे जमवा असें सागण्याऐवजी कर्ज घ्या असें सागण्यात येतें कर्जदार हा कर्जाच्या मदतीनें स्वत ची आर्थिक परिस्थिती सुधारीत आहे की जास्त कंगाल होत आहे इकडे मुळी लक्षच दिले जात नाही ! कधी कधी तर गरजेपेक्षाहि अधिक कर्जे दिली जात आहेत एका कलेक्टरनें तर या पद्धतीचा निषेध केला आहे कर्ज आणि काटकसर या दोन्ही गोष्टी *एकमेकाना पूरक असाव्यात या तत्वाला सोडून हे सर्व काम चालले* नाहीं काय ? याचा परिणाम असा झाला आहे की, एकंदर सोसायटयाना कर्ज १७७ ७१ कोटी दिलेले असून, प्रत्येक सभासदाने घेतलेल्या कर्जाची सरासरी ११७ रु. आणि त्यांनी ठेवलेल्या ठेवी ११ ८ कोटी असून ही सरासरी प्रत्येकी रु. ९ पडते आणि लोकानीं घातलेले भाडवल ४१.७९ कोटी असून त्याची सरासरी ३२ पडते जास्त कर्ज

दिले असतां ते वसूल करणें सोपे जाते असे मागण्यात येते परंतु वसुल्लीच्या बाबतीत सर माल्कम डार्लींग यानी मुंबई राज्याबद्दल म्हटले आहे की,'अविकसित सहकारी चळवळीच्या बाबतीत भरमसाठ कर्ज देणे हें चळवळीच्या वाढीला पोषक ठरणार नाही.' वर महाराष्ट्रराज्या बद्दल दिलेल्या आंकडेवारीवरून सर मालकम याचे म्हणणे अद्यापि खरे आहे असें दिसून येईल. तरीपण तिसऱ्या पचवार्षिक योजनेमध्ये भागांदाराचा पैसा ४२ कोटीवरून ८५ कोटीपर्यंत आणि त्याच्या ठेवी १२ कोटीपासून ४२ कोटीपर्यंत वाढाव्यात अशी योजना केली अ हे. परंतु हें मुद्दां शेतकरी वर्गापैकी बिनसरकारी सभासदानी चिकाटीने आणि सतत काम केल्याखेरीज साध्य होणार नाही. काटकसर करण्याची संवय लोकांना लावण्याकरितां त्याना काटकसरीपासून होणाऱ्या फायद्याची जाणीव झाली पाहिजे.

**कर्ज देणें आणि माल खपविणें यांचा परस्पर संबंध–**

कर्ज घेतलेल्या लोकानी मालाची पैदास जास्त केल्यास तो माल योग्य भावात विकला गेला पाहिजे. १९५९–६० साली २५०१ मार्केटिंग सोसायटयांनी ४६.५४ कोटीचा माल विकला. माल विकून जे पैसे येतील त्यातूनच दिलेल्या कर्जाची परतफेड करून घेण्याची अट असते. तरीसुद्धा या दिशेनें काम फार अल्प प्रमाणात झालें आहे. याच्या शिवाय लोकानी घेतलेल्या कर्जाचा उपयोग शेतीचा माल निर्माण करण्याच्या कामी केला आणि किती पैसा भलत्याच कामी लावला हें सांगता येत नाही कर्जवाटप करणे फारसे कठिण नाही पण दूरदूर राहणाऱ्या शेतकऱ्याचा माल गोळा करणें अवघड आहे म्हणून निःस्वार्थी कार्यकर्त्यांचा शेतकऱ्याना माल एकत्र गोळा करून, मार्केटिंग सोसायटीमधून तो कसा किफायतशीरपणें विकता येतो हे समजावून सांगितलें पाहिजे

**सहकाराचा अंतीम उद्देश**

गेल्या ५० वर्षात सहकारी चळवळीची जी वाढ झाली त्याचें कारण, निरपेक्ष, निःस्वार्थी कार्यकर्ते मिळाले हें होय.अशा या कार्यकर्त्यांची सख्या कमी होऊ लागली आहे काय किंवा सरकार नोकर नेमून हें काम करून घेत आहे म्हणून अशा कार्यकर्त्याचे लक्ष चळवळीवरून उडालें आहे काय ? सहकाराचा उद्देश जास्तशेतीचा माल पैदा व्हावा किंवा जास्त क्रय-विक्रय व्हावा एवढाच नसून लोकांच्या रहाणीचे मान सुधारावे हाही आहे. लोकाचे व्यक्तित्व वाढावे आणि त्याची आर्थिक परिस्थिति सुधारावी. माणसें आहेत त्याच्यापेक्षा चांगली संपन्न व्हावीत हें सहकाराचे सर्व उद्देश निव्वळ सरकारच्या प्रयत्नांनीं साध्य होणार नाहींत. स्थानिक पुढाऱ्यांच्या प्रयत्नानी ते साध्य होतील निव्वळ सरकारी रजिस्ट्रारनी सक्य तेथें सोसायटया काढाव्या आणि एखादा माणूस गाठून त्याच्याकडून हें काम करून घेण्याचे दिवस आता राहिलेलेनाहीत. ! याचा उमज जितक्या लवकर पडेल तितकेंच तें श्रेयस्कर !

***



"ह्या देशांत ग्रामीण आणि शेतकरी व्यवस्था मजबूत करायची असेल तर आपण सहकारी जगताच्या स्थापनेचें ध्येय ठेवावे. आणि ह्यामुळेंच सामान्य जनतेचेहि हित होणार आहे. आजच्या किंवा उद्याच्या हिंदुस्थानांत खेडयांतील मनुष्य हाच सामान्य मनुष्य समजला जाईल. आज आपली वाटचाल औद्योगीकरणाच्या दिशेने चालू आहे आणि ती आपल्यापरीनें आवश्यकहि आहे तरीपण त्यामुळे शेतीचें महत्व काही कमी होत नाही. सहकारी जगतात अभिप्रेत असलेली चळवळ एक विशाल अशी चळवळ आहे. ह्या चळवळींत देशांतील प्रत्येक घटक सामील होऊन तो सर्वांच्या हितासाठीं आणि भारतीय खेडयाच्या भरभराटीसाठीं झटेल आणि अशा विकसित खेडयाच्या आणि आयोजित केंद्राच्या एकोप्यातून बळकट, शांततेच्या तत्त्वांचा खरा उपासक, एकमेकांना सहाय्य देणारा, आणि भाग्यशाली असा भारत निर्माण होईल."

माननीय यशवंतराव सुखठणकर
राज्यपाल (ओरिसा)

" सहकारी चळवळ लोकशाहीचा कळस आहे असें म्हणतात पण वस्तुत: सहकारी चळवळ लोकशाहीचा पाया आहे. सहकारी चळवळ ही सामान्य शेतकऱ्याची चळवळ झाली पाहिजे. कोरडवाहू शेत कसणाऱ्याची व लहान शेतकऱ्याची गरज ती कितपत भागवूं शकेल या दोन निकषांवर सहकारी चळवळीचें मूल्यमापन केलें पाहिजे. "

मा. यशवंतराव चव्हाण
१३ मे १९६१ सातारा.

  

. सहकारी चळवळ ही मूलत: जनतेच्या प्रयत्नांवर आधारलेली आहे. सहकारी तत्त्वावर चालू असलेल्या सहकारी प्रक्रिया करण्याच्या धंद्यांना आर्थिक बाजूपेक्षां एक वेगळी अशी महत्त्वाची सामाजिक बाजूही आहे. शेतकऱ्याला उद्योगधंद्यांत पैसे गुंतविण्यास लावण्याचा जवळ जवळ हाच एक मार्ग आहे. ग्रामीण भागांतील स्थानिक साधन सामुग्रीचा उपयोग करण्याच्या निमित्तानें, बाहेरुन येणाऱ्या भांडवलामुळें त्या भागांत जे प्रश्न निर्माण होतात ते ह्यामुळें टाळतां येतात. शिवाय त्यानें ग्रामीण व शहरी मूल्यांत असलेलें अंतर नष्ट होऊन शहरांतील व खेड्यांतील लोक एका पातळीवर येतात. ग्रामीण व शहरी हा भेद साहजिकच नष्ट होतो. याशिवाय महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशा प्रकारें वाढलेलें उत्पन्न सहकारी संघटनेमुळें शक्य तितक्या जास्त क्षेत्रांत वाटले जातें जेणेंकरुन खऱ्या अर्थानें समाजवादी समाजरचनेचा उद्देश साध्य होतो . . . . "

मा. यशवंतराव चव्हाण
१७ जून १९६०

  

"सहकार हें सरकारचें एक लाडावलेलें मूल असून सहकारालाच सरकार ऊठसूठ पुढें करीत असतें असा एक आरोप केला जातो. पण त्यांत काही तथ्य नाही प्रत्येक पातळीवर औद्योगीकरणास चालना देण्याचा सरकारचा जो निर्धार आहे, त्याचेच केवळ हे धोरण द्योतक होय. सहकाराचा अवलंब करणारा शेतकरी हा या शेतीविषयक उद्योगधंद्यातला उत्पादक असल्यामुळें औद्योगीकरणाच्या प्रक्रियेंत साहजिकच कार्यक्षमता व प्रगति निर्माण होते. खेड्यांतील कोट्यावधि जनतेचें जीवन मंगलमय करावें असा हेतु मनाशीं ठेवून आपलें राष्ट्र पुढें नेण्याचा प्रयत्न राष्ट्रनेते करीत आहेत. जनतेचें कल्याण करावयाचें एक साधन ह्या दृष्टीनें सहकारी चळवळीकडे पहाणें इष्ट ठरेल . . "

मा. यशवंतराव चव्हाण
१५ आगस्ट १९५८






# सहकारी प्रक्रिया संस्था


डॉ. चिं. द. दाते
मॅ. डायरेक्टर महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि.






त्पादननिष्ठ कर्जपद्धतिनुसार प्रत्येक पतवान शेतकऱ्याला त्याच्या पेढीमार्फत कर्जपुरवठा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी बँक व तिच्याशीं संलग्न अशा मध्यवर्ति बँकांनीं राज्यसरकारनें देऊ केलेल्या मदतीच्या आश्वासनावर स्वीकारून आज १२ वर्षांहून अधिक काळ लोटला आहे. महाराष्ट्रांतील सहकारी संस्थांनी जें धोरण अंगिकारलें त्याचाच पाठपुरावा अखिल भारतीय ग्रामीण कर्जपुरवठा पाहणी समितीने १९५४ सालच्या आपल्या प्रसिद्ध अशा अहवालांत केला. उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीची वैशिष्ट्यें खाली दिल्याप्रमाणे नमूद करण्यांत आलीं :

(अ) उत्पादनवाढ हें कर्जपुरवठ्याचें प्रमुख उद्दिष्ट असावें.

(ब) मालकी हक्क असलेल्या जमीनीवर अल्पमुदतीचें कर्ज न आधारतां पुढें उत्पन्न होणाऱ्या पिकाच्या अंदाजावर तें देण्यात यावें.

(क) दिलें जाणारे कर्ज पीकाच्या उत्पादनावर होणाऱ्या खर्चावर अवलंबित ठेवावे व

(ड) दिलेल्या कर्जाची वसुली उत्पन्न झालेला माल जसजसा विकला जाईल त्यांतून व्हावी.

पूर्वीच्या पद्धतीत व ह्या पद्धतींत फार महत्त्वाची तफावत आहे. पूर्वी शेतकऱ्याच्या मालकीच्या जमीनीच्या क्षेत्रफळावर किंवा त्या जमीनीच्या महसूलावर कर्जमर्यादा ठरत असे म्हणजे जमीनीची किंमत ठरवून तिचा एक ठराविक अंश कर्ज म्हणून दिले जाई किंवा जमीनीच्या साऱ्याच्या काहीपट कर्ज दिलें जात असे त्यामुळें ज्याच्याजवळ स्वतःच्या मालकीची जमीन नसे त्याना जवळजवळ काहीच कर्ज मिळत नसे. शिवाय जें पीक निघत असेल त्याची संभाव्य किंमत किंवा त्यावर होणारा खर्च ह्याच्याशी दिल्या जाणाऱ्या कर्जाचा कांहीच मेळ नसे. त्याचें मुख्य कारण म्हणजे पूर्वीच्या पद्धतीत जमीन हेंच मुख्य तारण म्हणून गणलें जाई आणि म्हणून दिल्या जाणाऱ्या कर्जाची जमीनीच्या किंमतीशी सांगड घालणें आवश्यक होतें. जरूर पडल्यास जमीन विकून कर्जाची फेड होणें शक्य झाले पाहिजे असें धोरण असे. उत्पादननिष्ठ पद्धतीत जमीनीच्या किंमतीपेक्षा तिच्यात होणाऱ्या पीकावर व त्या पीकावर होणाऱ्या खर्चावर अधिक भर दिला आहे. म्हणजे ज्या पिकातून अधिक उत्पन्न येणार असेल व ज्याला अधिक खर्च येणार असेल त्या

पिकाकरिता अधिक कर्ज दिलें पाहिजे अशी भूमिका नवीन कर्जपद्धतीत सर्वमान्य झाली. म्हणजेच जमीनीऐवजी पीक हें केंद्रस्थान झालें. तसेंच कर्जाची फेड जमीनीच्या तारणाची विल्हेवाट न लावतां पीकाच्या विक्रीनूनच झाली पाहिजे ह्यावर विशेष भर देण्यांत आला. त्यामुळें पिकाची विल्हेवाट कशी होणार आहे ह्या प्रश्नाला फार महत्त्व प्राप्त झालें. ग्रामीण सहकारी पतपेढीने जर उत्पादननिष्ठ कर्जपद्धति अमलांत आणावयाची असेल तर पिकलेल्या मालाच्या विक्रीवर तिचे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष असें नियंत्रण असणे अगत्याचें झालें. पत व विक्री ह्याची सांगड एकाच संस्थेत किंवा एकमेकाशी संलग्न अशा संस्थात घालणें हें उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीचें एक महत्त्वाचें अंग म्हणून मानण्यात आलें. किंबहुना त्या पद्धतीचें यश पत व विक्री ह्याच्या निकटतेवरच अवलंबून आहे असा सिद्धांत मांडण्यांत आला. म्हणजेच पीककर्ज योजनेचें पाऊल जर पुढे पडावयाचें असेल तर पत व विक्री ह्याचा संबंध जास्तीत जास्त निकटचा आणावा लागेल ह्याची जाणीव सर्वांना झाली.

ज्याला कर्ज दिलें असेल त्याचा सर्व माल ताब्यांत घेऊन स्वत.च विकला तर ग्रामीणसहकारी पतपेढीला पत व विक्री ह्यांना सर्वांत जवळ आणता येईल. परंतु एकाच संस्थेने कर्जपुरवठा व मालाची खरेदीविक्री करूं नये असा बऱ्याच अनुभवानें रूढ झालेला असा सिद्धांत आहे. खरेदी विक्रीच्या व्यवहारात अनेक प्रकारचे धोके असल्यामुळें ते कर्जपुरवठा करणाऱ्या संस्थेने पत्करल्यास त्याचा कर्जपुरवठ्याच्या महत्त्वाच्या कार्यावर अनिष्ट असा परिणाम होण्याचा संभव असतो. म्हणून कर्जपुरवठा करणें व खरेदी विक्री करणें हे व्यवहार दोन स्वतंत्र संस्थानी करावे असा संकेत निर्माण झालेला आहे. त्याचा अर्थ असा नव्हे की ह्या दोन संस्थांमध्यें परस्पर असा संबंध असूच नये. किंबहुना कायदेशीररीत्या ह्या संस्था स्वतंत्र गणल्या गेल्या तरी त्यांचे व्यवहार एकमेकास पूरक असें होण्यातच सहकारी चळवळीचें पाऊल पुढें पडणें शक्य आहे हें सर्वमान्य झालें आहे. सहकारी पतपेढीने कर्ज पुरवितांना सभासदानें आपला सर्व माल एका विशिष्ट खरेदीविक्रीसंघामार्फतच, की ज्याच्याशी ती संलग्न आहे, विकला पाहिजे असा लेखी करार त्याच्याकडून घ्यावा असा संकेत उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीचा एक भाग म्हणून आतां मानण्यात आला आहे. तसेंच उत्पादनाकरितां लागणारा माल म्हणजे बीबियाणें, खतें, तेल वगैरे सभासदानें खरेदीविक्री संघामार्फतच घ्यावा असाही नियम करण्यात आला व त्याची अंमलबजावणी नीटपणें व्हावी म्हणून कर्ज रोख न देतां संघामार्फत मालाच्या रूपानें देण्याची पद्धतही मान्य करण्यात आली. म्हणजे कायदेशीररीत्या पतपेढी व खरेदीविक्रीसंघ ह्या दोन स्वतंत्र संस्था असल्या तरी व्यवहाराकरिता एकाच यंत्रणेची तीं दोन अंगें आहेत असें समजण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. तेव्हा शरीरें जरी दोन असलीं तरी मन मात्र एकच आहे इतका घनिष्ट संबंध त्या दोन संस्थामध्यें निर्माण झाल्यासच उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीस जोराची चालना मिळेल हें जाणून द्वितीय व तृतीय पंचवार्षिक योजनात पतपेढ्यांच्या मजबुतीइतकेंच किंबहुना त्याहून जास्त महत्त्व खरेदीविक्री संघाच्या मजबुतीस देण्यांत आलें आहे. अशारितीनें ह्या संस्थांस सरकारची भागीदारी गुदामें बांधण्याकरिता दीर्घ मुदतीचें कर्ज व अनुदान, योग्य सेवकवर्ग नेमण्याकरिता अनुदान इत्यादि गोष्टींचा अंतर्भाव ह्या योजनात करण्यांत आला व त्या सर्व योजना कार्यवाहीत येण्याच्या दृष्टीनें विशेष प्रयत्न करण्यांत येत आहेत.

महाराष्ट्रांत खरेदीविक्रीसंघ अनेक वर्षांपासून कार्य करीत आहेत व त्यातील काहींनी फार महत्त्वाचें स्थानही प्राप्त करून घेतलें आहे. द्वितीय व तृतीय पंचवार्षिक योजनात अंतर्भूत असलेल्या अनेक प्रकारच्या मदतीमुळें गेल्या तीन चार वर्षांत बऱ्याच संघाच्या कार्याला फार जोराची अशी चालना मिळाली आहे. शेतीला लागणारा माल बऱ्याच अधिक प्रमाणात ह्या संस्था आता पुरवीत आहेतच परंतु शेतकऱ्यानें पिकविलेला माल बाजारांत विकण्याचे कामही अनेक संस्था आतां पूर्वीपेक्षा जास्त नेटानें करूं लागल्या आहेत. त्यामुळें पीक कर्जाची वसुली खरेदीविक्री संघामार्फत होत आहे व ती पद्धत अधिक कार्यवाहीत आणण्यास मदत होत आहे असांतला भाग नाही. कारण अजूनही दोन्ही संस्था आपापलें कार्यक्षेत्र निराळें आहे ह्या भावनेंत आहेत. खरेदीविक्रीसंघ विकलेल्या मालाचें पैसे रोख देत असल्यामुळे अजूनही पत व विक्री ह्याचें म्हणावें तितकें जवळचें संबंध निर्माण झाले नाहीत. कालांतरानें दोघांचे कार्य एकमेकास पूरक असें होण्याजोगी परिस्थिति निर्माण होईलही व आज खरेदीविक्री संघामार्फत पतपेढ्यानी दिलेल्या पीककर्जाची वसुली होण्यास सुरवातही होईल. पण त्यामुळें शेतकऱ्याचे विक्रीचे प्रश्न सुटतील असें समजणें बरोबर होणार नाही. खरेदी विक्रीसंघ अजूनही नवीन आहेत. त्यांचे भांडवल व अनुभव तोकडे आहेत. मालांच्या किंमती बांधून देण्यास सरकार तयार नाही. मोठ्या बाजारपेठात प्रत्यक्ष व्यवहार करण्याची संधि, वरच्या पातळीवरील संस्था कार्यक्षम नसल्यामुळें मिळत नाही. ह्या सर्वांचा परिणाम म्हणजे खरेदीविक्री संघांना गावातील बाजारपेठेंतच अडतीच्या पद्धतीनें माल विकण्याशिवाय दुसरा मार्ग नाही. त्यामुळें संघाला किंवा त्याच्या सभासदांना गावांतील व्यापाऱ्यावरच सर्वस्वीपणें अवलंबून राहावें लागतें. त्याचा फायदा ते पूर्णपणें आपल्या स्वार्थाकरिता करून घेतात असा अनुभव आहे. गावात असणारे ५-१० व्यापारी आपापसांत संगनमत करून मालाच्या किंमती उतरविण्याचा प्रयत्न करतात. आलेला माल सांठविण्याची नीटशी सोय नसल्यानें किंवा माल विकून होतात पैसे पडण्याची घाई झाल्यामुळें शेतकरी आपला माल व्यापारी देत असलेल्या किंमतीत विकण्यास तयार होतात. नियंत्रित बाजारपेठांचे अनेक नियम व्यापारी पाळीत नसले तरी अडचणीत आलेला शेतकरी व त्याला मदत करण्याइतकी शक्ति नसलेला संघ हे दोघेही त्याविरुद्ध तक्रार करण्यास पुढें येत नाहीत. उदाहरणार्थ विकत घेतलेल्या मालाचे पैसे ठरवून दिलेल्या मुदतीत देण्याचा नियम अपवादानेंच पाळला जातो. मध्यंतरीं व्यापाऱ्याला माल उचलून नेण्याची परवानगी दिली जाते व व्यापारी पैसे परत देईल ह्या आशेवरच संघाला राहावें लागतें. व्यापाऱ्याची पत ठरविण्याची पद्धत बहुतेक प्रत्येक खरेदीविक्री संघानें

चालू केली आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारांत ह्या मर्यादाच्याकडे कोणी लक्ष देत नाही व ठरविलेल्या पतींच्या कितीतरी पटीनें व्यापाऱ्याच्या कडून कधीकधी येणें असतें असें गेल्या तीन चार वर्षांच्या कार्यावरून दिसून आलें आहे. मालाच्या किमतीत अनपेक्षित जर घट आली तर व्यापारी आपलें देणें फेडण्यास असमर्थ होतात. त्यामुळें काही संघात विकट परिस्थिति निर्माण झाली. खरेदीविक्री संघाना कर्जपुरवठा करण्याचे काम मध्यवर्ति सहकारी बँका करीत असल्यामुळे एखाद्या संघाला विशेष नुकसान आल्यास त्याचा परिणाम बँकेला द्यावयाच्या कर्जावर होण्याचा संभव आहे. ह्या परिस्थितीची कल्पना संघाच्या संचालक मंडळाला किंवा बँकेच्या कार्यकर्त्यांना नाही असे म्हणण्याचा उद्देश नाही. सध्याच्या कार्यपद्धतीत असणारे दोष व धोके ह्याची कल्पना दोन्ही संस्थांतील कार्यकर्त्यांना आहे. पण सोडले तर पळतें व धरलें तर चावतें अशी परिस्थिति असल्यामुळें वरीलप्रकारच्या अडतीच्या व्यवहारांचे प्रमाण सारखे वाढतेंच असे राहिलें आहे.

गेल्या तीन चार वर्षांतील सहकारी खरेदी विक्री संघामार्फत झालेल्या शेतीच्या मालाच्या विक्रीचे आकडे पाहिले तर हे संघ फार झपाट्याने पुढे जात आहेत असें धरून चालण्यास हरकत नाही. बाजारामध्ये त्यांना अधिक मानाचें स्थान प्राप्त होत आहे असेंही त्यावरून दिसतें. कांही बाजारपेठांत संघाचा प्रतिनिधि आल्याशिवाय व्यवहारही सुरू होत नाहीत अशी परिस्थिती आलेली आहे. ह्या सर्व गोष्टी समाधानकारक आहेत असेंच म्हणावें लागेल. पण संघांनी आतापर्यंत मिळविलेलें यश भक्कम अशा पायावर उभे नसल्यामुळें अल्पजीवी ठरेल की काय अशी भीति वाटणें साहजिकच आहे. व्यापाऱ्याना त्यांच्या पतीवर द्यावयाच्या मालाला काही मर्यादा न घातल्या तर उत्कर्षाचा बुडबुडा केव्हा फुटेल ह्याचा नेम नाही. तेव्हा प्रगतीची इमारत जर भक्कम उभी करावयाची असेल तर निव्वळ अडतीचे व्यवहार करून भागणार नाही हे उघड झाले आहे. मागील जानेवारी महिन्यात झालेल्या मध्यवर्ति सहकारी बँकांच्या परिषदेत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे अध्यक्ष डॉ. धनंजयराव गाडगीळ ह्यानी 'अडत म्हणजे खरोखरीची विक्री नव्हे' असे जे उद्गार काढले त्यामागे हाच हेतु होता. अडतीच्या व्यवहारात उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीला पोषक असें नियंत्रण ग्रामीण सहकारी पतपेढीला प्राप्त होत नाही. शिवाय व्यापाऱ्याच्यावर फाजील विसंबून राहावें लागल्यामुळें शेतकऱ्याला आपल्या मालाची योग्य ती किंमत मिळत नाही व खरेदीविक्री संघाला बरेच धोके पत्करावे लागतात हें स्पष्ट झाले आहे.

ह्या परिस्थितीतून जर मार्ग काढावयाचा असेल तर कच्च्या मालाची गांवच्या बाजारपेठेतील व्यापाऱ्याना अडतीवर विक्री करून भागणार नाही कच्च्या मालाचें पक्क्या मालात रूपांतर करून मोठ्या बाजारपेठेशी किंवा प्रत्यक्ष ग्राहकांशी संबंध जोडणाऱ्या प्रक्रिया संस्था वाढल्यामुळेच विक्रीच्या समस्या सुटण्यास मदत होईल. शिवाय पत व विक्री ह्याचा संबंध अधिक घनिष्ट अशा स्वरूपाचा प्रस्थापित करणे शक्य होईल. हा सिद्धान्त महाराष्ट्राला तरी अभिनव वाटण्याचें कारण नाही. महाराष्ट्रात निर्माण झालेले व होऊ घातलेले असे वीस सहकारी साखर कारखाने हे वरील सिद्धांताचे मूर्तिमंत दाखले आहेत. सरकारची हे कारखाने काढण्यांत बहुमोल अशी मदत झाली आहे व होत आहे हे सर्वांना ठाऊकच आहे. कारखान्याचे भागभांडवल, सरकारच्या भाग भांडवला व्यतिरिक्त, शेतकऱ्याच्याकडून ऊसाच्या क्षेत्रफळाच्या प्रमाणात एकरी रु. १,००० असें गोळा केलें जाते त्यातील काही भाग प्रथम व उरलेला ऊसाच्या किंमतीतून नंतर वसूल केला जातो. ऊसाची लागवड करण्याकरिता सहकारी पतपेढीमार्फत एकरी रु. ८०० ते रु. १२०० असें कर्ज दिले जाते. कर्जाचा बराच मोठा भाग मालाच्या रूपानेच पुरविला जातो तयार झालेला ऊस कारखान्यामार्फत कापला जातो व त्याची कारखान्यापर्यंत वाहतुक करण्याची जबाबदारीही कारखान्यावरच असते. गाळलेल्या ऊसाबद्दल प्रत्येक टनामागे काही रक्कम आगाऊ दिली जाते व उरलेली वर्षाचा एकंदर व्यवहार पाहून ठरते. सभासदाने पतपेढीकडून काढलेले कर्ज फेडण्याची जबाबदारी कारखान्यावर असल्यामुळें ऊसाची किंमत कर्ज फेडण्याकरितां प्रथम वापरली जाते व त्यानंतरच उरलेला पैसा सभासदाला मिळू शकतो. ह्या व्यवस्थेमुळेंच प्रत्येक सभासदाला ऊसाच्या लागवडीकरिता भरपूर पैसा पुरविण्यात ग्रामीण पतपेढीला किंवा मध्यवर्ति सहकारी बँकेला बिलकूल धोका वाटत नाही. अहमदनगर, कोल्हापूर किंवा पुणे ह्या जिल्ह्यांत ऊस लावणाऱ्या शेतकऱ्याना जरी कोट्यवधि रुपये कर्जरूपाने वाटले जातात तरी त्या बँकांची असल्या कर्जाची थकबाकी शून्यच असते. कारखान्याकडून कमीत कमी किती पैसा मिळेल ह्याचा अंदाज बांधणें सहजशक्य असल्यामुळे कर्जपुरवठा करणेही तितकेच सुलभ होतें भरपूर कर्ज मिळाल्याने शेतकऱ्याला जमीनीची उत्तम मशागत करतां येते. महाराष्ट्रांतील दर एकरी ऊसाच्या उत्पादनाचें तसेच दरटनी उतरणाऱ्या साखरेचे प्रमाण हिंदुस्थानात सर्वांत अधिक आहे त्याला वरील कार्यपद्धति बऱ्याच अंशी कारणीभूत आहे असे म्हटल्यास अतिशयोक्तीचें होणार नाही. कर्जाची परतफेड होण्याची खात्री असली तर वाटले तितका पैसा उपलब्ध करून देणें जड जाणार नाही अशी खात्री शेतकऱ्याना प्रक्रियासंस्थात आणण्यानेच होणार आहे. म्हणून प्रत्येक मालाकरिता प्रक्रियासंस्था स्थापन होऊ शकल्या व त्याची घडण साखर कारखान्यांच्या प्रमाणें होऊं शकली तर अधिक पीककर्ज देणें शक्य होऊन शेतीचे उत्पादन वाढण्यास मदत होईल असें ठामपणे म्हणतां येईल

अखिल भारतीय ग्रामीण कर्जपुरवठा पाहणी समिति, वैकुंठभाई मेहता समिति व इतर अनेक समित्यानीं कर्जपुरवठा आणि विक्री ह्याचा समन्वय घडवून आणल्यासच उत्पादननिष्ठ कर्जपद्धति अमलात आणता येईल असे स्पष्टपणें सुचविले आहे. माझ्या मतें 'विक्री' चा अर्थ थोडा व्यापक असा केल्याशिवाय वरील कर्जपद्धतीचा विस्तार करणें शक्य होणार नाही. 'विक्री' म्हणजे कच्च्या मालाची गावच्या बाजारपेठेतच विक्री असा न करिता कच्च्यामालाचे पक्क्या मालात रूपांतर प्रक्रिया संस्थाच्या मार्फत करून मोठ्या बाजारपेठेत किंवा

चालू केली आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारात ह्या मर्यादांच्याकडे कोणी लक्ष देत नाही व ठरविलेल्या पतीच्या कितीतरी पटीने व्यापाऱ्याच्याकडून कधींकधी येणें असते असें गेल्या तीन चार वर्षांच्या कार्यावरून दिसून आले आहे. मालाच्या किमतीत अनपेक्षित जर घट आली तर व्यापारी आपलें देणें फेडण्यास असमर्थ होतात. त्यामुळे काही संघात बिकट परिस्थिति निर्माण झाली. खरेदीविक्री संघांना कर्जपुरवठा करण्याचे काम मध्यवर्ति सहकारी बँका करीत असल्यामुळे एखाद्या संघाला विशेष नुकसान आल्यास त्याचा परिणाम बँकेला द्यावयाच्या कर्जावर होण्याचा संभव आहे. ह्या परिस्थितीची कल्पना संघाच्या संचालक मंडळाला किंवा बँकेच्या कार्यकर्त्यांना नाही असें म्हणण्याचा उद्देश नाही. सध्यांच्या कार्यपद्धतींत असणारे दोष व धोके ह्याची कल्पना दोन्ही संस्थांतील कार्यकर्त्यांना आहे. पण सोडलें तर पळतें व धरलें तर चावतें अशी परिस्थिति असल्यामुळे वरीलप्रकारच्या अडतीच्या व्यवहारांचे प्रमाण सारखे वाढतेच असे राहिले आहे.

गेल्या तीन चार वर्षांतील सहकारी खरेदी विक्री संघामार्फत झालेल्या शेतीच्या मालाच्या विक्रीचे आकडे पाहिले तर हे संघ फार झपाट्यानें पुढें जात आहेत असें धरून चालण्यास हरकत नाही. बाजारामध्ये त्याना अधिक मानाचें स्थान प्राप्त होत आहे असेंही त्यावरून दिसतें. कांही बाजारपेठात संघाचा प्रतिनिधि आल्याशिवाय व्यवहारही सुरू होत नाहीत अशी परिस्थिती आलेली आहे. ह्या सर्व गोष्टी समाधानकारक आहेत असेंच म्हणावें लागेल. पण संघांनी आतापर्यंत मिळविलेलें यश भक्कम अशा पायावर उभे नसल्यामुळे अल्पजीवी ठरेल की काय अशी भीति वाटणें साहजिकच आहे. व्यापाऱ्यांना त्यांच्या पतीवर द्यावयाच्या मालाला काही मर्यादा न घातल्या तर उत्कर्षाचा बुडबुडा केव्हा फुटेल ह्याचा नेम नाही. तेव्हा प्रगतीची इमारत जर भक्कम उभी करावयाची असेल तर निव्वळ अडतीचे व्यवहार करून भागणार नाही हें उघड झालें आहे. मागील जानेवारी महिन्यात झालेल्या मध्यवर्ति सहकारी बँकाच्या परिषदेत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे अध्यक्ष डॉ. धनंजयराव गाडगीळ ह्यानी 'अडत म्हणजे खरोखरीची विक्री नव्हे' असे जे उद्गार काढले त्यामागे हाच हेतु होता. अडतीच्या व्यवहारात उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीला पोषक असे नियंत्रण ग्रामीण सहकारी पतपेढीला प्राप्त होत नाही. शिवाय व्यापाऱ्याच्यावर फाजील विसंबून राहावें लागल्यामुळें शेतकऱ्याला आपल्या मालाची योग्य ती किंमत मिळत नाही व खरेदीविक्री संघाला बरेच धोके पत्करावे लागतात हें स्पष्ट झालें आहे.

ह्या परिस्थितीतून जर मार्ग काढावयाचा असेल तर कच्च्या मालाची गावच्या बाजारपेठेतील व्यापाऱ्याना अडतीवर विक्री करून भागणार नाही. कच्च्या मालाचें पक्क्या मालात रूपांतर करून मोठ्या बाजारपेठेशी किंवा प्रत्यक्ष ग्राहकाशी संबंध जोडणाऱ्या प्रक्रिया संस्था काढल्यासच विक्रीच्या समस्या सुटण्यास मदत होईल. शिवाय पत व विक्री ह्याचा संबंध अधिक घनिष्ट अशा स्वरूपाचा प्रस्थापित करणे शक्य होईल. हा सिद्धान्त महाराष्ट्राला तरी अभिनव वाटण्याचे कारण नाही. महाराष्ट्रात निर्माण झालेले व होऊ घातलेले असे वीस सहकारी साखर कारखाने हे वरील सिद्धांताचे मूर्तिमंत दाखले आहेत. सरकारची हे कारखाने काढण्यांत बहुमोल अशी मदत झाली आहे व होत आहे हे सर्वांना ठाऊकच आहे. कारखान्याचे भागभांडवल, सरकारच्या भाग भांडवला व्यतिरिक्त, शेतकऱ्याच्याकडून ऊसाच्या क्षेत्रफळाच्या प्रमाणात एकरी रु. १,००० असे गोळा केले जाते. त्यांतील काही भाग प्रथम व उरलेला ऊसाच्या किमतीतून नंतर वसूल केला जातो. ऊसाची लागवड करण्याकरिता सहकारी पतपेढीमार्फत एकरी रु. ८०० ते रु. १२०० असें कर्ज दिलें जातें. कर्जाचा बराच मोठा भाग मालाच्या रूपानेच पुरविला जातो. तयार झालेला ऊस कारखान्यामार्फत कापला जातो व त्याची कारखान्यापर्यंत वाहतुक करण्याची जबाबदारीही कारखान्यावरच असते. गाळलेल्या ऊसाबद्दल प्रत्येक टनामागें काही रक्कम आगाऊ दिली जाते व उरलेली वर्षाचा एकंदर व्यवहार पाहून ठरते. सभासदाने पतपेढीकडून काढलेलें कर्ज फेडण्याची जबाबदारी कारखान्यावर असल्यामुळे ऊसाची किंमत कर्ज फेडण्याकरितां प्रथम वापरली जाते व त्यानंतरच उरलेला पैसा सभासदाला मिळू शकतो. ह्या व्यवस्थेमुळेंच प्रत्येक सभासदाला ऊसाच्या लागवडीकरितां भरपूर पैसा पुरविण्यांत ग्रामीण पतपेढीला किंवा मध्यवर्ति सहकारी बँकेला बिलकूल धोका वाटत नाही. अहमदनगर, कोल्हापूर किंवा पुणे ह्या जिल्ह्यात ऊस लावणाऱ्या शेतकऱ्यांना जरी कोटयवधि रुपये कर्जरूपाने वाटले जातात तरी त्या बँकांची असलेल्या कर्जाची थकबाकी शून्यच असते. कारखान्याकडून कमीत कमी किती पैसा मिळेल ह्याचा अंदाज बांधणे सहजशक्य असल्यामुळे कर्जपुरवठा करणेही तितकेंच सुलभ होतें. भरपूर कर्ज मिळाल्याने शेतकऱ्याला जमीनीची उत्तम मशागत करता येते. महाराष्ट्रांतील दर एकरी ऊसाच्या उत्पादनाचें तसेंच दरटनी उतरणाऱ्या साखरेचें प्रमाण हिंदुस्थानात सर्वांत अधिक आहे त्याला वरील कार्यपद्धति बऱ्याच अंशी कारणीभूत आहे असे म्हटल्यास अतिशयोक्तीचें होणार नाही. कर्जाची परतफेड होण्याची खात्री असली तर वाटेल तितका पैसा उपलब्ध करून देणे जड जाणार नाही. अशी खात्री शेतकऱ्यांना प्रक्रियासंस्थांत आणण्यानेच होणार आहे. म्हणून प्रत्येक मालाकरिता प्रक्रियासंस्था स्थापन होऊ शकल्या व त्याची घडण साखर कारखान्याच्या प्रमाणे होऊं शकली तर अधिक पीककर्ज देणे शक्य होऊन शेतीचे उत्पादन वाढण्यास मदत होईल असे ठामपणे म्हणतां येईल.

अखिल भारतीय ग्रामीण कर्जपुरवठा पाहणी समिति, वैकुंठभाई मेहता समिति व इतर अनेक समित्यानी कर्जपुरवठा आणि विक्री ह्याचा समन्वय घडवून आणल्यासच उत्पादननिष्ठ कर्जपद्धति अमलांत आणता येईल असे स्पष्टपणे सुचविलें आहे. माझ्या मते 'विक्री' चा अर्थ थोडा व्यापक असा केल्याशिवाय वरील कर्जपद्धतीचा विस्तार करणे शक्य होणार नाही. 'विक्री' म्हणजे कच्च्या मालाची गावच्या बाजारपेठेतच विक्री असा न धरता कच्च्यामालाचें पक्क्या मालात रूपांतर प्रक्रिया संस्थांच्या मार्फत करून मोठ्या बाजारपेठेत किंवा

प्रत्यक्ष ग्राहकाला तो माल विकणें असा केल्यासच प्रगतीचा मार्ग मोकळा होईल. अशा यत्रणेतच शेतकऱ्याने निर्माण केलेल्या मालावर सहकारी कर्जपुरवठा करणाऱ्या संस्थांचें नियंत्रण सहज शक्य होतें. त्यामुळें अधिक कर्ज पुरवठा करण्यामागें असलेली भीति दूर होण्यास मदत होते. तसें शक्य नसल्यास खऱ्या अर्थानें उत्पादननिष्ठ अशी कर्जपद्धति कार्यवाहीत आणण्यास बँका पुढें येतील किंवा नाही ह्यांत शंका आहे. जी पद्धत रूढ होईल ती पूर्वीसारखी भूमिनिष्ठही राहणार नाही व जें ध्येय आहे तशी उत्पादननिष्ठही होणार नाही. दोन्हीं पद्धतीचें एक मिश्रण तयार होईल व त्यामुळें उत्पादनवाढ करण्याचें जें सहकारी चळवळीचे आपलें ध्येय आहे तें जवळ येण्यास मदत होणार नाही. सहकारी प्रक्रिया संस्थांचा पुरस्कार वर उल्लेखिलेल्या समित्यांनी जरूर केला आहे. पण त्या मार्फतच खरोखर प्रगति शक्य आहे असा ठाम सिद्धान्त त्यांनीं मांडला नाही. परंतु गेल्या तीन चार वर्षांच्या अनुभवावरून–महाराष्ट्रांतीलच नव्हे तर इतर राज्यांतीलही–असा सिद्धान्त मांडण्याची वेळ आली आहे असें वाटतें.

गेल्या चार पाच वर्षांत सहकारी साखर कारखान्याव्यतिरिक्त इतर ही अनेक प्रक्रिया संस्था लोकांच्या स्फूर्तीनें व सरकारच्या मदतीमुळें महाराष्ट्रांत स्थापन झाल्या आहेत. त्यांची संघटना उत्पादननिष्ठ कर्जपद्धतीला पोषक अशी बऱ्याच ठिकाणी झाली नाहीं असें खेदानें म्हणावें लागतें. प्रक्रियासंस्था सहकारी क्षेत्रांत काढणें हे खरे ध्येय किंवा उद्दिष्ट नाही. खरें ध्येय उत्पादन वाढविणें व त्याकरितां लागणारा कर्जपुरवठा करणें हें होय. तें ध्येय गांठण्याकरितां प्रक्रिया संस्थांकडे एक महत्वाचें साधन म्हणून पाहिलें पाहिजे. साधनालाच साध्य समजल्यामुळें साहजिक घोटाळा झालेला आहे. कांहीं उदाहरणें दिल्यास वरील गोष्ट निदर्शनास येईल.

(अ) प्रक्रिया संस्थाचे सभासदत्व प्राय. शेतकऱ्याकरिताच असावें म्हणजे प्रत्येक शेतकऱ्यानें द्यावयाचें भागभांडवल व पुरवावयाचा माल ह्याचे प्रमाण त्याने लागवडीस आणलेल्या जमीनीशी जोडतां येईल काही प्रक्रिया संस्थात हें धोरण न ठेवता सभासदत्व ग्रामीण सहकारी पतपेढ्याना दिलें असून त्यांच्यापासूनच भागभांडवल उभारण्यात आलें आहे. पतपेढ्या स्वत: उत्पादन करीत नसल्यामुळें प्रत्येक शेतकऱ्यानें आपला माल प्रक्रियासंस्थेत नेऊन देण्याची व्यवस्था करण्यात, त्यामुळे घोटाळे निर्माण होतील. काही ठिकाणी प्रक्रिया संस्थाचें भागभांडवल देण्याकरिता मध्यवर्ति सहकारी बँकांनी प्राथमिक पतपेढ्याना कर्जेही दिलीं आहेत ही कर्जे देताना त्या पतपेढ्याच्या कार्यक्षेत्रात तें पीक काढणारे किती सभासद आहेत व त्या पीकाखाली किती क्षेत्रफळ आहे ह्याचा अंदाज घेतला नाही. सरकारी भागभांडवल बरोबरीनें मिळत असल्याने येनकेन प्रकारेण प्रक्रिया संस्थाचें भाग भांडवल उभें करणें म्हणजे मुख्य उद्दिष्टाला डावलणेंच आहे.

(ब) काही ठिकाणी खरेदीविक्री संघानी आपल्या कार्याचा एक भाग म्हणून प्रक्रिया करण्याकरितां कारखान्याची उभारणी केली आहे किंवा त्याप्रमाणें योजना आखली आहे. खरेदीविक्री संघ ही अनेक सभासदांशीं अनेक प्रकारचा व्यवहार करणारी संस्था आहे. प्रक्रिया फक्त एखाद्याच मालावर होणार असेल व त्यांत संघाच्या काही सभासदांचेंच अंग असेल अशा परिस्थितीत ज्याचा त्याच्याशी संबंध येणार नाहीं अशा सभासदाच्या भांडवलाचा फायदा घेणें किंवा अशा सभासदाना कारखानदाराच्या कारभारात मत देणें योग्य होणार नाहीं. कांहीं कारणानें प्रक्रिया संस्थेत नुकसान आलें तर मूळ संस्थेवर सुद्धा त्याचा परिणाम होऊन तिला दुसरीं कार्यें करण्यात अडचणी येतील किंवा प्रक्रियाविभागात बराच फायदा झाला तर त्याचा उपयोग निष्कारण दुसऱ्या सभासदाना द्यावा लागेल. त्यामुळे संस्थेतील सभासदांत बेदिली निर्माण होऊन संस्थेची कार्यक्षमता घटेल. तेव्हा शक्यतोंवर प्रक्रिया संस्था स्वतंत्रच असावी व तिचे सभासदत्व जे शेतकरी तो माल पिकवीत असतील त्यांनाच देण्यात यावें.

(क) प्रत्येक ठिकाणी संस्थेच्या कार्यक्षेत्रात तयार होणारा कच्चा माल, खाजगी क्षेत्रांत असलेल्या इतर प्रक्रिया संस्था व त्यांना पुरविला जाणारा माल, प्रत्यक्ष बाजारात विक्रीकरितां येणारा माल ह्याची माहिती न काढताच कारखाने काढण्यात येत आहेत. एक दोन संस्थाच्या बाबतीत तर असें दिसून आलें आहे की संस्थेच्या परिसरात पुरेसा कच्चा मालच तयार होत नाही. बऱ्याच ठिकाणी तो माल पिकविणाऱ्या शेतकऱ्यांना सभासद करून घेऊन त्याचा माल आणण्याची योजना न आखतां बाजारांत माल विकत घेऊन त्यावर प्रक्रिया करण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. असल्या संस्था जरी सहकारी सोसायटयांच्या कायद्याखाली नोंदल्या असल्या तरी त्यात व खाजगी अशा कारखान्यांत कांहीच फरक नाही

वरील उदाहरणावरून असें दिसून येईल की सहकारी प्रक्रियासंस्थाची संघटना व कार्यपद्धति ह्यासंबंधी नीटशी कल्पना बऱ्याच जणाना झालेली नाही. त्यामुळें साहजिकच काही घोटाळे निर्माण झाले आहेत ह्या संस्थाचे कर्जपुरवठा व्यवस्थेतील स्थान जर नीटपणें समजून घेतलें तर असले घोटाळे पुढे होणार नाहीत असें मानण्यास हरकत नाही. शेतीच्या मालावर प्रक्रिया करणाऱ्या अनेक खाजगी संस्था आहेत काही क्षेत्रात असे कारखाने इतके आहेत की नवीन कारखान्याना पुरेसा वाव नाही. अशा ठिकाणी जर सहकारी पद्धतीवर नवीन कारखाने काढले तर अनेक अडचणी निर्माण होतील. तेव्हा जर एखादी सहकारी संस्था पुरेशी कार्यक्षम असेल तर तिला सरकारनें खाजगी क्षेत्रांतील एखादा कारखाना योग्य मोबदल्यात कायद्यानें मिळवून द्यावा अशा प्रकारची शिफारस अनेक समित्यानी केली आहे. तसेंच नवीन कारखाना काढण्याकरिता परवाने शक्यतोवर सहकारी संस्थानाच देण्यात यावे सहकारी प्रक्रिया संस्थाचें स्थान लक्षात घेता सरकारनें वरील प्रकारें धोरण ठरविलें तर तें योग्यच होणार आहे कारण त्यामुळे पर्यायानें उत्पादनवाढीस उत्तेजन मिळणार आहे.

प्रक्रियासंस्थांना एखादीच प्रक्रिया करून चालणार नाही कच्च्या मालाचें पक्क्या मालात रूपांतर करिताना अनेक उपपदार्थ तयार करण्याची शक्यता निर्माण होते. तसेंच एकाच पदार्थापासून अनेक

प्रकारचे जिन्नस तयार होऊं शकतात. उदाहरणार्थ भात सडल्यानंतर जो कोंडा राहतो त्यापासून तेल काढता येते. पण त्याकरिता बऱ्याच कोंड्याची जरूरी असल्यामुळें अनेक प्रक्रियासंस्थांनी मिळून अशी तेलाची गिरणी काढावी लागेल. भुईमुगापासून तेल व पेंड निघते. पेंडीपासून पुन्हा तेल काढता येते. पेंडीचा पुरवठा भरपूर प्रमाणात उपलब्ध होण्याकरिता तेल काढणाऱ्या अनेक प्रक्रियासंस्था एकत्रित याव्या लागतील भुईमुगाच्या पीठापासूनही अनेक पदार्थ होण्याची शक्यता आहे. प्रक्रियेचें क्षेत्र फार मोठें आहे. तें ज्या प्रमाणात व्यापलें जाईल त्याप्रमाणांत सहकारी प्रक्रिया संस्थांना आपल्या सभासदानी तयार केलेल्या मालाबद्दल अधिक मोबदला देता येईल. ज्या प्रमाणांत अधिक मोबदला मिळण्याची शक्यता निर्माण होईल त्या प्रमाणांत उत्पादनवाढीकरिता अधिक साधनसंपत्ति उपलब्ध करून देणेंही शक्य होईल.

वरील विवेचनावरून स्पष्ट होईल की प्रक्रियासंस्थांचे कार्य योजनाबद्ध होणें अगत्याचे आहे. नाहीतर उद्दिष्ट साध्य होणें बाजूला राहून असल्या संस्थांचें अपयश मात्र शिल्लक राहील. प्रक्रिया संस्था काढतें व त्या चालविणें तितकें सोपें नाही ह्याची जाणीव सर्वांना आहे. सहकारी कारखाने यशस्वीरीत्या चालवून दाखविल्यामुळें जनतेत व सहकारी चळवळीतील कार्यकर्त्यांत एक प्रकारचा आत्मविश्वास आलेला आहे. लोकांचा उत्साह अनाठायी जाऊ नये व प्रमुख ध्येय गाठणे सुलभ व्हावे म्हणून एक प्रकारची सुसूत्रता आणणें जरूर आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने सहकारी कारखाने काढण्यात बहुमोल असें कार्य केलें आहे. त्याच बँकेनें इतरही प्रक्रिया क्षेत्रांत पुढाकार घ्यावा अशी सर्वांची इच्छा होती. तिला मान देऊन बँकेने एक सहकारी औद्योगिक मंडळ स्थापन केलें आहे. मंडळाचें अध्यक्षपद डॉ. धनंजयराव गाडगीळांच्या सारख्या प्रथितयश धुरीणानें स्वीकारल्यामुळे मंडळाकडून भरीव कार्य होईल अशी अपेक्षा करण्यास हरकत नाही. आता ह्यापुढें महाराष्ट्रात सहकारी क्षेत्रांतील प्रक्रियासंस्था काढण्यापूर्वी मंडळाकडून तांत्रिक व आर्थिक सल्ला घेतल्यास असल्या संस्थाना फायद्याचें होईलच पण त्याबरोबर महाराष्ट्रातील सहकारी कर्जपुरवठा संस्थानाही भरीव कार्य करता येईल.

★★★



"सहकारी तत्त्व हे असें आहे की, तें प्रत्येकाच्या मनोवृत्तीवर अवलंबून आहे. सहकार घ्यावयाचा कसा? सर्व सामान्यपणें सहमत असणाऱ्या माणसांच्या मनाची त्यासाठी तयारी करावी लागते. त्यांचे मनःपूर्वक सहकार्य मिळवावयाचे असते ही गोष्ट सहकारी क्षेत्रात कार्य करणाऱ्या कार्यकर्त्यांनी कदापि विसरून चालणार नाहीं."

मा. यशवंतराव चव्हाण
३० जून, १९६०

" नियोजन आणि विकास यासाठी सर्वांत सुयोग्य साधन म्हणजे सहकारी संघटना. कृषि आणि घरगुती उद्योग या क्षेत्रांत सामाजिक नीतीचे एक साधन ह्या नात्यानें आजच्या नियोजनयुगांत सहकारी चळवळीकडे पाहण्यांत येतें. ग्रामीण उद्योग सहकारी पद्धतीवर संघटित केल्यानेच प्रगत होतील.

आपलें लोकशाही नियोजन जर यशस्वी व्हावयाचें असेल तर तें विकेंद्रित स्वरूपाचें असणें आवश्यक आहे. सहकारी क्षेत्रांतील विकेंद्रीकरण म्हणजे खात्याच्या अधिकाऱ्यांना अधिकार सुपूर्द करणे नव्हे. सहकारी मंडळयासारख्या संस्थामार्फत योजनेच्या आंखणी व अंमलबजावणीच्या कार्यात सहकारी संस्थांच्या प्रतिनिधींशी संमिलित होणे असा त्याचा भावार्थ आहे. सहकारी कार्यकर्ते व नियोजनाशीं संबंध असलेले अधिकारी या दोहोंच्या प्रवृत्तीमध्ये बदल होणें आवश्यक आहे. „

मा. वैकुंठभाऊ मेहता
१० जून १९६१ नागपूर „

  

" आपल्यापुढें हा सहकाराचा विषय सतत असावा. तसा तो असतोच असें नाही....... जेव्हा सहकारी धर्माचे पालन केले जात नाही असें आढळून येते तेव्हां मनाला यातना होतात. सहकारीचे दोन अर्थ आहेत–एक सहकारी संस्थामार्फत व दुसरा भांडवलशाही व साम्यवाद. यात सहकार हा मधला भाग आहे स्वार्थ आणि परार्थ यांचे योग्य मिश्रण म्हणजेच हा मधला भाग स्वार्थास कुठे ना कुठे तरी मुरड घालू शकणें हेच याचे गमक. आपसातील सहकारिता वाढली पाहिजे. समाजाच्या घटकाशीं सहकार केला पाहिजे. तुमची शक्ती प्रभावशाली आहे जोपर्यंत ही शक्ति योग्य दिशेने कार्य करीत आहे तोपर्यंत अपयशाची पर्वा करण्याचे कारण नाही. "

डॉ धनंजयराव गाडगीळ
२० जून १९६१ कोल्हापूर

  

" सहकारी चळवळीने जीवनाच्या सर्वक्षेत्रात पदार्पण केल्याशिवाय सहकारी समाज व सहकारी व्यवस्था प्रस्थापित होणार नाही जीवनांत सर्वत्र सहकारी वृत्ति बळावली पाहिजे. शेतकऱ्यांस मिळालेल्या कर्जाचा विनियोग योग्य रितीने होतो की कसें हे सहकारी संस्थेनें आस्थेने पाहिले पाहिजे. तसेच सहकारी साखर कारखान्याप्रमाणे इतर शेतीमालाच्या प्रक्रियात्मक सहकारी संस्था अधिक निर्माण होणे आवश्यक असून, त्याबाबत आस्था, जि-जिव्हाळा व सचोटी ठेवून व्यवहार केले व्हावयास हवेत "

डॉ. धनंजयराव गाडगीळ कोल्हापूर
२५ फेब्रुआरी १९६२


















# शेती विकास लॅण्ड मॉर्गेज बँकांचे कार्य

*श्री. बी. पी. पटेल*

भारतसरकारचे आर्थिक. व शेती सल्लागार





सऱ्या पंचवार्षिक योजनेनें शेतकीउत्पादनाच्या वाढीस अग्रहक्क दिला आहे. अन्नधान्याचे बाबतीत स्वयंपूर्णता साध्य करणे व उद्योगधंदे आणि .निर्यात याच्या गरजा भागविणें हें या अग्रहक्काचें उद्दिष्ट ! "शेतकी उत्पादन वाढविण्यासाठी जारीनें संघटित करण्यांत येणारे प्रमुख तंत्रविषयक कार्यक्रम पुढील प्रमाणे :—(१) पाट-बंधारे, (२) जमिनीची धूप थांबविणे,कोरडवाहू शेती व पडीक जमीन कसवटीस योग्य करणे, (३) रासायनिक व नैसर्गिक खताचा पुरवठा, (४) उत्तम बियाण्याची वाढ व वांटप, (५) पीक संरक्षण, (६) सुधारलेले नागर व शेतीची इतर अवजारें आणि (७) शेतीबाबत शास्त्रीय पद्धतीचा स्वीकार." रासायनिक व नैसर्गिक खतांचा पुरवठा' उत्तम बियाण्याची वाढ व वांटप, पीक-संरक्षण नि किरकोळ शेतकी अवजारें यांच्या पुरवठ्याखेरीज या कार्यक्रमातील अन्य गोष्टीसाठी लागणारी आर्थिक साधनें दीर्घ मुदतीच्या स्वरूपाची आहेत यासाठी मोठ्या रकमा गुतवाव्या लागतील व ही गुतवणूक नि अशा गुतवणुकी-मुळे मिळणारे जादा उत्पादन यात कालाच्या दृष्टीनें बरेच अंतर राहील छोट्या व मोठ्या पाटबंधारे योजना, धूप-प्रतिबंध नि सहकार यामुद्धा शेतकी-उत्पादनावर १२८० कोटि रुपयांच्या खर्चाची तरतूद तिसऱ्या योजनेने केली आहे. जमीन सुधारणेसाठी शेतकऱ्याना तगाई-कर्ज देण्यासाठी किती रक्कम दिली जाईल, याची नेमकी माहिती उपलब्ध नाही. मात्र अशा स्वरूपाची रक्कम छोटी असावी वर्षाला १७ कोटि रुपये एवढी ही रक्कम असावी असा अंदाज आहे. तिसऱ्या योजना कालात,शेतकी-उत्पादन ३० टक्क्यानी वाढविण्याची योजना आहे. ही वाढ दुसऱ्या योजनेतील वाढीच्या प्रमाणाच्या सुमारें दुप्पट आहे. तिसऱ्या योजनेतील लक्ष्यें गाठावयाची असतील, तर शेतकी उत्पादना-साठी ठेवलेल्या रकमेंत खाजगी गुतवणीची मोठी भर पडणें आवश्यक आहे. पाटबंधारे, जमीन लागवडयोग्य करणें,धूप-प्रतिबंध,यंत्रसामुग्रीचा वापर अशा विविध मार्गांनी जमीन-सुधारणा व शेतकी -उत्पादनात वाढ व्हावी, यासाठी खाजगी प्रयत्नांना चालना देण्याचे कामी सहकारी संस्था मोठी कामगिरी करूं शकतील ज्या देशात ६ कोटि ५७ लक्ष शेतकरी आहेत व ज्याची सरासरी जमीनधारणा ५.७ एकर आहे, अशा आपल्या देशासारख्या मोठ्या देशांत सहकारी संस्थांची जबाबदारी अधिकच वाढलेली आहे. कारण या शेतकऱ्याना व्यापारी

व विमा कंपन्या यांचेकडून शेतकी उत्पादनासाठी फारच अल्प आर्थिक मदत मिळते.

दीर्घ मुदतीच्या कर्जांचा पुरवठा करणें हा लॅन्ड मॉर्गेज बँकांचा उद्देश आहे. शेतकी उत्पादनाच्या अल्प व मध्यम मुदतीच्या गरजा ३ टप्प्यांनी भागविल्या जातात. प्राथमिक पातळीवर सेवा सहकारी संस्था, जिल्हा पातळीवर मध्यवर्ति बँका व राज्य पातळीवर अपेक्स बँका हीं कामें करतात. ढोबळ मनानें बोलावयाचें तर विकास-कर्जे सेवा सहकारी व मध्यवर्ति बँकांचे कक्षेंत येतात व चालू कर्जें अपेक्स बँकांच्या कक्षेंत येतात. वस्तुतः ज्या खरोखर दीर्घ मुदतीच्या योजना असतात व ज्यांना लॅन्ड मॉर्गेज बँकाकडून कर्जाचा पुरवठा व्हायला हवा, अशा योजना मध्यम मुदतीच्या कर्जाच्या कक्षेंत येतात असें मानण्याची प्रवृत्ति आहे. ही प्रवृत्ति लॅन्ड मॉर्गेज बँकाच्या कामकाजाच्या दीर्घसूत्री पद्धतीमुळें वाढीस लागते. कर्जांना तारण म्हणून जमिनीचें गहाणखत लॅन्ड मॉर्गेज बँकाना लागते; परंतु सेवा सहकारी संस्थाकडून मध्यम मुदतीची कर्जे मिळण्यासाठी दीर्घ काल लागत नाही व अनेकदां जमिनीचे कायदेशीर गहाणखत करून देण्याची आवश्यकता नसते. पण याचबरोबर सेवा सहकारी संस्थामार्फत मिळणाऱ्या एकूण कर्जांना फार मोठी मर्यादा आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. १९५९-६० सालच्या आकड्यांवरून हें विधान सिद्ध होऊं शकेल. यासाली शेतकी-विकासासाठी एकूण १६० कोटि रुपयांचीं कर्जे देण्यात आली. त्यापैकी शेतकी कर्ज सोसायट्यांनी दिलेल्या कर्जांची रक्कम सुमारे १५ कोटि म्हणजे एकूण कर्जाच्या सुमारे ९ टक्के होती. दीर्घ मुदतीच्या निधीला रिझर्व बँकेकडून जादा वाटा मिळूनहि सेवा सहकारी संस्थाना मध्यम मुदतीच्या कर्जासाठी निधीची टंचाई भासते, असें दिसतें. म्हणून विकासाच्या स्वरूपाच्या गरजा शक्य तो दीर्घ मुदतीचीं कर्जे देणाऱ्या संस्थांकडे म्हणजे लॅन्ड मॉर्गेज बँकाकडे वळविणें अधिक हितावह ठरेल.

गुंतवणुकीची प्रदीर्घता ठरविण्यासाठीं कोणते दंडक लावावेत? एकादें काम पूर्ण करण्यासाठी लागणारा वेळ व गुंतवणुकीमुळें होणाऱ्या नफ्यांतून कर्जफेड करण्याची शक्ति हे दंडक योग्य ठरतील. सर्वसामान्यतः जमीन-सुधारणेसाठी द्यावयाच्या कर्जांत पुढील गोष्टींचा समावेश व्हावा—जमीन लागवडयोग्य करण्यासाठी कर्जे, धूप-प्रतिबंध, विहिरी, ऑइल इंजिन अगर इलेक्ट्रिक मोटरवर चालणाऱ्या पंपांची उभारणी, ज्या भागाला धरणाचा फायदा मिळतो, अशा भागात पाणी मिळण्याची व्यवस्था करणें व बागायती.

वर उल्लेखिलेल्या कामांपैकी प्रत्येक कामाचे बाबतीत, लॅन्ड मॉर्गेज बँकाकडून कर्जे उपलब्ध करून देण्याबाबत कांही विशिष्ट प्रश्न गुंतलेले आहेत. ज्या जमिनी नव्या धरण योजनांच्या क्षेत्रात येतात, त्याचेबाबतींत राज्य सरकार, रिझर्व बँक व लॅन्ड मॉर्गेज बँका या सर्वांनी एकसंघ व विस्तृत कार्यक्रम आखणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें ज्या बागायतीचें उत्पन्न मिळावयास गुंतवणुकीनंतर ७ ते १० वर्षांनी प्रारंभ होतो, अशांना कर्जे देण्यासाठी स्वतंत्र कार्यपद्धति निर्माण केली पाहिजे. या क्षेत्रात अनुभव मिळावा यासाठी आंध्र प्रदेशात मुसी योजना व केरळ नि म्हैसूरमध्यें आणखी दोन योजना सुरू करून रिझर्व बँकेनें मौलिक कामगिरी केली आहे. धूप-प्रतिबंध या क्षेत्रात अद्याप सहकारी कर्जांचा प्रवेश झालेला नाही. महाराष्ट्रामधील मर्यादित अनुभवावरून हें दिसून आलें आहे की, बांधबंदिस्ती साठी लॅन्ड मॉर्गेज बँकांनी दीर्घ मुदतीची कर्जे देण्यास बराच अवसर आहे. या सर्व प्रश्नाची चर्चा या या एका लेखाच्या मर्यादेंत करणें शक्य नसल्यामुळें तिसऱ्या योजनेत लॅन्ड मॉर्गेज बँकांकडून अपेक्षिलेलें कार्य त्यांचेकडून पार पडावें, यासाठी ज्या प्रश्नांची चर्चा करणें आवश्यक आहे, अशा सर्वसामान्य स्वरूपांच्या प्रश्नाचा उहापोह येथे करावयाचा विचार आहे. सोयीसाठी, ह्या प्रश्नांचा तात्त्विक,संघटनाविषयक व आर्थिक अशा तीन ढोबळ वर्गवारीत विचार करितां येतील.

**तंत्रविषयक प्रश्न**

लॅन्ड मॉर्गेज बँकानी जमिनीच्या तारणावरच कर्जे द्यावयाची असल्यामुळे या बँकाच्या नियमित कामकाजासाठी, जमीनधारकाच्या मालकी हक्काचे अद्ययावत कागदपत्र ठेवणे अत्यावश्यक असतें. जमिनीबाबतच्या अद्ययावत कागदपत्राबाबत सर्व भागात परिस्थिति समाधानकारक आहे, असे मानता येत नाही. मालकी बदलण्याच्या हक्काचा प्रश्न कुळ वा जमीनसुधारणा योजनाविषयक कायदे यांचेशी अत्यंत निगडित आहे.यासाठी दुसऱ्या योजनेंत अशा सूचना करण्यांत आल्या की, मालकी बदलण्याचे हक्क सहकारी संस्थाना असावेत, कमाल जमीनधारणेच्या मर्यादेतून सहकारी संस्थाना वगळण्यात यावें व ज्या सहकारी संस्थाचे जमीनसुधारणा कायदे अगर कुळकायदे यामुळे नुकसान झालें असेल, त्यांना मदत करण्यात यावी. गरज असल्याची असेल तर ती म्हणजे प्रत्येक राज्यातील प्रश्नाची सर्वंकष पहाणी करून तात्त्विक अडचणी नष्ट करण्यासाठी एक गुंतागुंत नसलेला कार्यक्रम आखण्याची. कुळाची मुदत व कमाल जमीनधारणा याबाबत सर्वच राज्यांत कायदे करण्यात आले आहेत. आता शेतकी-उत्पादन व ग्रामीण विकास याच्या दृष्टीनें, या सुधारणाच्या अंमलबजावणीचें काम त्वरित संपविणें व जमिनीच्या मालकी हक्काबाबत, दीर्घ काल व्यत्यय येणार नाही, अशी स्थिर परिस्थिति निर्माण करणें ही गोष्ट निकडीची आहे. रजिस्ट्रेशनची कार्यपद्धती,जमिनीबाबतच्या कागदपत्राच्या खरेपणाचा पुरावा मिळविणें, विविध सर्टिफिकिटें मिळविणें इत्यादीमुळें निर्माण होणाऱ्या अडचणीही नष्ट केल्या पाहिजेत. याबाबत एक गोष्ट करता येण्याजोगी आहे. ती म्हणजे जमीन-पत्रें ताब्यात असणाऱ्या महसूल संस्था व लॅन्ड मॉर्गेज बँकाचा नोकरवर्ग याच्यात अत्यंत निकटचे सहकार्य निर्माण करणें. जमीनपत्रे हाताळणाऱ्या नोकरवर्गाला, शेतकी उत्पादनाचीं लक्ष्यें गाठण्यास मदत करण्याचे कामी लॅन्ड मॉर्गेज बँकाना करावयाच्या महत्त्वाच्या कामाची योग्य जाणीव दिली, तर ती गोष्ट अतिशय उपयुक्त ठरेल. विकास गट व जिल्हे यांमध्ये विकासाचें काम करणाऱ्या नोकरवर्गालाही हें शिक्षण देण्यात यावें

**संघटनेचे प्रश्न**

दुसऱ्या योजनेचे अखेरीस, सर्व राज्यात मध्यवर्ती लॅन्ड मॉर्गेज बँका

अस्तित्वात आल्या होत्या किंवा स्पेशल लॅन्ड मॉर्गेज बँक विभाग निर्माण करून ॲपेक्स सहकारी बँकाशी जोडण्यात आले होते. मात्र ही गोष्ट सांगितली पाहिजे की, दुसऱ्या योजनेत अनेक राज्यांत मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँका उभारण्यांत आल्या व फक्त महाराष्ट्र, गुजरात, मद्रास, म्हैसूर व आंध्र प्रदेश या ५ राज्यात, या बँकामार्फत दीर्घ मुदतीची कर्जे देण्यास काही प्रमाणात प्रारंभ झाला. या बँकाच्या संघटनेचे स्वरूप संघराज्याच्या धर्तीचे असावें. राज्याच्या पातळीवर मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँक, तालुका व जिल्हा पातळीवर प्रायमरी बँका अशा पद्धतीची योजना असणें उत्तम व हितावह होय. तालुका पातळीवरील बँका तालुक्याच्या मुख्य गावी असाव्यात . अनेक राज्यात, प्राथमिक लॅन्ड मॉर्गेज बँका, उभारणीच्या अवस्थेत आहेत. १९५९–६० सालात प्राथमिक लॅन्ड मॉर्गेज बँकाची संख्या ४०७ होती. तिसऱ्या योजनेत आणखी २६५ प्राथमिक लॅन्ड मॉर्गेज बँका उभारण्याची योजना आहे.

प्राथमिक व मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँकांना, राज्य सरकाराच्या मदतीमुळें उत्तेजन मिळलें. राज्य सरकारे, रिझर्व बँक ऑफ इंडिया व केंद्र सरकार यांच्या सहाय्यानें, भाग भाडवल विकत घेऊन व चालकत्वाच्या खर्चातील काही वाटा उचलून; मदत करतात. लॅन्ड मॉर्गेज बँकाना जमिनीच्या मूल्यमापनाचें कामी अनेक अडचणी येत आहेत, हें मान्य झालेलें आहे. म्हणून, चालू आर्थिक वर्षापासून, लॅन्ड मॉर्गेज बँकाना जमीन मूल्यमापन अधिकारी ठेवता यावेत, यासाठी सहाय्य देण्यात येईल. सध्या पाचशें जमीन मूल्यमापन अधिकाऱ्याचा खर्च मंजूर करण्यात आला आहे. पण हा कार्यक्रम झपाट्यानें वाढला व अधिक अधिकाऱ्यांची गरज भासूं लागली, तर अशा अधिक अधिकाऱ्यासाठी मदत मिळायला हरकत नाही.

प्राथमिक लॅन्ड मॉर्गेज बँका संघटित करणें व मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँका मजबूत करणें हे कार्य विशेष महत्त्वाचे समजून त्यांना प्राधान्य देऊन कार्यक्रम अत्यंत गांभीर्यानें व त्वरित हाती घेऊन जेवढे लौकर पूर्ण करता येतील, तेवढें करणें ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे आपल्या जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी संघटना सुसज्ज केल्याशिवाय दीर्घ मुदतीच्या कर्जाचें आपलें लक्ष्य गाठणें या बँकाना शक्य होणार नाही.

आर्थिक प्रश्न

दुसऱ्या योजनेच्या अखेरीस, सर्व राज्यात मिळून येणें असलेल्या दीर्घ मुदतीच्या कर्जाची रक्कम ३४ कोटि रुपयाचे आसपास होती, असा अंदाज आहे. तिसऱ्या योजनेच्या अखेरीस ही रक्कम १५० कोटि रुपयांपर्यंत जाईल, अशी कल्पना आहे. याचा अर्थ लॅन्ड मॉर्गेज बँकाना आपल्या कामाचे प्रमाण खूपच वाढवावें लागेल. १९६०–६१ साली या बँकानी ९ कोटि रुपयाची कर्जे दिली. हें प्रमाण क्रमशः वाढवीत तिसऱ्या योजनेच्या अखेरच्या वर्षांत ४५ कोटि रुपयांपर्यंत न्यावें लागेल. तिसऱ्या योजनेच्या कालात दिलेल्या कर्जाची एकूण रक्कम १४५ कोटि रुपयापर्यंत जायला हवी.

हें लक्ष्य कसें साध्य होऊं शकेल ? जमिनीची गहाणपत्रें मिळवून याच्या जोरावर डिबेंचर्स काढून , १४५ कोटि रुपयापर्यंतचे डिबेंचर्स विकत घेतील, एवढे लोक शोधायचे, ही कामगिरी लॅन्ड मॉर्गेज बँकांना पार पाडावी लागेल. काही राज्यांत, आवश्यक ते कायदे झालेले नसल्यामुळें किंवा डिबेंचर्स काढण्यासाठी आवश्यक ती यंत्रणा सिद्ध नसल्यामुळें डिबेंचर्स काढलेही गेलेले नाहीत. लॅन्ड मॉर्गेज बँकांपाशी वाढणारा स्वत:चा पैसा व स्टेट बँक ऑफ इंडियाकडून हंगामी आर्थिक तरतुदीसाठीं मिळणारी मदत, यामुळें ह्या सहकारी संस्था गरजा भागवूं शकतील असा अंदाज आहे. सर्वांत अवघड प्रश्न, डिबेंचर्स घेण्यासाठी निधि उपलब्ध करण्याचा आहे.

लॅन्ड मॉर्गेज बँकांचे डिबेंचर्स मुख्यत: रिझर्व बँक, स्टेट बँक, आयुर्विमा कॉर्पोरेशन, व्यापारी बँका व अन्य अर्थ संस्था, सहकारी संस्था, सार्वजनिक विश्वस्त निधि, प्रॉव्हिडंट फंड व सर्वसामान्य जनता विकत घेते. रिझर्व बँकेची मदत धरून, सामान्यत: ५० टक्के पैसा सहकारी संस्था व ग्रामीण धनकोंकडून येतो, असे म्हणायला हरकत दिसत नाहीं. जी डिबेंचरांची मालिका संपणार नाहीं, त्या मालिकेंतील २० टक्क्यांपर्यंतचे डिबेंचर्स रिझर्व बँक खरेदी करते. ग्रामीण डिबेंचरांच्या बाबतीत ती अधिक सढळ हातानें मदत देते. ग्रामीण भागांतील बचतीची गुंतवणूक शेतकी-विकासासाठीं उपलब्ध करणें हा ह्या उत्तेजनाचा प्रधान हेतू आहे. उरलेला अर्धा भाग, म्हणजे सुमारे ७५ कोटि रक्कम, आयुर्विमा कॉर्पोरेशन, स्टेट बँक, इतर व्यापारी बँका व अर्थसंस्था नि पैसा गुंतवूं इच्छिणारी सर्वसामान्य जनता यांचेकडून मिळेल, अशी अपेक्षा आहे. मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँकांच्या नव्या डिबेंचर्सपैकी १० टक्के डिबेंचर्स घेण्याचें नवें धोरण स्टेट बँकेनें गेल्या काहीं वर्षांत अवलंबिलें आहे. तिसऱ्या योजनेच्या कालांत स्टेट बँकेची मदत योग्य त्या प्रमाणात वाढावी, अशी योजना आहे. सर्व देशाच्या दृष्टीनें दीर्घ मुदतीची बचत आयुर्विमा कॉर्पोरेशनकडे येते. ही संस्था शेतकी धंद्याबद्दल जबाबदार हितकारक, उपकारी दृष्टिकोन धारण करून, लॅन्ड मॉर्गेज बँकाच्या डिबेंचर्सना कमाल पाठिंबा देईल, अशीहि अपेक्षा आहे.

दीर्घ मुदतीच्या कर्जासाठी उपलब्ध करावयाच्या निधीत वाढ करण्यासाठी एक ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट फिनॅन्स कॉर्पोरेशन उभारण्याचा विचार रिझर्व बँक व केंद्र सरकार जारीनें करीत आहेत. हे कॉर्पोरेशन एक नित्याचा नियम म्हणून मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँकाचे डिबेंचर्स विकत घेईल आणि ज्यात नफा मिळतो पण दीर्घ काल वाट पहावी लागते, अशा रबर, कॉफी, काजू, व सुपारी यांच्या बागा, पाटबंधारे, बांधबंदिस्ती, धूप-प्रतिबंध नि फळबागा इत्यादि शेतकी -उत्पादनाच्या वाढीसाठी पैसा पुरवील. कॉर्पोरेशनची कर्जे, मध्यवर्ति लॅन्ड मॉर्गेज बँकेमार्फत दिली जातील.

दीर्घ मुदतीच्या कर्जांचा विकास, देशात सर्वत्र सारख्या प्रमाणांत झालेला नाही,हें पूर्वी सांगितलेंच आहे. लॅन्ड मॉर्गेज बँकानी आंध्र, गुजरात, महाराष्ट्र, मद्रास व म्हैसूर या राज्यांत उल्लेखनीय प्रगती केली आहे. सर्व देशात मिळून अशा बँकानीं एकूण ३० कोटि रुपयाची दीर्घ मुदतीची कर्जें दिली आहेत. यापैकी २६ कोटीची कर्जें या ५ राज्यांतली आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे, आतापर्यंत लॅन्ड मॉर्गेज बँका जमीन

खरेदीसाठी कर्ज देणें व जुनीं कर्जे फेडण्यासाठी कर्ज देणें या परस्परांत व्यवहारावर अवलंबून आहेत. १९५९-६० सालच्या कर्जांची विभागणी पुढीलप्रमाणें आहे :– जुनी कर्जे फेडण्यासाठी १.८५ कोटि, जमीन-खरेदीसाठी ११ कोटि, जमीन सुधारणा ३.७२ कोटि, यंत्रखरेदी २.२८ कोटि व अन्य कारणासाठी ०.५५ कोटि रुपये .

पण लॅन्ड मॉर्गेज बँकांनी जमीन विकास बँका असें स्वरूप धारण करण्याची वेळ आतां आलेली आहे. नॅशनल डेव्हलपमेंट कौन्सिलनें, तगाई कर्जे सहकारी संस्थामार्फत वाटण्याचा जो निर्णय नुकताच घेतला आहे, त्यामुळें मॉर्गेज बँकांच्या कार्याला चालना मिळेल. या दिशेनें आता गुजरात सेंट्रल लॅन्ड मॉर्गेज बँकेंत रूपान्तरित झालेल्या सौराष्ट्र लॅन्ड मॉर्गेज बँकेनें खूपच प्रगति केलेली आहे. या बँकेनें सौराष्ट्राच्या ५ जिल्ह्यात १९६० पूर्वीच्या सुमारे ५ वर्षांच्या कालावधीत जमीनसुधारणेसाठी ६ कोटि रुपये कर्जाऊ दिले. गेल्या १२ महिन्यांत तिनें ३ कोटि रुपयांहून अधिक कर्जे दिली. यावरून तिसऱ्या योजना कालासाठी धरून दिलेलें २० कोटि रुपयांचे लक्ष्य ही बँक सहज गाठूं शकेल असें वाटतें. मात्र, कर्जांचा सर्वात मोठा कार्यक्रम, महाराष्ट्रासाठी आंखला आहे. १९६०-६१ सालचे अखेरीस ५ कोटि रुपयांची कर्जे दिलेली असतील व तिसऱ्या योजनेचे अखेरीस लॅन्ड मॉर्गेज बँकांमार्फत ५० कोटि रुपयांची कर्जे देण्याचें लक्ष्य ठरलेलें आहे. महाराष्ट्र सरकारनें याबाबतचा कायदा व कार्यपद्धतीत सुधारणा केल्या आहेत. त्यामुळें कर्जदार, गहाणखत करून द्यावी न लागतां, 'लॅन्ड इम्प्रूव्हमेंट लोन्स ॲक्ट'च्या धर्तीवर कर्जाच्या अर्जावर त्वरेनें निर्णय घेणें शक्य होईल. सरकारी योजनेतील विहिरींची दुरुस्ती, पंप बसविणे, वगैरे कार्यक्रम लॅन्ड मॉर्गेज बँकामार्फतच करवून घेण्याचें सरकारनें ठरविलें आहे. महसूल व तगाई ही खाती, लॅन्ड मॉर्गेज बँकांशी सहकार्यानें काम करतील. या व्यवस्थेमुळें या शेतकऱ्याचें कांहीच नुकसान होणार नाही. कारण तगाई कर्जे ज्या दरानें मिळतात, त्याच दरानें लॅन्ड मॉर्गेज बँका कर्जे देतील. सरकारनें हा कार्यक्रम आपल्या खात्यामार्फत केला असता, तर जेवढा खर्च आला असता, तेवढी रक्कम सरकार लॅन्ड मॉर्गेज बँकांना देणार असल्यामुळें हेतू सफल होईल. गुजरात व महाराष्ट्रातील लॅन्ड मॉर्गेज बँकांनी जें धोरण स्वीकारलें आहे त्याकडे सर्वांचे निःसंशय लक्ष लागून राहिलेलें आहे व या धोरणाचा त्यांचा अनुभव इतर सर्व राज्यांना अत्यन्त मौल्यवान ठरेल अशी आशा आहे. ★★★



"सहकार सहजीवनाचा आत्मा आहे व सहजीवन मानवी जीवनाचा आत्मा आहे शुचिता, समभाव व सद्‌अभिरुची याच्या त्रिवेणी ,संगमात सहकार जन्मास' येतो. जीवन म्हणजे सहजीवन व सहजीवन म्हणजे सहकार हेच मानवी जीवनांचे समीकरण !"




# सहकारी योजना व कार्यक्रम अंतर्गत निधी जमविण्याचा प्रश्न

सी. के. सुब्रह्मण्यम् नायडू
आंध्र विद्यापीठ



तिसऱ्या पंचवार्षिक योजनेनें, 'स्वर्गनें वाढणाऱ्या सरकारी क्षेत्रावर भर दिला आहे. या सहकारी क्षेत्रांत शेतकरी, कामगार व ग्राहक यांच्या गरजांकडे विशेष लक्ष दिलें की, सहकारी क्षेत्र सामाजिक स्थैर्याचें महत्त्वाचें अंग बनू शकेल; तसेंच त्यांत व्यवसायाची संधि वाढून आर्थिक विकासहि वेगानें होईल, असें मागून दुसऱ्या योजनेप्रमाणेंच या योजनेनेंहि त्याच एका धोरणाचा पुनरुच्चार केला आहे. या योजनेनें म्हटलें आहे कीं, 'वाढत्या सहकारी ग्रामीण अर्थव्यवस्थेचा एक भाग या नात्यानें, धोरणाचा ठोबळ हेतू म्हणून शेतकी व ग्रामीण जनतेच्या कल्याणाशी निगडित असणाऱ्या अन्य अनेक आर्थिक व सामाजिक, चळवळीचा प्राथमिकघटक समजून, खेड्याचा विकास करण्यांत यावा.' या संबंधातला, विशेषत. वाढत्या शेतकी उत्पादनांत, एक महत्त्वाचा कार्यक्रम, सहकारी पद्धतीतून कर्जाचा पुरवठा करणें हा होय. १९६० -१९६१ या वर्षांत , ग्रामीण सहकारी पतपेढ्यांनी ,आपल्या सभासद शेतकऱ्याना, अल्प व मध्यम मुदतीची मिळून सुमारे २०० कोटि रुपयाची कर्जें दिली, असा अंदाज आहे. तिसऱ्या योजनेच्या अखेरीपर्यंत सहकारी संस्थाचें जाळे सर्व खेड्यात पसरलें व ३७ दश लक्ष शेतकरी या संस्थाचे सभासद झाले (ही संख्या एकूण शेतकऱ्याच्या दोन तृतीयांश आहे) तर १९६५–६६ च्या अखेरीस , अल्प व दीर्घ मुदतीची सुमारे ५३० कोटि रुपयाची कर्जें या संस्था देतील , अशी अपेक्षा आहे. वर्षाचे अखेरीस दीर्घमुदतीच्या मॉर्गेज कर्जाची रक्कम सुमारें १५० कोटि रुपये असेल ही लक्ष्यें काहीशी भेडसावणारी दिसतात परन्तु अशा सहकारी कर्जाच्या वाढीचा प्रमुख उद्देश 'योजनेंत ठरविलेल्या प्रचंड शेतकी लक्ष्याच्या पूर्ततेसाठी पुरेसा पैसा मिळण्याची हमी देणें' हा दिसतो. अर्थात् एक गोष्ट नमूद केली पाहिजे की, गेल्या काही वर्षांत देण्यात आलेल्या उदार सहकारी कर्जांचा उत्पादन-योजनेशी मेळ घालण्यांत आला आहे काय ? तसेंच, शेतकी कार्यासाठी देण्यात आलेल्या या वाढत्या कर्जांमुळे उत्पादनवाढ झाली किंवा नाही, झाली असल्यास ती किती झाली; तसेच या सर्व प्रक्रियेत कोठें गळती आहे काय, याबद्दल खात्रीच्या पुराव्याचे अभावी कोणीच निश्चित उत्तर देऊ शकत नाही

शेतकरी-कर्जदाराच्या या सतत वाढत्या संख्येला कर्जे देण्याचा भार सहन करण्याची व ही प्रचंड रक्कम यशस्वी रीतीनें हाताळण्याची



सहकारी पत-पद्धतीची पात्रता यामुळें कसाला लागेलच; पण त्याखेरीज सहकारी बँका व संस्था यांच्या आर्थिक ताकदीवर अत्यंत मोठा ताण पडेल. या वस्तुस्थितीची जाणीव योजनाकाराना आहे, ही गोष्ट योजना-कालांत सहकारी संस्था किती पैसा जमवूं शकतील, याबाबत त्यानीं केलेल्या अंदाजावरून सिद्ध झाली आहे. प्राथमिक सहकारी सस्यांचें भाग-भांडवल (सरकारी मदत वगळता) १९५९–६० सालीं ४२ कोटि रुपये होतें, तें १९६५–६६ साली ८५ कोटि रुपये होईल. मध्यवर्ति सहकारी बँकाचें २३ कोटींवरून ६२ कोटींवर व अॅपेक्स बँकाचें ९ कोटींवरून ३३ कोटींवर जाईल, असा अंदाज आहे. त्याचबरोबर १९५९–६० ते १९६५–६६ या दरम्यान प्राथमिक सहकारी संस्यां-मधील ठेवी रु. १२ कोटींवरून ४२ कोटींपर्यंत, मध्यवर्ति बँकांतील रु. ९५ कोटींवरून २१२ कोटींपर्यंत व अॅपेक्स बँकांतील ठेवी ६० कोटींवरून १४२ कोटींपर्यंत जातील, असाहि अंदाज आहे. योजनेनें हें ओळखलें आहे कीं, 'दीर्घ मुदतीच्या कर्जांचें १५० कोटि रुपयांचें उद्दिष्ट साध्य करावयाचें असेल, तर ग्रामीण डिबेंचर्संची लोकप्रियता व लॅन्ड मॉर्गेज बँकाना पैसे गुंतविणाऱ्या संस्यांकडून मिळणारा पाठिंबा यावर तें लक्ष्य बऱ्याच प्रमाणात अवलंबून राहील.' आणि योजना-कारांनी अत्यंत सडेतोडपणें पण, उत्साहवर्धक असें आवाहन केलें आहे कीं, 'रिझर्व बँक ऑफ इंडिया, दि स्टेट बँक ऑफ इंडिया व आयुर्विमा कॉर्पोरेशन अशा राष्ट्रीय संस्थाकडून मदतीचा मोठा वाटा आला पाहिजे.'

सहकारी संस्यांच्या अंतर्गत भांडवलाचा अंदाज करताना, योजना-कारांनी, सहकारी बँकांचा कारभार व त्यांचा कर्ज-आराखडा याबाबत ह्या संघटनांनी आजपर्यंत केलेलें कार्य ध्यानांत घेतलें असावें, असा अंदाज आपण करूं शकतो. त्याचप्रमाणें या संस्यांची पैसा उभा करण्याची सध्याची ताकद व भावी कालांतील शक्यता यांचाहि त्यांनी विचार केला असावा. आजवर सहकारी संघटनेच्या इतिहासात कधी नियो-जनाची संधि वा गरज भासली नाही, त्यामुळें हे अंदाज एवढ्या भव्य प्रमाणावर आहेत.सहकारी संस्थाना असामान्य स्वरूपाचा असा हा अनुभव मिळेल; हा अनुभव अवघड आहे, तसाच उत्तेजकहि आहे. या अनुभवातून सहकारी संस्था यशस्वीपणें गेल्या तर ती गोष्ट त्यांची कार्यशक्ति नि त्यांची निष्ठा, तसेंच त्यांच्याबाबत असणारा विश्वास नि त्यांची कीर्ति यांचें तें द्योतकच ठरेल'.

एक मुद्दा मात्र काहीसा विवाद्य वाटतो. प्राथमिक, माध्यमिक व अॅपेक्स पातळ्यांवरील सहकारी सस्था, योजनाकारांच्या अंदाजाइतका, अंतर्गत पैसा उभा करूं शकतील काय? सहकारी संस्यांचें स्वतःचें भांडवल व ठेवी याबाबतचीं लक्ष्यें वास्तव आहेत व ती अमलात आणता येतील, असें सहकारी संस्थांची आजपर्यंतची कामगिरी व विद्यमान अर्थ-प्रवाह यावरून सूचित होत नाहीं. सर्व पातळ्यावर मिळून भाग भांडवलांतील एकूण वाढ सुमारे १०६ कोटि रुपये आहे; १९५९–६० च्या अखेरीच्या रु. ७४ कोटींवरुन भागभांडवल १९६५–६६ चें अखेरीस रु. १८० कोटींपर्यंत जावें अशी अपेक्षा आहे. ही वाढ ढोबळ मानानें १५० टक्क्यांहून किंचित् कमी आहे. हें शक्य आहे की, सर्व खेड्यापर्यंत सहकारी आंदोलन पोहोचवून, शेतकरी लोकसंख्येच्या दोन तृतीयांशा-एवढी सभासदसंख्या करण्याची मोहिम व विविध पातळ्यावर भाग-भांडवल नि द्यावयाची कर्जें यांचें निश्चित प्रमाण ठरवून या संबंधांत अधिक शास्त्रीयता निर्माण करणें, या योगानें मोठ्याप्रमाणावर वाढ होईल अशी अपेक्षा असावी. त्याचबरोबर, योजनाकाराना असेंहि वाटलें असेल –(नि तसें वाटणें कांहीं प्रमाणात असमर्थनीय आहे)–कीं, सहकारी पतपेढ्यांना विशेषतः राज्य व मध्यवर्ति बँकांच्या पातळीवर भाग-भांडवलासाठीं मिळणारी भरपूर सरकारी मदत, मंद न होतां सध्याप्रमाणें चालू राहील. १९५९–६० सालचे अखेरीस, सहकारी पत-पेढ्यांच्या भाग-भांडवलाला सरकारकडून मिळालेल्या मदतीची रक्कम रु. २१.३५ कोटि एवढी होती. ही मदत वजा केली तर सहकारी संस्याचें स्वतःचें भाग-भांडवल जेमतेम ५३ कोटि रु. होतें. अपेक्षा अशी दिसते की, को-ऑपरेटिव क्रेडिट कमिटीनें (१९६०) शिफारस केल्याप्रमाणें, सध्यांच्या ५ कोटि रुपयांच्या सर्वसामान्य चालू मदती-ऐवजी वार्षिक १५ कोटि रुपयाची मदत देऊन, राष्ट्रीय शेतकी कर्ज (दीर्घ मुदतीची) निधि (नॅशनल अॅग्रिकल्चरल क्रेडिट फंड) सध्यां-पेक्षां खूपच भक्कम करण्यांत येईल. तरीहि मध्यम मुदतीच्या कर्जांची वाढती मागणी व लॅन्ड मॉर्गेज बँकेच्या डिबेंचर्संची वर्गणी यायोगें या निधीवर खूपच ताण पडेल. कारण मध्यम मुदतीचीं कर्जें व लॅन्ड मॉर्गेज डिबेंचर्स यासाठी सहकारी यंत्रणेला बाह्य आर्थिक मदतीवर बव्हंशी विसंबून रहावें लागतें. यावरून असें दिसेल की, भाग-भांडवलाचें १०६ कोटि रुपयाचें लक्ष्य गांठणें कमालीचें अवघड आहे.

आपल्या चर्चेशीं अधिक सुसंबद्ध गोष्ट म्हणजे योजनाकारांनी आखलेला सहकारी संस्याच्या ठेवी-वाढीचा कमालीचा फाजील, –(बहुधा अवास्तव)–कार्यक्रम. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, १९५९–६० तें १९६५–६६ या दरम्यान प्राथमिक सहकारी पतपेढ्याच्या ठेवी रु. १२ कोटींवरून ४२ कोटींपर्यंत, मध्यवर्ति बँकाच्या ९५ कोटींवरून २१२ कोटींपर्यंत व अॅपेक्स बँकाच्या ६० कोटींवरून १४२ कोटींपर्यंत वाढा-व्यात असा अंदाज आहे. या कालावधींत रु. २२९ कोटींची वाढ संकल्पि-लेली आहे योजनाकारानी हा संकल्प कोणत्या आधारावर बांधला हें अहवाल पाहून स्पष्ट होत नाहीं; पण त्याच्या आशावादाला, सहकारी पतपेढ्याच्या आजपर्यंतच्या कामगिरीचा पाठिंबा नाही, अशी भीति वाटते. कदाचित् आकड्यांचें अल्प पृथक्करण योग्य ठरेल. अॅपेक्स बँकाच्या ठेवीमध्यें ३० जून १९६० रोजी संपणाऱ्या दशकात ३९ कोटि रु. वाढ झाली (१९४९–५० साली ठेवीची रक्कम रु. २१ कोटि होती व १९५९–६० सालच्या अखेरीस रु ६० कोटि होती). या वाढीचें वार्षिक प्रमाण ४ कोटि रुपयाहून कमी पडतें नजीकचा भरभराटीचा काळ घेतला तरी ३० जून १९६० रोजी संपलेल्या पाच वर्षांत ३१ कोटि रु. वाढ झाली. हें प्रमाण वर्षाला ६ कोटि रु. आहे. (यामध्यें फक्त 'व्यक्ती व इतर' यांच्या ठेवींचा विचार केला) तर गेल्या दशकात सरासरी वाढ रु १ कोटि व ३० जून १९६० रोजीं संपणाऱ्या ५ वर्षांत

रु. १.६ कोटि एवढी आहे. निराळया शब्दात सांगावयाचें म्हणजे, सर्वसामान्य लोकांचा पाठिंबा फारसा उत्साहवर्धक नाही). योजनाकारांनी तिसऱ्या योजनेचे काळात वार्षिक वाढ रु. १६ कोटि धरली आहे. ही वाढ ३० जून १९६० रोजीं संपलेल्या ५ वर्षांतील वार्षिक वाढीच्या २७५% टक्क्याहून अधिक आहे.

मध्यवर्ति सहकारी बँकांबाबतहि अंदाज अत्यंत महत्त्वाकांक्षी भासतात. १९४९–५० चे अखेरीस मध्यवर्ति सहकारी बँकांतील ठेवींची रक्कम ३५ कोटि रु. होती तर १९५९–६० सालचे अखेरीस रु. ९५ कोटि होती. म्हणजे गेल्या दशकांतील वार्षिक सरासरी रु. ६ कोटि पडली. १९५४–५५ ते १९५९–६० हा पाच वर्षांचा काल घेतला तरी मध्यवर्ति सहकारी बँकांतील ठेवी रु. ४६ कोटींवरून रु. ९५ कोटींवर गेल्या; म्हणजे वार्षिक वाढ सरासरी रु. १० कोटि झाली. (वर उल्लेखिलेल्या दहा व पाच वर्षांत 'व्यक्ति व इतर' यांचेकडून आलेल्या ठेवीतील वाढीचें प्रमाण अनुक्रमें रु. ३.२ कोटि व रु. ५ कोटि होतें. हें अर्थातच फारसें समाधानकारक नाही). याचबरोबर, आपण हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, या वाढी सर्व राज्यात समान नाहीत. कांहीं राज्यांतील स्थिति निराशाजनक आहे. योजनाकारांची अपेक्षा अशी आहे की, मध्यवर्ति बँकांतील ठेवी रु. ९५ कोटींवरून रु. २१२ कोटींपर्यंत जाव्यात; ही वाढ एकूण ११७ कोटींची म्हणजे वार्षिक सरासरी २३.५ कोटि रुपयाहून किंचित कमी आहे. निराळया शब्दांत असें म्हणतां येईल की, गेल्या पांच वर्षांतील सरासरी वार्षिक वाढीपेक्षा अपेक्षित वाढ सुमारें २३०% टक्के अधिक आहे.

गेल्या दशकात अॅपेक्स बँका व मध्यवर्ति सहकारी बँका, यांच्या खेळत्या भांडवलाशी त्यांचेपाशी असणाऱ्या ठेवींचें प्रमाण लक्षांत घेण्यायोगें घटलें आहे. याचें आपण स्वतःलाच स्मरण करून देणें आवश्यक आहे. अर्थातच हा काही आशादायक भाग नव्हे. १९५०–५१ सालचे अखेरीस, अपेक्स बँकांमधील ठेवींचें (रु. २२.०७ कोटि) खेळत्या भांडवलाशी प्रमाण ६४.२ टक्के होतें; तर १९५९–६० सालचे अखेरीस तें ३४.४ टक्के होतें म्हणजे ही घट सुमारे ५० टक्के एवढी आहे. मध्यवर्ति सहकारी बँकांबाबत हीच स्थिति दिसून येते. १९४९–५० सालचे अखेरीस ठेवींचें खेळत्या भांडवलाशी प्रमाण ७०.२ टक्के होतें तर १९५९–६० सालचे अखेरीस तें ३८.६ टक्क्यांपर्यंत उतरलें याच कालांत इतर कर्जे (बॉरोइंग्ज) खूपच वाढली. अॅपेक्स बँकांबाबत तीं १९५०–५१ अखेर २५ टक्के होतीं; तर १९५९–६० अखेर ती ५४ टक्के झाली. मध्यवर्ति सहकारी बँकांबाबत हें आकडे अनुक्रमें १४ टक्के व ४५ टक्के असे होते. हें अपेक्षितच आहे नि याबाबतीत प्रमुख मार्ग (सोर्स) रिझर्व बँक ऑफ इंडिया ही आहे. खालील तक्त्यावरून परिस्थिति अधिक स्पष्टपणें समजू शकेल.

| वर्ष | वर्ष अखेर रिझर्व बँकेकडून मागितलेल्या कर्जाची रक्कम (आकडे कोटीत) | खेळत्या भांडवलाशीं प्रमाण |
|---|---|---|
| १९५३–५४ | ९ | २२.० |
| १९५४–५५ | ८.४४ | १७.७ |
| १९५५–५६ | १४.०७ | २२.२ |
| १९५६–५७ | २५.७६ | ३२.४ |
| १९५७–५८ | ४४.०८ | ४०.४ |
| १९५८–५९ | ६३.९६ | ४३.४ |
| १९५९–६० | ८५.२१ | ४८.८ |

अॅपेक्स बँका व मध्यवर्ति सहकारी बँकांच्या स्वतःच्या भांडवलाबाबतची परिस्थिति, गेल्या ५ वर्षांत राज्य सरकारांनी भाग-भांडवलाला भरपूर मदत करूनहि, गेल्या दशकात सामान्यतः स्थिर अशीच राहिली.

योजनाकारांनी याबाबतींत जेवढा आशावाद दाखविला आहे, तेवढा वर दिलेल्या आकडेवारीवरून ग्राह्य मानतां येत नाही, असें मला वाटतें. सहकारी अर्थसंस्थातील ठेवींची स्थिति सुधारण्याठी वेळोवेळी सूचना करण्यांत आल्या आहेत हें खरे आहे. या सूचना अंमलांत आणण्याचे प्रयत्नहि झाले आहेत. तरीहि एकंदर स्थिति उत्साहवर्धक नाही. तसेंच सर्व राज्यात ती समानतेनें चांगली नाही. सहकारी बँकांतील ठेवींमध्यें वाढ होण्यासाठी सुचविण्यात आलेल्यापैकीं कांही उपाय पुढीलप्रमाणें आहेत. मध्यवर्ति सहकारी बँकांच्या कार्यक्षेत्रात शाखा उघडून ग्रामीण व निम-शहरी विभागातील ठेवी मिळविणें, ठेवींवरील व्याजाचे दर ठरविण्याची मोकळीक देणें, स्थानिक स्वराज्य संस्था व शिक्षण संस्थाना सहकारी संस्थात आपले शिल्लक निधि ठेवता यावेत , या दृष्टीनें व्याजाचे दर ठेवणें, व्यक्तिगत ठेवीदाराला विश्वास व निष्ठा वाटेल अशा रीतीनें त्याला बँकविषयक सवलती व सेवा उपलब्ध करून देणें.

याखेरीज, एक गोष्ट लक्षांत घ्यावयास हवी, ती ही की, या क्षेत्रात अनेक स्पर्धक संस्था आहेत . केन्द्र व राज्य सरकारे मधून मधून कर्जे उभारतात; राष्ट्रीय बचत योजना व राज्यांची वाढती लक्ष्यें, आयुर्विमा कार्पोरेशनचा ग्रामीण व निमशहरी भागातील आयुर्विमा व्यवसायाचा वाढता कार्यक्रम, आकर्षक व्याजाचे दर देणाऱ्या व्यापारी बँका, आकर्षक निवेदन पत्रें असलेले नवे औद्योगिक कारखाने , राज्य वीज मंडळें, फिनॅन्शियल कॉर्पोरेशन्स इत्यादि संस्था. याखेरीज या सवयात कराच्या वाढत्या पातळीचाहि विचार करावयास हवा दुसरी गोष्ट ठेवींच्या हमीबाबतची आहे. व्यापारी बँकांमधील रु. १५०० पर्यंतच्या ठेवींना सरक्षण देण्यात आलें आहे, मात्र सहकारी बँकांमधील अशा ठेवींना या संरक्षणामधून वगळले आहे. याची प्रतिक्रिया सहकारी बँकांकडे पळणाऱ्या ठेवींच्या ओघावर काय होते ते फक्त भावी काळच ठरवील. तिसरी गोष्ट अशी की, सहकारी अर्थसंस्थानी (काहीं अपवाद वगळता), टीकाकारानी वारंवार दाखवून दिल्याप्रमाणें, ठेवी मिळविण्याचे बाबतीत व्यापारी बँकाइतकी धडाडी, उपक्रमशीलता व कष्ट करण्याची तयारी दाखविलेली नाही रिझर्व बँकेनें आर्थिक बाबतीत कमालीची उदारता दाखविल्यामुळे , सहकारी बँकांचे स्वावलंबनाच्या ईर्षेचें टोक काहीसें बोथट बनलें आहे. एक काळ असा होता की, मध्यवर्ति सहकारी बँकांचे डायरेक्टर जरूर तेंव्हां व्यक्तिगत प्रयत्न

करून व आपलें वजन वापरून , आपापल्या बँकांसाठी ठेवी मिळवीत. हा इभ्रतीचा प्रश्न नव्हता; तर श्रद्धा व निष्ठा याचा प्रश्न होता. पण गेल्या काही वर्षांत सहकारी आर्थिक संस्थासाठी लागणारा पैसा काहीसा असामान्य सहजपणें उपलब्ध होऊं लागणें ही गोष्ट सर्वस्वी वरदानासारखी ठरलेली नाही. अनेक अडचणी व ताण यांच्या दबावा-मुळे दूरच्या भूतकालात, उपक्रमशीलता, स्वावलंबन व स्थानिक सह-कारी प्रयत्नांचा वारंवार आढळ झाल्याचें दिसू न येईल. पण जेव्हां एकाद्या बाह्य पण उदार संघटनेमार्फत, फारसा प्रयत्नाविना गरजा भागविल्या जातात, तेव्हां स्थानिक प्रयत्नाची इच्छा व ईर्षा मंद होते आणि असेंच घडल्याचें दिसून आलें आहे. भाग-भांडवलाला, सरकारची उदार मदत व रिझर्व बँकेकडून अधिक सढळ हातानें मिळालेलें आर्थिक सहाय्य—वर दिलेल्या तक्त्यावरून ही वस्तुस्थिति स्पष्ट होते– याचा परिणाम सहकारी बँकांच्या कार्यपद्धतीवर झाल्यावाचून रहात नाही. जुन्या निष्ठा, कार्यप्रवणता व स्थानिक प्रयत्न या गोष्टी पुन्हा जुन्या पातळीवर पुनरुज्जीवित करतां येतील काय, ही तर्काचीच बाब आहे.

ठेवी जमा करून, शक्य तेवढ्या मर्यादेपर्यंत आपल्या संलग्न संस्थाना मदत देणें , हें सहकारी अर्थ संस्थाचें कर्तव्य असलें तरी प्राथमिक पत-पेढ्यांनी फक्त कर्ज मागणारा गट म्हणून काम करणें योग्य नव्हे. सहकारी पतपेढ्यांच्या अंतर्गत निधीचा प्रश्न प्राथमिक पतपेढ्यांचे भवितव्य व सामर्थ्याशी संलग्न आहे.

ग्रामीण सहकाराचें वाढतें जाळें व त्याची झपाट्यानें वाढणारी सभासद-संस्था याना लागणारा सर्व पैसा सामान्यत. कोणत्याहि सहकारी अर्थसंस्था उपलब्ध करून देऊं शकत नाहीत. सहकारी संस्थाना रिझर्व्ह बँकेचा भला मोठा पाठिंबा मिळावा, ही योजनाकारांची चिंता, त्यांनी केलेल्या "तिसऱ्या योजनेंतील अर्थव्यवस्थेच्या वाढत्या गरजा, शेतकी लक्ष्यें व पतीच्या गरजा लक्षात घेऊन रिझर्व्ह बँकेला आणखी मोठा वाटा उचलावा लागेल." या विधानावरून स्पष्ट होत असली, तरी देशातील कोणतीहि मध्यवर्ति बँक, मग तिची उदारता कितीहि असो व तिला शेतकऱ्यांच्या कल्याणाची कितीहि काळजी असो, ती वाढत्या सहकारी क्षेत्राच्या सर्व आर्थिक गरजा पूर्ण करू शकणार नाही. यामुळे ज्या कल्पनेंतून सहकारी पत संस्थाचा जन्म झाला व आपल्या निर्मितीपासून त्यांनी ज्या पद्धतीनें काम करावें अशी अपेक्षा तिची संगति लागून इष्टता पटते. या पतपेढ्यांचे प्राथमिक उद्देश, आपल्या सभासदांमध्यें बचत व काटकसरीची सवय निर्माण करणें, ग्रामीण विभागातील ठेवी गोळा करून एकत्र करणें व स्थानिक उत्पादना-साठी अशा बचती कर्जरूपाने उपलब्ध करून देणें हे आहेत. हे उद्देश निश्चयपूर्वक व एकाग्रतेनें अंमलात आणण्याचा प्रयत्न आपण केलेला नाही आपल्या सारख्या अविकसित देशात, या मार्गात बऱ्याच अडचणी आहेत ; पण अन्य अनेक देशाप्रमाणें आपण या अडचणीवर मात केली पाहिजे. आपण अशी इमारत उभी केली आहे की, आर्थिक दृष्टीनें, ती एका बाजूला बरीच कलडलेली आहे !

'रायफायसेन" पद्धतीच्या दोन बाजू अशा आहेत की, दुर्दैवानें आपण त्याकडे पुरेसें लक्ष दिलेलें नाही. उशीरा का होईना, पण आपण स्वतःला या गोष्टींची आठवण करून देणें आवश्यक आहे. ही गोष्ट सामान्य वाटली तरी आपल्या वाढत्या कर्ज-कार्यक्रमाच्या संबंधात ती अत्यंत महत्त्वाची आहे. 'रायफायसेन' ग्राम संस्थेचा (किंवहुना बँकेचा) एक उद्देश, आपल्या सभासदाची व्यक्तिगत कर्जाची ( अगर खेळत्या भांडवलाची ) गरज भागविणें हा आहे. याचा अर्थ असा की, शेतकऱ्यांनी अनेक वर्षेपर्यंत स्वत.च्या उत्पन्नातून, शेतीच्या विकासासाठी व उत्पाद-नासाठी लागणाऱ्या भांडवलाचा निदान काही भाग तरी जमवावा व त्याना लागेल ती जादा रक्कम त्यांनी आपल्या संस्थाकडून कर्जाऊ घ्यावी. आपल्या काही संस्था , शेतकऱ्याची स्वतःची मिळकत व त्याच्या मालकीची जमीन १ एकर आहे की ५ एकर, १० की, २० एकर हें विचारांत न घेतां कर्जें देतात, त्याप्रमाणें दरवर्षी शेतकरी-सभासदाला कर्ज द्यावीत हें योग्य नव्हे. सभासदानी आपल्या स्वतःच्या बचतीमधूनच लागवड किंवा अन्य उत्पादक कामें हाती घ्यावीत व फक्त उरलेला पैसा सहकारी संस्थानी त्याना पुरवावा, याबाबत शेत-कऱ्यांना उत्तेजन देण्याच्या दृष्टीनें सहकारी संस्थानी फारच थोडें कार्य केलें आहे. शेतकरी सभासदाच्या व्यक्तिगत प्रयत्नाकडे , मग तो अत्यल्पहि कां असेना, कर्जाच्या रकमेचा संबंधच या संस्थांनी जोडलेला नाही. शेतकरी छोटे जमीनमालक आहेत, हा युक्तिवाद पटत नाही. आरोप असा आहे की, ग्रामीण सहकारी पतपेढ्यांनी सदैव सुखवस्तु शेतकऱ्यांना पैसा पुरविला असून, छोट्या, सीमारेषेवर असलेल्या व त्या रेषेच्या खाली असलेल्या शेतकऱ्याकडे दुर्लक्षच केलें आहे.

दुसरा व अत्यंत महत्त्वाचा मुद्दा असा की, "रायफायसनें" या संस्थाची कल्पना काढली ती, ह्या संस्था केवळ कर्ज-पुरवठा संस्था व्हाव्यात या उद्देशानें नव्हे; तर काटकसर व बचत या सवयी वाढविण्याची साधने या संस्था बनाव्यात, अशी त्याची कल्पना होती. म्हणजेच, रायफाय-सेन ग्रामीण बँकाचा दुसरा उद्देश, ग्रामीण जनतेंत काटकसर व बचत याची वाढ करावी, त्याच्या बचती मिळवाव्यात व सामान्यपणें 'ग्रामीण बँकर्स ' म्हणून काम करावें, असा होता,म्हणूनच "राय फायसेन" संस्थाना काटकसर व कर्ज संस्था किंवा ग्रामीण बचत व कर्ज पुरवठा बँका म्हटलेले आहे. प्रथमपासूनच भर आहे तो काटकसर व बचत करून स्थानिक भांडवल उभारण्यावर आहे. "ग्रामीण बँका ठेवी मिळविणे व कर्ज देणें ही दोन्ही कामें करतात, ही जर्मन पद्धतिची शक्ति आहे" असें जे म्हणण्यात येतें तें बरोबर आहे. आपण "राय फायसेन पद्धत स्वीकारली आहे. पण ती स्वीकारताना काटकसर व बचत याचे संवर्धन व जोपासना करण्याच्या अत्यावश्यक बाबीला जे अग्रस्थान, जें महत्त्व देणें अत्यावश्यक होते तेवढ्या निश्चयानें त्यावर भर दिलेला नाही. स्वावलंबन नि संघटना याच्याद्वारें जर्मन शेतकऱ्याची पिळवणूक थांबविण्यासाठी, रायफायसेननें आपल्या ग्रामीण सहकारी संस्था सुरू केल्या. हें करताना त्यांचा पाया मजबूत होता. ही मजबुती कशात होती ? तर सहकारी पतसंस्था अशा रीतीनें चालवायची की शेत-

कऱ्याला त्याच्या योग्य व उत्पादक गरजांसाठीं कर्ज तर मिळावेंच; पण त्याचबरोबर हळुहळु त्याला बचत करण्यात व स्वत:च्या बचतींतून उत्पादनाची कामें हातीं घेण्यास मदत व्हावी. रायफायसेनची कल्पना अशी की, सहकारी संस्थेनें शेतकऱ्यास कर्जपुरवठा अशा रीतीनें नियंमित करावा की, क्रमश: त्याची कर्जाची गरज घटत जावी व अखेरीस स्वत:च्या बचतीमुळें तिची मुळीच निकड भासू नये. या वृत्तीनें अंगिकारिलेल्या पद्धतीनें रायफायसेन ग्रामीण बँकांनी प्रचंड शिलकी निधि उभारले आहेत. सहकारी संस्थाच्या विकासापूर्वीं ठेवी ठेवण्याची कल्पना, जर्मन मालक - शेतकऱ्यांना जवळ जवळ अज्ञात होती. " पण आता जर्मनी ,ठेवीच्या रकमा कोटींनी आहेत. पूर्वीच्या काळी छोट्या ठेवी मिळविण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर पद्धतशीर प्रयत्न करण्यात आले. " *ग्रामीण सहकारी संस्थाचे निधि व व्यक्तिश: सभासदाची ठेव वाढविण्यासाठी बचतपेट्या,* बचत तिकिटें, बचती गोळा करण्यासाठीं शाळकरी विद्यार्थ्यांच्या ग्रामीण कुटुंबाना भेटी, जर्मन मार्कचा छोटासा भागहि ठेव म्हणून स्वीकारणें या मार्गाचा अवलंब करण्यात आला. काटकसरीची संवय जोपासणें *हें आपलें कर्तव्य आहे, असें रायफायसेन संस्था मानतात,* हें पाहून आनंद होतो. काटकसर करणें आपल्याच हिताचें आहे असें ते मानतात; कारण ठेवी मिळण्यावरच धनको म्हणून आपलें यश अवलंबून आहे, अशी त्यांची भावना आहे. त्यांच्या ठेवी केवळ सभासद व बिगर सभासदाकडूनच जमविल्या जात नाहीत. सर्व वर्ग व सर्व वयाच्या लोकापर्यंत पोहोंचण्याचा प्रयत्न केला *जातो.* जमीन–मालक शेतमजुरांना व आपल्या नोकरानाहि, आपल्या पगाराचा काही भाग ठेव म्हणून ठेवण्याची शिफारस करतो. रायफायसेन संस्था, बचत बँका म्हणून ग्रामीण जनतेला इतर फायद्याबरोबर तीन मौलिक फायदे देतात; ते म्हणजे; बँकाची नजीकता, संपूर्ण सुरक्षितता व पुरेसें व्याज आणि या संस्था अभिमानानें सांगतात कीं, एकाहि ठेवीदाराची ठेव बुडालेली नाहीं.

एक गोष्ट येथें सांगणें योग्य ठरेल. ती अशी की, दुसऱ्या युद्धाच्या कांहीसा आधीं, जर्मनीतील शेतकी सहकारी पतपेढ्यांकडे २०० कोटि ६० लक्ष मार्कच्या ठेवी होत्या व या ठेवींची रक्कम कर्जापेक्षा अधिक होती. असें सांगतात की, जानेवारी १९३८ च्या अखेरीस, स्थानिक पतपेढ्यांनी आपल्या प्रादेशिक मध्यवर्ति बँकात ठेवलेल्या ठेवींची रक्कम ५५८ दशलक्ष मार्क एवढी होती; तर मध्यवर्ति बँकानी स्थानिक पतपेढ्याना दिलेल्या कर्जाची रक्कम २०४ दशलक्ष मार्क होती. १९३७ *च्या अखेरीस शेतकी पतपेढ्यानी ४॥ टक्के व्याजाचे ३१६ दशलक्ष* मार्क किमतीचे सरकारी रोखे खरीदले होते. हीच स्थिति आजहि कायम आहे गेल्या वर्षी पश्चिम जर्मनीला भेट दिलेल्या भारतीय मंडळाचा एक सदस्य म्हणतो, " पश्चिम जर्मनीच्या ग्रामीण अर्थ व्यवस्थेंत पतपेढ्याचें स्थान अत्यंत महत्त्वाचें आहे सर्व देशभर त्या " रायफायसेन बँका " म्हणूनच ओळखल्या जातात नि खेडुताना आवश्यक असलेल्या बँकविषयक सर्व गरजा त्या पुरवितात. या बँका मध्यवर्ती प्रादेशिक बँकांशी संलग्न असतात व त्या जरूर तेव्हा त्याना पैसा उपलब्ध करून देतात. पण *ग्रामीण बँकानी शक्य तों आपल्याकडील ठेवींमधूनच गरजा* भागवाव्यात अशी अपेक्षा असते. छोट्या ग्रामीण संस्थांमध्येंहि मोठ्या प्रमाणावर ठेवी आहेत. आम्हीं ज्या ग्रामीण संस्थाना भेट दिली, त्यांपैकी बहुतेक, आपल्या सदस्याची कर्जें भागविण्यासाठी व अन्य कामांसाठीं मध्यवर्ति बँका वा इतर बँकांकडून पैसा घेत नाहीत. १९५८ च्या अखेरीस, पश्चिम जर्मनीतील पतपेढ्या व १२ प्रादेशिक मध्यवर्ति बँकात मिळून ६६०० दशलक्ष मार्काच्या ठेवी होत्या, या विरुद्ध १९५८ *साली सभासदाना दिलेल्या कर्जांची रक्कम ४७०० दशलक्ष मार्क होती.* "

मी या बाबीचें कांहीसें विस्तृत विवेचन केले, ते हेंच दाखविण्यासाठीं कीं, आपल्या योजनाकारांनी सकल्पिलेला कर्जाचा महत्त्वाकांक्षी कार्यक्रम कृतिमान करावयाचा असेल, तर सहकारी अर्थसंस्थांतर्फे कितीहि पैसा उपलब्ध झाला, तरी ग्रामीण पतपेढ्यानी आपल्या कार्यक्षेत्रात स्थानिक पैसा उभा केलाच पाहिजे आपण या चित्राकडे काहींसा अधिक वास्तव रीतीनें पाहूं. १९५०–५१ चे अखेरीस ग्रामीण पतपेढ्यांकडे ४.४८ कोटींच्या ठेवी *होत्या व खेळत्या भाडवलाशीं* हें प्रमाण १०.९ टक्के होते. १९५९–६० चे अखेरीस या पतपेढ्यांकडे १२ कोटीं च्या ठेवी होत्या व खेळत्या भाडवलाशी हें प्रमाण सुमारे ५ टक्के होते. १० वर्षांच्या कालावधींत, ग्रामीण सहकारी पतपेढ्यांमधील ठेवींची रक्कम अवघी ७.४ कोटींनी वाढली. म्हणजे वार्षिक वाढीचा दर ८. ७५ *लक्षापेक्षा कमी होता. गेली ५ वर्षें घेतली तरी ही वाढ* १.३ कोटी रुपये आहे. हीहि गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, पंजाब, महाराष्ट्र व गुजरात या तीन राज्यांनीच, शेतकी सहकारी पतपेढ्यांकडे जून १९६० च्या अखेरीस असलेल्या ११.८६ कोटींच्या ठेवींपैकी ५० टक्के ठेवी दिलेल्या आहेत. म्हैसूर, मद्रास व आंध्र याचा यानंतर क्रम *लागतो. इतर अनेक राज्यांत प्राथमिक पतपेढ्या आर्थिकदृष्ट्या* दुर्बल आहेत, याचा हा पुरावा आहे. हेंहि येथें सांगितलें पाहिजे की, सभासदांच्या ठेवींचें एकूण रकमेशी प्रमाण ६४ टक्के आहे. या पार्श्वभूमीवर ठेवींच्या सर्वंकष परिस्थितीचा विचार केला पाहिजे.

योजनाकारांनी, १९६५–६६ अखेर, ३० कोटि रुपयाच्या वाढीचा *कार्यक्रम, आखलेला आहे. ही वाढ वार्षिक ६ कोटि रुपयाची आहे.* यासाठी सर्वांगीण व निश्चयपूर्वक प्रयत्न करावयास हवेत. ग्रामीण सहकार चळवळीतील नेते इतके प्रयत्न करावयास कितपत सिद्ध होतील, याचा अंदाज करण्याचे भानगडीत मी पडू इच्छित नाही. पण एक गोष्ट निश्चित आहे की, सहकाराची योजना यशस्वी व्हावयाची असेल, तर ह्या दिशेनें प्रयत्न झालेच पाहिजेत, याबद्दल तिळमात्र शंका नाही.

एका दशकापूर्वी (१९५०–५१) रिझर्व बँकेनें बरोबरच म्हटलें होतें- "सहकारी पतपेढ्या मध्यवर्ती अर्थसंस्थाकडून मोठ्या प्रमाणावर पैसे काढतात म्हणून, हें सांगण्याची गरज नाही की, सहकारी आंदोलनानें आपल्या सभासदामध्यें काटकसरीच्या सवयींची जोपासना करून, ग्रामीण बचती गोळा करण्याचा निकराचा प्रयत्न केला पाहिजे विशेषत: अर्थव्यवस्थेच्या शेतकी क्षेत्रात या अत्यंत महत्त्वाच्या पतसंस्था असल्यामुळें, त्याच्यावर पडणाऱ्या वाढत्या जबाबदारीची जाणीव ठेवून, *सहकारी संस्था स्वावलंबी बनविण्यासाठी व तिची सभ्याची*

एका बाजूला झुकलेली आर्थिक वाढ दुरुस्त करण्यासाठी, ग्रामीण भागांतील ठेवी आकर्षित करून सर्व बचती गोळा करण्यासाठी कसोशीनें, निकराचे व सतत प्रयत्न झाले पाहिजेत." १९५८ मध्यें, पुन्हां रिझर्व बँकेने " या पतपेढ्या निधीसाठी अर्थपुरवठा संस्थावर अधिकाधिक अवलंबून रहात असल्याचा " उल्लेख केला असून " पतपेढ्यांच्या ठेवींची स्थिति सुधारण्यासाठी सतत मोहिम करण्याची " आवश्यकता प्रतिपादन केली आहे.

अशा स्थितीतहि शेतकरी सहकारी पतपेढ्याचा हा महत्वाचा व मूलभूत प्रश्न, रूरल क्रेडिट सर्वे कमिटीनें–ती समिति सरकारी भागीदारी, सरकार व सहकार या विषयाच्या तात्त्विक चर्चेत अडकून राहिल्यामुळेंच की काय– एकदम निकालांत काढला. या समितीनें म्हटलें आहे कीं– आणि त्यांनी काढलेल्या निष्कर्षावरून अगदी उघड आहे – "ग्रामीण बचती शक्य करण्याची आवश्यकता ( आर्थिक विकास व आम्ही वर उल्लेखिलेल्या पद्धतीनें कर्जविस्तार करून ) ग्रामीण बचती ( विविध मार्गांनी पैसा गोळा करून ) उपलब्ध करण्यापेक्षां कितीतरी अधिक निकडीची आहे." समितीचे असें मत असल्यामुळें, समितीनें अवास्तव आशावाद दर्शवून म्हटलें आहे की, "**सहकारी डिबेंचर्समुळें ग्रामीण बचती मोठ्या प्रमाणावर आकर्षित होतील, असें दिसतें.**" ( अधोरेखन माझे ) गुंतवणुकीसाठी डिबेंचर्सची पद्धत ग्रामीण भागात अद्याप अज्ञात असली तरीहि समितीचा तसा विश्वास आहे. रूरल क्रेडिट सर्वे अहवालात ' काटकसर ' या शब्दाचा उल्लेख देखील नाही व " सर्व जोर केवळ कर्जावर " आहे, याबद्दल डार्लिंग साहेबांनी खेद व्यक्त केला आहे.

४५ वर्षांपूर्वी ग्रामीण पत-संघटनेच्या योजनेंत, या प्रयत्नाच्या आवश्यकतेवर, मॅकलॅगन कमिटीनें जोरदार भर दिला होता. कमिटीनें म्हटलें होतें –" अशा ठेवीमुळें खेड्यात काटकसरीची वृत्ति वळावते; तो उत्तम निधि बनतो, व त्यामुळें या संस्थांच्या व्यवस्थापक मंडळावर उपयुक्त माणसें येऊन, ती स्वत:च्याच ठेवीचे संरक्षक म्हणून काम करतात. म्हणून आम्हाला असें वाटतें की, अधिकात अधिक स्थानिक ठेवी मिळविण्याचा प्रयत्न करणें हा प्राथमिक संस्थाचा प्रमुख हेतु असावा. तसेंच पश्चिम युरोपांतील सहकारी पतपेढ्या व भारतातील प्राथमिक पतपेढ्या यांमध्यें लक्षात येण्याजोगा जो फरक आढळतो, तो भारतातल्या प्राथमिक संस्थांकडे असलेल्या अत्यल्प ठेवींचें बाबतीत... अर्थात् हें लक्षांत ठेवलें पाहिजे की, युरोपांत देखील तत्सम ठेवी आरंभी कूर्मगतीनेंच आल्या... आणि जसजसें आंदोलन वाढत जातें तसतशी या ठेवींमध्यें मोठ्या प्रमाणावर वाढ झाली नाही तर आपल्या **प्रमुख उद्दिष्टाचे संदर्भात सहकारी आंदोलन फसलें हें कबूल केलेंच पाहिजे.**" यापेक्षा अधिक सत्य व स्पष्ट विधान सापडणार नाही आणि अधिक उपयुक्त सल्ला मिळणार नाही व लहान प्रमाणावर का होईना, हा सल्ला गंभीरपणें मानला गेला असता, तर आज सहकारी आंदोलन अधिक निरोगी, पायाशुद्ध व जोमदार दिसले असते.

ज्या देशात छोटे शेतकरीच बहुसंख्य आहेत, अशा देशात, त्यांच्या बचतीची रक्कम फारशी मोठी होणार नाही, हें खरे असलें तरी, त्याचा अर्थ असा नव्हे की, सहकारी संस्थानी, शेतकऱ्याची बचतीची इच्छा वाढविण्याचा, बचतीची सवय जोपासण्याचा व बचतीला उत्तेजन व सवलती देण्याचा प्रयत्नच करूं नये. एका गोष्टीचा मी येथें पुनरुच्चार करूं इच्छितों. "रायफायसेन" व "शूल्म" यांच्या कल्पनेनुसार छोट्या उत्पादकांच्या छोट्या व इतस्तत: पसरलेल्या बचती एकत्र करून, त्यांचे अशा रीतीनें वाटप करावयाचें की, त्याचें चलन नेहमी फिरत राहील, जेणें करून बचतीची छोटीशी रक्कम मोठ्यातमोठी रक्कम कर्जाऊ देण्याचें कार्य करू शकेल, हा सहकारी संस्थांचा उद्देश आहे. यातील तत्व असे की, सभासदाच्या स्वत:च्या ठेवी, याच सहकारी संस्थांचे सर्व नसलें तरी बहुतेक खेळते भांडवल ठरतील. हें तत्व आपल्या देशांतील परिस्थितीत लागू पडू शकत नाही, हें अद्याप सिद्ध व्हावयाचें आहे. श्रीमंत वर्ग अधिक सहजपणें बचत करूं शकतो. पण गरीब वर्ग येवढ्या प्रचंड संख्येनें येथें आहे की, त्यांच्या बचतीची एकूण शक्ति फार प्रचंड आहे; प्रत्येक व्यक्तिगत छोट्या शेतकऱ्यांची कर्जाची गरज अल्प असली तरी त्यांची सर्वांची मिळून गरज जशी प्रचंड आहे, तेंच बचतीच्या संदर्भातही सत्य आहे. सहकारी आंदोलन हें ' बचत निर्माण करणारें ' आंदोलन आहे हे विसरता येणार नाहीं.

व्यक्तिगत बचती कितीहि किरकोळ असल्या तरीहि, बरीच वर्षे त्यानीं सहकारी संस्थेला दिलेला पैसा मिळून एक प्रचंड रक्कम उभी राहूं शकेल. इतर देशात याच सहकारी प्रयत्नाचे लक्षात येण्याजोगे संस्मरणीय सुपरिणाम झाले असून, त्यामुळें सभासदांची बचत मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झाल्यानें सहकारी पतसंस्थांचें रूपान्तर बचत व बँकिंग संस्थांत झालें आहे. छोटे-छोटे शेतकरी असलेल्या इतर देशांत, सहकारी प्रयत्नांना गौरवास्पद फळें आली असतांना, कितीहि अवघड असलें, तरीं आपल्या देशांत तशा प्रयत्नाना यश येणारच नाही, असें मानण्याचे कारण अर्थातच मुळीच नाही

या लेखाच्या मर्यादेत, ग्रामीण बचत गोळा करण्याच्या व वाढविण्याच्या योजनाची चर्चा विस्तारानें मी करूं शकणार नाही वेळोवेळी अनेक सूचना करण्यात आल्या आहेत ग्रामीण जनतेंत विश्वास निर्माण होईल, अशा रीतीनें प्राथमिक सहकारी संस्थांची आर्थिक मजबुती व विश्वासार्ह संग्राहक चालकत्व, जरूर तेव्हा ठेवींच्या जामिनावर कर्जाचा त्वरित पुरवठा, ठेवीवर आकर्षक व स्पर्धेत टिकतील असे व्याजाचे दर, बचत सप्ताह पाळून प्रचार, बचत पेढ्याचे द्वारे बचत गोळा करणे, संस्थाच्या नियमात तरतूद करून, योग्य त्या सर्व वेळी ठेवीसाठी बचती देण्याचे स्वयस्फूर्त बंधन घालून घेणे, या नेहमी सुचविलेल्या काही योजना आहेत खरें म्हणजे कमतरता सूचनाची नसून, अडचण आहे ती त्यांच्या अंमलबजावणीसाठी वापरल्या जाणाऱ्या पद्धतीची व तंत्राची. या अंमलबजावणीच्या आड एक प्रकारचा मानसिक प्रतिकार (गड), एक प्रकारचा मुरलेला आळस येत आहे. याच्या जोडीला कल्पनाशक्ति व दूरदृष्टि याचा अभाव व सरकार नि रिझर्व बँक याच्यावर अवलंबून रहाण्याच्या वृत्तीमुळे निर्माण झालेली

आत्मसंतुष्टतेची वृत्ति ! ह्या सर्व गोष्टी या दिशेनें विधायक प्रचंड प्रयत्न करण्याच्या मार्गांत येत आहेत

याच विषयावरील एका मुद्याचा जातां जातां उल्लेख करतों. ग्रामीण बचतीच्या टंचाईची जीं कारणें रूरल क्रेडिट सर्वे कमिटीनें दिली आहेत, त्यांत ग्रामीण जनतेला आपल्या ठेवी स्थानिक संस्थांत ठेवण्याइतका विश्वास वाटत नाही, हें एक महत्वाचें कारण आहे. वेतनरहित चालकत्व असलेल्या पारंपारिक छोट्या ग्रामीण सहकारी संस्था ग्रामीण जनतेत कधीतरी विश्वास निर्माण करूं शकतील काय? व त्या बचत गोळा करण्याचें प्रभावी साधन बनू शकतील काय? हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचा प्राथमिक सहकारी संस्थेचा घडण, आकार व चालकत्व यांचेशीं घनिष्ठ संबंध असून, दुर्दैवानें या वादामुळें आपल्या योजनाकाळांत दोन गट पडले आहेत. मेहता कमिटीनें एक मध्यम मार्ग काढून या दोन्ही गटांची तडजोड करण्याचा प्रयत्न केला असल्यामुळें, या वादांत पडण्याचा मोह मी टाळणें शहाणपणाचेंच ठरेल.

सामाजिक व आर्थिक विकास घडवून आणून नव्या समाजव्यवस्थेचा पाया घालतील, अशा तऱ्हेच्या 'भूदान' 'ग्रामदान' 'श्रमदान' 'संपत्ति दान' इत्यादि राष्ट्रीय आंदोलनाचा आतां आपणास संवय झालेली आहे. *सहकारी नियोजक, सहकारी प्रशासक, सहकारी कार्यकर्ते एक प्रकारच्या* निकडीच्या भावनेनें, जिद्दीनें येत्या ३ वर्षांत, आरंभीच्या सेवाभावी निष्ठावान कार्यकर्त्यांच्या ठायीं असलेल्या मिशनरी वृत्तीनें, निष्ठेनें व्यवहारी दूरदृष्टीनें व धाडसी वृत्तीनें ग्रामीण सहकारी बचतीचें प्रचंड आंदोलन उभारूं शकणारच नाहीत काय ? शेतकऱ्यांचे प्रचंड समूह एकत्रित करून, बचत व कर्ज याच्यामध्यें अत्यावश्यक अशी सांगड निर्माण करणें, सहकारी पतपेढ्यांचा आर्थिक पाया मजबूत करणें, या पतपेढ्या आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी बनविणें व सध्यांचें या संस्थांचें ऋणकोंचा गट हें स्वरूप पालटून, ग्रामीण बँकिंगच्या वैभवशाली हितप्रद स्वरूपांत त्याचें रूपांतर करतां येणार नाही काय ?

ग्रामीण सहकारी संस्था नेहमी अर्थपुरवठा संस्थांकडे कर्जें मागण्याच्या एकाच दिशेच्या मार्गानें जाऊं शकणार नाहीत. हा मार्ग दुहेरी हवा. एका बाजूला स्थानिक बचती गोळा करणें व जरूर तेव्हां मध्यवर्ति बँकांकडून पूरक पैसा घेणें असा ह्याचा व्यवहार हवा. भाग-भांडवलाच्या सरकारी मदतीसह अधिक सरकारी मदत, कर्जें मागण्याची वाढलेली शक्ति, रिझर्व बँकेच्या मदतीच्या मर्यादेत वाढ, सरकारी हमी, मदत व देणग्या या गोष्टी संधिकालातील व्यवस्था व तात्पुरते उपचार म्हणून योग्य असल्या, तरी या आधारांवर सहकारी पतपेढ्या व बँकिंगच्या चळवळींची निरोगी वाढ होणार नाहीं व ती दीर्घकाल टिकणारहि नाहीं. सहकाराची वाढ कांचेच्या घरांत होत नाहीं. प्राथमिक पातळीवर स्वावलंबनाच्या स्फूर्तिदायी संघर्षांतूनच, सहकारी चळवळ आपल्या ध्येयाप्रत पोहोंचू शकेल. हा मार्ग कठीण, काहींसा मंद व कदाचित् कटु असला, तरी याच मार्गानें सहकारी संघटनेच्या सुदृढ प्रगतीची यशोमागता होऊं शकेल. "आंदोलन जसजसें वाढेल, तसतशी *ठेवींमध्यें मोठी वाढ झाली नाही, तर आपल्या प्रमुख उद्दिष्टाबाबत* सहकारी आंदोलन अपेशी ठरलें. हें कबूल करावें लागेल. " या मॅक्लॅगन कमिटीनें, अत्यंत गंभीरपणें केलेल्या विधानाचें आपण स्मरण ठेवू या. हें विधान जसा इशारा आहे, तसेंच तें सहकारी चळवळीतील कार्यकर्त्यांना एक आव्हानहि आहे. हें आव्हान स्वीकारण्यावरच सहकारी संघटनेचीं मूलभूत उद्दिष्टें यशस्वीरित्या परिपूर्ण होतात की नाहीं, हें ठरणार आहे. ★★★



"सहकारी चळवळींत, समाजाच्या प्रत्येक घटकाचा समावेश होईल हेंच भावी विशाल सहकारी जगताचें स्वप्न आहे."

—माननीय वैकुंठभाई मेहता


















# सहकारी औद्योगिक संस्था आणि त्यांचे प्रश्न?

श्री. सी. जे. राम सुब्बू

डे. चीफ ऑ. शेतकी कर्ज पुरवठा खाते रिझर्व्ह बँक.






पल्या आर्थिक विकासाची जी एकूण योजना आहे तिचा महत्त्वाचा उद्देश ग्रामीण व छोट्या उद्योगधंद्याचा विकास साधण्याचा प्रयत्न करणें हा आहे व ह्या योजनेचे प्रमुख अंग औद्योगिक सहकारी संस्थांची वाढ करणें हे होय. भांडवलाची आणि तंत्रज्ञाची चणचण भासत असल्यामुळे घरगुती व छोट्या उद्योगधंद्यावर भर देणें हें स्वाभाविकच आहे कारण त्याला भांडवल कमी लागते व परंपरागत साध्या कौशल्याचा त्यात उपयोग करण्यात येत असतो शिवाय देशाच्या वाढत्या लोकसंख्येमुळे विशेषत: ग्रामीण भागात निर्माण झालेली बेकारीची समस्या सुटण्यासही मदत होते. कर्वे समितीनें सुचविल्याप्रमाणे प्रगत ग्रामीण अर्थरचनेच्या पायावर उभारलेला औद्योगिक मनोरा अशा रीतीनें उभा केला पाहिजे की, जेणेंकरून खेड्याच्या प्रत्येक समुहाला, स्थानिक परिस्थितीस अनुरूप औद्योगिक व शहरी केंद्र निर्माण करण्यांत येऊन तें मोठ्या केंद्राला जोडलेलें असावें उत्पादन वाढीसाठी, उत्पादनाचा खर्च कमी करण्यासाठी, मालाच्या विक्रीची व्यवस्था व वाढ करण्यासाठी व अशा औद्योगिक केंद्रातील लोकांची मिळकत वाढविण्यासाठी तांत्रिक, आर्थिक आणि इतर मदत देऊन उद्योगधंद्याचा मजबूत व कार्यक्षम विकेंद्रित विभाग निर्माण करण्याच्या कामी सहकारी औद्योगिक संस्था ( इंडस्ट्रियल को–ऑपरेटिव्ज् ) महत्त्वाची कामगिरी बजावू शकतील

घरगुती व छोट्या उद्योगधंद्याच्या विकासासाठी पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनेप्रमाणे तिसऱ्या योजनेतही व्यापक कार्यक्रमाचा समावेश करण्यात आला आहे. कच्च्या मालाचा पुरवठा, उत्पादन तंत्र, मोठ्या धंद्याकडून त्याच क्षेत्रात होणारी स्पर्धा वगैरेबाबतच्या अडचणीतून मार्ग काढण्यास मदत करण्याच्या दृष्टीने या योजना आखण्यात आल्या आहेत अ भा हातमाग मंडळ खादी, ग्रामोद्योग मंडळ, अ. भा. हस्तव्यवसाय मंडळ यासारख्या संस्थामार्फत या दृष्टीने प्रयत्न करण्यात येत आहेत. या दृष्टीने ज्या उपाययोजना करण्यात आल्या आहेत त्यापैकी काही पुढीलप्रमाणें आहेत. वाजवी अटींवर कच्च्या मालाच्या त्वरित व भरपूर पुरवठ्याची व्यवस्था, शिक्षण व मार्गदर्शन केंद्रांची स्थापना आणि सुधारलेल्या अवजारांचें वाटप, विक्रीसाठी दुकानें व एम्पोरियम उघडणें, सरकारी खरेदीत ग्रामीण उद्योगधंद्यातील मालाला प्राधान्य देणे, उत्पादन क्षेत्रें राखून ठेवणें, मोठ्या

धंद्यांतील उत्पादनमालावर अल्पप्रमाणात तरी जकात कर बसविणें व छोट्या आणि ग्रामीण उद्योगधंद्यांतील उत्पादन मालाला उत्पादनासाठी मदत व विक्रीच्या किंमतीत सूट देणे वगैरे. अशा प्रकारे औद्योगिक क्षेत्रांतील सहकाराची गरज भागविता येईल.

या औद्योगिक समूहाचा हळूहळू विकास करून त्याना कार्यक्षम बनविणें हें उद्दिष्ट आहे. कारण त्यामुळें सर्वसाधारणपणें अर्थव्यवस्था मजबूत होण्यास मदत होईल व सरकारच्या या उद्योगधंद्याना मदत देण्याचा जो बहुविध कार्यक्रम आहे त्याचा संपूर्ण फायदा त्यांना घेता येईल. या उद्योगधंद्यानी उद्दिष्ट गाठण्यासाठी पुढें सरसावलें पाहिजे. त्याच्या गरजा भागविण्यासाठी औद्योगिक सहकारी संस्थाखेरीज दुसरा उत्तम मार्ग नाही. भारताच्या घटनेमध्येसुद्धा ग्रामीण व छोट्या उद्योगधंद्याची वाढ शक्यतो सहकारी तत्त्वावर करण्याच्या आवश्यकतेलाच मान्यता देण्यात आली आहे. आर्थिक स्वायत्ततेचें तत्त्व हा सहकाराचा गाभा आहे. आणि हें औद्योगिक सहकाराचे क्षेत्राचे बाबतीत तर विशेषेकरून सत्य आहे. विकेंद्रित विभागांच्या निर्मितीचा जो आपला कार्यक्रम आहे त्यात स्वतः मजुरी करण्याचे तत्त्व अभिप्रेत आहे त्याला हें सर्व पोषक आहे. सहकारी संस्थाची मध्यवर्ती संघटना एका बाजूनें मोठ्या उद्योगधंद्याशी टक्कर देण्यासाठी आवश्यक मदत देते व दुसऱ्या बाजूनें सरकारकडून कर्ज पुरवठा, विक्री वगैरेसाठी जी मदत मिळते. तिचे वाटप योग्य मार्गानें करण्याचें काम करते. अशा तऱ्हेने औद्योगिक सहकारी संस्थांच्या संघटनेला अलिकडच्या काळांत खूपच उत्तेजन मिळाले आहे. त्याची संख्या, सदस्यसंख्या व व्यवहार यांत बरीच वाढ झाली आहे. जून १९५१ ते जून १९६० या काळात त्याची संख्या ७१०५ वरून २८९८२ पर्यंत वाढली आहे. २८९८२ पैकीं ११०८६ विणकरांच्या प्राथमिक संस्था होत्या व १७८९६ इतर औद्योगिक सहकारी संस्था होत्या. १९५९-६० साली ५० कोटींची विक्री झाली. पैकी विणकर सहकारी संस्थाची विक्री ३६ कोटीची झाली तर इतर संस्थांनी १४ कोटींचा माल विकला. राज्याराज्यांत व धंद्याधंद्यात यशाच्या प्रमाणात जरी मोठी तफावत आढळली. तरी हातमाग वगैरेसारख्या निवडक धंद्यात एकूण जे व्यवहार चालतात त्यात सहकारी चळवळीचा मोठा भाग असतो हें निःसंशय ! सहकारी क्षेत्रांत ३०-९-१९५३ रोजीं ६ लक्ष ८२ हजार लूम्स होते तें ३०-६-१९६० रोजी १२ लक्ष २ हजार झाले. एक किंवा जास्त उद्योगधंदे समाविष्ट करणाऱ्या वरच्या पातळीवर किंवा जिल्हा पातळीवर फेडरल संघटना अनेक राज्यांत स्थापन करण्यात आल्या. कच्च्या मालाचा पुरवठा व प्रक्रिया यासाठी संघटना, खेळत्या भांडवलासाठी संघटना आणि मोठ्या प्रमाणावरील बाजारपेठांच्या यंत्रणेचा विकास वगैरे कार्यांत खूपच प्रगति करण्यात आली आहे. या कार्यांत बराच पल्ला गाठण्यात आला आहे व येत्या काही वर्षांत बरेच कार्य होईल अशी अपेक्षा आहे.

औद्योगिक सहकारी क्षेत्रात अपेक्षेप्रमाणें प्रगति व्हावयास पाहिजे असेल तर केलेल्या कार्याचा आढावा घेऊन चालू प्रश्नावर विचार करावा लागेल आणि ध्येय गांठण्यासाठी दुप्पट प्रयत्न करावे लागतील.

औद्योगिक सहकारी संस्थापुढें कोणत्या महत्त्वाच्या समस्या आहेत याचा विचार करण्यापूर्वी औद्योगिक सहकारी संस्थाची वर्गवारी करणे योग्य ठरेल. पहिला व महत्त्वाचा वर्ग म्हणजे उत्पादक सोसायट्या. येथें कामगार एकत्र येऊन एकच प्रकारचें उत्पादन सांघिकरीत्या करतात व त्यासाठी स्थापलेली सोसायटी त्यांना वेतन देते. त्यानंतर सेवासंस्था. सेवासंस्था कारागिराना वैयक्तिक उत्पादनासाठी कच्चा माल मिळविण्यास मदत करतात. त्याचप्रमाणें त्यानी तयार केलेल्या मालाला बाजारपेठ मिळवून देण्यास सहाय्य करतात. यानंतरचा वर्ग आहे छोटे उद्योगधंदेवाले यांचा. व ते स्वतःच कारागीर असतात व आपल्या कुटुंबियाखेरीज आवश्यकतेनुसार आणखी थोडेसे कामगार कामावर ठेवतात. असे छोटे उद्योगधंदेवाले एकत्र येऊन सहकारी संस्था स्थापतात. दुर्मिळ कच्चा माल मिळविणे व तयार मालाला बाजारपेठ मिळविणे ही सेवा या संस्थाना करावी लागते. आणखी दोन क्षेत्रात सहकारी तत्त्वावर औद्योगिक कार्याचें संगठण झालेलें आहे. अर्थात या संस्था जे कार्य करतात ते पाहता त्याना औद्योगिक सहकारी संस्था म्हणतां येणार नाही. यापैकी पहिली ऊसासंबंधी असून आपल्या देशात त्याचे महत्त्व दिवसेंदिवस वाढत आहे. शेतीमालाच्या प्रक्रिया करणाऱ्या या संस्था असून शेतकरी त्याचे सदस्य असतात. त्याना को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग किंवा प्रोसेसिंग सोसायट्या म्हणतात. साखर उत्पादन, कापसाचे जिनिंग व प्रेसिंग व भुईमुगाची सालें काढणे वगैरे कामासाठी या सोसायट्या असतात. दुसरा वर्ग कन्झुमर्स को-ऑपरेटिव्हच्या फेडरेशनतर्फें अस्तित्वात आलेल्या प्रक्रिया करणाऱ्या सोसायट्याचा असून अशा प्रकारच्या संस्थाची संख्या अगदी अल्प आहे

कोणत्याही औद्योगिक संस्थेप्रमाणें औद्योगिक सहकारी संस्थाचे यश बाजारपेठेच्या कार्यक्षम व्यवस्थेवर अवलंबून आहे याबाबतच्या विकेंद्रित विभागाच्या अडचणी फार तीव्र आहेत घरगुती व छोटे उद्योगधंदे, भांडवल व संघटना याबाबत कमकुवत असल्यामुळे मोठ्या उद्योगधंद्याप्रमाणे गिऱ्हाइकापर्यंत पोहोंचू शकत नाही मोठ्या उद्योगधंद्यांजवळ भरपूर भांडवल असतें, जाहिरात व प्रसिद्धीची साधनें असतात, विक्रीची यंत्रणा असते, शिवाय कंपनी प्रसिद्ध असेल तर तिच्या नांवाचाही फायदा मिळतो. म्हणून कोणतीहि औद्योगिक सहकारी सोसायटी सुरु करण्यापूर्वी बाजारपेठेंत मालाला किती उठाव मिळेल याचा नीट अभ्यास केला पाहिजे याशिवाय हा प्रश्न सरकारी मदतीनें कसा सोडविता येईल याचाही विचार केला पाहिजे मोठ्या उद्योगधंद्यात उत्पादन झालेल्या मालाची किंमत व सोसायटीनें उत्पादन केलेल्या मालाची किंमत याची प्रमाणत तुलना करून सरकारकडून विक्री किंवा उत्पादन सूट म्हणून किती मदत मिळते, मोठ्या उद्योगधंद्यानें उत्पादन केलेल्या मालावर कर किती असतो यावर सोसायटीचा माल स्पर्धेत कितपत टिकेल हें अवलंबून आहे. त्याशिवाय बाजारपेठेंत मालाला किती उठाव मिळतो हाही एक भाग आहे कारण ज्या भागात मालाचें उत्पादन होतें त्याच भागात तो खपला तर वाहतुकीचा खर्च पडत नाही व त्यामुळें किंमत कमी होते. ग्रामीण उत्पादकाच्या विविध








# सहकारी कर्ज-व्यवस्था
# काहीं प्रचलित प्रवाह

*श्री. के. माधव दास*
डे. चीफ ऑ. शेतकी कर्ज पुरवठा खाते रिझर्व्ह-बँक






ल इंडिया रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनें १९५४ साली भारतांतील सहकारी चळवळीबाबत आपल्या अहवालात म्हटलें आहे की, "सहकारी चळवळीचा इतिहास लिहावयास घेतला तर त्यांत भरपूर विसंगती आढळून येईल. "

१९५४–५५ सालानंतर ज्या घटना झाल्या त्याला उद्देशूनही हा शेरा मारणे बहुधा अयोग्य ठरणार नाही. १९५४ ते ५६ या काळात विविध राज्यांत सहकारी चळवळीच्या पुनर्घटनेचा पाया म्हणून, ऑल इंडिया रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीची ग्रामीण कर्जाची एकत्रित योजना सर्वसाधारणपणें सर्वत्र स्वीकारण्यांत आली. राज्य व प्रादेशिक परिषदात आणि परिसंवादांत सविस्तर चर्चा झाल्यानंतरच ही योजना स्वीकारण्यात आली. तदनंतर एकत्रित योजनेच्या महत्त्वाच्या बाबींबाबत–विशेषकरून राज्यांत स्थापावयास सुरवात केलेल्या मोठ्या आकाराच्या पतपेढ्यांच्या कायदेशीरपणाबाबत काहीं ठिकाणीं शंका व्यक्त करण्यास सुरवात झाली. तसेंच प्राथमिक पातळीवर पतपेढ्यांच्या आकार व व्याप्तीबाबत आणि सरकारनें भागभांडवलांत काहीं पैसा गुंतवावा किंवा काय वगैरेबाबत कोणताच निर्णय झालेला नव्हता सहकारी पतपेढ्यांच्या पतमर्यादेबाबतच्या दर्जाची योग्यायोग्यता, उत्पादन कार्यक्रमानुसार शेतकऱ्यांना पैसा देणें आणि सहकारी कर्जाचा फायदा पत नसलेल्या शेतकऱ्यांना देणें वगैरेबाबतही चर्चा झाली.

या घटनांमुळें ग्रामीण पतपेढ्यांबाबतच्या सुसूत्र योजनेच्या अंमलबजावणी बाबत काही प्रमाणात गोंधळ निर्माण झाला. विशेषतः प्रत्यक्ष कार्याच्या वेळी त्याची जाणीव तीव्रतेनें झाली. त्यामुळें या वादाला आळा घालण्यासाठी कांहीं तरी सर्वमान्य उपाययोजना करणें आवश्यक झालें. १९५९ च्या जुलैमध्यें भारत सरकारनें म्हैसूर येथें राज्य सहकारी संस्थांची परिषद भरविली. त्यात या विषयावर चर्चा होऊन या प्रश्नाचा सविस्तर अभ्यास करण्यासाठीं श्री. वैकुंठभाई मेहता यांच्या अध्यक्षतेखालीं एक समिती नेमण्यात आली. या समितीनें मे १९६० साली आपला अहवाल सादर केला. सहकारी चळवळीच्या ध्येयसिद्धीच्या दृष्टीनें हा अहवाल मौलिक ठरला इतकेंच नव्हे तर आता तो सर्वमान्यही झाला आहे. या अहवालांत वादग्रस्त प्रश्नावर सयुक्तिक तोडगे सुचविण्यात आले असून ते सोडविण्याचा दृष्टिकोन कसा असावा

ह्या बाबतीतील सूचक धोरणाचाहि समावेश करण्यांत आला आहे. विविध राज्याच्या तिसऱ्या पंचवार्षिक योजनेखालील सहकार क्षेत्राच्या विकास कार्यक्रमाच्या यशाची ही शुभसूचक नांदीच होय! ह्यामुळें सहकारी पतपेढ्यांच्या वाढीबाबत अधिकाधिक अपेक्षा निर्माण झाली. त्याबाबतचीं लक्ष्यें पुढीलप्रमाणें होतीं.

| | | १९६५–६६ |
|---|---|---|
| १) | ग्रामीण प्राथमिक सोसायटी ( सेवा सहकारी संस्था ) | २ लक्ष ५० हजार |
| २) | सदस्यसंख्या | ४ कोटि |
| ३) | (अ) याखाली येणारी ग्रामीण लोकसंख्या | ५५ टक्के |
| | (ब) याखाली येणारी शेतकरी संख्या | ७४ टक्के |
| ४) | सहकारी संस्थेतर्फे द्यावयाचे कर्ज | |
| | (अ) छोट्या काळासाठी | रु. ४०० कोटि |
| | (ब) मध्यम कालमर्यादेचे | रु. ८० कोटि |
| | (क) दीर्घ कालमुदतीचे (मागील-बाकी) | रु. ११५ कोटि |
| ५) | सदस्यसंख्येचे प्रमाण | रु. १६० |
| ६) | प्रत्येक सदस्याला दिलेल्या कर्जाचे प्रमाण ( छोट्या व मध्यम मुदतीचे) | रु. १२० |
| ७) | प्रत्येक सोसायटीच्या शेअर भांडवलाचें प्रमाण | रु.४,८०० |
| ८) | प्रत्येक सोसायटीचा राखीव व इतर निधि . . | रु. १,६०० |
| ९) | प्रत्येक प्राथमिक ग्रामीण सोसायटीनें स्वीकारावयाच्या ठेवी | रु. ३० कोटि |

या योजना आखतांना वैकुंठलाल मेहता समितीच्या शिफारसी संपूर्ण विचारांत घेण्यात आल्या आणि त्यांचा उल्लेख सहकारी चळवळीच्या विकासाचे महत्त्वाचे टप्पे सांगताना संक्षेपाने का होईना ह्या लेखात करण्याचा विचार आहे.

प्राथमिक अवस्थेत संस्थेचा कोणता प्रकार असावा हा पहिला प्रश्न असून वैकुंठलाल समितीनें यावर व्यवहार्य तोडगा सुचविला आहे त्यामुळें याबाबतचा वाद मिटला असून या प्रश्नावरील गोंधळ संपला आहे. समितीनें म्हटलें आहे की, १९५८ साली राष्ट्रीय विकास समितीनें ठरविल्याप्रमाणें, सर्वसाधारण नियम म्हणून खेडें हा प्राथमिक गट धरून सहकारी संघटनेची उभारणी करावी अर्थात जेथें खेडे अगदीच लहान असेल तेथें एका संस्थेच्या कक्षेत खेड्याचा एक समूह आणावा. एका संस्थेच्या कक्षेत जास्तीत जास्त ३००० लोकसंख्येचा प्रदेश असावा ( म्हणजे ६०० कुटुंबें किंवा शेती करणारी ५०० कुटुंबे ) आणि तीन ते चार मैलांच्या परिघापेक्षा जास्त मोठा भाग असू नये.

प्राथमिक शेती पतपेढ्यांच्या शेअर भांडवलात सरकारनें पैसे गुंतविण्याबाबत वैकुंठभाई मेहता समितीनें म्हटलें आहे की, 'सरकारनें शेअर भांडवलांत पैसा गुंतवावा पण तो सदस्यांनी गुंतविलेल्या रकमेपेक्षां जास्त असू नये. सर्वसाधारण सोसायट्यामध्यें अशी रक्कम रु. ५००० पेक्षा जास्त असू नये व खास बाबतीत ती रक्कम रु. १०,००० पेक्षां जास्त असू नये.' समितीची दुसरी महत्त्वाची शिफारस म्हणजे सरकारनें प्राथमिक सोसायट्यांना बुडीत खात्याच्या राखीव निधीसाठी अनुदान द्यावें. मध्यवर्ति बँकेलाहि या कारणास्तव अनुदान द्यावें. आधीच्या वर्षी दिलेल्या कर्जापेक्षा या वर्षी जेवढें जास्त कर्ज दिलें असेल त्याच्या ३ टक्के प्राथमिक सोसायटीला व १ टक्का मध्यवर्ति बँकेला असें ह्या अनुदानाचे प्रमाण असावें.

छोट्या प्राथमिक पतपेढ्यांच्या शेअर भांडवलात पैसे गुंतविण्यासाठी राज्य सरकारनें बँकेच्या लाँगटर्म ऑपरेशन्स फंडातून किती उसनवारी करावी याबाबतचे सविस्तर नियम देणारे एक परिपत्रक रिझर्व बँकेनें काढलें आहे याचाहि येथें उल्लेख केला पाहिजे.

विविध राज्यांत प्राथमिक पतपेढ्यांना नवा जोम आणण्यासाठीं ज्या योजना हाती घेण्यात आल्या आहेत त्यांचा एक भाग म्हणजे वरील उपाययोजना होत. ही कामगिरी महत्त्वाची व तातडीची आहे.

सहकारी पतपेढ्यांच्या रचनेच्या श्रेणीबाबत नोंद घेण्यासारखी महत्त्वाची घटना अलिकडच्या काळांत घडलेली नाहीं. मध्यवर्ती सहकारी बँका,राज्य सहकारी बँका व भूतारण बँका याबाबत नवें सांगण्यासारखें कांहीं नाही. ग्रामीण पतपेढीबाबतची पुनर्रचना सूत्र योजनेनुसार चालूच आहे. म्हणजे भाग भांडवलात सरकारचा हिस्सा, तपासणी आणि शासन यंत्रणेची मजबुती व समकुवत बँकाचें विलीनीकरण हें कार्य आवश्यकतेनुरूप होत आहे.

प्रत्येक जिल्ह्यासाठी एक स्थैर्य असलेली सुदृढ मध्यवर्ति बँक या सर्वसाधारण तत्त्वावर मध्यवर्ती बँकांचे विलीनीकरण चालू आहे. हा कार्यक्रम पुरा झालेला नाही. विशेषत: बिहार, आसाम व पश्चिम बंगाल राज्यात हा कार्यक्रम अद्याप पूर्ण व्हावयाचा आहे.

मध्यवर्ति बँका व राज्य सहकारी बँकांना जादा कर्ज देण्याच्या तरतुदीबाबत वैकुंठभाई मेहता समितीनें काही शिथिलता सुचविली आहे. बँकांनी आपलें उत्पन्न वाढविण्याच्या प्रयत्नाशी सुसंगत विशेषत: ठेवी व सदस्याकडून भागभांडवल याला अनुलक्षून धोरणाची उदारता असावी असा संकेत आहे वैकुंठभाई मेहता समितीच्या शिफारसी रिझर्व बँकेनें स्वीकारल्या असून सविस्तर नव्या कार्यपद्धतीची रूपरेषाहि जाहीर झाली आहे

भू–सुधार बँकेबाबत कार्यपद्धतीत नुकताच काही बदल करण्यात आला आहे व नव्या पद्धती सुरू करण्यात आल्या आहेत ग्रामीण कर्जरोख्याची एक योजना असून त्यासाठी रिझर्व बँकेकडून पुरेशी मदत उपलब्ध आहे. काही निश्चित बाबतीत व मर्यादित प्रकरणी मध्यवर्ति भूतारण बँकेला कर्जरोख्याची कालमर्यादा व कर्जाची मर्यादा यातील काटेकोर संबंध टाळण्याची परवानगी देणें, मध्यवर्ति भूतारण बँकेमार्फत

दीर्घ मुदतीची कर्जें देण्याची खास योजना तयार करणे वगैरे नवी कार्य-पद्धती आहे. ही योजना आंध्र व केरळमध्ये कार्यवाही होणार असून रिझर्व बँकेनें मदत देण्याचें कबूल केलें आहे. शेवटी निर्दिष्ट केलेल्या बाबतीत विविध राज्यांत आणखी अशा योजना सुरू करण्यास वाव आहे असा मुद्दा विचारार्थ येणे शक्य आहे.

परंतु त्यासाठी त्याची काळजीपूर्वक आखणी केली पाहिजे व या योजनेच्या अर्थव्यवस्थेचा सविस्तर अभ्यास केला पाहिजे. अर्थात् अशा योजनेला मोठ्या प्रमाणात मदत देणें रिझर्व बँकेच्या ' लाँग टर्म ऑपरेशन्स फंडाच्या ' मर्यादित निधीच्या आवाक्याबाहेरचें आहे. 'ॲग्रिकल्चरल डेव्हलपमेंट फायनान्स कॉर्पोरेशन' स्थापन करण्याच्या योजनेवर विचार चालू आहे. या कॉर्पोरेशनचा रिझर्व बँकेशी संबंध राहील व ती भूतारण बँकांना मदत करूं शकेल. लँड मॉर्गेज बँका त्यामुळें स्टेट को-ऑपरेटिव बँकाना मध्यम मुदतीची कर्जें देण्याखेरीज उत्पादनासाठी कर्ज देण्याच्या योजनेला आर्थिक साह्य देऊ शकेल.

सर्व दृष्टीनें सांगोपांग विचाराती साररूपानें असें निश्चित म्हणतां येईल की, सहकारी संस्थानी दिलेल्या कर्जाच्या रकमेंत भरपूर वाढ झाली आहे. उदा० ग्रामीण पतपेढ्यानी १९५५–५६ साली ५० कोटिचें कर्ज दिलें होतें. १९५९–६० साली ही रक्कम १६९ कोटिपर्यंत वाढली. परंतु या वाढीबरोबर सहकारी संस्थेच्या किंवा बँकेच्या उत्पन्नात किंवा शासनव्यवस्थेच्या कार्यक्षमतेत तुलनात्मक प्रमाणांत वाढ झालेली नाही. उपरिनिर्दिष्ट कर्जाऊ दिलेल्या रकमेचा मोठा हिस्सा रिझर्व्ह बँकेकडून आला. राज्यसहकारी बँकानी रिझर्व बँकेकडून १९५९–६० पर्यंत ७८ कोटींची उसनवारी केली. हंगामी शेतीकामासाठी व धान्याच्या बाजारपेठासाठी ही रक्कम वापरण्यात आली आहे. अनेक राज्यात अनेक सहकारी संस्थांचे हिशेब तपासण्याचें काम बाकी राहिलें आहे आणि अगदी निवडक राज्यातच सहकारी पतपेढ्याच्या तपासणीचें काम सेंट्रल बँकामार्फत समर्पक योजनेद्वारा होतें. मुळांत योजनेचा मुख्य भाग म्हणजे कर्ज आणि बाजारपेठ यांची सांगड घालणें. ह्या गोष्टीला अनेक राज्यांत अद्याप सुरवात झालेली नाही. सबंध सहकारी चळवळीतील हा मोठा धोका आहे. हिशेब तपासणें व देखरेखीसाठी खास शिक्षण दिलेला नोकर वर्ग आवश्यक आहे. ही व्यवस्था कार्यक्षम हवी. बाजारपेठ व कर्ज याची कार्यक्षम व हितकर सांगड घातली पाहिजे. या तीन गोष्टी केल्यास योग्य रीतीनें सहकारी चळवळीच्या यशस्वितेची "उद्दिष्टें" गाठता येतील.

अनेक राज्यांत विशेषतः पूर्व भागातील राज्यातील सहकारी चळवळ अद्यापहि प्रामुख्याने सरकारी मार्गदर्शन व नियंत्रणनुसार चालते. सरकारी नियंत्रणाची तिच्यावरील पकड आजहि पक्की आहे. कांही अपवाद सोडल्यास राज्य सहकारी युनियन कमजोर आहेत आणि त्याची बिनसरकारी लोकानुवर्ती परिणामकारक संघटना नाही हा आणखी एक धोका आहे. कारण ही वृत्ति अशीच चालू राहिल्यास स्वावलंबी सहकारी चळवळीचे आपलें स्वप्न साकार होणार नाही. सरकारी मदत व प्रवर्तन यावर जास्त प्रमाणांत अवलंबून न राहता सहकारी चळवळीचें स्वतःचें भांडवल व त्याचा वापर ह्यावर अधिक भर देण्याकडे प्रामुख्यानें शक्ती केंद्रित केल्या पाहिजेत. ★★★



"सहकारी चळवळ केवळ कर्ज देण्याकरिताच नाही, तर तिचा उद्देश खेड्यांतील जनतेचा सर्वांगीण विकास करणें हा आहे."

※ ※ ※

"लोकशाही देशांत सहकारी चळवळीचें उत्पादन वाढविण्याच्या दृष्टीने व जनतेची प्रगति घडवून आणण्याचे हेतुनें फार मोठें महत्त्व आहे."

सहकारमंत्री श्री बाळासाहेब भारदे









# शेती सुधार सहकार व सरकार

**श्री. बाळासाहेब देसाई**

**शेतकी मंत्री महाराष्ट्र**

लीकडच्या काळात जग फार झपाट्यानें बदलत आहे. नवीन नवीन शास्त्रीय शोध उपलब्ध झाल्या-कारणानें हा बदल फार झपाट्यानें होऊं लागला आहे. या अणुशक्तीच्या युगात मानव-प्राणी चंद्रावर जाऊं शकेल अशी चिन्हें दिसूं लागली आहेत. शेतीच्या क्षेत्रांतहि नवीन नवीन उपयुक्त शोध लागत आहेत. परंतु इतर प्रगतिशील देशांशी तुलना करता आपली भारतीय शेती व शेतकरी समाज बराच मागे आहे असे दिसून येतें. आजहि दूरदूरच्या खेड्यांतील शेत-करी वर्ग आपली शेती जुन्या रूढ पद्धतीनें वाडवडिलांच्या प्रमाणेंच करीत आहे. यापुढें मागें राहून चालणार नाही. आपणहि प्रगतिपथावर पावलें टाकली पाहिजेत आणि दारिद्र्य व अज्ञान या दोन उणीवा दूर करून शेतीकडे पाहण्याचा शेतकऱ्याचा दृष्टीकोण बदलला पाहिजे. पूर्वीच्या काळी आपल्या गरजा मर्यादित होत्या व खेड्यातील बहुतेक गरजा खेड्यात भागत होत्या परंतु काळ बदलत आहे आणि आपल्या वाढत्या गरजा भागविण्यासाठी एकमेकावर अवलंबून राहणें व त्याच-प्रमाणें एकमेकाशीं सहकार्य करणे आवश्यक झालें आहे शेतीकडे धंदा ह्या दृष्टीकोणातून बघण्याची जरूरी भासू लागली आहे आपल्या सुजलां सुफलां म्हणून समजल्या जाणाऱ्या देशाला वाढत्या लोकसंख्येच्या मानानें अन्नपुरवठा करण्याची व शेतकरी समाजाला पोटापुरतेंच पिकवावयाचें नसून, सुधारलेल्या पद्धतीनें जास्त उत्पादन करणेंची जबाबदारी आज शेतकऱ्यावर येवून पडली आहे आणि त्याला तोंड देण्यासाठी त्याच्याजवळ सुधारलेली पद्धत हेंच अस्त्र आहे व सहकार हाच मार्ग आहे.

### शेती सुधारण्यास सहकारी संघटनेची आवश्यकता

शेती हा धंदा बऱ्याचशा प्रमाणात निसर्गावर अवलंबून आहे एखाद्या गिरणी मालकास योग्य तो बदल करून मागणीप्रमाणें उत्पादन वाढ-विणे हें सहज शक्य असतें तेच शेतीउत्पादन वाढविणें सोपें नसते हें हळूंहळू होतें शेतीच्या धंद्यात तांत्रिक बाजू जेवढी महत्त्वाची आहे तेवढीच आर्थिक बाजूहि महत्त्वाची आहे पीक कोणतें घ्यावें, पूर्व मशागत कशी सुधारावी, खत कोणते व किती प्रमाणात द्यावें. सुधार-लेले बी-बियाणें व पेरणी कशा पद्धतीनें करावी, कीड व रोगांपासून बचाव कोणत्या प्रकारे करावा व कोणती नवीन अवजारें वापरावीत.



या गोष्टीचें तांत्रिक ज्ञान असणें जसें आवश्यक आहे तसेंच शेती किफायतशीर पद्धतीनें करण्यासाठी आवश्यक भांडवलाची, साधनांची सोय कशी उपलब्ध होईल याचीहि माहिती असणें अत्यंत आवश्यक आहे. ह्या सर्व गोष्टींबरोबरच अनुभवाची जोड मिळाल्यास शेतीतून अधिक उत्पादन काढण्यास वेळ लागणार नाहीं. शेतकऱ्यांमध्ये शेती हा धंदा म्हणून जो शेती करतो त्यासच योग्य तो मोबदला मिळतो हें सर्वश्रुतच आहे. शेतीच्या आर्थिक बाजूकडे लक्ष देऊन बाजाराच्या तेजीमंदीवर आपला माल कशाप्रकारें विकावा व फायदा कसा काढावा या गोष्टीचा सारासार विचार केल्याशिवाय शेती किफायतशीर होणार नाहीं. आपल्याकडे बरेच प्रगतीशील शेतकरी आहेत व त्यांची उत्पादन करण्याची शक्तिहि इतर देशांतील शेतकऱ्यांएवढीच आहे. परंतु तांत्रिक माहितीच्या व अनुभवाच्या जोडीला सहकारी संघटनेचे महत्त्व त्यांना तितकेसें पटलेलें दिसून येत नाही. शेतीसुधारणेचें काम सुकर करण्याच्या दृष्टीनें आपण एकमेकां सहाय्य करूं हाच एक सुपंथ आहे. शेतीच्या बाबतीत सहकाराची जेवढी गरज आहे तेवढी कदाचित इतर कोणत्याहि धंद्याच्या बाबतीत नसेल व म्हणूनच शेतीला सहकाराची जोड देण्याच्या बाबतीत आपण या राज्यात कसोसीनें प्रयत्न करीत आहोंत.

## शेतकऱ्यांची पहिली गरज भांडवल

जमीन तयार करण्यापासून तों माल तयार करून बाजारांत नेईपर्यंत शेतकऱ्यास नेहमीच पैशाची गरज असते. सावकारी नियंत्रण कायद्यामुळें बऱ्याच सावकारांनी या व्यवसायांतून माघार घेतलेली आहे व शेतकऱ्याला ही गरज शासनाकडून किंवा सहकार पद्धतीच्या पतपेढीच्या सहाय्यानेंच भरून काढावयाची आहे.

जमीनसुधारणेच्या बाबतीत बांधबंदिस्ती करणें, वरकस जमिनीत भातखाचरें करणें, ट्रॅक्टरनें खोल नांगरट करणें इत्यादि कामें शासनाकडून केली जातात. बांधबंदिस्तीमुळें एकरी उत्पादनांत वीस पचवीस टक्के वाढ होत असल्यामुळें व तसेंच बांध घातलेल्या भागातील विहीरींतील पाणी वाढत असल्यामुळें या कार्यक्रमाला महाराष्ट्र राज्याच्या शेतकी खात्यातर्फे विशेष भर देण्यांत आला आहे. बांधबंधिस्तीसाठी एकरी सर्वसाधारणपणें पन्नास रुपये खर्च येतो. पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत जवळ जवळ बावीस लक्ष एकरातून अशी बांधबंधिस्ती करण्यात आली. सरकारनें खर्च केलेली ही रक्कम पंधरा हप्त्यानें फेडावयाची आहे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत या कार्यक्रमासाठीं पसतीस लक्ष एकर जमिनीवर बांधबंधिस्ती करण्याचें योजिलें आहे. बांधबंधिस्तीच्या कामास खरी चालना नगर जिल्ह्यांतील कर्जत व पारनेर तालुक्यातील बहुसंख्य शेतकऱ्यांनी एकत्रित येऊन उत्साहानें कार्य हाती घेतल्यामुळें मिळाली, शेतकरी संघ स्थापन झाल्यामुळें सारी गावें एकजीवानें कामें करावयाला लागली आणि १९५८ मध्यें एका वर्षाच्या अवधीत दोन तालुक्यांतील शेतकऱ्यांनी दीड लक्ष एकर जमिनीवर ताली घालून पूर्वी कधीहि न मिळालेलें यश संपादन केलें. अशा तऱ्हेनें पक्षातीत व व्यावसायिक संघटना दिवसेंदिवस शेतीच्या प्रगतीकडे लक्ष देत आहेत ही एक भाग्याची गोष्ट आहे.

याशिवाय दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत वरकस जमिनीत शासनाकडून अंदाजे पांच हजार एकरावर भात खाचरें करणेंत आली. भात खाचरें तयार करण्यास एकरी पांचशें रुपये खर्च येतो. त्यामध्यें सरकारकडून निम्मी रक्कम सूट म्हणून दिली जाते. राहिलेली रक्कम पंधरा हप्त्यानें फेडावयाची असते. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत वीस हजार एकरावर अशा प्रकारची भातखाचरें तयार करण्याचें शेतकी खात्याचें उद्दिष्ट आहे.

आपल्या राज्यात लागवडीखालील चारशे बेचाळीस लक्ष एकरांपैकी फक्त सदतीस लक्ष एकरापुरती पाण्याची सोय आहे. यापैकी निम्मे क्षेत्र विहीरींच्या पाण्यावर अवलंबून आहे. दुसऱ्या योजनेअखेर जवळजवळ पन्नास हजार नवीन विहीरी खोदण्यात आल्या व तसेंच बारा हजार विहीरींची दुरुस्ती करण्यात आली. नवीन विहिरींच्या खोदण्यास दोन हजार पांचशें रुपये कर्ज म्हणून दिले जातात. यामध्यें पाचशे रुपयें सूट देण्यात येते. या सर्व विहीरी खोदण्यासाठी कर्ज देण्याचें काम बहुतांशी जिल्ह्यांतील भू-तारण बँकांच्या मार्फतच करण्यात आलें. या भू-तारण बँका आजमितीला शेतकऱ्यांची एकूण पाच कोटी ऐंक्याण्णव लक्ष रुपयांची गरज भागवीत आहेत. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत चौसष्ट हजार चारशे नवीन विहीरी खोदण्याचे व ३२,००० विहीरींची दुरुस्ती करण्याचे उद्दिष्ट आहे. ही कामगिरी भू-तारण बँकाकडून केली जाईल. शासनाकडून या योजनेंत सूट म्हणून वीस टक्के रक्कम व व्याजातील फरक मदत रुपानें देण्यात येईल.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत विहीरी खोदण्याबरोबरच विहीरी बोअर करून देण्यासाठी एक हजार पाचशें विहीरींचें काम शेतकऱ्याचे खर्चानें करण्यात येईल. तसेंच सुरुंग लावून १०,००० विहीरी खोल करण्याची योजना चालू आहे. नुसत्या विहीरी खोल करून भागत नाहीं तर विहीरींतील पाणी काढून शेतीला पाणी देण्यासाठी या विहीरींवर ३१,००० पंप व विजेच्या मोटारी बसविण्यासाठीहि कर्जाची व मोबन सबसिडीची वगैरे सोय केली आहे. विहीरी खोदण्यासाठी, इंजिन आणि पंप बविण्यासाठी सबसिडी व व्याजातील फरक यासाठी शासनानें ४,१७,००,००० रुपयांची तरतूद केली आहे. विहीरी खोदणें, दुरुस्ती करणें, बोअर करणें व सुरुंग लावून विहीरी खोल करणें आणि पंप बसविणें यामुळें एकूण ८.७३ लक्ष एकरात पाण्याचा पुरवठा होईल.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेअखेर २,००,००० एकर जमीन ट्रॅक्टरच्या सहाय्यानें नांगरट करण्यात आली. तिसऱ्या योजनेंत ३,१४,००० एकरात ट्रॅक्टरनें नांगरणी करण्यात येईल. सध्या सहकारी बँकामार्फत सुधारलेल्या अवजाराची खरेदी, ट्रॅक्टर नांगरणी, यासारख्या कामासाठी शेतकऱ्यांना लागणारी मध्यम मुदतीची कर्जें देण्यात येतात. शासनाकडून अशा मध्यम मुदतीच्या कर्जाची गरज पाच कोटी रुपयापर्यंत भागविली जात आहे.

## शेतकऱ्यांची दुसरी गरज म्हणजे सेवा सहकारी सोसायट्यांमार्फत साधन पुरवठा

शुद्ध व सुधारलेल्या बियाचे वाटप करण्याचें काम गेल्या दहा वर्षांपासून चालू असून त्यासाठी एकूण ११,३७० एकरावर २१३ तालुका बी–बियाणें केंद्रे स्थापन करण्यात आली आहेत. चालू योजनेंत आणखी ३१ केंद्रें स्थापून एकूण १५,३७२ एकर क्षेत्र होईल. या केंद्रातून तयार झालेलें बी, मान्यता दिलेल्या शेतकऱ्याच्या शेतावर वाढ करुन सेवा सहकारी सोसायट्यामार्फत पधरा लक्ष एकर गव्हासाठी, १८,००,००० भातासाठी एक कोटी एकर इतर धान्य पिकासाठी व ७,७५,००० एकर इतर कडधान्यासाठी या प्रमाणे वितरण करावयाचे आहे.

उत्तम पीक येण्यासाठी पाण्याची जेवढी गरज आहे तेवढीच खतांचीहि आहे, हे शेतकऱ्याना नीट समजलेलें आहे. रासायनिक खताचे वाटप दुसऱ्या योजनेअखेर २०,००० टन नत्रजन, ८,७०० टन स्फुरद व १२,००० टन पोटॅश या प्रमाणात झालें. तिसऱ्या पचवार्षिक योजनेच्या शेवटच्या वर्षी ( १९६५–६६ ) साली सर्व प्रकारच्या पीकांसाठी १,३५,००० टन नत्रजन, ६५,००० टन फॉस्फॅरिक ॲसिड आणि ४२,००० टन पोटॅश या प्रमाणात वाटण्याचे उद्दिष्ट आहे आपल्याला माहितच आहे की अमोनियम सल्फेट मध्ये २० टक्के नत्रजन, सिंगल सुपर फॉस्फेटमध्ये सोळा ते अठरा टक्के स्फुरद व पोटॅशियम सल्फेटमध्ये पन्नास टक्के पोटॅश असतें. यावरुन हा कार्यक्रम किती मोठा आहे याची कल्पना येईल. खत वाटपाचे काम सहकारी पतपेढ्यामार्फत करण्याचें काम चालू आहे. राज्यातील एकूण ३५,५२६ गावापैकी ३४,४७६ गावातून सहकारी पतपेढ्याची स्थापना झाली आहे. सहकारी संस्थांचा आकडा आता २८,९७३ झाला असून त्यापैकी १७,८१६ सहकारी पतपेढ्या आहेत. या सहकारी पतपेढ्यानी १९५९–६० मध्यें रासायनिक खताचे व कीटकनाशक औषधाचे वाटप, बी–बियाणाचे वितरण, शेती उत्पादनाकरितां उपकरणांचें वाटप आणि इतर कामाकरिता मिळून पाच कोटी रुपयाचा वापर केला. याशिवाय प्राथमिक शेतकी पतपेढ्यानी २२.४५ कोटी रुपये कर्जाऊ दिले तसेंच १९५९–६० मध्ये २०३ लक्ष रुपयाच्या मालास बाजारपेठ मिळवून दिली आणि ९८६.०७ लक्ष किमतीच्या मालाचे वितरण केलें

पीक सरक्षणाच्या दृष्टीनें दुसऱ्या पचवार्षिक योजनेमध्यें महाराष्ट्र राज्यात पाच हजार हात पप, पाच हजार पांचशे ( ५,५०० ) धुळारी पप, १,८०० बियावर उपचार करण्यासाठी लागणारे फिरते पप, ३३३ यांत्रिक पप, व ३०० यांत्रिक धुळारी, शेतकऱ्याच्या उपयोगासाठी माफक भाड्यानें देण्याची निरनिराळ्या जिल्ह्यातून सोय करण्यात आली आहे. सांगली येथील बिनपर्णी टोळावर सतत तीन वर्षे विमानातून औषध मारण्याची कामगिरी शेतकी खात्यानें शेतकरी सघटनाच्या मार्फत हाती घेतली होती. असा तऱ्हेची योजना विदर्भ व खानदेश भागातील कपाशी वरील दहिया रोगावर गंधक मारण्यासाठी, जिल्हा सहकारी शेतकरी सघटनानी १,५०,००० एकरावर अमलात आणली. तसेंच गतवर्षी पुणें जिल्ह्यातील भुईमुगावरील मावाकिडीवर सहकारी पतपेढ्याच्या सहाय्यानें औषध फवारण्याचे काम हाती घेण्यात आलें होतें. येवढ्या मोठ्या विस्तृत प्रमाणात आणखी एक प्रयोग नागपूर विभागातील सत्र्यावरील " सायट्रस सिला " या किडीचे उच्चाटन करण्यासाठी शेतकी खात्यानें सहकारी सघटनाच्या सहाय्यानें जानेवारी व मार्च १९६२ मध्यें पार पाडला.

उत्पादन वाढविण्याच्या दृष्टीनें सुधारलेल्या लागवडीचा प्रचार करण्याची मोहीम या योजनेंत हाती घेण्यात आली आहे. हें काम एकूण ३५,००,००० एकर क्षेत्रात भात, गहू, ज्वारी, बाजरी, भुईमूग व कापूस या पिकासाठी घेण्याचे ठरलें आहे. एवढेच नव्हे तर ऊस, तबाखू वगैरे पिकासाठीहि ही योजना लागू करण्यात आली आहे. आणि फळाच्या उत्पादनवाढीच्या दृष्टीनें डोंगर उतारावर ५,५०,००० एकरांत काजू, आंबे व तसेच समुद्रकाठच्या रेताड जमिनीत नारळ व इतर झाडाची लागवड करण्यात येणार आहे यात सहकारी संस्थांची फार मोठ्या प्रमाणात मदत घेण्यात येणार आहे.

### महाराष्ट्रांत कृषिऔद्योगिक अर्थव्यवस्थेनें मूळ धरलें आहे

सहकारी तत्त्वावर शेतमालाची प्रत ठरवून, प्रक्रिया करुन कृषि औद्योगिक अर्थव्यवस्थेचा विकास करण्याचें आपण ठरविलें आहे. त्यानुसार भातसडीचा सहकारी धंदा, सहकारी तेल गिरण्या, कापसाच्या जिनिंग व प्रेसिंग फॅक्टऱ्या अशा ११८ सहकारी संस्था काम करीत आहेत. ऊस पीकविणारा शेतकरी हा सहकारी कारखानदार झाल्याचें स्फूर्तीप्रद उदाहरण महाराष्ट्रातील ऊसबागाईतदारानी भारताला दाखवून दिलें आहे. याशिवाय राज्यात सहकारी शेती संस्थाहि बऱ्याच आहेत. महाराष्ट्र राज्यांत अशा एकून ५०५ सहकारी शेतकी संस्था असून त्याच्या सभासदाची सख्या १५,१४४ आहे. या संस्थामुळें शेती विकासाचें काम तर सुकर होईलच, पण त्याबरोबरच कृषिऔद्योगिक क्षेत्रातहि झपाट्याने प्रगती होईल

शेती माल विक्री कायदा करुन नियमित बाजारपेठा स्थापन करण्याच्या दृष्टीने या राज्यात दुसऱ्या योजनेच्या अखेरीस एकूण २११ मोठ्या आणि ६२ छोट्या बाजारपेठाचे नियमन करण्यात आले आहे त्यामुळें सहकारी शेती संस्थाच्या मालास योग्य भाव मिळण्यास मदत होईल

### सहकार्याचे तत्त्व अद्यापि शेतीव्यवसायांत रुजलेले नाहीं.

वर सांगितलेल्या माहितीवरुन एक दिसून येईल की, महाराष्ट्रामध्यें सहकारी संस्था बऱ्याच मोठ्या प्रमाणात स्थापन झालेल्या असल्या तरी आज त्यापैकी फारच थोड्या संस्था शेती उत्पादनाच्या कार्याकडे लक्ष देत आहेत या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करुन चालणार नाही. वास्तविक, आपल्याकडे शेकडा ७० टक्के लोक शेती व्यवसायात गुंतलेले असता, आहे यापेक्षा फार मोठ्या प्रमाणात या व्यवसायामध्यें सहकारी संस्थानी भाग घेतला पाहिजे. याची पहिली पायरी म्हणजे शक्य तितक्या जास्त प्रमाणात सामुदायिक शेती संस्था स्थापन झाल्या पाहिजेत. अशा संस्थामुळें शेतीकरिता लागणारी साधनसामुग्री , मजुरी,

माडनल वगैरे सर्वांच्या धान्यांमध्यें भरपूर प्रमाणात बचत होऊन शेतीच्या कायम सुधारणेच्या योजना पार पाडता येतात. एखादा श्रीमंत शेतकरी कदाचित आपल्या शेतीमध्ये नेत्रदीपक यश मिळवू शकतो. परंतु आपणाला फक्त असें वैयक्तिक यश नको आहे. सर्वसाधारण शेतकरी समाज उन्नतिपथावर आला पाहिजे तरच त्याचा देशाला फायदा होणार आहे.

सरकारी अधिकाऱ्यांचे शेती सुधारणेच्या प्रचाराचे काम चालू आहेच. तरीपण हेंच काम शेतकऱ्यांच्या पक्षातील व्यावसायिक संघटनेच्या सहाय्याने सहकारी संस्थांच्या मार्फत झालें तर त्यातून निर्माण होणाऱ्या आपुलकीमुळें कामाचा उठाव जोरदार होईल हें निःसंशय आहे, तसेंच तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात कृषि उत्पादनाबरोबरच कच्च्या मालाचें पक्क्या मालात रूपांतर करून सहकारी तत्वावर विक्रीची सोय होऊन शेतकऱ्यांची पैशाची गळती बंद होऊन त्याची आर्थिक उन्नति होईल अशी आशा करूं या.

सहकार हें शेती सुधारणेचे एक प्रमुख साधन म्हणून फार मोठ्या प्रमाणांत उपयोगांत आणलें गेले पाहिजे तरच शेतकरी समाज उन्नतिपथावर येऊं शकेल व शेतकरी समाज वर आला तरच देश निश्चितपणें प्रगतिपथावर जाऊं शकेल यांत संशय नाही.








# सहकारी चळवळींत रजिस्ट्रारचें स्थान

श्री एल्. एन्. बोंगीरवार
रजिस्ट्रार सहकार खातें





सहकारी चळवळीची सुसूत्र व परिणामकारक वाढ होण्याच्या दृष्टीनें सहकारी खात्याचे निबंधक ह्यांच्यावर अत्यंत कठीण पण तितकीच महत्त्वाची जबाबदारी आहे. सहकारी चळवळीसारखी लोकप्रिय चळवळ सतत कार्यवाहीत राहावी म्हणून निबंधक ह्यांच्या प्रचारक स्वभावाचा कसा उपयोग होऊं शकतो ह्याचा निरनिराळ्या सभा व नियुक्त प्रतिनिधिक मंडळें यांनी वारंवार उल्लेख केलाच आहे. निबंधक म्हणून लोकप्रसृत सर्वसाधारण कल्पनेप्रमाणे सहकारी संस्था नोंदण्याचे ते केवळ यंत्र नाही, तर संपूर्ण चळवळ, तिच्या बाबतच्या राष्ट्र व राज्यपातळीवरील योजनाबद्ध कार्यक्रमात अपेक्षित केलेल्या मार्गावर सतत प्रगति करीत राहील अशी काळजी घेणे हे त्याचे एक महत्त्वाचे कर्तव्य आहे. हे कर्तव्य करीत असताना चळवळीचे मुख्य स्वरूप म्हणजे लोकांनी केलेली व लोकांसाठी लोकांनीच चालविलेली चळवळ ह्याला कोणत्याहि तऱ्हेचा बाध न येऊं देण्याची दक्षता घेणे आवश्यक असते. लोकांच्या चळवळीचे स्फूर्तिस्थान म्हणजे लोकांची स्वतःची इच्छा, व स्वयंस्फूर्तीनें केलेला कार्यक्रम ह्यामुळें स्फूर्तिस्थानाच्या वाढीलाच बाध येणारे काहीही कृत्य झाले तर, ही चळवळ पुढें कधीहि वाढणार नाही म्हणून योजनाबद्ध कार्यक्रम समोर असताहि तो उगीच लोकांवर लादला जाणार नाही, व सहकारी कार्यक्रमाच्या ऐवजी सरकारी कार्यक्रम होणार नाही, ह्याची खबरदारी निबंधकाला घ्यावी लागते. ही तारेवरची कसरत असली तरी निबंधकाचे खरे कौशल्य, ही जबाबदारी, यशस्वीरीतीने सांभाळण्यातच आहे ही जबाबदारी सांभाळण्यात सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे " लोकशिक्षणाचा " प्रसार ज्यांच्या हितासाठी सहकारी चळवळ आहे, त्यांना ह्या चळवळीत ते हित कसें आहे हे जर समजले तर, ते ह्या चळवळीत भाग घेतीलच, म्हणून ह्या विषयासंबंधी वारंवार चर्चा करून आवश्यक तांत्रिक मदत देऊन व प्रत्यक्षात यशस्वी झालेल्या संस्थांची माहिती मिळवून, सहकारी चळवळीतील नेत्यांना ह्या गोष्टी सर्वसाधारण जनतेला समजावून देण्यासाठी सदोदित उत्तेजित करणें आवश्यक असते. सहकारी चळवळीत अशा रीतीनें, स्वतःच्या वाढीची स्वयंपूर्ण शक्ति निर्माण करणें अत्यावश्यक आहे, व ह्या दृष्टीनेंच निबंधकानें आपले व्यवहार केले पाहिजेत. नाहीतर नुसते नियम व कायदा ह्यांचे अवडंबर करून ह्या चळवळीला मदत होण्याऐवजी, अपायच होण्याचा संभव

आहे. दुसरी तितकीच महत्त्वाची जबाबदारी म्हणजे, चळवळीत, वाईट प्रवृत्ति जेव्हा जेव्हा निर्माण होतील, तेव्हा तेव्हा त्याकडे कार्यवाहीने लक्ष देऊन त्याचे वेळीच निर्मूलन करणें. त्यासाठी कायद्याचा, कठोरपणें व कार्यक्षमतेनें कुणालाही भीड व भीति न बाळगता उपयोग करणें आवश्यक असते. व ही जबाबदारी निबंधक ज्या कार्यक्षमतेनें पार पाडील त्या प्रमाणांत सर्वसाधारण लोकांचा सहकारी चळवळीवरील विश्वास कायम राहील. संस्था नोंदणी करणें हा जरी त्याच्या कार्याचा एक अलग भाग असला तरी त्यासाठी सुद्धा पूर्ण, पूर्व विचार करून नोंदण्यात येणारी संस्था सहकारी तत्त्वें व अर्थव्यवहार ह्याबाबतीत पूर्ण कार्यक्षम अशीच राहील अशी खात्री करून घेणें प्राप्त आहे. ह्यासाठी अशा संस्थांना योजनाबद्ध कार्यक्रम तयार करण्यास योग्य ती मदत द्यावी लागते. संस्था नोंदणी अधिकारास केवळ रबरी शिक्का मारण्यापेक्षा कितीतरी मोठे महत्व आहे. त्याचे प्रमुख म्हणून बहुजनांना सहकाराचे खरे ज्ञान करून देण्याकरिता आवश्यक ती उपाययोजना विचारपूर्वक करावी लागते. मित्रत्व हा आत्मा समजल्या जाणाऱ्या सहकारी चळवळीत स्वावलंबन, आर्थिक उन्नति अधिक चांगली उपजीविका याबाबतीत मार्गदर्शन, निरीक्षण, आणि नियंत्रण ह्याकडे निबंधकाला नेहमीच लक्ष द्यावें लागतें निबंधक यांचे सहकारी चळवळीशी असलेलें संघटन इतकें एकरूप आहे कीं ते आणि चळवळ हें निराळे राहूच शकत नाहीत.

सहकारी चळवळ देशातील जीवनमान हळूहळू प्रगत करीत आहे. ही चळवळ केवळ कर्ज देणाऱ्या संस्था तयार करण्याकरिता नसून शिक्षण, बाजारपेठांची सुधारणा, कोठारी पद्धती, सहकारी साखर कारखान्यांची प्रस्थापना, प्रभावी जपानी भात योजना, सहकारी गृहसंस्थापन, भूतारण पेढ्याद्वारा जमिन सुधारणा, बाजारवृद्धि, औद्योगिक आणि जंगल कामगार संस्था यांत गतीनें वाढ करण्याकरिताही आहे ह्या आणि इतर अनुषंगिक कार्यांनी ह्या चळवळीत महत्त्वाचें स्थान पटकाविलें आहे अशा द्रुतगतीनें प्रगत होणाऱ्या सहकारी चळवळीतील तंत्रपद्धतीत निबंधक हें मित्र, तज्ज्ञ आणि मार्गदर्शक म्हणून गौरविलें जातात. सहकारी चळवळीच्या वाढत्या गरजाप्रमाणें नफानुक्रमान, उन्नती, प्रतिबंध, विकास व दृढीकरण यांच्यात सूक्ष्म समतोलपणा राखून सहकारी संस्थांच्या सर्वस्थितीत, सर्वांगीण प्रगतीस निबंधक बरेच सहाय्य होऊं शकतात. असें यावरून स्पष्ट होईल. निरनिराळ्या संस्थांचे रचना कार्य आणि सहकार तत्वप्रणाली यांच्या झपाट्यानें होणाऱ्या वाढीस एकसूत्रीपणा आणण्याचे कार्यही फार महत्त्वाचे आहे त्याकरिता ह्या चळवळीस मिळणाऱ्या आर्थिक सहाय्याचा योग्य वापर करण्याच्या उद्देशानें अविरत व शांत मेहनत आणि अखंड देखरेख याची आवश्यकता आहे. केवळ सहकारी संस्थांची नोंदणी आणि तिच्या अर्थव्यवहाराचे निश्चिती एवढीच निबंधकाची जबाबदारी नाही.

"सहकार" म्हणजे आर्थिक लोकसत्तेचे एक प्रमुख साधन अशा तऱ्हेच्या प्रगतीस प्रगत अर्थव्यवस्था व खऱ्या सहकारी तत्वप्रणालीचे प्रदर्शन कारणीभूत होतात. प्रधान मंत्र्यांच्या शब्दात सांगावयाचें तर आजच्या सहकाराचा प्राथमिक उद्देश म्हणजे निश्चित व आत्मविश्वासाचे समाजघटक निर्माण करणें हा होय चळवळीचा दूरगामी विचार करता नियोजन योग हा दृष्टिकोन समोर ठेवून आपली कार्यपद्धति आखावी लागते

सहकारी चळवळीत निरनिराळ्या कार्यांचा समावेश होतो आणि अशा कार्यांत अन्य खात्याबरोबर खास मित्रत्वाचे नातें असावें लागते. निबंधक, राज्य सरकार व राज्यसरकारची अन्य खाती, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, स्टेट बँक ऑफ इंडिया ही एका बाजूस आणि सहकारी संस्था व सार्वजनिक कार्यकर्ते दुसऱ्या बाजूस ह्यांच्यात एकसूत्रिपणा आणण्यासाठी संघटक म्हणून काम करावे लागते. हें काम करीत असतांना सहकारी चळवळीची रचना-पद्धती त्याबाबतीतील निरनिराळे निर्णय व सरकारच्या अपेक्षा, सहकारी कार्यकर्त्यांना निवेदन करणें, आणि सरकारच्या त्याबाबतच्या प्रतिक्रिया, प्रगती आणि लोकांच्या गरजा निवेदन करणें हें कार्य करावें लागतें कृषि-उद्योग-अर्थव्यवस्थेची सत्यता पटविण्यासाठी फारच महत्वाचे कार्य सहकारी चळवळीत अंगिकारावें लागते. १९६० चा नवीन सहकारी कायदा लवकरच अमलांत येईल. तो कायदा अशा तऱ्हेनें तयार करण्यात आला आहे की, त्यात सहकारी क्षेत्रातील बहुतेक सर्व तऱ्हेच्या गरजा भागल्या जातील. त्याचवेळी आवश्यक त्या गरजा भागविण्यासाठी निबंधक यांचे हात बळकट करण्याची ही तरतूद त्यात करण्यात आली आहे. निबंधक हे अशा स्थितीत कायद्यातील तरतुदींचे प्रशासक म्हणून राहातील. निबंधक यांचे हे कार्य कायम स्वरूपाचे राहाणार नाही. कारण भविष्यकाळात सहकारी संस्थाच हे कार्य आपल्या हातात घेतील. व तशी कायद्यांत तरतूदही करण्यात आली आहे ज्या ठिकाणी आवश्यक आहेत त्याच ठिकाणी असे अधिकार सहकारी संस्थांनी स्वतः तयार केलेल्या मध्यवर्ती संस्थाकडे सोपविण्यात येतील

फेब्रुवारी १९६१ मध्यें प्रस्थापित केलेल्या सहकारीखात्याच्या नवीन रचनेत सहकारी खात्यातील अधिकाऱ्यांना ही कठीण जबाबदारी पार पाडणें सोपें जावें अशी यंत्रणा निर्माण केली गेली आहे व त्यासाठी संबंधित अधिकाऱ्यांना योग्य अधिकारही दिले आहेत

अर्थव्यवस्था, ग्रामोद्योग, कृषिव्यवसाय याबाबतीत सर्व तऱ्हेच्या गरजा ज्यात समाविष्ट आहेत, इतके मोठे कार्यक्षेत्र सहकारी चळवळीनें तूर्त व्यापिलें आहे सहकारी चळवळ ही आपल्या देशाची राज्यातील अर्थप्रगति आणि सामाजिक पुनर्रचना यासाठी मान्य केलेली कार्यपद्धती आहे. सहकारी चळवळीची ही उत्क्रांती म्हणजेच निबंधकाच्या कार्यव्यापाची उन्नती होय सहकारी संस्थाच खरे काम पायाशुद्ध पद्धतीनें करू शकतील. मात्र निबंधक यांनी आपली तांत्रिक सल्ला, मदत, देखरेख आणि नियंत्रण या बाबतची जबाबदारी योग्यरीतीनें पार पाडली पाहिजे तात्पर्य, पूर्वी निबंधक यांना ही चळवळ नुसती अंमलात आणणे व त्यावर देखरेख करणे एवढेच काम होते परंतु प्रस्तुतच्या काळात या व्यतिरिक्त, गरजांच्या प्रमाणात या चळवळीस योग्य तो आकार देणें आणि सर्व तऱ्हेच्या गरजा सहकारामार्फत भागविण्याची कामगिरी मूळ लोकशाहीचे व लोक स्फूर्तीचे स्वरूप कायम ठेवून, हाती घेणें ह्या जबाबदाऱ्या निबंधकावर आल्या आहेत.

***






# भू-तारण बँकांची भूमिका

डॉ. म. वि. हाटे
मॅ. डायरेक्टर महाराष्ट्र स्टेट लँ. मॉ. बँक





हकारी क्षेत्रात भूतारण बँकांना एक अतिशय वैशिष्ट्यपूर्ण आणि महत्त्वाची भूमिका पार पाडावयाची आहे. इतर प्रकारच्या सहकारी सस्था उदा०—प्राथमिक कर्जपुरवठा करणाऱ्या सस्था ह्या प्रामुख्याने जमिनीची मशागत करण्यासाठी कर्जपुरवठा करतात. परंतु भूतारण बँकांना मात्र जमिनीचा विकास करण्यासाठी कर्जपुरवठा करावा लागतो. प्राथमिक कर्जपुरवठा करणाऱ्या सस्थाकडून मिळणाऱ्या अल्प आणि मध्यम मुदतीच्या कर्जास काही बाबतीत आपोआपच मर्यादा पडतात. उदा०—नवीन विहीर बांधणे किंवा एन्जीन विकत घेऊन बसविणे इत्यादी कारण या कामासाठी आवश्यक असणाऱ्या कर्जपुरवठ्याचे प्रमाण एकतर बरेच मोठे असावे लागते आणि शेतकऱ्यास ते कर्ज सोयीस्कर हप्त्यानी फेड करता येईल असेही असावे लागते. भूतारण बँकातून अशाच प्रकारच्या दीर्घ मुदतीच्या कर्जाचा पुरवठा होत असतो हे कर्ज पुरवठ्याचे कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. कारण त्यामुळे जमिनीची प्रत सुधारण्यास मदत होते व परिणामी उत्पादनात वाढ होते असे उत्पादन वाढल्यामुळे शेतकऱ्यास बँकेने ठरविलेले कर्जाचे हप्ते फेडणे अधिक सोयीस्कर होते वक्तशीर वसुली झाल्याखेरीज कोणतीही कर्जपुरवठा करणारी सस्था आपला खर्च भागवू शकणार नाही, हे सागावयास नकोच.

## भूतारण बँकांचे कार्याचा विस्तार

भूतारण बँका यंत्रणेचे दोन स्तर आहेत ते म्हणजे अनुक्रमे (१) मध्यवर्ती आणि, (२) प्राथमिक बँका होत मध्यवर्ती बँकाचे कार्यक्षेत्र एखाद्या राज्यापुरते असते प्राथमिक बँकाचे कार्यक्षेत्र मात्र जिल्हा किंवा त्याचा काही भाग यापुरतेच मर्यादित असते दिनांक ३० जून १९६१ रोजी भारतात एकूण १६ मध्यवर्ती बँका होत्या भारतातील जवळ जवळ प्रत्येक प्रमुख राज्यात एक मध्यवर्ती बँक कार्य करीत होती. मद्रास, आंध्र, महाराष्ट्र आणि म्हैसूर राज्यातील मध्यवर्ती बँका या देशातील काही जुन्या आणि स्थायी स्वरूपाच्या मध्यवर्ती बँकामध्ये मोडतात पश्चिम बंगाल, राजस्थान आणि पंजाब येथे मात्र अलीकडेच मध्यवर्ती बँकाचे कार्य सुरू झालेले आहे दिनांक ३० जून १९६१ रोजी मद्रास आणि आंध्र राज्यातील मध्यवर्ती बँकाचे खेळते भांडवल प्रत्येकी रुपये ८ कोटी होते. तेच महाराष्ट्र राज्याचे मध्यवर्ती बँकेचे रुपये ५ कोटीचे वर होते आणि म्हैसूर बँकेचे जवळ जवळ रुपये ४ कोटी होते मध्यवर्ती भूतारण बँका कर्ज रोख्याची विक्री

करून भांडवल उभारतात. या भांडवलातून शेतकऱ्यांस कर्जपुरवठा केला जातो. मात्र हा कर्जपुरवठा सर्व साधारणपणे प्राथमिक भूतारण बँकांचेच मार्फत केला जातो. दिनांक ३० जून १९६१ रोजी भारतातील अशा प्राथमिक भूतारण बँकांची संख्या ४०८ होती. यामध्ये मध्यवर्ती सहकारी बँकांच्या २१ भूतारण विभागाचा देखील समावेश होतो. म्हैसूर राज्यामध्यें ही संख्या १०० चे वर होती. मद्रास आणि आंध्र राज्यात ती प्रत्येकी ८० होती तर महाराष्ट्रांत २७ होती. महाराष्ट्रांतील २७ प्राथमिक भूतारण बँकामध्ये मध्यवर्ती सहकारी बँकांच्या चार भूतारण विभागाचा समावेश होतो इसवी सन १९५९–६० मध्यें आंध्र आणि महाराष्ट्र राज्यांत प्राथमिक भूतारण बँकानी प्रत्येकी रुपये १ कोटीचेवर कर्ज वाटप केलें. मद्रास आणि म्हैसूर राज्यांत हाच आकडा प्रत्येकी जवळ जवळ रुपये १ कोट होता मद्रास आणि आंध्र राज्यात प्राथमिक भूतारण बँकाचें एकदर येणे असलेले कर्ज प्रत्येक राज्यात रुपये ५ कोटीपेक्षा जास्त होते, तर महाराष्ट्र आणि म्हैसूर राज्यात हाच आकडा प्रत्येकी जवळ जवळ रुपये ३ कोटी होता.

### स्वतंत्र कर्जपुरवठा करणाऱ्या संस्था या दृष्टीने भूतारणबँकांची आवश्यकता

भूतारण बँका वगळल्यास सहकार क्षेत्रामध्यें शेतकऱ्याना कर्जपुरवठा करणाऱ्या एकमेव प्रकारच्या संस्था म्हणजे प्राथमिक कर्जपुरवठा करणाऱ्या संस्था होत. सर्वोच्च आणि मध्यवर्ती सहकारी बँकाकडून घेतलेले कर्ज हे यांचे प्रमुख भांडवल होय, तर सर्वोच्च आणि मध्यवर्ती सहकारी बँकाचे भांडवलाचा मुख्य भाग हा जनतेकडून घालेल्या अल्प व मध्यम मुदतीच्या ठेवी आणि रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाकडून घेतलेले कर्ज यानी बनलेला असतो. थोडक्यात प्राथमिक कर्जपुरवठा करणाऱ्या संस्था, मध्यवर्ती सहकारी बँका आणि सर्वोच्च सहकारी बँक यांच्या भांडवलाचे प्रमुख वैशिष्ट्य असे की, ते मुळातच अल्प किंवा मध्यम मुदतीपुरते असते. शेतीच्या विकास कार्यासाठी शेतकऱ्याना, सोयीस्कर हप्ते बंदीने फेड करता येईल अशा, सुमारे ५ ते २० वर्षे मुदतीच्या कर्जाची आवश्यकता असते. तेव्हा त्यांच्या भांडवलाचे एकदर स्वरुप पाहता, सर्वोच्च आणि मध्यवर्ती सहकारी बँकानी दीर्घ मुदतीचें कर्ज वाटप करणे योग्य होईल असे वाटत नाही. कारण त्यांचे भांडवलच मुळात अल्प किंवा मध्यम मुदतीपुरते उपलब्ध असते.

बरे, दुसऱ्या बाजूने विचार केला असता सर्वोच्च आणि मध्यवर्ती सहकारी बँकानी आपला अल्प आणि मध्यम मुदतीच्या कर्जाचा व्यवहार सभाळून शिवाय दीर्घ मुदतीचे भांडवल उभारावे हे योग्य वाटत नाही. दीर्घ मुदतीचे भांडवल उभारणें आणि ते दीर्घ मुदतीचे कर्ज म्हणून त्याचे वाटप करणें हा व्यवहारच एका विशिष्ट स्वरुपाचा आणि स्वतंत्र आहे. तो सुव्यवस्थित रितीने चालविण्यासाठी विशिष्ट प्राविण्य संपादन केलेली यंत्रणा असणे आवश्यक असते भूतारण बँकाचे व्यवहारामध्ये अनेक महत्वाचे गोष्टींचा अंतर्भाव होतो कर्जरोखे विकून भांडवलाची उभारणी करणें हे त्यांतीलच एक कार्य होय. या कर्जरोख्यास ताबडतोब गिऱ्हाईक मिळावे आणि ते सर्वांस पसंत पडावे म्हणून त्यास राज्य सरकारची हमी मिळवावी लागते मुदत भरल्यानंतर कर्जरोख्याची परतफेड करण्यासाठी गंगाजळीची तरतूद करावी लागते. या सर्वास आधारभूत असे " विश्वस्त पत्र " असते हे विश्वस्त पत्र म्हणजे राज्य सरकार, मे. रजिस्ट्रार ऑफ को–ऑपरेटिव्ह सोसायटीज् आणि संबंधित मध्यवर्ती भूतारण बँक यांमधील त्रिपक्षीय करारच होय. तारण म्हणून ज्या जमिनी अर्जदार बँकेस देऊ करतो त्यावर त्याची संपूर्ण मालकी सिद्ध होते किंवा नाही हे पाहणें,त्या जमिनीवर इतर कांही पूर्वीचे बोजे नसल्याबद्दल खात्री करणें तसेच सदर जमिनींची एका विशिष्ट पद्धतीनें आणि तत्वानुसार किंमत करणे इत्यादि गोष्टींसाठी, ज्याला कायद्याची माहिती आहे असा नोकरवर्ग बँकेस नेमावा लागतो. भूतारण बँकाचे कर्ज समान वार्षिक हप्त्यामध्यें फेडावे लागते. हे वार्षिक हप्ते ठरविण्याचे काम अत्यंत किचकट आणि फार तांत्रिक स्वरुपाचे असते. तेव्हां भूतारण बँकाना आपल्या हिशेब खात्यांमध्ये विशेष प्रशिक्षण घेतलेल्या, अनुभवी अशा नोकरवर्गाची नेमणूक करणें आवश्यक असते. तसे पाहिले तर बँकेमध्ये सर्वच नोकरवर्ग अनुभवी किंवा प्रशिक्षित असावा लागतो. परंतु हिशेबाची उपरोल्लेखित पद्धत ही अतीशय गुतागुतीची असल्यामुळे त्या खात्यात प्रशिक्षीत व अनुभवी नोकरवर्गाची आवश्यकता जास्त असते. उपरनिर्दिष्ट सर्व गोष्टींचा विचार केला असता, दीर्घ मुदतीचे कर्जवाटप करणेसाठी एका स्वतंत्र सस्थेची आवश्यकता आहे हे दिसून येईल शिवाय भूतारण बँकांच्या व्यवहाराचे एकदर स्वरुपच असे काही आहे की सर्वोच्च आणि मध्यवर्ती सहकारी बँका हा व्यवहार स्वीकारण्यास कधीही फारसा उत्सुक नव्हत्या. परिस्थितीनुसार जेव्हा त्या बँकाना सदर व्यवहार करणें भाग पडलें तेव्हा देखील त्यानी या व्यवहाराबद्दल काही फारशी आस्था दर्शविलेली नाही.

### भूतारण बँकांचें ध्येय

भूतारण बँका मुख्यत्वेकरून तीन गोष्टींसाठी कर्जवाटप करतात त्या म्हणजे ( अ ) जुनी कर्जफेड, ( ब ) जमीनखरेदी आणि (क) भू–विकास. पूर्वी एक तर शेतकऱ्याची सावकारीपाशातून सोडवणूक करणे आवश्यक होते आणि दुसरे म्हणजे बँकाकडून कर्ज घेऊन जमीन सुधारणा करावी आणि उत्पादन वाढवून आपला फायदा करावा ही दृष्टी शेतकऱ्यास आली नव्हती म्हणून भूतारण बँकांनी आपल्या कार्याचे सुरवातीस शेतकऱ्यास जुनी कर्ज फेड करण्यासाठी म्हणून बऱ्याच मोठ्या प्रमाणावर कर्ज वाटप केले आता केवळ कर्ज फेडीसाठी कर्ज वाटप केल्यामुळें जमिनीचे उत्पादन प्रत्यक्षपणे वाढत नाही हे उघड आहे त्यामुळें शेतकऱ्याची परतफेडीची पात्रता देखील वाढू शकली नाही हेही ओघानेच आले. परिणाम असा झाला की, बँकाना वसूलीमध्यें अनत अडचणी येऊ लागल्या. या परिस्थितीमुळें आता विचारवंताचे असे मत झाले आहे की भूतारण बँकानी शेतकऱ्याना शक्य तोवर फक्त भू–विकास आणि उत्पादक गरजेसाठीच कर्ज वाटप करण्याकडे आपले लक्ष केंद्रित करावे आता महाराष्ट्रात जो नवीन सहकारी कायदा झाला आहे त्याने देखील भूतारण बँकाचे कार्य फक्त

धान्याचे रकमेस एका ठराविक रकमेने गुणणे– त्यामुळें कर्जमंजुरीतील दिरंगाई कमी होण्यास मदत होईल. शिवाय नवीन सहकारी कायद्यान्वये केलेल्या अधिनियमांचा मसुदा पाहिल्यास त्यामध्येंही कर्ज मागणीच्या अर्जाच्या चौकशीच्या प्रत्येक पायरीस ठराविक कालमर्यादा ठरविलेली आहे. तेवढ्या काळांत त्या अर्जाची चौकशी होणें आवश्यक आहे असें कायद्यानें ठरविले आहे. त्यामुळेंहि सदर दिरंगाईत कपात होण्यास मदत होईल. तगाई योजनामध्यें मात्र कर्जाचे अर्ज रेव्हेन्यू अधिकाऱ्यामार्फत बॅंकेकडे येतात. जर हे अर्ज रेव्हेन्यू अधिकाऱ्यामार्फत न पाठविता परस्पर प्राथमिक भूतारण बॅंकेकडे गेले आणि जर प्राथमिक बॅंकांनी आपला आवश्यक तो नोकरवर्ग वाढविला तर कर्जमंजूरीतील दिरंगाई आणखीहि कमी करता येईल.

### भांडवल उभारण्यात येणाऱ्या अडचणी

भूतारण बॅंका कर्जरोख्यांची विक्री करून भांडवल उभारतात. या कर्जरोख्याच्या व्याज व मुद्दलाच्या रकमेबद्दल संबंधित राज्य सरकारनें हमी घेतलेली असते. परंतु अशी सरकारने हमी घेतलेली असूनही या कर्जरोख्यांस ठराविक आणि कायम असें गिऱ्हाईक नाहीं. याचे एक कारण असें की, ते दीर्घ मुदतीने म्हणजे सुमारे १० ते १२ वर्षे मुदतीचे असतात. एवढ्या लांब मुदतीच्या कर्जरोख्यांस गिऱ्हाईक अगदीच मर्यादित प्रमाणांत उपलब्ध असते. दुसरें असें कीं, निरनिराळी राज्य सरकारें त्यांनी दरवर्षी उभारलेल्या कर्जावर जो व्याजाचा दर जाहीर करतात त्याचेशी सदर कर्जरोख्यांवरील व्याजाचा दर निगडीत असतो. मध्यवर्ती भूतारण बॅंकांना, जर त्याचें कर्जरोखे आणि राज्य सरकारची कर्जे यांमध्यें कर्जाची मुदत, विक्री किंमत इत्यादि बाबी समान असल्यास, राज्य सरकारनें जाहीर केलेल्या व्याजाच्या दरापेक्षा निदान ½ टक्का तरी जास्त असा व्याजाचा दर ते कर्जरोखे पुरेसे आकर्षक बनविण्यासाठी, जाहीर करावा लागतो. वरें, एवढें व्याज देऊनही कर्जरोख्यासाठी हमखास गिऱ्हाईक मिळेलच असें म्हणता येत नाही. यांतच दलाली, कर्जरोखे खपविण्याची हमी घेणाऱ्या संस्थेस द्यावे लागणारे कमिशन आणि कर्जरोख्याचे दर्शनी किंमतीपेक्षा कमी ठेवावी लागणारी त्यांची विक्री किंमत इत्यादि खर्चाची भर पडली म्हणजे कर्जरोख्यावर द्यावा लागणारा प्रत्यक्ष व्याजाचा दर जवळ जवळ ४¾ टक्क्यापर्यंत वाढतो.

भांडवल उभारण्यासाठी एका दुसऱ्या पद्धतीवर सध्या जास्त भर देण्यांत येत असून ती वाढत्या प्रमाणात अवलंबिण्यात येत आहे. ती म्हणजे ( वर उल्लेख केलेल्या साध्या कर्जरोख्यांव्यतिरिक्त) ग्रामीण कर्जरोख्यांची विक्री करणे. त्यामुळें ग्रामीण जनतेस बचत करण्याची सवय लागून त्या बचतीचा उपयोग विकास कार्याकडे करता येतो हा एक जास्तीचा फायदा आहेच. धी बॉम्बे स्टेट को-ऑपरेटिव्ह लॅंड मॉर्गेज बॅंकेने नुकतीच रुपये २० लक्ष इतक्या दर्शनी किंमतीची ग्रामीण कर्जरोख्यांची प्रथम श्रेणी विक्रीस काढली होती. यावर ५ टक्के इतक्या जबर दरानें व्याज जाहीर केलेले होतें. या कर्जरोख्यांची मुदत ७ वर्षे होती. मात्र रिझर्व्ह बॅंकेने यापैकी अर्ध्यापेक्षा किंचित जास्त रकमेचे कर्जरोखे ( ८ : ७ या प्रमाणांत ), ज्यांची मुदत १५ वर्षे होती असे केवळ ४ टक्के दराने विकत घेतले. परिणामत. या श्रेणीच्या कर्जरोख्यावरील सर्वसाधारण प्रत्यक्ष व्याजाचा दर ४½ टक्के इतका खाली आला.

ग्रामीण कर्जरोख्यांची विक्री करताना भूतारण बॅंकास अनेक अडचणींना तोंड द्यावें लागते. एकतर ग्रामीण कर्जरोखे हे नवीनच बाजारांत आले असल्यामुळें त्यांचा प्रचार व प्रसिद्धि करणे यावर बराच खर्च करावा लागतो. तें खपवून प्रत्यक्ष रक्कम गोळा करण्यातहि खर्च होतोच. शिवाय हिशेब ठेवण्याचे दृष्टीने पाहिले असता हे कर्जरोखे धारण करणारे वैयक्तिक खातेदारच मोठ्या संख्येने असतात. ते मुख्यत्वेकरून ग्रामीण विभागात राहणारे असतात. एवढ्या मोठ्या संख्येने असलेल्या खातेदारांचा हिशेब सांभाळण्यासाठी नोकरवर्गात बरीचशी वाढ करावी लागते व तो खर्च बॅंकेस करावा लागतो. ( ग्रामीण कर्जरोखे फक्त व्यक्तींनाच धारण करता येतात, संस्थाना नव्हे हे विदित आहेच. ) या सर्व गोष्टींचा परिणाम असा होतो की, कर्जरोख्यावर प्रत्यक्ष द्यावा लागणारा व्याजाचा दर वाढतो आणि बॅंकेस मिळणाऱ्या नफ्याचे प्रमाण कमी होतें.

### नफ्याचें प्रमाण

भूतारण बॅंकाना जो प्रत्यक्ष व्याजाचा दर द्यावा लागतो त्यापेक्षा त्याना त्याचे व्यवहारामध्यें होणारे नफ्याचे प्रमाण किमान ३ टक्के तरी जास्त असले पाहिजे, निदान सुरवातीच्या काही वर्षांत तरी तें तितके असले पाहिजे असें माझे मत आहे. नफ्याचे प्रमाण निदान ३ टक्के का असावे याला माझे मताप्रमाणे तीन प्रमुख कारणें आहेत. पहिलें कारण असें की भूतारण बॅंकाच्या यंत्रणेचे एकंदर दोन विभाग किंवा स्तर आहेत पहिला स्तर म्हणजे सर्वोच्च भूतारण बॅंक आणि दुसरा स्तर म्हणजे प्राथमिक भूतारण बॅंका. व्यवहारामध्ये जो काही नफा होईल तो या दोन स्तरामध्ये जवळ जवळ सारख्या प्रमाणांत वाटला जातो तेव्हा नफ्याचे प्रमाण जर ३ टक्के ठरविले तर दोन्ही स्तरामध्यें प्रत्येकी जास्तीत जास्त १½ टक्के नफा मिळेल

दुसरे, भूतारण बॅंकाच्या व्यवहाराचे एकंदर स्वरूप अतिशय तांत्रिक आणि क्लिष्ट आहे त्यासाठी तांत्रिक दृष्ट्या परिपूर्ण, प्रशिक्षित आणि पुरेशा नोकरवर्गाची आवश्यकता असते. त्याशिवाय सदर संस्था भक्कम पायावर उभ्या राहू शकणार नाहीत. अर्थात् विशिष्ट शिक्षण घेतलेला कार्यक्षम नोकरवर्ग, त्यास चांगला पगार दिल्याखेरीज उपलब्ध होणार नाही हे ओघाने आलेच याशिवाय कर्जाची वसुली करण्यासाठी कर्जदाराशी सतत संबंध ठेवून योग्य वेळी विशेष प्रयत्न करून वसुलीची सारखी खटपट करावी लागते. त्यासाठी देखील पुरेसा स्वतंत्र नोकरवर्ग आवश्यक आहे या नोकरवर्ग, कार्यालय इत्यादिवरील खर्चामुळे नफ्याचे युक्त प्रमाण बरेचसे वाढतेच. कारण पुरेसा पैसा उपलब्ध नसल्यास वरील गोष्टी करणे कठीण आहे. तिसरे कारण असें की मद्रास सारख्या राज्यामध्यें, जेथे भूतारण बॅंकाची यंत्रणा अत्यंत सुसंघटित आहे, भूतारण बॅंकेचे नफ्याचे प्रमाण २½

टक्के आहे. तेव्हा भूतारण बँकेस कार्याचे सुरवातीची कांही वर्षे, निदान ५ ते १० वर्षे तरी ३ टक्के इतके नफ्याचे प्रमाण असावे असे वाटते. उपरोक्त गोष्टींचा विचार करता ३ टक्के हा आकडा काही जास्तीचा आहे असे दिसत नाही.

### तगाई योजना

सहकारी संस्थामार्फतच तगाई कर्जाचे वाटप व्हावे हे तत्व आता जवळ जवळ सर्वमान्य झालेले आहे. महाराष्ट्रामध्ये " तगाई " योजनांखाली काही ठराविक गोष्टींसाठी दीर्घ मुदतीची कर्जे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर भूतारण बँकामार्फत वाटली जातात. परंतु ही कर्जे वाटण्यासाठी आवश्यक असणारे भांडवल राज्य सरकारकडून बँकेस मिळत नाही. तर ते मध्यवर्ती भूतारण बँकेस कर्जरोख्याची विक्री करून उभारावे लागते. या तगाई योजनांचा उगम अलीकडेच झाला आहे. इसवी सन् १९५८ साली गुजरायमध्ये दुष्काळाची परिस्थिती असतांना, त्या काळच्या मुंबई सरकारने अशी इच्छा व्यक्त केली की शेतकऱ्यांना दीर्घ मुदतीचे कर्ज वाटण्याचे ( सरकारचे ) कार्याशी भूतारण बँकांनी संलग्न व्हावे. सरकारी तगाईची अंशतः जागा घेण्यासाठी म्हणून भूतारण बँकामार्फत दीर्घ मुदतीचे कर्जवाटपाची योजना होती. म्हणून सरकारशी विचारविनिमय करून आणि सरकारचे मदतीने मुंबई राज्य सहकारी भूतारण बँकेने ही तगाई योजना हाती घेतली आणि विहीर खुदाई व दुरुस्तीसाठी आणि ऑइल एंजिनें व विजेचे पंपिंग सेटस् इत्यादिसाठी लांब मुदतीचे कर्ज वांटप करण्यास सुरवात केली.

तगाई योजनेखाली इसवी सन् १९६०-६१ मध्ये एकंदर ६४६६ विहिरींची खुदाई आणि दुरुस्ती झाली व २५४४ एन्जिनें विहिरींवर बसविण्यात आली. बँकेचा इसवी सन १९६०-६१ मध्ये एकदर व्यवहार रुपये ३.१४ कोटीचा झाला. यापैकी रुपये १७८ कोट फक्त तगाई योजनेखाली वाटण्यात आले हे लक्षात घेतले म्हणजे तगाई योजनेखाली बँकेने किती विस्तृत प्रमाणावर कर्ज वाटप केले आहे हे ध्यानात येईल. बँकेने १९६०-६१ साली, जमीन खरेदी, जुनी कर्जफेड इत्यादिसाठी जे कर्ज वाटप केले तें त्या वर्षीच्या एकदर व्यवहाराच्या २० टक्के पेक्षां देखील कमीच होते हेही ध्यानी येईलच.

### तगाई योजनेसाठी लागणारें भांडवल

मुंबई राज्य सहकारी भूतारण बँकेने हाती घेतलेली तगाई योजना ही एक वैशिष्टयपूर्ण स्वरूपाची अभिनव योजना आहे इतर राज्यात देखील याच धर्तीवर तेथील भूतारण बँकाकडे तगाई योजना सोपविण्यात येण्याचा संभव आहे. तेव्हा मुंबई बँकेस तगाई योजनेमध्ये कोणकोणत्या अडचणी आल्या व कोणत्या संकटातून जावे लागले इत्यादि गोष्टींचा परामर्ष घेणे अस्थानी होणार नाही महाराष्ट्र सरकारने विहीर खुदाई व दुरुस्तीसाठी तसेंच ऑईल एंजिनें विकत घेण्यासाठी तगाई वाटपाचे काम सदर बँकेकडे सोपविले खरें, परंतु सरकार या कामासाठी जे भांडवल वापरीत होते तें मात्र बँकेस उपलब्ध करून दिले नाही. कर्जरोखे विकून भांडवल उभारण्यात बँकेस किती अडचणी येतात याचे विवेचन वर केलेच आहे. तेव्हां तगाई योजना यशस्वी रितीने पार पाडण्यासाठी स्वप्रयत्नाने कर्जरोखे विकून भांडवल उभारण्याचे कामी बँकेस किती अडचणी आल्या असतील याची कल्पना येईलच.

चालू वर्षी म्हणजे १९६१-६२ सालामध्ये तगाई योजनेखाली, विहीर दुरुस्ती व खुदाईसाठी आणि ऑईल एंजिनासाठी व पंपिंग सेटस्साठी एकंदर रुपये ६ कोटीचे वाटप करण्याचा मुंबई बँकेचा संकल्प आहे. हा संकल्प सर्वस्वी पूर्ण झाला नाही असे जरी गृहीत धरले तरी बँकेस तो अंशतः तरी पूर्ण करण्यासाठी जवळ जवळ रुपये ४ कोटीची जरूर भासणार आहे. इसवी सन १९६१-६२ मध्ये दोन श्रेणीत सर्वसाधारण कर्जरोखे विकून रुपये २½ कोट आणि ग्रामीण कर्जरोखे विकून सुमारे १½ कोट उभारण्याचा बँकेचा विचार आहे. तृतीय पंचवार्षिक योजनेमध्ये ५ वर्षाच्या काळात रुपये ४५ कोटीचे दीर्घ मुदतीचे कर्ज वाटप करण्याचा बँकेचा कार्यक्रम आहे, एवढेच नव्हे तर रुपये १५ कोटीचे सर्वसाधारण कर्जरोखे व रुपये ३० कोटीचे ग्रामीण कर्जरोखे विकून बँकेस सर्वच्या सर्व रुपये ४५ कोटीचे भांडवल उभारून सदर कार्यक्रम यशस्वी रितीने पार पाडणे भाग आहे या गोष्टीचा विचार केला म्हणजे बँकेस किती कठीण कार्य पार पाडावयाचे आहे व त्यासाठी किती भगीरथ प्रयत्न करावे लागतील याची कल्पना येईल. सरकारनें भांडवल उभारणीच्या कामी जबाबदारी सर्वस्वी बँकेवर टाकली आहे. तेव्हा निदान आपल्या वजनाचा उपयोग करून सरकारने रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, स्टेट बँक ऑफ इंडिया आणि आयुर्विमा कॉर्पोरेशन इत्यादींना विनंती करून, सदर संस्थानी मुंबई बँकेने विक्रीस काढलेल्या प्रत्येक श्रेणीच्या सर्वसाधारण कर्जरोख्यांपैकी निदान २० टक्के कर्जरोखे प्रत्येकी विकत घेण्याचे ठाम आश्वासन मुंबई बँकेस द्यावे, अशी विनंती करावी असें माझे मत आहे

### सरकारी मदत ( सब्सिडी )

तगाई योजनामध्ये अशी एक अट सरकारने घातली आहे की मुंबई राज्य सहकारी भूतारण बँकेने अंतिम कर्जदारास, म्हणजे शेतकऱ्यांस ४½ टक्के दराने कर्ज द्यावे. या संदर्भात नफ्याचे प्रमाण ३ टक्के असावे याबद्दल जे वर विवेचन केलेले आहे त्याचा विचार करता सरकारी सब्सिडी प्रश्न अतिशय महत्वपूर्ण बनतो. बँकेचा आर्थिक व्याजाचा दर ७¾ टक्के आहे, तर सरकारने शेतकऱ्यास त्यापेक्षा सवलतीच्या कमी व्याजाच्या दराने ( जो सरकारने निश्चितरित्या ठरवून दिला आहे ) बँकेने कर्ज वाटप करावे अशी अट घातली आहे. तेव्हा बँकेचा आर्थिक व्याजाचा दर आणि सरकारी सवलतीचा दर यामधील फरका इतकी रक्कम सरकारने बँकेस सब्सिडी म्हणून दिली पाहिजे हे ओघाने आलेच म्हणून माझे मत असे आहे की, सरकारनें मुंबई राज्य सहकारी भूतारण बँक आणि तिच्याशी संलग्न असलेल्या प्राथमिक भूतारण बँकाना एकदर ७¾ टक्के-४½ टक्के म्हणजे ३¼ टक्के सब्सिडी द्यावी सध्या हेच सब्सिडीचे प्रमाण २½ टक्के आहे.

बँकेस कर्जरोख्यावर द्याव्या लागणाऱ्या व्याजाचा दर प्रत्यक्षात ४¾ टक्के पडतो यात आवश्यक असणारे नफ्याचे प्रमाण ( वर

विवेचन केलेले ) ३ टक्के मिळविले म्हणजे बँकेचा व्याजाचा आर्थिक दर बनतो. सध्या हा दर ७¾ टक्के आहे.

## समारोप

भूतारण बँकांना भेडसावणाऱ्या अडचणींचे वर्णन वर आलेच आहे. जर या अडचणी दूर करण्यासाठी पुरेसे उपाय योजले तर या बँका सहकार क्षेत्रांत पूर्वीपेक्षां जास्त चांगल्या तऱ्हेने आपली भूमिका महत्वपूर्ण रीतीने पार पाडू शकतील असें वाटतें. अर्थात् नेमून दिलेली लक्ष्यें पूर्ण कशी होतील आणि व्यवहार कसा वाढविता येईल यावरच केवळ बँकानी भर देता उपयोगी नाही. वाटल्या व्यवसायवरोबरच कर्जदाराना प्रत्यक्ष भेटून तावडतोब आणि वक्तशीर वसुली करण्यासाठीं प्रशिक्षित आणि पुरेशी यंत्रणा तसेंच कर्जाचा दुरुपयोग होऊ नये म्हणून निरीक्षकांची योजना इत्यादि गोष्टींचाही विकास व्हावयास हवा. तरच जलद गतीने कर्ज वाटप करण्यामध्यें अंतर्भूत असलेले धोके टाळतां येतील. नवीन सहकारी कायद्याच्या कलम १४४ खालीं मध्यवर्ती भूतारण बँकेच्या समितीस प्राथमिक भूतारण बँकांवर देखरेख करण्याचे सर्व साधारण अधिकार, तसेंच त्यांची तपासणी करण्यासाठीं अधिनियम इत्यादि करण्याचे अधिकार प्रदान केलेले आहेत तेव्हां या संबंधात आवश्यक ते अधिनियम लवकरांत लवकर तयार करण्यात यावेत अशी अपेक्षा आहे.

योग्य वेळी कर्ज वाटप, वाटलेल्या कर्जाचा योग्य उपयोग आणि वक्तशीर व तत्परतेनें होणारी वसुली या गोष्टींची एकदा निश्चिती झाली म्हणजे भूतारण बँकांना त्यांचे व्यवसायाचा विकास करण्यास बराच वाव आहे. आता आंबे, काजू इत्यादि बागायती पिकांची लागवड करण्यासाठीं भूतारण बँकामार्फत विकास कर्ज देण्याचे घाटत आहे अशा तऱ्हेच्या योजनामध्यें विकास होण्यापूर्वी जमिनीची किंमत कमी असते. उपरोल्लेखित बागायती पिकांची लागवड संपूर्ण यशस्वी झाल्यावर तिची किंमत वाढते. अशा तऱ्हेचे विकासकर्ज देतांना भूतारण बँकांना उपरोक्त परिस्थितीमुळें सुरवातीस साहजिकच अनावश्यक असा धोका पत्करावा लागतो. तेव्हा हे धोके टाळण्यासाठीं व त्याची जबाबदारी भूतारण बँकेवर असू नये म्हणून राज्य सरकारने उपरनिर्दिष्ट विकास कर्जाबाबत, जमिनीचा विकास करतेवेळी तिची असलेली किंमत आणि बागायत पूर्ण होऊन– म्हणजे सुमारे ५ वर्षांनी– तिची होणारी किंमत यामधील फरकाइतक्या रकमेबद्दल हमी घेणें जरूर आहे.

शेतकऱ्याना सहकारी संस्थामार्फत कर्जे पुरवितांना एका महत्वाच्या गोष्टीचा विसर पडता कामा नये. दीर्घ मुदतीचे कर्ज वाटप करून जमिनीचा विकास न केल्यास अल्प व मध्यम मुदतीचे कर्ज वांटपाचे क्षेत्र अत्यंत मर्यादित राहील. जमिनीचा ज्यावेळीं पुरेसा विकास व सुधारणा होईल आणि ज्यावेळी तिची उत्पादनक्षमता वाढेल त्याचवेळी शेतकऱ्यास शेतीची हंगामी कामे करण्यासाठी, शेतमालाची विक्री करण्यासाठीं, बैल खरेदी, शेतीचे उपयोगाची अवजारे, यंत्रे इत्यादि करण्यासाठीं मोठ्या रकमेच्या कर्जाची आवश्यकता भासेल. जमिनीचा विकास केल्यामुळें तिचा पुरेपूर उपयोग करून घेता येतो, शेतकऱ्यांची परतफेडीची पात्रता वाढते आणि त्याचे जीवनमान वाढू लागते. तुलनेनेंच पाहिले तर भारतातील सर्व प्राथमिक भूतारण बँकाच्या सभासदांकडून येणे असलेले कर्ज इसवी सन् १९५९–६० सालाचे शेवटी केवळ रुपये १९.२२ कोटी होते तर तेच शेतीसाठीं कर्जपुरवठा करणाऱ्या संस्थाचे १७७,३१ कोट रुपये होते. परन्तु या तुलनेने आपण निराश होण्याचे कारण नाही कारण वर विवेचन केल्याप्रमाणें जर भूतारण बँकानी कर्ज वांटप करून जमिनीचे विकासास मदत केली नसती तर प्राथमिक संस्थाच्या कर्जाचा आकडा कदाचित् आता आहे इतका राहिला नसता ◇◇◇



"राजकीय स्वराज्य मिळविण्यासाठी ६० वर्षे लागली. आतां आर्थिक स्वराज्य केव्हा मिळणार ? आर्थिक स्वराज्य मिळविण्याचा पाया सहकारी चळवळ आहे. या चळवळीचे बाबतीत लोकाचा विश्वास संपादन करून ती प्रत्येक घरांत पोंहचवा. कांहीही कार्य न केलें तरी आर्थिक स्वराज्य मिळेल या भरवंशावर न राहता सतत काम व अहर्निश उद्योग याद्वारें संपन्नता, मुक्तता संपादण्यांसाठीं सतत प्रयत्नशील असणें आवश्यक आहे."

मा. मारोतरावजी कन्नमवार
१४ डिसेंबर १९६१ भण्डारा




# सहकारी चळवळीतील नवप्रवाह व महाराष्ट्रांतील तिचे स्थान

प्रा. एम्. आर. पाळंदे




माजिक अरिष्टांतून त्यावरील उताराहि जन्माला येत असतो. धार्मिक हेकटपणा शिगेला पोहोचतांच त्यांतून युरोपमधील सुधारणा जन्म पावल्या. कालमानानुसार निरुपयोगी ठरलेल्या रूढीचें पालन करण्यावर आवश्यकतेपेक्षां अधिक भर दिल्यानेंच त्याविरुद्ध निर्भयपणें बंड उभारण्यास चालना मिळते आणि पुष्कळदा त्या रूढींचें निर्दालन करण्यांत आग्रही सुधार काना यशहि मिळतें. भांडवलशाहीतूनच समाजवाद ( Socialism ) व साम्यवाद ( Communism ) उदयाला आले आणि आज त्यांनीच भांडवलशाहीला शह दिल्यासारखें झालें आहे. औद्योगिक क्रांतीनें समाजाचें आर्थिक जीवन ओळखूहि येणार नाहीं एवढें पालटून टाकलें, इतकेंच नव्हे तर सामाजिक विचारसरणीवरहि असा आघात केला की, ज्यायोगें रूढ विचारसरणीला एकदम कलाटणी मिळाली. माणसा-माणसातील नातें कसें असावें ह्या संबंधीच्या प्रस्थापित समजुती बाजूला पडल्या आणि सामाजिक व वैयक्तिक कर्तव्याविषयी नवें संकेत रूढ झाले. ह्या मानानें थोडयाशा माफक प्रमाणात सहकारी चळवळीनेहि कार्य केले दिवसें दिवस असह्य होत चाललेल्या तीव्र उणीवेच्या परि-स्थितीतून सहकारी चळवळ जन्मास आली व काहींशा प्रमाणात तिनें कार्य करून समाजाची बरीचशी गरज भागविली. दरिद्री शेतकरी आणि गरीब व्यापारी व गरजू कारागीर यांना आपल्या व्यवसायाला लागणारे अल्पसेंहि भांडवल उपलब्ध न झाल्यामुळे त्यांची उपासमार होत होती. तेव्हा त्यांना त्यांच्या अडचणी दूर करण्यास सहाय्य करण्यासाठी त्यांचा संयुक्त प्रयत्न घडवून आणावा ह्या हेतूने सहकाराचा अवलंब करण्यात आला.

सहकारी तत्वाचे वैशिष्टय असे की, कोणत्याहि प्रश्नाला तोंड देताना किंवा तो सोडविताना केवळ आर्थिक दृष्टिकोनातून विचार न करतां त्याच्या नैतिक बाजूवरहि भर देण्यांत येतो. भांडवलाचा विचार करताना सहकारी चळवळीनें पूर्वीच्या पद्धतीहून अगदीच वेगळी अशी प्रेरक भूमिका घेतली. भांडवल या कल्पनेमध्यें अदृश्य अशा मानवी गुणवत्तेलाहि तिनें स्थान दिलें. सहकारी तत्वज्ञानाप्रमाणें गरीब परंतु प्रामाणिक अशा सतत कष्ट करणाऱ्या शेतकऱ्याला किंवा लहान व्यापा-



त्याला जोपर्यंत तो चारित्र्यवान आहे तोपर्यंत बाजारात आपली काहीच पत नाही असें वाटतां कामा नये त्याचें चारित्र्य हीच त्याची साधन संपत्ति. अमर्यादित जिम्मेदारीच्या तत्त्वावर स्वत:सारख्याच देशबांधवांशी निकटचे व अतूट असे संबंध सहकारी संस्थेच्या द्वारा निर्माण करून सामाजिक हमी देऊन कर्ज उभारणें त्याला शक्य झालें. त्यायोगें स्वत:चा धान्य पिकविण्याचा किंवा त्याच्या वाटपाचा व्यवसाय करून आपली उपजीविका करणें त्याला साध्य झालें. अशा प्रकारें गेल्या शतकाच्या मध्यास जर्मनीत व युरोपातील इतर देशांत सहकारी चळवळीचा प्रारंभ झाला. भारतातहि ह्याच प्रकारें ह्या शतकाच्या आरंभी सहकारी चळवळीची सुरुवात झाली.

प्रांजलपणें व प्रामाणिकपणानें काम करणाराचा मार्ग सोपा नसतो आणि त्याच्या प्रयत्नाला फळहि एकदम मोठ्या प्रमाणात येत नाही, त्यामुळेंच तें डोळ्यांतहि भरत नाही स्वत:न सुधारणा घडवून आणण्याचा स्वयंस्फूर्त प्रयत्न अल्पावधीत फार मोठा परिणाम (संख्येच्या दृष्टीने) घडवून आणील अशी अपेक्षा नसते. केवळ गुणाच्या जोरावर प्रगती घडवून आणण्यासाठीं स्वत:ला शिस्त लावून घ्यावी लागते व स्वार्थत्याग करावा लागतो. परंतु ह्याचमुळें तो अवलंबिणाराची संख्या झपाट्यानें वाढू शकत नाहीं. भारतांतील सहकारी चळवळीची प्रगति फारच मंदगतीनें होत आहे ह्याचें हें एक महत्त्वाचें कारण असू शकेल १९०४ साली चळवळीला सुरुवात झाली. त्यानंतर आतां अर्धे शतक उलटून गेलें. हा काळ काही थोडा थोडका नाही. परंतु त्या मानानें प्रगति मात्र फारच निराशाजनक आहे. काळजीपूर्वक चौकशी केल्यानंतर ग्रामीण कर्जविषयक पाहणी समितीला देशाच्या एकूण गरजेपैकी फक्त ३ टक्के गरज सहकारी संस्थाकडून भागविली जाते असें आढळून आलें. तेव्हा १९५४ सालच्या आपल्या अहवालांत तिनें सहकारी चळवळ अयशस्वी झाली आहे असें धक्का देणारें विधान करावें हें साहजिकच होतें. परंतु त्याचबरोबर तिनें ही चळवळ यशस्वी झाली पाहिजे असेंहि हिरीरीनें प्रतिपादन केलें.

हा निष्कर्ष सहकारी तत्त्वाचा किंवा त्या तत्त्वांच्या प्रेरणेनें सुरू झालेल्या सहकारी चळवळीचा धिक्कार करण्याच्या हेतूनें काढलेला नव्हता तर जाणत्या ध्येयवादानें प्रेरित झालेल्या चळवळीला अंतर्भूत मर्यादा कशा पडतात त्याचे ते वास्तव चित्रण होतें. ह्या मर्यादा उल्लंघिण्यासाठी काय करावें हें दर्शविण्याच्या दृष्टीनेंच समितीनें आपल्या अहवालात कांही सूचना केल्या होत्या.

ह्या बाबतींत एक असें लक्षात ठेवलें पाहिजे की आपल्यासारख्या मोठ्या देशात केवळ अंकगणिताच्या सहाय्यानें काढलेली सरासरी ही त्यासाठी गणनेंत घेतलेल्या प्रत्येक घटकाची सर्वसाधारण परिस्थिति बरोबर दर्शवीलच असें नाहीं. प्रदेश व लोकसंख्या ह्याच्या दृष्टीनें काही घटक बरेच मोठेहि असतील. वेगवेगळ्या प्रदेशातील प्रगति विषम असेल. काही भाग चांगलेच प्रगत झाले असतील तर कांही बरेच मागें रेंगाळले असतील. भारतातील सहकारी चळवळीच्या बाबतीत तर असेंच घडलें आहे. मद्रास, पंजाब आणि महाराष्ट्राचा अंतर्भाव असलेलें पूर्वीचे मुंबई राज्य येथें सहकारी चळवळीला अधिक उत्साहानें साद मिळाली. विशेषत: मुंबई राज्यातील महाराष्ट्र, गुजरात व कर्नाटक ह्या भागांत विविध प्रकारच्या सहकारी संघटना निघाल्या. सर्वांचे एकूण कार्य विचारांत घेता तें निराशाजनक मुळीच नाही. ह्या संदर्भात एक विशेष महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली पाहिजे ती ही की ह्या सर्व संघटना सरकारी अधिकाऱ्याच्या पुढाकारानें व वैचारिक प्रेरणेनें सुरू झाल्या. सामाजिक अर्थव्यवस्थेत खुल्या व्यापाराचें तत्त्व प्रचारात होतें आणि सरकारचें कार्य फार अकरणात्मकच होतें. हें सर्व लक्षांत घेतां ह्या चळवळीचे महत्त्व जाणून घेऊन ह्या भागातील कार्यकर्त्यांनी सार्वजनिक सेवाबुद्धीनें विविध प्रकारच्या सहकारी संस्था प्रस्थापित केल्या व त्या यशस्वीपणें चालविल्या ह्याबद्दल त्यांचें विशेष कौतुक करणें आवश्यक ठरतें. सहकारी चळवळीचें एकहि महत्त्वाचे अंग त्यांनी बाकी ठेवलें नाहीं. कर्ज देण्याच्याच बाबतीत पहा ना, वर उल्लेखिल्या प्रमाणें संबंध देशाच्या एकूण गरजेपैकी केवळ तीन टक्के गरज सहकारी संस्थांनी भागविली असें सर्व देशाचे प्रमाण असलें तरी मुंबई राज्यात मात्र हें प्रमाण तीस टक्के होतें

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर प्रगतीबद्दलच्या कल्पनांत आमूलाग्र बदल झाला. परकीय राजवटीखालील प्रदीर्घ काळांत झालेली हानी झपाट्यानें व पद्धतशीरपणें काम करून भरून काढणें आवश्यक होतें. स्वतंत्र भारतानें स्वत:ची लोकशाहीनुवर्ती घटना तयार करून ती १९५० पासून वहिवाटींत आणली. तीमध्यें केंद्र व राज्य सरकारनीं कोणतें धोरण अवलंबावे व तें अमलांत आणण्यासाठी कसे संयुक्त प्रयत्न करावे त्यासंबंधीचे आदेश देणारें एक स्वतंत्र प्रकरण आहे. त्याचे उद्दिष्ट स्वातंत्र्य, समता आणि न्याय यांवर आधारलेला समाज प्रस्थापित करणें हें आहे राष्ट्राचा समतोल विकास घडवून आणण्यासाठी सर्वांगीण नियोजन हें प्रभावी साधन मानण्यांत आलें सामाजिक व्यवस्था समाजवादी धर्तीची असावी हें मान्य करण्यात आलें. ह्या सर्वांमुळें भारताच्या शासनव्यवस्थेवर पूर्वी कधीहि न बजावलेलें कार्य पार पाडण्याचा भार पडला त्याची कर्तव्यें व कामकाज ह्यांना अपूर्व असे एक आगळेंच स्वरूप प्राप्त झालें. समाजवादी व्यवस्थेंत शासनसंस्था केवळ अकरणात्मक व तटस्थ राहू शकत नाही लोकांची सामुदायिक इच्छाशक्ति व सामर्थ्य तिच्या ठायी एकवटलेलें असतें. त्यामुळें तिला राष्ट्राच्या प्रगतीसाठी विशिष्ट धोरण आखून तें वहिवाटीत आणण्यासाठी प्रभावी उपाययोजना करावी लागते सरकारनें कमीत कमी हस्तक्षेप करावा हें सूत्र ह्या संदर्भात अगदीच बाल्यावस्थेंतील ठरते. असल्या संदर्भांत सक्ति ही लोकशाही विरोधी व तिरस्करणीय ठरतेच असें नाही.

ग्रामीण कर्ज पाहणी समितीनें सुचविल्याप्रमाणें ( इतर कल्याणकारी उपक्रमाप्रमाणेंच ) सहकारी चळवळीस भरीव आर्थिक सहाय्य करून व तांत्रिक सहाय्य देऊन सरकारनें प्रत्यक्ष भाग घ्यावा हें तत्त्व आता धोरण म्हणून मान्य झालें आहे व गेल्या काही वर्षांत तें प्रकर्षानें आचरणात आलेलें दृष्टोत्पत्तीस येते. पहिल्या पंचवार्षिक योजनेंत सहकारी चळवळीचा उल्लेख करण्यात आला होता परंतु तिच्याकडे

कांहीं विशिष्ट कामगिरी सोंपविण्यांत आली नव्हती. दुसरींत आणखी एक पाऊल पुढें जाऊन सहकारी चळवळीच्या प्रगतीची निश्चित लक्ष्यें ठरविण्यांत आली. त्यातील बहुतेक साध्य झाली असून सहकारी चळवळीची निकडहि लोकाना पटली आहे. त्यामुळें चळवळीला जोरानें चालना मिळाली आहे. सरकारनें पुढाकार घेतला आहे. सरकारकडून मार्गदर्शन व आर्थिक सहाय्य ह्यांची हमी मिळाली आहे. त्यामुळें सहकारी चळवळीच्या प्रगतीचा वेग आणखी वाढेल अशी अपेक्षा आहे. अर्थातच लोकशाहीमध्यें सरकार म्हणजेच लोक व लोक म्हणजेच सरकार हें खरें असलें तरी त्यामुळें गोंधळ मभवतच नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. सवलतीचा व सोयीचा दुरुपयोग केला जाऊं नये म्हणून दक्षता घेतलीच पाहिजे व तसा तो झाल्यास त्यावर उपाययोजना करण्याची व्यवस्थाहि करून ठेवणें अवश्य असतें.

गेल्या काही वर्षांत सहकारी क्षेत्रांत महाराष्ट्रानें उल्लेखनीय प्रगति केली आहे. सबंध भारतातील खेड्यापैकीं ६० टक्के खेड्यात सहकारी चळवळीनें पदार्पण केलें असून सुमारे २० टक्के लोकसंख्येला तिचा लाभ थोडाफार मिळत आहे तर महाराष्ट्रातील ८५ टक्के खेड्यांत सहकारी चळवळीनें मूळ धरलें असून तिचा लाभ ३० टक्के लोक घेत आहेत. खेड्यांतील सहकारी पतपेढ्यानी एकूण १२५ कोटी रुपये रक्कम कर्जाऊ दिली, त्यापैकीं एकट्या मुबई राज्यानें २५ कोटींहून अधिक रक्कम कर्जाऊ दिली आहे. पिकांच्या तारणावर कर्ज देण्यास प्रारंभ केल्यापासून तर सहकारी पतपेढ्यांचें सामर्थ्य आणखी वाढलें आहे. सहकारी पतपेढ्याची संख्या पंधरा हजारावर गेली असून त्यांच्या सभासदांची संख्या १२ लाखांहून अधिक झाली आहे. त्याचे भांडवल व राखीव निधी मिळून सुमारें १० कोटी आहे. लँड मॉर्गेज बँक ( जमिनीच्या तारणावर कर्ज देणारी बँक ) व भांडवल देणाऱ्या केंद्रीय संस्था ह्यांनी शेती सुधारण्यासाठीं दीर्घ मुदतीची कर्जे दिली आहेत. लँड मॉर्गेज बँक डिबेंचर्सच्या द्वारें पैसा उभा करते तर भांडवल पुरविणाऱ्या केंद्रीय संस्थाना रिझर्व्ह बँकेकडून कर्ज मिळतें. विहिरी खणण्यासाठी किंवा त्यावर पंप बसविण्यासाठीं जी तगाई सरकार देतें ती सुद्धा बरीचशी लँड मॉर्गेज बँकेच्याद्वारेंच देतें. धंदेवाईक सावकाराच्या व्यवहारावर नियंत्रण घालणारा जो कायदा सरकारनें केला आहे त्याचे पालन बरोबर होतें आहे की नाहीं हें पाहण्याची जबाबदारी सहकारी खात्याकडेंच सोपविण्यात आली आहे.

सहकारी शेतीकडे महाराष्ट्रांतील बरेचसे शेतकरी आकर्षित झाले असून तिला चागला पाठिंबा मिळत आहे. सध्या सुमारें ३०० सहकारी शेती संस्था काम करीत असून त्याच्या सभासदाची संख्या अकरा हजाराहून अधिक आहे व त्याच्या लागवडीखालील जमिनीचे क्षेत्रफळ ५२५०८ एकर आहे. त्याच्याकडून झालेल्या उत्पादनाची किंमत सुमारे वीस लाख रुपये होईल पाऊस अपुरा व अनिश्चित असेल तेथें पाणी पुरविण्याच्या ( लिफ्ट इरिगेशनला ) फार महत्त्व असतें. त्यासाठी सहकारी संस्थांचा फार उपयोग होतो. अशा लिफ्ट इरिगेशन सहकारी संस्थांची राज्यातील संख्या १३० आहे., त्याच्या सभासदांची एकूण संख्या १२००० हून अधिक असून त्याचे भाग भांडवल २७ लाख रुपयांहून अधिक आहे. अशा १२३ संस्थांना १ कोटी रुपयांहून अधिक सहाय्य सरकारनें केलें आहे. ह्या संस्थांचे कार्य जोरात सुरू झालें की, सुमारें साठ हजार एकर जमिनीला लागवडीसाठी पाणी उपलब्ध होईल. ह्याचा जास्तीत जास्त लाभ घेण्यासाठीं जपानी पद्धतीनें भातशेती करण्याची स्वतंत्र योजना आखण्यात आली आहे. शेतकी आणि सहकारी खात्यानें ती संयुक्तपणें तयार केली असून तिला चांगलें यश येत आहे.

औद्योगिक क्षेत्रात व कच्च्या मालाचा पक्का माल तयार करण्याच्या व्यवसायात महाराष्ट्रांतील सहकारी चळवळीनें स्पृहणीय प्रगति केली आहे. भारतांतील पहिला सहकारी साखर कारखाना ह्या राज्यांत अहमदनगर जिल्ह्यात सुरू झाला

त्याच्या मागोमाग १५ हून अधिक कारखाने निघाले असून आणखीहि कांही सुरू होत आहेत. या कारखान्यांच्या यशामुळें आणि लोकप्रियतेमुळें सहकारी औद्योगिकरणाचें एक नवें दालन खुलें झालें आहे. विदर्भांत लवकरच सूत काढणारी सहकारी गिरणी सुरू करावयाचें ठरलें आहे. असेच आणखीहि काही उद्योगधंदे सुरू होण्याची शक्यता आहे. सहकारी पद्धतीनें संघटित केलेल्या हातमागाच्या धद्यानें चांगली प्रगति केली आहे. विणकराच्या प्राथमिक संस्थाची संख्या ७२५ असून त्याच्या सभासदांची संख्या सुमारें ८१ हजार आहे आणि खेळतें भांडवल १ कोटि ७ लक्ष रुपयाच्या आसपास असेल. राज्यांतील २६ जिल्ह्यांपैकीं १२ जिल्ह्यांत सहकारी औद्योगिक संघ आहेत. ते शिक्षित नोकरवर्ग उपलब्ध करणें, स्वस्तांत कच्चा माल पुरविणें, प्राथमिक संस्थांनी तयार केलेला पक्का माल बाजारांत विक्रीसाठीं ठेवणें. इत्यादि बाबतीत अनेक प्रकारें प्राथमिक संस्थांना उपयोगी पडतात आणि त्यासाठी आकारहि फारच अल्प घेतात. सर्व राज्यांसाठीं म्हणून राज्य औद्योगिक सहकारी संस्था ( स्टेट इंडस्ट्रियल को-ऑपरेटिव्ह असोसिएशन ) स्थापण्यात आली असून तिचें भाग भांडवल दोन लाख रुपये आहे. ह्या संस्थेशी जोडलेल्या संघटनाकडून हें भाग भांडवल उभें करण्यात आलें असून त्यापेक्षा किंचित अधिक भांडवल स्वत. राज्य सरकारनें दिलें आहे. सोलापूरमध्यें तर जिल्हा औद्योगिक सहकारी बँक स्थापन केलेली असून ती सहकारी संस्था व प्राथमिक संस्था याना छोट्या उद्योग धंद्यासाठीं सर्व प्रकारें मदत करते राज्यात लहान प्रमाणावरील उद्योगधंदे व ग्रामोद्योग यासाठीं अस्तित्वात आलेल्या सुमारे २००० ( दोन हजार ) औद्योगिक संस्था काम करीत आहेत त्याच्या सभासदांची संख्या दीड लाखाहून अधिक असून खेळतें भांडवल जवळ जवळ ५ कोटी रुपये आहे. नवीं नवीं क्षेत्रें हुडकण्यात ह्या संस्था नेहमी दक्ष असतात. असाच प्रकारें नुकतीच अहमदनगर जिल्ह्यात यंत्राला लागणारे सुटे भाग ( Spare parts ) तयार करणारी एक संस्था निघाली आहे. दुसरी लहान बॉल बेअरिंग करण्याच्या उद्देश्यानें निघाली असून तिसरी संस्था रेडिओचे सुटे भाग तयार करण्याचा कारखाना काढणार आहे वर उल्लेखिलेले दोनहि कारखाने पुणे जिल्ह्यात निघणार आहेत. औरंगाबादचें वैशिष्ट्य असलेलें हिमरू कापड तयार

करणें व सुप्रसिद्ध बिद्रीची भांडी यांचें उत्पादन करणें या उद्देशानें तेथें सहकारी संस्था निघाली आहे तर येवले आणि पैठण येथें रेशमी कापड तयार करणारी, नागपूर येथें नागपूरी साड्या तयार करणारी आणि इतरहि ठिकठिकाणी चामड्यापासून कलात्मक वस्तू तयार करणाऱ्या, चांदीची मनोहर लेणी बनविणाऱ्या, तांब्यापासून आणि काश्यापासून अनेक उपयुक्त वस्तु तयार करणाऱ्या अशा विविध प्रकारच्या सहकारी संस्था त्या त्या प्रदेशात काम करीत आहेत.

राज्यात आदिवासींची संख्या अधिक असून त्यांतील बरेंहुक जण जंगलात राहातात आणि जंगलातील ठेकेदार त्याना मजूर म्हणून राबवून घेतात. या मजूराना चांगलें काम आणि त्यांची राहाणी सुधारेल एवढें वेतन मिळावें ह्या उद्देशानें स्थापन करण्यात आलेल्या सहकारी संस्थांनी पुष्कळ मजल मारली आहे. लवकरच जंगलीं लाकूड तोडण्याचा ठेकाच या संस्था स्वत:च्या अंगावर घेऊं लागतील अशी आशा वाटते. तसें झालें म्हणजे मधल्यामध्यें दलाली करणारे ठेकेदार नाहीसे होतील. जंगल कामगाराच्या या संस्था जुन्या मुंबई राज्यात १९४७ पासून सुरू झाल्या. ह्या संस्था ठाणे, कुलाबा, नाशिक आणि त्यावेळचे पश्चिम खानदेश म्हणजेच आताचे धुळें येथेंच मोठ्या प्रमाणावर आढळतात. हे लोक अतिशय मागासलेले असल्यामुळें त्यांना मदत करण्यासाठी सरकारनें खास व्यवस्था केली असून अधिकारी आणि बिगर अधिकारी अशा लोकांची नियोजन समिती सरकारनें स्थापिली आहे.

सहकारी विक्रीच्या क्षेत्रातहि महाराष्ट्रानें धीमेपणानें प्रगति चालविली आहे. राज्याने राज्य विक्री संस्था स्थापिली असून शिवाय जिल्हानिहाय अशा ९ संस्था आहेत. आणि तालुका निहाय खरेदी आणि विक्री करणाऱ्या १७५ संस्था आहेत त्याशिवाय कापसाची विक्री करणाऱ्या २४ सहकारी संस्था, फळें विकणाऱ्या २४ संस्था, कापूस पिंजून त्याच्या लडी तयार करणाऱ्या ६ आणि इतर प्रकारच्या २९ अशा एकूण २६७ संस्था ह्या क्षेत्रात काम करीत आहेत. त्यांतील बहुतेक बाबतीत विक्री आणि कर्ज यांची प्रत्यक्ष सांगड घातली असल्यामुळे शेतकऱ्याला आपला माल चांगल्या प्रकारानें कमी विकला जाईल याची चिंता करावी लागत नाही आणि अत्यावश्यक असेल तेव्हा कर्ज मिळेल की नाही या फिकीरींत राहावें लागत नाही. धान्याची कोठारे तसेंच इतर माल साठविण्याची गोदामें बांधण्यासाठी सरकार या संस्थाना विशेष सहाय्य करतें, त्यामुळें धान्य व इतर वस्तु सुरक्षित ठेवणे अडचणीचें जात नाही. तसेंच शेतकी माल जेथें विकावयास येतो अशा बाजारपेठेत जे गैरव्यवहार चालतात ते दूर करण्यासाठी बहुतेक महत्वाच्या ठिकाणी ह्या बाजारातील व्यवहाराचें नियंत्रण केलें जातें व त्यासाठी स्वतंत्र बाजार समित्या स्थापण्यात आल्या आहेत पश्चिम महाराष्ट्रात जवळ जवळ २०० समित्या आज अस्तित्वात आहेत. त्यांचेजवळ स्वत:चे आवार व कित्येक ठिकाणी इमारतीहि असून त्या सर्व साधनांनी सुसज्ज आहेत. त्यासाठी राज्यसरकारकडून त्याना कर्ज व इतर सर्व सहाय्य याद्वारा मदत मिळालेली आहे. महत्वाच्या अशा सर्व वस्तूंची खरेदी, विक्री कायद्याने नियंत्रित करण्यात आली आहे.

आपल्या महाराष्ट्र राज्याला खूप मोठा किनारा लाभला आहे. तेथें समुद्रांत भरपूर मासे सापडतात त्यामुळें मच्छिमारीचा धंदा विकसित करावयास भरपूर वाव असून त्यासाठी सुमारें १०० सहकारी संस्था अस्तित्वात आल्या असून त्यांच्या सभासदाची संख्या २५ हजारापेक्षां जास्त आहे व खेळतें भांडवल२३लाखाहून अधिक भरेल.या मच्छिमार धंद्यावर गुजारा करणाऱ्या आणि ठाणें जिल्ह्यातील बोर्डीपासून ते रत्नागिरी जिल्ह्यातील शिरोडें येथपर्यन्त पसरलेल्या सुमारें २०० मैल लांबीच्या किनारपट्टीतील ६० हजार कोळ्यांना या सहकारी संस्थाखालीं आणणें शक्य होईल अशी फार मोठी आशा निर्माण झाली आहे.

साधारणपणें शेतीला जोडून सहकारी दुग्धव्यवसायहि सुरू करणें सोयीचे जातें. त्यानुसार अस्तित्वात आलेल्या सहकारी दुग्धोत्पादन केंद्राची संख्या आतां बरीच असली तरी या क्षेत्रात आपलें महाराष्ट्र राज्य किंचित् मागासलेले आहे यात शंका नाही सध्या दुग्धोत्पादन करणाऱ्या प्राथमिक संस्था ११२ असून दूधपुरवठा करणाऱ्या संस्थांची संख्या ८ आहे. या संस्थेचे सभासद २५ हजाराहून अधिक भरतील आणि त्याचे खेळतें भांडवल १३ लाखांहून जास्त आहे. महत्त्वाच्या शहराना दूधपुरवठा करणाऱ्या प्राथमिक संस्था निर्माण होण्यास फार मोठी चालना मिळाली आहे.

खेडूताला लागणाऱ्या जवळ जवळ प्रत्येक वस्तूचा पुरवठा करण्याच्या उद्देशानें अस्तित्वांत आलेल्या विविध उद्देशी सहकारी संस्था हे महाराष्ट्रांतील सहकारी संस्थाचे गेली कित्येक वर्षापासूनचें एक वैशिष्ट्य आहे. या संस्थामागील भूमिका अशी की शेतकऱ्याला सहकारी संघटनाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि व्यापारी संस्थेचा वा व्यक्तीचा संपर्क लागू नये व सहकारी संघानें त्याचे जे हित केलें असेल त्याची हानि करण्याची संधीच अशा इतर व्यक्तींना वा व्यापाऱ्यांना मिळू नये अशा संस्थाना आतां 'सेवा संस्था' असें म्हणतात त्यांची स्थापना अत्यावश्यक आहे या गोष्टीवर फार भर दिला जात असून त्याना मोठ्या प्रमाणावर प्रोत्साहन दिले जात आहे. अशा संस्थांची संख्या आता ७ हजारावर गेली आहे. कर्जाचा पुरवठा करणे, कच्चा माल खरेदी करणें, तयार झालेला माल विकणें, बियाणे, जंतुनाशकें, खतें वाटणें इत्यादि अनेक प्रकारची महत्त्वाची कामें या संस्था पार पाडीत असतात.

सहकारी ग्राहक संस्था मात्र राज्यात अजूनहि लोकप्रिय झालेल्या नाहीत. त्यांची संख्या १००० हून अधिक असून त्यांतील ४०० संस्था बृहत् मुंबईतच आहेत शिधा वाटपाच्या ( Rationing ) आणि नियंत्रणाच्या ( Controls ) काळात या संस्थाकडे धान्य, कापड इत्यादि वाटण्याचे काम सोपविले होते परंतु शिधावाटपाची पद्धति बंद होताच सरकारचा त्याना मिळणारा पाठिंबा नाहीसा झाल्यासारखा झाला आणि त्याचा परिणाम म्हणजे यातील कित्येक संस्थांना खोट खावी लागली व आपला कारभार गुंडाळावा लागला

सहकारी तत्वाचे समग्र ज्ञान आणि विविध दिशांनी विविध क्षेत्रांत

सहकारी चळवळ यशस्वी करण्याचें तंत्र अवगत असणे हे सहकारी चळवळीच्या प्रसाराला अत्यावश्यक आहे. सहकारी चळवळीचा ध्येयवाद जेवढ्या प्रमाणात लोकप्रिय होईल तेवढी ती चळवळ यशस्वी होण्याची शक्यता अधिक वाढेल. पूर्वीच्या मुंबई राज्यानें ही गोष्ट पूर्णपणे ओळखली आहे आणि आताच्या महाराष्ट्र राज्याला तिची पुरेपूर कल्पना आहे. सहकारी संस्थांमध्ये नोकरी करण्याचा पेशा पत्करू इच्छिणाऱ्यांना सहकारी चळवळीचें शिक्षण पद्धतशीरपणें देण्याची सोय आता करण्यांत आली आहे. व्यवस्थित, तपशीलवार शिक्षणक्रम तयार झाले असून ते देणाऱ्या शाळा अस्तित्वांत आल्या आहेत. शिवाय छोट्या मुदतीचे सोप्या पद्धतीनें शिक्षण देणारे असे वर्गहि जिल्हानिहाय चालू आहेत. तेथेच कधी कधी एखाद्या खास क्षेत्रातील शिक्षणहि देण्यात येते एखाद्या विशिष्ठ बाबतीतील शिक्षण देण्यासाठी किंवा कार्यकर्त्यांच्या, नोकरांच्या ज्ञानाची फेरउजळणी करण्यासाठी शिक्षणकेंद्रे अस्तित्वात आलेली आहेत. अलिकडे सार्वजनिक क्षेत्रांत उत्साहानें भाग घेणाऱ्या स्त्री–पुरुषांना,विशेषत: ज्यांना सहकारी चळवळीत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष भाग घेतला तर चळवळीला विशेष लाभ होईल अशा स्त्री पुरुषाना, सहकारी तत्त्वज्ञानाची व संस्थाची सर्वसाधारण कल्पना यावी या हेतूने राज्याच्या निरनिराळ्या भागात सहकारी शिबिरे भरविण्यात येऊं लागली आहेत. ही शिबिरें सुमारे एक आठवडा चालतात आणि सर्व विद्यार्थी व शिक्षक त्या काळांत एकत्र राहतात. अशा निरनिराळ्या प्रकारे शेंकडों व्यक्ति आज सहकारी शिक्षण घेत आहेत. या सर्व शिक्षणविषयक कार्याचा उच्च बिंदु म्हणजे पुणे येथील सहकारी महाविद्यालय ( कॉलेज ) होय. १९४७ साली त्याकाळचे सहकार मंत्री श्री. वैकुंठभाई मेहता यांनी पुढाकार घेऊन अशा प्रकारचे विशेष शिक्षण देणारी ही संस्था स्थापन केली. नुकतीच या संस्थेची सूत्रें रिझर्व बँकेकडे सोपविण्यांत आली असून तिला पूर्वीपेक्षांहि आता अधिक भरीव मदत रिझर्व बँकेकडून मिळू लागली आहे

ह्या शैक्षणिक चळवळीच्या बाबतीतील वैशिष्टचपूर्ण आणि आनंदाची गोष्ट म्हणजे हें सर्व कार्य पूर्वीची बॉम्बे स्टेट को–ऑपरेटिव्ह युनियन आणि आताची महाराष्ट्र स्टेट को–ऑपरेटिव्ह युनियन या बिनसरकारी संस्थेकडे सर्वस्वी सोपविलें आहे. राज्याच्या सहकारी संघटनेंत ह्या संस्थेला एकमेवाद्वितीयम् असें स्थान आहे ही मुख्यत: निरनिराळ्या संस्थाची प्रातिनिधिक संघटना म्हणून अस्तित्वात आली असली तरीसुद्धा तिच्यामध्यें व्यक्तीगत सभासदाचाहि एक वर्ग आहे. या संस्थेच्या सुरुवातीपासूनच पश्चिम भारतातील प्रमुख सहकारी कार्यकर्ते या संस्थेचे व्यक्तिश सभासद असून त्यांनी संस्थेसाठी केलेले प्रत्यक्ष कार्य आणि त्याचे मार्गदर्शन याचा लाभ या संस्थेला गेल्या पिढीपासून मिळत आहे. ह्या सर्व व्यक्ति संस्थेचा पाया सुदृढ करण्यास फार कारणीभूत झाल्या आहेत. सरकारची प्रथमपासूनच या संस्थेबद्दल पुष्कळ सहानुभूति होती व चळवळीची प्रसिद्धी आणि प्रसार करण्याचे सर्व कार्य सरकारने या संस्थेवर सोपविलें. तसेच सहकारी शिक्षणाची संघटना करण्याचा भारहि त्यानी तिच्यावर टाकला . ती जबाबदारी स्वातंत्र्यानंतर फार मोठ्या प्रमाणात वाढली आहे ही युनियन एक इंग्लिश त्रैमासिक काढते. एक पाक्षिक काढते आणि अलिकडेच एक पाक्षिक मराठीतहि सुरू करण्यास तिनें सुरुवात केली आहे. प्रदर्शनें भरविणें, व्याख्यानें ठेवणें, चित्रपट दाखविणें आणि राज्याची सहकारी परिषद भरविणें ही सर्व कार्ये ही युनियन पार पाडीत असते. ही सर्व जबाबदारी पार पाडण्यासाठी कारभार पहाणारा असा मोठा नोकरवर्ग लागतो. त्याला बुद्धिमत्ताचे आणि माहितगाराचे मार्गदर्शन लागते. आणि हा सर्व पसारा सभाळण्यासाठी खर्चहि खूप करावा लागतो. हा खर्च चालविण्यासाठी सरकार अवश्य तेवढा सर्व पैसा युनियनच्या स्वाधीन करते.

महाराष्ट्रांतील सहकारी जीवनाचें आणखी एक उल्लेखनीय वैशिष्टय म्हणजे राज्य सहकारी मंडळ ( स्टेट को– ऑपरेटिव्ह कौन्सिल ) हे होय. तसे पाहिले तर या मंडळाचे स्वरूप केवळ सल्लागार मंडळ असे आहे. परंतु त्याच्या मताला सरकार फार मान देते आणि त्या मतानुसार शक्य तें सर्व करण्याचा प्रयत्न सरकार करीत असते. राज्यांतील सर्व महत्त्वाच्या सहकारी संघटनाचे प्रतिनिधि, महाराष्ट्र स्टेट को–ऑपरेटिव्ह युनियनच्या कार्यकारिणीचे सर्व सभासद, संबंधित सरकारी खात्याचे चिटणीस हे ह्या मडळाचे सभासद असतात. आणि रजिस्ट्रार ऑफ को–ऑपरेटिव्ह सोसायटीज हे त्या मंडळाचे पदसिद्ध चिटणीस असतात. सहकारी खात्याचे मंत्री या मंडळाच्या सभेला कटाक्षानें उपस्थित असतात आणि तेथील चर्चेत भाग घेतात. अशा प्रकारें सरकारी व बिनसरकारी अनुभवाचे व बुद्धिमत्तेचे एकत्र मथन तेथे होऊन त्यांतून पुढील कार्याची दिशा ठरते सरकार आपले सहकारी चळवळीचे संकल्पित धोरण ह्या मंडळापुढे विचारविनिमयासाठी ठेवते. त्यावर मतप्रदर्शन व चर्चा होऊन मडळ अधिकृत ठराव संमत करते. या मंडळाच्या पुढील बैठकीत सरकारने या ठरावानुसार काय उपाययोजना केली त्यासंबंधीचा वृत्तांत सादर करण्यात येतो या सहकारी चळवळीच्या विविध अंगासंबंधीच्या अद्ययावत् स्थितीची कल्पना देणारी नानाप्रकारची आकडेवारी मंडळाच्या सभासदांकडे माहितीसाठी वारंवार पाठविण्यात येते. अशा प्रकारे राज्यातील सहकारी कार्याची प्रगति आणि दिशा यासंबधी मंडळाला सतत, साद्यंत माहिती राहील अशी व्यवस्था ठेवली जाते

राज्य सहकारी मडळ ( स्टेट को–ऑपरेटिव्ह कौन्सिल ) आणि राज्य सहकारी युनियन ( स्टेट को–ऑपरेटिव्ह युनियन ) या दोनही सुसंघटित संस्था असून त्याना राज्यातील सहकारी क्षेत्रातील बिनसरकारी संघटनाचे प्रतिनिधि म्हणून मानलें जातें आणि त्याच्या मताचा त्या दृष्टीनें विचार करण्यात येतो सरकारचे सर्वांत श्रेष्ठ अधिकारी त्या संघटनाशी निगडित असतात. आपल्या सरकारच्या ह्या लोकशाहीनुवर्ती दृष्टीकोनाचे कौतुक करणे आवश्यक आहे. कारण या दोनहि संस्था आज राज्यातील सहकारी चळवळीला इष्ट तें वळण लावण्यात आणि तिला योग्य ते स्वरूप देण्यांत अत्यंत प्रभावी ठरल्या आहेत. सहकार हा अर्थातच समाज कल्याण कार्याचा एक घटक आहे आणि म्हणून लोकांतील जबाबदार व जाणत्या लोकांच्या मताला मान मिळणें आणि त्याना सहकारी चळवळीचा कारभार चालविण्याच्या बाबतीत आणि त्याचे उद्दिष्ट स्पष्ट करण्याच्या बाबतीत मदत करण्याची प्रत्यक्ष संधी मिळणे हें अत्यंत उचितच होय. ❋ ❋ ❋




# सभासद शिक्षणाची भारतातील व परदेशांतील योजना

श्री. एस्. बी. महाबळ
डे. चीफ ऑ. - शेतकी कर्ज पुरवठा खाते रिझर्व्ह बँक







श्चिम युरोपमधील काही देशांना भेट देण्याची व तेथील सहकारी शिक्षणाच्या पद्धतीचा अभ्यास करण्याची संधी मला १९६० साली लाभली. त्या देशांच्या सहकारी चळवळीत सभासदांना सहकाराचे शिक्षण कसें दिलें जातें त्यासंबंधीचे माझे काही विचार प्रस्तुत लेखांतून मांडण्याचें मी ठरविलें आहे. त्या देशांना मी दिलेली भेट तशी ओझरती होती त्यामुळें माझ्या निरीक्षणाला स्वाभाविकच मर्यादा आहेत, हें या ठिकाणी नमूद केलें पाहिजे.

## सहकारी सभासदांचें परदेशांतील शिक्षण

सहकारी संस्थांच्या सभासदांच्या शिक्षणासाठी परदेशांतील सहकारी संघटना जी मेहनत घेतात आणि त्या शिक्षणाला जें प्राधान्य देतात तें पाहून भारतीय निरीक्षकाला सहाजिकच आश्चर्य वाटतें कारण त्यांच्या त्या शिक्षणपद्धतीमध्यें तोंडदेखली सहानुभूति नसते किंवा संकुचित आस्था नसते. त्या देशांतील सहकारी चळवळींची अशी खात्री होऊन चुकली आहे की, त्यांचा एकमेव विश्वसनीय आधार त्यांच्या सभासदांचे सहकारी शिक्षण होय त्यामुळेच त्या सभासदांची निष्ठा अभेद्य राहून त्यांना त्या चळवळीची खरीखुरी जाणीव होते

पश्चिम युरोपमधील देशांतील सहकारी चळवळ ही मुख्यत्वें करून ग्राहक सहकारी चळवळ आहे तेव्हां धंदा राखणें व त्याचा विस्तार करणे या दृष्टीनें सभासदांचा आश्रय व निष्ठा या दोन्ही गोष्टी विशिष्ट महत्त्वाच्या ठरतात आता सभासदांचे शिक्षण म्हटले की, त्यात विशिष्ट प्रमाणात प्रचार व जाहिरात यांचा देखील अंतर्भाव होतो तेव्हा ज्या आधुनिक धंद्याचा पसारा व व्याप फार मोठा आहे ज्यांना आपली गिऱ्हाईकी वाढवावयाची आहे, त्यांनी आपली व आपल्या धंद्याची, तसेंच आपल्या इतर व्यवहाराची, त्याचप्रमाणें आपल्या ग्राहकांना विशेष फायदा काय होईल याची जाहिरात करणें अत्यावश्यक ठरतें. इतकेंच नव्हे तर जे खाजगी मालकीचे धंदे आहेत व जे आपल्या हजारो ग्राहकांच्या आश्रयावर अवलंबून असतात त्यांनादेखील ते करीत असलेल्या धंद्याचे ज्ञान करून देणें एका परीनें आवश्यक असते. पश्चिम युरोपमध्यें ग्राहकांचे जे मोठे स्टोअर्स आहेत त्यांनादेखील धंद्याच्या दृष्टीनें आपल्या मालाची व कार्याची जाहिरात करावीच लागते या जाहिरातीच्या माध्यमातून सहकारी तत्त्वें व कार्यपद्धती यांचा सहयोग सहज साधता येईल. तेव्हा सभासदांच्या शिक्षणाची



जी धंद्याची बाजू आहे ती अशा बाबतीत महत्त्वाची बाब ठरते व शिक्षणाचे महत्त्व त्यामुळें विशेषत्वानें प्रस्थापित होतें. अशा शिक्षणातून सभासदांना सहकारी चळवळीत आपण कोणती भूमिका करावयाची तें समजतें; तसेंच त्यांच्या निष्ठेचा व आश्रयाचा फायदा सहकारी चळवळीला व पर्यायानें त्यांना देखील कसा होतो हें देखील त्यांना समजतें. या शिक्षणाचे महत्त्व पटवून देणारी दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे, तिकडील देशांतून सहकारी चळवळींना बाहेरच्या संस्थाकडून ( म्हणजे सरकारमारफत ), मदत मिळत नाही. त्यांना स्वतःच्या हिमतीवर विसंबून रहावें लागतें. जी ग्राहकांची सहकारी संस्था स्वतःच्या पायावर उभी राहू शकत नाही ती भविष्यात दिवाळें काढल्याशिवाय राहणें शक्य नाही. सरकार कोणत्याहि ग्राहक सहकारी संस्थेला विशेष सवलती देत नाही. अगर सरळ आर्थिक मदत करीत नाही ग्राहकांच्या सहकारी संस्थांना खाजगी धंदेवाल्यांशी स्पर्धा करावी लागते व त्या स्पर्धेत तग धरून रहाण्याची आपली कार्यक्षमता सिद्ध करावी लागते. आपलें अस्तित्व टिकवून धरण्यासाठी त्यांना जी धडपड करावी लागते त्यामुळें त्यांना आपल्या सभासदांच्या निष्ठेच्या महत्त्वाची जाणीव आपोआप होते व त्यांची सतत साथ किती उपयोगी असते हे देखील अनुभवपरत्वें पटतें. त्यामुळें साहजिकच सहकारी संस्थांना आपल्या सभासदांच्या निष्ठेचे आणि आश्रयाचे संगोपन व संवर्धन करावें लागतें आणि त्याकरिता शिक्षणाची व जाहिरातीची आवश्यकता भासते.

प्राथमिक अवस्थेतील ग्राहक सहकारी संस्थेपासून तो ग्राहक सहकारी चळवळीच्या सर्वोच्च राष्ट्रीय पातळीपर्यंत सहकारी चळवळीची जडणघडण कशी होत गेली याचे शिक्षण तिकडे सभासदांना काळजीपूर्वक दिलें जातें. सहकारी चळवळ ही खालपासून वरपर्यंत व्यवस्थित रीतीनें संघटित झालेली असते; यात प्राथमिक अवस्थेतील सर्व सहकारी संस्थांचे राष्ट्रीय संघटनेमध्यें एकत्रीकरण अभिप्रेत असतें. अशा रीतीनें व्यवस्थितपणें एकत्र आलेल्या या सहकारी संघटणाच्या सभासदांचे शिक्षण एकमेकाला पूरक असे करतां येते अगदी प्रारंभापासून शिक्षण देण्याची जेथे व्यवस्था असते, तेथे स्थानिक सहकारी संस्था अथवा त्यांच्या शाखा देखील अशा अभ्यासक्रमाला हजर राहू शकतात. जेथे अशा अभ्यास क्रमांत सहकारी संस्थांचा नोकरवर्ग व अधिकारी यांना शिकवून तयार करण्याचा प्रश्न असतो तेथे ती तद्विषयक बाब बनते आणि अशा वेळी राष्ट्रीय पातळीवरून या शिक्षणाचा विचार सहकारी संस्थांच्या मध्यवर्ती संघटनेने केला पाहिजे सर्व वर्गांच्या नोकरांच्या शिक्षणाचा कार्यक्रम यात आखलेला असतो. यात सहकारी संस्थांचे पदाधिकारी व सामान्य सभासददेखील भाग घेतात निरनिराळ्या वर्गांच्या नोकरांना द्यावयाचे शिक्षणाचे स्वरूप अर्थातच् भिन्न असतें. कारण निरनिराळ्या पातळीवरील पदाधिकाऱ्यांच्या गरजा वेगवेगळ्या असू शकतात. तथापि या शिक्षणाची जेवढी म्हणून अंगे आहेत त्यांचें एकत्रीकरण राष्ट्रीय संघटना करते. भारतीय मनुष्य जेव्हां येथील शिक्षण पद्धतीचा अभ्यास करू लागतो तेव्हा त्याला एक गोष्ट विशेषकरून जाणवते; ती म्हणजे शिक्षण, मग तें पगारी नोकरांचें असो अगर सहकारी संस्थांच्या अवैतनिक सन्मान्य पदाधिकाऱ्यांचे या सभासदांचे असो, त्याचा सर्व सहकारी चळवळीची संघटना सोसते त्यांना बाहेरची, सरकारी अगर अन्य प्रकारची मदत, या चळवळीचें वैशिष्ट्यपूर्ण स्वरूप लक्षात घेऊन, विशेष सवलत म्हणून कधीहि मिळत नाही.

## परराष्ट्रांतील सभासदांच्याशिक्षणाचे तंत्र

स्थानिक आणि राष्ट्रीय सहकारी संस्था आपल्या सभासदांशी प्रत्यक्ष संपर्क साधण्याचा प्रयत्न करतात. सभासदांना सभांचे आमंत्रण देण्यात येते, त्या ठिकाणी ते संस्थेचे धोरण व कार्यक्रम यावर चर्चा करतात सामाजिक समारंभाचे त्यांना आमंत्रण देण्यात येते व त्या ठिकाणी गाण्याचा आणि अल्पोपाहाराचा कार्यक्रम ठेवून या समारंभाचे आकर्षण वाढविण्यात येते सभासदांबरोबरच सामान्य जनतेशीहि अशा गाय-मेळाव्याच्या निमित्ताने संपर्क साधण्यात येतो. जेव्हा संस्थेची एखादी नवीन शाखा उघडण्यात येते अथवा एखादा महत्त्वाचा प्रसंग सहकारी चळवळीमध्ये उपस्थित होतो, तेव्हा त्यांचा फायदा घेऊन सभासदांना व इतर महत्त्वाच्या सदस्यांना सभांना व सामाजिक समारंभांना मुद्दाम आमंत्रण देण्यात येते. जे सभासद विशेष गंभीर प्रवृत्तीचे व अभ्यासू वृत्तीचे असतात, त्यांना अभ्यास-मंडळाच्या आणि पत्रव्यवहाराच्या अभ्यासक्रमाद्वारे सहकारी चळवळीची निरनिराळीं अंगें अभ्यासण्याची संधि देण्यात येते. अभ्यास-मंडळे सुरू करण्यासाठीं आणि पत्रव्यवहाराचा अभ्यासक्रम आखण्याकरिता सहकारी संस्थांना मदत करण्यासाठी राष्ट्रीय संघटना, खास नोकरवर्ग ठेवते अन्य तऱ्हेनेहि या संस्था मदत करतात. उदाहरणार्थ, योग्य असे अभ्यासक्रम आखणे, क्रमिक पुस्तकें निवडणें, अभ्यासाला योग्य असें साहित्य निर्माण करणें आणि ते सर्व संस्थाला मोफत किंवा सवलतीच्या किंमतीनें पुरविणे काही सहकारी संस्था तर त्याच्याहि पलीकडे जातात सहकाराच्या विषयासाठी अभ्यासमंडळ सुरू करून या थांबत नाहीत, तर सभासदांच्या आवडीच्या विषयावर या अभ्यास-मंडळातून चर्चा घडवून आणतात, मग हे विषय साहित्य, संगीत किंवा नाट्यकला या संबंधीचे का असेनात ! त्यांना एवढेच समाधान हवे असते की, कुठूनहि आपण आपले सभासद आणि महत्त्वाचे सदस्य यांच्यापर्यंत जाऊन पोहोचावें आणि आपले अस्तित्व त्यांच्या नजरेस आणून द्यावें व त्यांच्या मनात अशी जाणीव निर्माण करावी की, सहकारी संस्था ह्या अशा संघटना आहेत की,ज्या सभासदांच्या केवळ शैक्षणिकच नव्हे तर सांस्कृतिक आणि बौद्धिक प्रगतीमध्येहि खरोखरच मनापासून लक्ष घालू इच्छितात. आणि त्यांच्या मनावर असे बिंबविण्याचा प्रयत्न करतात की, ही संस्था त्यांचे हित साधण्यासाठी त्यांनीच निर्माण केलेली संघटणा आहे ही अशा प्रकारची जाणीव एकदा का त्यांच्या ठिकाणी निर्माण झाली व ती सदैव ताजी ठेवण्याचा प्रयत्न केला गेला की, मग सांप्रतचे सभासद व भविष्यकाळात होणारे सभासद यांचे पाय आपोआपच सहकारी दुकानाकडे वळतात

स्त्रीसभासदांच्या शिक्षणाकडे खास लक्ष पुरविलें जातें युरोपियन समाजाची सांप्रतची जी सामाजिक व आर्थिक घडण आहे तीमध्यें

घरसंसाराला लागणाऱ्या वस्तूंची खरेदी बहुतांशी गृहिणीच करतात. तेव्हा सहकारी दुकानावरून माल खरेदी करण्यासाठी स्त्रियाना प्रवृत्त करण्यासाठी त्याना सहकारी तत्त्वाचे महत्त्व पटवून देणारे शिक्षण देणें अगत्याचें ठरतें. स्त्री-सभासदाना विशेष आकर्षण वाटेल, अशा प्रकारचे शिक्षण त्याना देणे व त्या दृष्टीनें त्याचे स्वरूप ठेवणें, ही अशा परिस्थितीत महत्त्वाची बाब ठरते. या स्त्रियाना स्त्रियाच्या सहकारी संघटणाचे सभासद होण्यासाठी उत्तेजन देण्यात येते. या स्त्रियाच्या संघटणाच्या द्वारे अथवा त्याच्या ज्या छोट्या छोट्या शाखा असतात, त्याच्या विद्यमाने स्त्री-ग्राहकाना शिक्षण देण्यात येतें या स्त्रियाच्या संघटणाचे सभासद नियमितपणें सहकारी दुकानाच्या जागेत अथवा एखाद्या सोयीस्कर ठिकाणी जमतात. त्या ठिकाणी स्त्री-ग्राहकाना सहकारी तत्त्वाचे शिक्षण घेण्यास प्रवृत्त करण्यांत येतें. किंवा त्याना ज्याची विशेष आवड असेल, अशा विविध कला शिकण्याची संधि उपलब्ध करून देण्यात येते. तसेच वैचारिक देवाण-घेवाण करण्यास उत्तेजन देण्यात येतें. त्याना सहकारी चळवळीच्या तत्त्वाचें आणि कार्यपद्धतीचें शिक्षण देण्यात येते. आणि अशा रीतीनें त्याना त्याच्या सहकारी संस्थाच्या कारभारात भाग घेण्यास समर्थ बनविण्यांत येतें. गृहव्यवस्था किंवा शिशु-संगोपन अथवा गृहसजावट किंवा माळीकाम, कार्यपद्धतीचे शिक्षण देण्यात येते. आणि अशा रीतीनें त्याना त्यांच्या सहकारी संस्थाच्या कारभारांत भाग घेण्यास समर्थ बनविण्यात येते. गृहव्यवस्था किंवा शिशु-संगोपन अथवा गृहसजावट किंवा माळीकाम, किंवा शिवणकाम आणि भरतकाम वगैरे सर्वसाधारण स्त्रियाना आवडणारें शिक्षण घेण्यास त्याना प्रवृत्त करण्यात येते. राष्ट्रीय सहकारी संघटना या खास शिक्षक आणि शिक्षणोपयोगी साहित्य पुरवितात. या संस्था स्त्रियाच्या संघटणाना मार्गदर्शन करण्यासाठी खास खाती चालवितात काही मोठ्या सहकारी संस्था आणि राष्ट्रीय सहकारी संघटना प्रायोगिक स्वयंपाकगृहे चालवितात. या ठिकाणी स्त्रियांना स्वयंपाकाचें प्रत्यक्ष धडे देण्यात येतात आणि स्वयंपाक-घरांतील आधुनिक उपकरणें कशी वापरावीत, तें शिकविलें जाते. या स्वयंपाकघराचा अन्य हेतूनें देखील उपयोग करण्यात येतो. उदा० सहकारी दुकाने जो माल विकतात अथवा सहकारी संस्थाच्या कारखान्यातून जो माल तयार होतो, त्याचा दर्जा किती उच्च प्रतीचा असतो, हें सिद्ध करणें. त्याचप्रमाणें बाजारात मिळणाऱ्या मालापेक्षा आपला माल विशेष प्रतीचा आहे, हे दाखवून देणे. सहकारी ग्राहक स्त्रियाची वरीचशी मासिकेंदेखील या सहकारी संघटनामार्फत प्रसिद्ध होत असतात. त्यामध्यें सहकारी चळवळीसंबंधीची महत्त्वाची माहिती तर असतेच, त्याशिवाय गृहिणीच्या दृष्टीनें उपयुक्त अशी माहिती प्रसिद्ध करण्यात येत असते.

खरं पाहू गेलें असता वृत्तपत्रें, नियतकालिकें आणि मासिकें याचा उपयोग सभासदाच्या शिक्षणासाठी व्यापक प्रमाणावर करण्यांत येतो काही नियतकालिकाचे स्वरूप फार गंभीर असतें सहकाराचें तत्त्वज्ञान, त्याच्या समस्या, ध्येयधोरणें आणि कार्यक्रम, सहकारी संस्थाची व्यवस्था वगैरे विषय मुख्यत्वेंकरून या नियतकालिकांतून येतात. सहकारी संघटणाच्या द्वारे सर्वसाधारण मनोरंजनाच्या विषयास वाहिलेली मासिकें देखील प्रसिद्ध होतात आपले ग्राहक सभासद, त्याचप्रमाणे सामान्य जनता यानी ती विकत घेऊन वाचावी, हा त्याचा हेतू असतो. बहुतेक मासिकाना जरी सहकारी चळवळीचे विशेष अगत्य वाटत असल्याचे दिसून येत असले तरी ती मासिकें व्यावहारिकदृष्ट्या इतर सर्वसाधारण मासिकांसारखीच असतात केव्हा केव्हा त्यात उच्च दर्जाचे वाङमय आणि सांस्कृतिक विषयाचें विवेचन आढळतें या मासिकाचा उद्देश सहकारी चळवळीचे तत्त्वज्ञान आणि फायदे याचीच तेवढी टिमकी वाजविणें, हाच केवळ नसतो तर ती अप्रत्यक्षरीत्या सहकाराचें तत्त्व हे सभासदाच्या हिताच्या दृष्टीनें किती महत्त्वाचे असतें तें सुचवितात.

या सहकारी संघटणा सामान्यत: प्रौढ सभासदासाठी असल्या तरी आपल्या भावी सभासदाची काळजी त्या त्याच्या तरुणपणीच वाळगतात. सहकारी संस्थाना तरुण सभासदाचे महत्त्व पटलेलें असते. म्हणून त्या केवळ अल्पवयीन तरुणानाच गाठीत नाहीत, तर लहान मुलांना देखील गाठण्याचा प्रयत्न करतात ७ ते ११ वर्षाच्या मुलांना त्याच्यासाठी योजण्यात आलेल्या क्लबातून नाव नोंदण्याला उत्तेजन देण्यात येतें. ही मुलें आठवड्यातून एकदा जमतात व आपल्या शिक्षकाच्या मार्गदर्शनाखाली मौजमजा करतात त्याच्यासाठी खास साहित्य तयार करण्यात येतें. त्यांची पुस्तकें बहुधा सचित्र असतात मनरंजनाखेरीज अन्य कोणताहि हेतु या पुस्तकांत अभिप्रेत नसतो त्याची रचनाच अशी असते की, त्यामधून मुलाना त्याच्या लत्यामधील सहकारी दुकानाची व त्याना उपयोगी पडतील अगर आवडतील अशा कोणत्या वस्तु मिळतात त्याची माहिती मिळावी. ११ ते १५ वर्षे वयाच्या मुलाची संघटणा स्वतंत्रपणें करण्यात येतें व योग्य अशा साहित्याच्या द्वारे त्याना सहकारी संस्थाचे फायदे कोणते त्याचें त्याना अप्रत्यक्षरीत्या ज्ञान करून देण्यात येते १६ ते २१ वर्षे वयाच्या मुलामुलींना सायंकाळच्या सामाजिक कार्यक्रमात मुद्दाम निमंत्रिण्यात येते तेथें तो नाचगाण्यात, आमोदप्रमोदात अगर छोट्या सहली काढून आपला वेळ व्यतीत करतात सायंकाळच्या या सामाजिक कार्यक्रमात सहकाराच्या शिक्षणावर प्रत्यक्ष भर देण्यात येत नाही त्या कार्यक्रमाच्या द्वारे त्याना ठोकळमानाने एवढेच सुचविण्यात येते की, त्याचा भावी संसार थाटण्यास स्थानिक सहकारी संस्थेची त्याना मदत होऊ शकेल

### भारतांतील सभासदाचें शिक्षण

परराष्ट्रातून सहकारी कार्यपद्धतीचे शिक्षण कसें दिलें जातें व त्याचे स्वरूप किती वेगळे व किती व्यापक असतें, हें जेव्हा आपण पहातो, तेव्हा विद्यमान भारतातील प्रयत्न त्या दृष्टीनें फारच अल्प-अपुरें आहेत, ही गोष्ट मनाला जाणवल्याशिवाय रहात नाही, सहकारी चळवळ आपल्या पायावर उभी रहावयाची असेल, तर त्यासाठी शिक्षणाच्या व प्रयत्नाच्या द्वारे किमान एवढ्या गोष्टी तरी केल्याच पाहिजेत. तेव्हां भारतामध्यें ही चळवळ फोफावण्याची व स्वतःच्या पाया-

वर उभी रहावयाची असेल तर उपरोक्त क्षेत्रात आपण कितपत प्रगति करतों यावर सर्व गोष्टी अवलंबून रहातील. तथापि भारतात सहकारी सभासदांच्या शिक्षणाचें पुढें काय होणार म्हणून कोणी विनाकारण निराश होण्याचे कारण नाही. यापूर्वीच उल्लेख करण्यात आल्याप्रमाणे, एक गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे कीं, जेथे सहकारी चळवळ ही मुख्यत्वें करून ग्राहक सहकारी चळवळीच्या स्वरूपाची आहे तेथें तिचें स्वरूप धंदेवाईकपणाचे असते. व त्या ठिकाणीं सहकारी शिक्षणावर विशेष भर देण्यात येतो; तीच कार्यपद्धति भारताला देखील प्राप्त परिस्थितीत लागू करणे क्रमप्राप्तच ठरेल. भारतांतील सहकारी चळवळ ही आणखी काहीकाळ तरी मुख्यत्वें करून कृषिप्रधान रहाणार व त्यामध्ये कर्ज आणि व्यापारी देवाण–घेवाण या दोन गोष्टींना महत्त्व रहाणार. छोट्या शेतकऱ्याला कर्जाची नेहमीच गरज रहाणार. सावकारीचा धंदा करणाऱ्या लोकांचें भांडवल कांही अंशी संपुष्टात येत आहे. उलटपक्षी आतां जें मोठें भांडवल उपलब्ध होत आहे तें शेतीच्या विकासाच्या पूर्वाकांक्षित योजनांच्या पूर्ततेसाठी. शेतकऱ्याना कर्ज मिळावें म्हणून सरकारनें सहकारी संस्थांना मान्यता देण्यास सुरुवात केली आहे तेव्हा आर्थिक कारणासाठी आज शेतकरी हा सहकारी पतपेढीचा सभासद बनत आहे. व त्या संघटनेमार्फत मिळणाऱ्या सवलतीचा फायदा घेण्यास प्रवृत्त झाला आहे. ग्राहक सहकारी संघटनाना आज जशी आपली गिऱ्हाईक टिकविण्यासाठी आपल्या सभासदाची मनधरणी करावी लागते व आश्रय टिकवून धरण्यासाठीं धडपडावें लागतें तसें काही शेतकऱ्यांच्या सहकारी पतपेढीला करावें लागणार नाही. तीच गोष्ट कमी प्रमाणात व्यापारी देवाण घेवाण करणाऱ्या अडत्यांच्या संस्थाना (Marketing Societies) लागू करतां येईल. आता सभासद करून घेण्यासाठीं, शेतकरी पतपेढ्या व खरेदी विक्री-संघ यांनी, सहकारी शिक्षणाच्या बाबतीत ग्राहक सहकारी संस्थांच्या मार्गानेंच जाण्याचें कांही प्रयोजन नाहीं. तथापि कोणत्याहि प्रकारची सहकारी संस्था झाली तरी सभासदाच्या शिक्षणाला नेहमीच प्राधान्य राहील; कारण सहकारी संस्था कार्यक्षम करण्यासाठी आवश्यक त्या तत्त्वांचे व कार्यपद्धतीचें महत्त्व सभासदांना पटवण्यावरच अशा संस्थांचें यशापयश अवलंबून रहातें. सभासदाना जर आवश्यक ज्ञान नसेल व त्यानी सुयोग्य दृष्टिकोण धारण केला नाही तर या स्वायत्त संस्थाची प्रगति होणें शक्य नाही

सभासदाच्या शिक्षणाच्या एकंदर व्यापावरूनच या क्षेत्रातील आपल्या कार्याचें मूल्यमापन ठरणार आहे. या कार्यासाठी लागणारी साधनसामुग्री मर्यादित आहे आणि कार्याचा व्याप मोठा व वाढता आहे. म्हणूनच या शिक्षणाला लागू पडेल तेवढाच कार्यक्रम व्यवस्थित आखला पाहिजे व कार्यकुशलतेनें त्याची अंमलबजावणी केली पाहिजे या कार्यांत प्रयत्न विफल होता कामा नये व जास्तीत जास्त यशाचा वांटा पदरांत पडला पाहिजे. सहकारी संस्थाच्या सभासदांची संख्या आजच लाखांच्या घरांत गेली आहे. आणि पुढील काही वर्षात जेव्हां सहकारी चळवळ फोफावेल व तिची द्रुतगतीनें वाढ होईल, तेव्हा ही संख्या अधिकच वाढत जाईल. त्यावेळी इतक्या सभासदापर्यंत आपल्या कार्याचें लोण पोहचवावायचें व त्यांना शिक्षण द्यावयाचें हेंच मूळांत साधनांच्य व नोकरवर्गाच्या दृष्टीनें किती तरी अजस्त्र काम होऊन बसेल. सहकारी चळवळ, यांत शेतकऱ्यांच्या पतपेढ्या व मार्केटिंग सोसायट्या देखील आल्या, जर खरोखरच भरभक्कम पायावर उभारावयाची असेल व ती स्वयंपूर्ण बनवायची असेल तर सभासदांच्या शिक्षणाला कमी महत्त्व देऊन चालणार नाही हे जरी खरें असलें तरी प्राप्त परिस्थितीत कमी खर्चाचा व सहजगत्या सांभाळतां येणारा असा कार्यक्रम आपणाला आंखावा लागेल. आणि या दृष्टिकोनातूनच असे सूचित करण्यात आलें आहे की, साम्प्रत आपण सभासदाच्या शिक्षणावर एवढा भर देऊ नये, तर सहकारी संस्थाना योग्य असें नेतृत्व शोधून काडावें व त्याला शिकवून तयार करण्याचें काम हाती घ्यावे. या नेतृत्यातून जे पदाधिकारी संभाव्य असतील त्यांची संख्या सभासदांच्या संख्येच्या मानानें कितीतरी कमी भरेल. व त्यांना शिक्षण देण्याचे काम सभासदाच्या शिक्षणापेक्षा कितीतरी सुलभ होईल. ज्या ठिकाणीं नेते जन्मजात असतात व जे नेतृत्वाच्या स्वाभाविक गुणधर्मानें उठून दिसतात त्या ठिकाणी सहकारी चळवळीचें लोण त्याच्यापर्यंत जाऊन पोचलें पाहिजे व त्याना सहकारी चळवळीची तत्त्वें व प्रत्यक्ष अंमलबजावणी याचे शिक्षण देण्यासाठी खास प्रयत्न केले पाहिजेत. मग अशा पुढाऱ्याना आवश्यक त्या अधिकृत मार्गदर्शनासाठी सहकारी संस्थांचा कारभार सहज पहाता येईल, अशी अपेक्षा करावयास हरकत नाही. आतां कांही ठिकाणी हे पुढारी आपल्या अधिकारांचा दुरुपयोग करण्याचा संभव आहे. अशा वेळी माहितगार व सुशिक्षित सभासदानी त्यांच्या अदाधुंदीच्या कारभाराला आपल्या अधिकाराचा अंकुश लावून ताळ्यावर आणावें. आता हें देखील शक्य आहे की काही बाबतीत चागलें नेतृत्व सहजासहजी उपलब्ध होणार नाही. अशा वेळी नवीन नेतृत्व निर्माण करण्याच्या दृष्टीने सभासदाच्या शिक्षणावर कसून भर देणें हीच श्रेयस्कर बाब होय. शिक्षणानें एक गोष्ट साध्य होण्याचा संभव असतो. ती म्हणजे काही सभासदामध्यें तरी नेतृत्व करण्याचा स्वाभाविक गुणधर्म असतो. आणि मग यातूनच कांही जणाना समाज सेवेसाठी प्रवृत्त करता येते. जेथें विद्यमान नेतृत्वाला संघटनेत आतून बंधन असण्याची आवश्यकता जाणवते अथवा जेथें चागलें नेतृत्व उपलब्ध नसतें तेथे सभासदांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविणें अगत्याचें ठरते. तरी सर्व शिकलेल्या सभासदानी आपल्यावरील जबाबदारी ओळखून त्याप्रमाणें वागावें.

एकदा कां हें नेतृत्व सुसंस्कृत सभासदाकडे गेले की, प्रत्येक सहकारी संस्थेतील पदाधिकारी आपापल्या सभासदांना शिकवून तयार करण्याची जबाबदारी पत्करतील. खरे पाहूं गेलें असता, प्रत्येक सहकारी संस्थेच्या सभासदांच्या शिक्षणाची जबाबदारी खास करून एका स्वतंत्र पदाधिकाऱ्याकडे सोपविली पाहिजे. आणि तशीच आवश्यकता वाटली तर त्याला पैशाचें आमिष देखील दाखवायला हरकत नाही. अशा पदाधिकाऱ्याला सहकारी चळवळीच्या तत्त्वाचे व कार्यपद्धतीचेच केवळ

वर उभी रहावयाची असेल तर उपरोक्त क्षेत्रात आपण जितपत प्रगति करतो यावर सर्व गोष्टी अवलंबून रहातील. तथापि भारतात सहकारी सभासदाच्या शिक्षणाचें पुढें काय होणार म्हणून कोणी विनाकारण निराश होण्याचें कारण नाही. यापूर्वीच उल्लेख करण्यांत आल्याप्रमाणे, एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे की, जेथें सहकारी चळवळ ही मुख्यत्वें करून ग्राहक सहकारी चळवळीच्या स्वरुपाची आहे तेथें तिचें स्वरूप धंदेवाईकपणाचें असतें. व त्या ठिकाणी सहकारी शिक्षणावर विशेष भर देण्यात येतो; तीच कार्यपद्धति भारताला देखील प्राप्त परिस्थितींत लागू करणे क्रमप्राप्तच ठरेल. भारतांतील सहकारी चळवळ ही आणखी काहीकाळ तरी मुख्यत्वें करून कृषिप्रधान रहाणार व त्यामध्यें कर्ज आणि व्यापारी देवाण–घेवाण या दोन गोष्टींना महत्त्व रहाणार. छोटया शेतकऱ्याला कर्जाची नेहमीच गरज रहाणार. सावकारीचा धंदा करणाऱ्या लोकांचे भांडवल काही अंशीं संपुष्टात येत आहे उलटपक्षी आता जे मोठें भांडवल उपलब्ध होत आहे तें शेतीच्या विकासाच्या पूर्वाकांक्षित योजनाच्या पूर्ततेसाठी. शेतकऱ्यांना कर्ज मिळावें म्हणून सरकारनें सहकारी संस्थांना मान्यता देण्यास सुरुवात केली आहे. तेव्हां अधिक कारणासाठी आज शेतकरी हा सहकारी पतपेढीचा सभासद बनत आहे. व त्या संघटनेमार्फत मिळणाऱ्या सवलतीचा फायदा घेण्यास प्रवृत्त झाला आहे ग्राहक सहकारी संघटनांना आज जशी आपली गिऱ्हाईक टिकविण्यासाठी आपल्या सभासदाची मनधरणी करावी लागते व आश्रय टिकवून धरण्यासाठी धडपडावें लागतें तसें काही शेतकऱ्याच्या सहकारी पतपेढीला करावें लागणार नाही. तीच गोष्ट कमी प्रमाणांत व्यापारी देवाण घेवाण करणाऱ्या अडत्यांच्या संस्थांना (Marketing Societies) लागू करता येईल. आता सभासद करून घेण्यासाठी, शेतकरी पतपेढया व खरेदी विक्री-संघ यांनी, सहकारी शिक्षणाच्या बाबतीत ग्राहक सहकारी संस्थांच्या मार्गानेंच जाण्याचे कांही प्रयोजन नाही. तथापि कोणत्याहि प्रकारची सहकारी संस्था झाली तरी सभासदाच्या शिक्षणाला नेहमीच प्राधान्य राहील; कारण सहकारी संस्था कार्यक्षम करण्यासाठी आवश्यक त्या तत्त्वाचें व कार्यपद्धतीचें महत्व सभासदाना पटवण्यावरच अशा संस्थाचें यशापयश अवलंबून रहातें. सभासदांना जर आवश्यक ज्ञान नसेल व त्यानी सुयोग्य दृष्टिकोण धारण केला नाही तर या स्वायत्त संस्थाची प्रगति होणें शक्य नाही.

सभासदाच्या शिक्षणाच्या एकंदर व्यापावरूनच या क्षेत्रातील आपल्या कार्याचे मूल्यमापन ठरणार आहे. या कार्यासाठी लागणारी साधनसामुग्री मर्यादित आहे आणि कार्याचा व्याप मोठा व वाढता आहे म्हणूनच या शिक्षणाला लागू पडेल तेवढाच कार्यक्रम व्यवस्थित आखला पाहिजे व कार्यकुशलतेनें त्याची अमलबजावणी केली पाहिजे या कार्यांत प्रयत्न विफल होता कामा नये व जास्तीत जास्त यशाचा वाटा पदरात पडला पाहिजे. सहकारी संस्थांच्या सभासदांची संख्या आजच लाखाच्या घरात गेली आहे. आणि पुढील काही वर्षांत जेव्हां सहकारी चळवळ फोफावेल व तिची द्रुतगतीनें वाढ होईल, तेव्हा ही संख्या अधिकच वाढत जाईल त्यावेळी इतक्या सभासदापर्यंत आपल्या कार्याचें लोण पोहचवावयाचे व त्याना शिक्षण द्यावयाचे हेंच मूळात साधनांच्य व नोकरवर्गाच्या दृष्टीनें किती तरी अजस्त्र काम होऊन बसेल. सहकारी चळवळ, यांत शेतकऱ्यांच्या पतपेढया व मार्केटिंग सोसायटया देखील आल्या, जर खरोखरच भरभक्कम पायावर उभारावयाची असेल व ती स्वयंपूर्ण बनवायची असेल तर सभासदाच्या शिक्षणाला कमी महत्त्व देऊन चालणार नाही हें जरी खरे असलें तरी प्राप्त परिस्थितीत कमी खर्चाचा व सहजगत्या सांभाळता येणारा असा कार्यक्रम आपणाला आखावा लागेल आणि या दृष्टिकोनातूनच असे सूचित करण्यात आलें आहे की,सांप्रत आपण सभासदाच्या शिक्षणावर एवढा भर देऊं नये, तर सहकारी संस्थाना योग्य असे नेतृत्व शोधून काढावें व त्याला शिकवून तयार करण्याचें काम हाती घ्यावें या नेतृत्वातून जे पदाधिकारी संभाव्य असतील त्याची संख्या सभासदाच्या संख्येच्या मानाने कितीतरी कमी भरेल. व त्यांना शिक्षण देण्याचें काम सभासदाच्या शिक्षणापेक्षा कितीतरी सुलभ होईल. ज्या ठिकाणी नेते जन्मजात असतात व जे नेतृत्वाच्या स्वाभाविक गुणधर्मानें उठून दिसतात त्या ठिकाणी सहकारी चळवळीचें लोण त्याच्यापर्यंत जाऊन पोचलें पाहिजे व त्याना सहकारी चळवळीची तत्त्वें व प्रत्यक्ष अंमलबजावणी याचें शिक्षण देण्यासाठी खास प्रयत्न केले पाहिजेत मग अशा पुढाऱ्याना आवश्यक त्या अधिकृत मार्गदर्शनासाठी सहकारी संस्थाचा कारभार सहज पहाता येईल, अशी अपेक्षा करावयास हरकत नाही. आतां काही ठिकाणी हे पुढारी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करण्याचा संभव आहे अशा वेळी माहितगार व सुशिक्षित सभासदानी त्यांच्या अंदाधुंदीच्या कारभाराला आपल्या अधिकाराचा अंकुश लावून ताळ्यावर आणावें. आता हें देखील शक्य आहे की काही बाबतीत चांगलें नेतृत्व सहजासहजी उपलब्ध होणार नाही. अशा वेळी नवीन नेतृत्व निर्माण करण्याच्या दृष्टीनें सभासदांच्या शिक्षणावर कसून भर देणें हीच श्रेयस्कर बाब होय. शिक्षणानें एक गोष्ट साध्य होण्याचा संभव असतो. ती म्हणजे काही सभासदामध्यें तरी नेतृत्व करण्याचा स्वाभाविक गुणधर्म असतो. आणि मग यातूनच काही जणाना समाज सेवेसाठी प्रवृत्त करता येते जेथे विद्यमान नेतृत्वाला संघटनेंत बांधून बंधन असण्याची आवश्यकता जाणवते अथवा जेथें चांगलें नेतृत्व उपलब्ध नसतें तेथे सभासदांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविणें अगत्याचे ठरते तरी सर्व शिकलेल्या सभासदानी आपल्यावरील जबाबदारी ओळखून त्याप्रमाणें वागावें.

एकदा का हें नेतृत्व सुसंस्कृत सभासदाकडे गेलें की, प्रत्येक सहकारी संस्थेंतील पदाधिकारी आपापल्या सभासदाना शिकवून तयार करण्याची जबाबदारी पत्करतील खरे पाहूं गेलें असता, प्रत्येक सहकारी संस्थेच्या सभासदाच्या शिक्षणाची जबाबदारी खास करून एका स्वतंत्र पदाधिकाऱ्याकडे सोंपविली पाहिजे. आणि तशीच आवश्यकता वाटली तर त्याला पैशाचें आमिष देखील दाखवायला हरकत नाही अशा पदाधिकाऱ्याला सहकारी चळवळीच्या तत्त्वाचे व कार्यपद्धतीचेच केवळ

शिक्षण देऊन भागणार नाही, तर अध्यापनाचें शास्त्र देखील त्याला शिकविणें उचित होईल.

## भारतातील सभासदाच्या शिक्षणाचे तंत्रविशेष

भारतात सभासदाना शिक्षण देण्याची पद्धत ही अर्थातच् पाश्चात्य देशातील पद्धतीपेक्षा वेगळी असेल. या देशात खेड्यातील शिक्षणाचा दर्जा तसेच साक्षरतेचें प्रमाण कितीतरी कमी आहे. त्याच-प्रमाणें हा दर्जा व प्रमाण सुधारण्यासाठी कांहीं साधनांचा उपयोग करावयाचा म्हटलें तर ती देखील मर्यादित आहेत. स्त्रिया तर बहुताशी निरक्षरच आहेत. तेव्हा पाक्षिकें, स्त्रियाच्या संघटणा, सायंकाळचे सामाजिक समारंभ वगैरेचा जसा पाश्चात्य देशातून इष्ट परिणाम होतो तसा काही भारतात होऊ शकणार नाही. तेव्हा मापूर्वी सुचविल्याप्रमाणें नवें नेतृत्व म्हणजे पदाधिकारी निर्माण करण्याच्या दृष्टीनें प्रयत्न झाले पाहिजेत. व त्याना प्रथम शिक्षण दिलें पाहिजे जर असें नेतृत्व उपलब्ध होत नसेल किंवा सहकारी संस्थेच्या बाबतीत ते योग्य रीतीने कार्यक्षम होत नसेल तर सभासदाच्या शिक्षणाला प्राधान्य द्यावे, असें देखील सुचविण्यात आलें आहे. तेव्हा या सर्व गोष्टीचा नीट विचार करून सभासदाच्या शिक्षणासाठी पुढील योजना सुचविना येतील.

सहकारी संस्था जर व्यवस्थित चालवायच्या असतील तर सभासद, पदाधिकारी, सरकारी अधिकारी, वगैरेंच्या सभाना फार महत्त्वाची कामगिरी बजावावी लागेल त्याचे महत्त्व नेहमीच राहील; कारण अशा समातून, सभासद व पदाधिकारी याना एकत्रित येण्याची संधी लाभेल व त्यानी आपल्या सहकारी संस्थेच्या कारभाराची माहिती, त्याच्या संस्थेची प्रगति व कारभार याचीहि माहिती मिळू शकेल. तसेंच सभासदाची कर्तव्यें कोणती व त्याना काय अधिकार आहेत, या ज्ञानाची-देखील आपोआप उजळणी होईल.

पदाधिकाऱ्याच्या शिक्षणासाठी सध्या ' स्टेट कॉपरेटिव्ह युनियन्स'नी अभ्यासाचे फिरते वर्ग चालू केले आहेत. ते फार उपयुक्त आहेत. पदाधिकाऱ्याचा सोयीस्कर अशा ठिकाणी व वेळेला हे अभ्यासाचे वर्ग चालविण्यात आले व त्याना हे पदाधिकारी हजर राहिले तर ज्या सहकारी संस्थाचा कारभार ते पहाणार आहेत त्याची तत्वें काय आहेत व कार्य पद्धति कशी आहे याचें ज्ञान प्राप्त करून घेण्याची ती चागली संधी ठरेल. या फिरत्या वर्गाचे यश शिक्षकाच्या लायकीवरून ठरणार आहे *ही या अभ्यास क्रमातील महत्त्वाची बाब होय. या शिक्षकाना केवळ* सहकारी चळवळीची तत्त्वें व कार्यपद्धति याचीच तेवढी संपूर्ण माहिती असून कार्यभाग साधणार नाही. तर त्याना शिक्षकाच्या पेशाची आवड, तो सांभाळण्याचे सामर्थ्य व त्याचे स्वतःचे योग्य तऱ्हेनें झालेले शिक्षण या गोष्टी देखील आवश्यक आहेत दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, या अभ्यासक्रमाच्या दृष्टीनें उपयुक्त असे साहित्य उपलब्ध झालें पाहिजे. जेव्हा योग्य असें वाङ्मय तयार करून घेणें व ते प्रसिद्ध करणें ही सहकारी सघटणा व इतर सबधित संस्था याची खास जबाबदारी आहे अशा अभ्यासक्रमात ' दृक्–श्राव्य ' साधनें उपलब्ध झाली तर त्यामुळे बराच मोठा कार्यभाग साध्य होण्याचा संभव आहे. खेडेगावातील नेत्याना सहकारी संस्थाच्या तत्त्वाची व कामाची माहिती करून देण्यासाठी लहान मोठे चित्रपट, मॅजिक् लॅटर्नच्या सहाय्यानें दाखवावयाच्या ' स्लाईड्स् ' नकाशे– तक्ते वगैरेचा उपयोग केला पाहिजे

लहान मोठ्या गावातून सभा व फिरते वर्ग याचा उपयोग काही प्रमाणात देशांत करण्यात येत आहे. या व्यतिरिक्त आणखी काही योजना सुचविना येतील. सेन्ट्रल कॉपरेटिव्ह बँकाच्या सुपरवायझराकडे सहकारी संस्थाच्या पदाधिकाऱ्याना शिक्षण देण्याचे काम सोपविण्यात यावें. त्याचा सहकारी संस्थाच्या कारभाराशी प्रत्यक्ष संबंध येत असल्या कारणानें त्याना स्थानिक लायक अधिकारी निवडून काढता येतील; तसेंच प्रत्येक सहकारी संस्थेच्या अडीअडचणी काय आहेत याचेदेखील त्याना ज्ञान असतें. त्याच्या पाठीशी भाडवलदार संस्थेची सत्ता व प्रतिष्ठा ही दोन्ही असल्याकारणाने त्याच्या बोलण्याकडे लक्ष तरी दिलें जाईल.

पदाधिकाऱ्याच्या शिक्षणासाठी पत्रव्यवहाराच्या अभ्यासक्रमाचा उपयोग करून घ्यावा असें देखील एक मत आहे. हे पदाधिकारी शिकलेले असतात. त्याना पत्रव्यवहाराच्या अभ्यासक्रमाचे धडे घेण्यास प्रवृत्त करता येईल कारण या अभ्यासासाठी ज्याना आपलें खेडें सोडून दूर जाणें जमणार नाही. त्याना घरी बसून फुरसतीनें अभ्यास करता येईल. एखाद्या सहकारी संस्थेच्या सर्व पदाधिकाऱ्याना मिळून पत्रव्यवहाराचा अभ्यासक्रम घेता येईल पत्रव्यवहाराच्या द्वारे आलेले धडे एकत्र बसून वाचण्याची व त्यावर चर्चा करण्याची संधी त्याना लाभेल व हे सर्व त्याच्या दृष्टीनें फायदेशीर होईल. पदाधिकाऱ्यासाठी निरीक्षण-दौरे योजण्यांत यावे असें देखील सुचविता येईल आपल्या आजूबाजूच्या सहकारी संस्थाचा कारभार कसा व्यवस्थित चालला आहे आणि त्या कोणत्या तत्त्वाचा व कार्यपद्धतीचा अवलंब करतात, हें प्रत्यक्ष जाऊन पहाणें याहून अधिक परिणामकारक व उपयुक्त अशी कार्यपद्धति खेडेगावातील नेत्यासाठी अन्य असण्याचा संभव नाही गेडेगावातील नेत्याच्या योग्य अशा तुकड्या पाडून त्याना आजूबाजूच्या प्रदेशातून फिरवून आणता येईल अशा प्रकारच्या निरीक्षण-दौऱ्यामुळें आपल्या सहकारी संस्था चागल्या रीतीनें कशा चालवाव्या याचे ज्ञान तर त्याना होईलच, शिवाय सहकारी संस्थामध्यें परस्पर बंधुभाव कसा नादतो व त्यामुळें सहकारी चळवळीच्या कार्याला कशी चालना मिळते याची देखील त्याना यथार्थ कल्पना येईल ★★★






# लघुउद्योगांचा विकास
## नागरी सहकारी बँका

श्री. व्ही. पी. वर्दे



गरी सहकारी बँका सामान्य माणसाच्या आर्थिक जीवनात महत्त्वाची कामगिरी बजावतात स्वातंत्र्यपूर्वकाली मुख्य भर अनुत्पादक कामावर म्हणजे सावकाराकडून भारी व्याजानें घेतलेल्या कर्जाची फेड, लग्न, मुंजी वगैरे सारख्या समारंभाप्रीत्यर्थ होणारे खर्च यावर भर असे. स्वातंत्र्यानंतर सहकारी नागरी बँकाचे कार्यक्षेत्र विकसनशील अर्थजीवनाच्या गरजा भागविण्यासाठी जॉइंट स्टॉक बँकाच्या वळणावर चालले आहे. पूर्वी व्यापारी बँकिंगचें काम केल्याबद्दल नागरी बँकावर रिझर्व्ह बँक ऑफ इंडियासह सर्वाकडून खूप टीका होत असे. आपल्याकडील शिल्की (Surplus) पैशाला फायदेशीर गिऱ्हाईक मिळविणें ही त्या काळात नागरी बँकापुढील समस्या होती आणि आजही चांगल्या प्रकारे चालविलेल्या नागरी बँकांपुढें तोच प्रश्न आहे. विकसनशील अर्थव्यवस्थेत नागरी बँकांकडील वाढत्या शिल्की गुंतविण्यासाठी लघु उद्योग हें उत्कृष्ट साधन आहे.

पण लघु उद्योग म्हणजे तरी कोणता ? लघुउद्योग मंडळानें केलेल्या व्याख्येनुसार पांच लाखापेक्षा कमी भांडवल ज्यांत गुंतविलें असेल आणि ज्यात ( अ ) प्रत्येक पाळीस ५० पेक्षा कमी माणसें असून विजेचा उपयोग केला जात असेल, किंवा ( आ ) प्रत्येक पाळीस शंभरपेक्षां अधिक माणसें असून वीज वापरली जात नसेल तर ते सर्व कारखाने अगर उद्योग लघुउद्योग मानले जातात.

या लघुउद्योगाच्या आर्थिक गरजा नागरी बँक कशा भागवू शकेल हा आपल्यापुढील प्रश्न आहे.

या गरजा समजण्यासाठी औद्योगिक संस्था ज्या निरनिराळया अवस्यातून जाते त्या अवस्था आधी समजावून घेऊ या.

प्रथम लहान कारखानदाराला कारखान्यासाठी जमीन, ती बांधण्यासाठी आवश्यक साहित्य व यंत्रे लागतात त्याच्याजवळ स्वत चे भांडवल असावें लागतें, तें सामान्यत या तीन बाबींच्या एकूण खर्चाच्या ५० ते ६० टक्के असतें. बाकीच्या रकमेसाठी तो आपल्या बँकेवर किंवा आपली गरज भागवू शकेल अशा एखाद्या संस्थेवर अवलंबून असतो

या ठिकाणी असा प्रश्न उत्पन्न होतो कीं (१) जमीन खरेदी करून तीवर बांधकाम करण्यासाठी आणि (२) यंत्रे व कारखाना विकत घेण्यासाठीं, उद्योगधंदा सुरू करण्याची इच्छा असलेल्याना पैसा पुर-



विणें ही गोष्ट नागरी बँकेच्या कायदेशीर कार्यक्षेत्रात येते काय ? कारण, जमीन वा इमारती किंवा यंत्रें ही स्थायी मालमत्ता असून त्यापासूनची वसुली धंद्यातील नफ्यातून १०–१५ वर्षांनी व्हावयाची असते. अशा कामासाठी पैसे उसने देणें म्हणजे इतके दिवस पैसा अडकवून ठेवणें होय. उलट नागरी बँकांना ठेवींच्या रूपानें मिळणारा पैसा अल्प मुदतीसाठी असतो म्हणून तात्त्विक दृष्ट्या नागरी बँका अल्प मुदतीनें कर्जे काढून दीर्घ मुदतीसाठी देऊ शकत नाहीत. अशा दीर्घ मुदतीच्या गरजा भागविण्यासाठी स्टेट फिनान्शियल कॉर्पोरेशन्ससारख्या विशिष्ट संघटना असतात. नॅशनल स्मॉल स्केल इंडस्ट्रीज कॉर्पोरेशन ( सरकार पुरस्कृत संघटना ) ही छोट्या कारखानदारांना भाडेखरेदी पद्धतीनें दरसाल ४ टक्के व्याजासह वीस वर्षांत मुद्दल फेडण्याच्या अटीवर यंत्रासाठी पैसे देते. तथापि, स्टेट फिनान्शियल कॉर्पोरेशनकडून कर्ज मंजूर होण्यापर्यंतच्या मध्यंतर काळात नागरी बँका छोट्या कारखानदारांना कर्जे पुरवू शकतात. स्टेट फिनान्शियल कॉर्पोरेशनला समाधानकारक आर्थिक स्थिति असल्याचा निर्वाळा पुरवून नागरी बँका छोट्या कारखानदारांना मदत करू शकतात. असा निर्वाळा देण्यानें कॉर्पोरेशनला त्यांच्या अर्जांचा निकाल लवकर देण्यास मदत होते. नागरी बँकांकडून मिळू शकणाऱ्या या मध्यंतर सहाय्यामुळें (interim Accomadation) कित्येक कारखानदारांना आपल्या योजना वेळेवर अमलांत आणणें शक्य झालें आहे. त्यांच्या दीर्घकालीन कर्जांच्या गरजा स्टेट फिनान्शियल कॉर्पोरेशन व इतर तत्सम संस्थांनी भागवाव्यात इतकी पतही त्यांनी लहान कारखानदारांना प्राप्त करून दिली आहे. नागरी बँकांनी ही प्राथमिक तयारी करून दिली नसती तर पुष्कळसे उद्योग आज जन्मासही आले नसते.

नागरी बँकेच्या मदतीनें कारखाना व यंत्रें स्थापन केल्यानंतर पुढील काम मालाच्या उत्पादनाचे, त्यासाठी कच्चा माल हवा. धंदा सुरळीत चालावयाचा तर चार पांच महिन्यांचा तरी कच्च्या मालाचा साठा असणें आवश्यक आणि त्याचा सतत पुरवठा होत राहील अशी व्यवस्था हवी. या साठ्यापैकी काही माल नेहमी अंतिम उत्पादन तयार करण्यासाठी प्रक्रिया करण्याच्या अवस्थेत राहतो.

पुष्कळ वेळा कच्चा माल या देशात उपलब्ध नसतो व म्हणून तो परदेशातून आणवावा लागतो. निर्यातकार आयातकाराला फक्त त्याच्या बँकेमार्फतच ओळखतो म्हणून निर्यातकारासाठी "लेटर ऑफ क्रेडिट" उघडण्याकरिता कारखानदाराला त्याच्या नागरी बँकेमार्फत खटपट करावी लागते. परंतु परकी चलनाचा व्यवहार प्रत्यक्षपणें करू दिला जात नाही. त्यामुळें त्याना एखाद्या एक्स्चेंज बँकेमार्फत " लेटर ऑफ क्रेडिट " आपल्या गिऱ्हाईकातर्फे उघडावें लागतें, आणि आयात केलेला माल जेव्हां आणि जसा येईल तसे त्याच्या किमतीचे ड्राफ्ट सोडविण्याची हमी द्यावी लागते. नागरी बँक ही सर्व खटपट छोट्या कारखानदाराच्यावतीनें करते; त्यासाठी थोडें कमिशन घेते व कच्च्या

मालाच्या किमतीवर १० ते १५ टक्के " मार्जिन " घते कच्चा माल आला की, कारखानदाराला त्याचे पैसे चुकते करावे लागतात; पण त्यासाठी त्याचेजवळ पुरेसे पैसे नसतील तर नागरी बँक मालाच्या तारणावर कारखानदाराला पैसे देण्यास तयार असते.

पक्का माल तयार झाल्यानंतर त्याची विक्री करावी लागते. पक्क्या मालाची विक्री बहुधा १–२ महिन्याच्या उधारीने करावी लागते अशा प्रकारे पुष्कळशा गिऱ्हाइकाना माल विकावयाचा असतो व त्याच्याकडून पैसे घ्यावयाचे असतात. तांत्रिक दृष्ट्या या गिऱ्हाईकाना "व्यापारी कर्जदार " म्हणतात. मालविक्रीची किंमत हाती पडेपर्यंत लहान कारखानदाराचे भांडवल या प्रक्रियात अडकून पडते. यात नोकर वर्गाचे पगार व मजुरी आणि इतर संबंधित खर्च यांची भर पडते. ज्याना माल विकलेला असतो त्या व्यापाऱ्याकडून पैसा परत आला म्हणजे गुंतलेलें भांडवल मोकळें होणार. ते पुन. आणखी उत्पादन वाढविण्यासाठी वरील प्रक्रियात गुंतून राहतें.

कच्चा माल, चालू कामे, तयार माल व उधारीने माल घेणारे (Trade debtors) याच्यासाठी गुंतून पडलेलें भांडवल हे तांत्रिक दृष्ट्या खेळतें भांडवल म्हणून ओळखलें जातें. हे मूलत: अल्प मुदतीचे असते हें आपण पाहिले. पण त्याचबरोबर हें फिरतें किंवा आवर्तक स्वरूपाचेहि असतें. शिवाय एक दोन महिन्याच्या उधारीची सोय नसली तर लहान कारखानदाराला कच्च्या मालाच्या खरेदीसाठी भांडवल लागतें. तेवढ्यापुरती त्याची खेळत्या भांडवलाची गरज कमी होते ज्याच्याकडून ते कच्चा माल विकत घेतात त्याना " ट्रेड क्रेडिटर्स " (Trade Creditors) असें पारिभाषिक नाव आहे.

अर्थातच लहान कारखानदाराला आवर्तक भांडवलाचा अखंड प्रवाह ठेवावा लागतो व यावाबत त्याला नागरी बँकाचा फार उपयोग होतो कर्जाची रक्कम ठरविण्यासाठी बँकेनें वेळोवेळी कच्च्या मालाचा साठा चालू कामे व ट्रेड डेटर्स याचा आढावा घ्यावा लागतो. या आकड्याचे विश्लेषण करून कच्चा माल, चालू कामे व ट्रेड डेटर्स याच्या एकूण खर्चाचा ६० ते ७० टक्के इतकी तरतूद बँकेतर्फे केली जाते

ही पद्धति यशस्वी होण्यासाठीं छोट्या कारखानदारानी हिशेबाच्या योग्य वह्या, व कच्च्या मालाच्या साठ्याचे बिनचूक टिपण ठेवलें पाहिजे आणि आलेले सर्व पैसे प्रामाणिकपणें बँकेत टाकून बँकेच्या खात्यातून देणी दिली पाहिजेत. आगाऊ दिलेल्या पैशाला तारण, कच्च्या मालाचा सांठा, चालू कामें व तयार माल याचे असतें. कारखानदाराला हा माल उत्पादनासाठी नेहमी लागत असल्यामुळें तो वखारीत ठेवणें शक्य नसतें. तारण फिरतें असतें आणि कारखानदाराच्या विश्वासावर तो बँकेने सोडविलेला असतो व मालविक्रीच्या पैशातून बँकेचे देणें भागवयाचे असतें.

म्हणून पैसे आगाऊ देताना बँक कर्जदाराच्या विश्वसनीयतेचा विचार करते. कारखान्याच्या आर्थिक स्थितीच्या काही कसोट्या असतात त्या थोडक्यात खालील प्रमाणें :

१. बँकखात्यावर झालेल्या जमेच्या आधारे विक्रीची तपासणी. विकून आलेल्या सर्व रकमा बँकेत टाकावयाच्या असल्यामुळें जमेचा आकडा सामान्यत विक्रीशी जमला पाहिजे. ट्रेड डेटर्सना उधारीनें विकलेल्या मालाचा हिशेबही करावा लागेल.

२. बँकेच्या खात्यांतील रकमाच्या उचलीशी खरेदीची तुलना. व्यवस्थेच्या व संबंधित खर्चाव्यतिरिक्त या बाबी जमल्या पाहिजेत

३. विक्रीच्या संबधात ट्रेड डेटर्सचे प्रमाण हे प्रमाण ३ ते ४ महिन्याच्या विक्रीइतके पडत असेल तर तें ठीक आहे, तें त्यापेक्षा जास्त पडत असेल तर वसुली समाधानकारक नाही आणि ट्रेड डेटर्स वाईट असण्याची शक्यता आहे.

४. सर्व ट्रेड डेटर्स खरेखुरे आहेत काय याची तपासणी हिशेबाच्या वह्या तपासून त्याच्या खाती झालेल्या व्यवहारावरून करावी. पुष्कळ वेळा बनावट कर्जदाराच्या नावें मालक, भागीदार व डायरेक्टर भांडवल काढून घेत असतात त्याबाबत जागरूक राहिले पाहिजे.

५. ट्रेड क्रेडिटर्सचे विश्लेषण व किरकोळ देणेकरांचे एकूण खरेदीशी प्रमाण. हे प्रमाण २–३ महिन्याच्या खरेदीइतकें असेल तर ठीक आहे त्यापेक्षा अधिक असेल तर आणखी तपासणीची आवश्यकता आहे.

६. एकूण नफा व निव्वळ नफा याचे विक्रीच्या अनुषंगाने प्रमाण. इतर प्रतिस्पर्धी धंद्याशी याची तुलना करावी लागेल

७. तोटा आला असता ताळेबंदात मालमत्तेच्या बाजूस दिसणारी तोट्याची रकम व भरणा केलेले भांडवल याची तुलना करावी लागेल त्यामुळें भांडवलातील घट आणि कंपनीची स्थिरता याची कल्पना येईल

८. भरणा झालेलें भांडवल, कर्जाऊ भांडवल, सावकाराकडून मिळविलेल्या हुंडीच्या रकमा, व त्याच्या परस्पर प्रमाणाचे आंकडे.

व्यापारी कर्जदाराच्या प्रमाणात भांडवलपुरवठ्याचा विचार करताना पूरक उद्योगाची भूमिका विचारात घेणें मनोरंजक ठरेल " पूरक उद्योग " म्हणजे मोठ्या कारखान्याना सुटे भाग पुरविणारे लहान धंदे टाटा, व्होल्टास्, फिलिप्स, बिर्ला, किर्लोस्कर वगैरे मोठ्या औद्योगिक घटकाना निरनिराळे सुटे भाग लागतात या गरजा त्या विशिष्ट भागाचे उत्पादन करण्यात नैपुण्य मिळविलेल्या लहान कारखानदाराकडून करून घेणें त्याना स्वस्त पडते केलेल्या कामासाठी मोठ्या घटकाकडून येणें असलेल्या बिलाच्या आधारे या छोट्या घटकांना पैसा पुरविणें नागरी बँकाना अधिक सोपें असते मोठ्या घटकाकडून येणें असलेल्या बिलाच्या ७५ ते ८० टक्के इतक्या रकमा बँका ॲडव्हान्स देतात.

मान्यता दिलेल्या घटनांकडून यावयाच्या बिलाच्या हिशेबानेही अशी व्यवस्था करता येईल.

भारत सरकारने रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाच्या सल्ल्याने छोट्या उद्योगांना कर्जे देण्यासाठी तयार केलेल्या गॅरंटी योजनेचाहि उल्लेख केला पाहिजे. या योजनेप्रमाणे रिझर्व्ह बँकेची नेमणूक या योजनेसाठी भारत सरकारचे एजंट म्हणून झाली असून तिला " गॅरंटी ऑर्गनायझेशन ", असे संबोधण्यात येते. या गॅरंटी योजनेचा हेतु लघुउद्योगांना बँकांकडून अधिक कर्जे देणाऱ्या संस्थांना संभाव्य तोट्याबाबत हमी देण्याचा आहे. कर्जे देणाऱ्या संस्था व भारत सरकार यांनी हे तोटे वाटून घेण्याची ही योजना आहे. कोणत्याहि एका ॲडव्हान्सपोटी जास्तीत जास्त एक लाख रुपये मिळविण्याची ही योजना आहे. गॅरंटीचे रक्षण मिळण्यासाठी वार्षिक ½ टक्का आकार ठेवला आहे. अखेरीस येणाऱ्या तोट्यापैकी कमीतकमी २५ टक्के तोटा सहन करण्याची तयारी शिखर (Apex) बँकेने पत्करली तर निवडक नागरी बँकांना ही योजना लागू केली जाईल.

ही योजना अद्यापि प्रायोगिक स्थितीत आहे व नागरी बँकांनी तिचा प्रयोग केलेला नाही. तेव्हां आजच तिच्याविषयी मत देणे अस्थानी ठरेल. तथापि, निवडक नागरी बँकांनी या योजनेचा फायदा घ्यावा आणि लघु उद्योगांना भांडवलपुरवठा वाढत्या प्रमाणात उपलब्ध करून द्यावा असा सल्ला आहे.








# सहकारी शेती

श्री. डी. अेम. जाखडे
डे. इकॉनमिक अॅडव्हाइझर
. रिझर्व्ह बँक .




हिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळात सामाजिक उद्दिष्टें नजरेसमोर ठेवून जमीनविषयक धोरणें आखण्यात आली, त्याचप्रमाणें पुढील काही वर्षे शेतीच्या उत्पादनवाढीला विशेष अग्रस्थानहि देण्यांत आलें. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात हाती घेण्यात आलेल्या औद्योगिक विकासाच्या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमामुळेहि कच्चा माल आणि अन्नधान्यें याना मोठी आणि सतत वाढती मागणी निर्माण झालेली आहे अशा प्रकारे औद्योगिक विकासाची गरज आणि योजनेच्या उद्दिष्टाची पूर्तता दोन्ही दृष्टींनी शेतीच्या उत्पादनात वाढीचा आग्रह धरणें आणि या वाढीला पोषक ठरेल अशी प्रगतिपर व्यवस्था निर्धारित करून तिच्या अमलबजावणीची कामें तातडीची झाली आहेत.

आजच्या कृषि व्यवस्थेतील लहानशी व आर्थिक दृष्ट्या तोट्याची असलेलीं शेतें ग्रामीण अर्थजीवनाच्या त्वरित विकासाच्या आड येतात असा युक्तिवाद करण्यात आला. कृषिव्यवस्थेतील या मूलभूत समस्येवर रामबाण उपाय म्हणून सहकारी शेतीची सूचना करण्यात आली. सहकारी शेतीच्या विषयावर खूप वादविवाद विशेषतः दुसऱ्या योजनेच्या उत्तर काळात झाला. आता आपण तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या तोंडाशी येऊन ठेपलो आहोत तोपर्यंत सहकारी शेतीविषयीचा पूर्वीचा विरोध बराचसा मावळला आहे. या वादविवादाचा काही भाग निव्वळ तात्त्विक म्हणजे अनुभवाचा विशेषत भारतातील सहकारी शेतीच्या अनुभवाचा आधार नसलेला होता या वादाच्या धुराळ्यामुळें सबंध सहकारी शेतीविषयीच काहीसे संशयाचे वातावरण निर्माण झालें आहे. त्यामुळें ध्येयवाद अगर तात्त्विक आवडी निवडी यावर भर देण्याऐवजी सहकारी शेतीची परिणामकारक संघटना देशात उभारताना येणाऱ्या व्यावहारिक अडचणींवरच अधिक भर देणें श्रेयस्कर होणार आहे तिसऱ्या योजनेच्या काळात सहकारी शेती विभागाचा विस्तार करताना योजनाकाराना येणाऱ्या अडचणींचा विचार या लेखात केला आहे.

### अमेरिकन पार्श्वभूमि

कृषिविषयक अर्थशास्त्राच्या एकदोन मूलभूत गोष्टी आधीच सांगून ठेवणें उपयुक्त ठरेल सहकारी शेतीचा कार्यक्रम योजण्यास या गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत भारतीय शेतीचें क्षेत्र अत्यंत कमी असणें हें



तर समंधुन आहेत. मेंगनल मोगल गबूंगाठी जमविण्यात आलेल्या आकडयावरून असे दिसते की, भारतातील ७१ टक्के शेतकऱ्याजवळ ५ एकरापेक्षा कमी असतील असे शेतीचे तुकडे आहेत ( परिशिष्ट पहा ) उलटपक्षी ४ टक्के कुटुंबाकडे प्रत्येकी २५ एकरापेक्षा अधिक जमीन आहे. बहुसंख्य शेतीचे तुकडे अत्यंत लहान आहेत ही गोष्ट ग्रामीण पतपुरवठा समितीच्या अहवालातहि नमूद केली आहे. शेतीच्या वहु उत्पन्नाविषयीचे आकडे इतके प्रस्थात आहेत की, ते पुनः येथे देण्याचे कारण नाही. या आकडयावरून निघणारा मुख्य निष्कर्ष इतकाच की, " भारतातील निदान निम्मी शेती करणाऱ्या कुटुंबाकडील जमीन अशी आहे की, विकसनशील अर्थव्यवस्थेत जमीन उपयोगात आणण्याचे स्वतंत्र घटक म्हणून त्याचा विचारहि करता येणार नाही. "*

शेतीचे उत्पादन वाढविण्यासाठी, एवढेच काय. सामान्यतः सुधारलेली शेतीची तंत्रे सुधारण्यासाठीहि जमीनव्यवस्थेचा घटक वाढविणे अत्यावश्यक झाले आहे.

शेतीची त्वरित सुधारणा होण्याच्या आणि उत्पादनवाढीच्या मार्गातील खरी अडचण, भारतातील कौटुंबिक शेती पद्धतीमुळे निर्माण झाली आहे. " शेतकऱ्याला वैयक्तिकरीत्या किती पैसा खर्चावा लागतो आणि त्याला मोबदला काय मिळतो हेच पाहिले जाते. सामाजिक खर्च आणि फायदा याचा विचारच या पद्धतीत होत नाही. " शेतीच्या सुधारणेसाठी आवश्यक असे भांडवली खर्चाचे पुष्कळ प्रकार आहेत व ते अंगावर घेणे वैयक्तिक शेतकऱ्याला शक्य नसते म्हणून काही तरी सहकारी अगर सरकारी योजना जरूर आहे.

.आजच्या परिस्थितीत जमिनीचे रक्षण, ती सपाट करणे, निचरा काय घालणे, शेतात पाट सोडणे वगैरे कामांना अनेक अडचणी येतात. सर्व साधने एकत्र करता आली आणि वैयक्तिक मालकी कायम ठेवली तर असा कार्यक्रम हाती घेणे शक्य होईल. सहकारी शेतीचा स्वीकार केला म्हणजे अशा प्रकारे सहकारी विभागात उत्पादक रोजगारीला वाव वाढतो. शिवाय, आजच्या परिस्थितीत वैयक्तिक शेतकरी आपल्या लहानशा घटकाला अडकलेले राहतात. त्यांची फालतू श्रमशक्ति पण सहकारी शेतीमुळे मोकळी होईल. हल्ली या लोकांना पुरेसे काम नसले तरी ते दुसऱ्या कामासाठीहि मिळू शकत नाहीत. अर्थात् प्रारंभिक अवस्थेत बेकारीचा आघात अधिक जोराने जाणवेल, कारण या पद्धतीत छुपी बेकारी स्वाभाविकपणेच उघड बेकारीत रूपांतर पावणार आहे. या आव्हानाला जितक्या प्रमाणात तोंड देता येईल त्यावर सहकारी शेतीचे यश काही अंशी अवलंबून राहील. शेतीला पूरक असे धंदे, पशुपालन अगर दुग्ध व्यवसाय यांना सहकारी शेतीमुळे अधिक चांगला वाव मिळेल. त्याच प्रमाणे शेतीच्या पद्धतीत सुधारणा आणि अधिक संयुक्तिक अशी पीक व्यवस्था यानाहि सहकारी शेतीतच वाव मिळतो.

सहकारी शेतीने साधणारे आणखी एक महत्त्वाचे उद्दिष्ट आहे भांडवलाची उभारणी आणि शहरी उपयोगासाठी पुरेसा साठा करून ठेवणे सहकारी शेतीत शक्य आहे. विकसनशील अर्थव्यवस्थेत योग्य अशा स्थिर पातळीवर धान्याचे भाव टिकवून ठेवण्याची आवश्यकता सर्वत्र मान्य करण्यात आली आहे. या बाबतीतील पण, बाजारपेठेसाठी उपलब्ध असलेला साठा आणि उत्पादनाची पातळी यावर अवलंबून आहे. सहकारी शेती संस्था, असा साठा गोळा करण्याचे प्रमुख साधन होय.

साठे गोळा करण्याचे काम उत्पादक घटक थोडे व संघटित असले म्हणजे लहान, विखुरलेल्या आणि असंघटित व पुष्कळशा शेतांपेक्षा अधिक चांगल्या प्रकारे होते. तसेच कर्जपुरवठा, सुधारलेले बियाणे, खते वगैरे आवश्यक वस्तूंचे वाटप सांच्या परिणामकारक वाटपासाठी ही संघटना कारणीं शक्य होईल. सरकारी मार्गदर्शन व मदत यांचेविषयी हल्लीच्या असंघटित अवस्थेमुळे गुनागुंतीचे व कठीण झाले आहे.

अशाप्रकारे बिनकिफायतशीर ( unEcomomical ) शेताचा प्रश्न हाच उपाय व इलाज याच्या दृष्टीने मुख्य प्रश्न आहे. आजच्या सरकारी धोरणाने कुळांना संरक्षण व न्याय्य वागणूक यांची हमी, जमिनीची मालकी संपादन करण्याचा कुळांना अधिकार, फालतू जमिनीचे (Surplus) पुन वाटप करण्यासाठी कमाल मालकीवर, मर्यादा ( ceiling ) व त्यासाठी कायदे तुकडेजोड करण्याची सोय या गोष्टी कायद्याच्या मदतीने शक्य झाल्या आहेत. पण तुकडेजोडीने शेतीचा विकास व शेतीची कामे करणे सोयीचे होत असले तरी त्यामुळे जमिनीच्या एकूण क्षेत्रावर परिणाम होत नाही. तसेच जमीनमालकीची कमाल मर्यादा ठरवून देण्याने पुन वाटपासाठी जमीन मिळून शेताचा आकार वाढविण्यासही फारच मर्यादित वाव आहे. अर्थातच या शेतीसुधारणा झाल्या तरी बिनकिफायतशीर शेतघटकाचा प्रश्न शिल्लक राहतोच.

भांडवल गुंतवणुकीच्या आजच्या वेगाने शेती विभागातून बिगर शेती विभागाकडे कामगारांचा मोठा भाग खेचून घेणे व त्या मार्गाने शेतीवरील गर्दी कमी करणे निदान तात्कालिक भविष्यकालात फारसे शक्य होणार नाही अर्थातच शेतीची अधिक शास्त्रशुद्ध पायावर पुनःर्घटना आणि श्रमशक्तीचा परिणामकारक वापर यासाठी सहकारी शेती अधिक व तात्कालिक महत्त्वाची ठरते.

सहकारी शेतीचे प्रकार

पहिल्या योजनेच्या जन्मापूर्वीच या देशात सहकारी शेतीचे काही प्रकार अस्तित्वात आले होते हे ध्यानात घेतले पाहिजे सहकारी नियोजन समिति ( १९४५ ) ने केलेल्या शिफारशीनुसार चार प्रकारच्या सहकारी शेतीसंस्था देशात संघटित केल्या गेल्या त्या अशा :-- (१) शेती सुधारणा संस्था (Better Farming) (२) " टेनंट फार्मिंग " (३) संयुक्त शेती आणि (४) सामुदायिक शेती संस्था. या प्रकारातील फरक थोडक्यात स्पष्ट करणे उपयुक्त ठरेल.

(१) शेतीसुधारणा सोसायटी

शेती सुधारणा (Better farming) सोसायटीत प्रत्येक सभासद जमिनीचा मालक असतो व तो स्वतंत्रपणे तिची लागवड करतो.

*पहा– अध्यक्षीय भाषण डॉ. ध. रा. गाडगीळ, इंडियन सोसायटी फॉर ॲग्रिकल्चरल इकॉनॉमिक्स चे १५ वे अधिवेशन (१९५४)

तथापि, (अ) सोसायटीनें ठरवून दिलेली शेतीयोजना तो मान्य करतो आणि (ब) सोसायटीकडून कर्जपुरवठा, बी, खतें, रासायनिक खतें व विक्रय व्यवस्था, यंत्राचा उपयोग यासारख्या विशिष्ट सेवा मिळवितो. व्यावहारिक दृष्ट्या 'बेटर फार्मिंग' सोसायटी, विविध कार्यकारी सोसायटी अगर सेवा सहकारी सोसायटी याच्याप्रमाणेच काम करते.

## (२) 'टेनंट फार्मिंग' सोसायटी

'टेनंट फार्मिंग' सोसायटी, जमीन मोफत अगर भाड्यानें मिळविते. या जमिनीचे तुकडे करून प्रत्येक वैयक्तिक सभासदाला एक वेगळा प्लॉट दिला जातो. पण त्यानें सोसायटी ठरवील त्याप्रमाणे शेतीची लागवड करावयाची असते सोसायटीची योजना अंमलात कशी आणावयाची हें संपूर्णपणें वैयक्तिक सभासदावर सोपविलें जातें सोसायटी कर्जपुरवठा, बियाणे, शेती व शेतीची मौल्यवान् अवजारे पुरविते आणि सभासदाचे पीक विकून देण्याचीहि व्यवस्था करते या सोयीचा फायदा घ्यावा की नाही तें सभासदानें ठरवावें प्रत्येक कूळ सभासद आपल्या जमिनीपोटी ठराविक भाडें देतो पण जमिनीतील पीक त्याचे व सर्वस्वी त्याच्या ताब्यात राहतें. सर्व खर्च भागवून, गंगाजळी बाजूला ठेवून राहील तो नफा सभासदानी दिलेल्या भाड्याच्या प्रमाणात वाटला जातो

## ३) संयुक्त शेती संस्था

या प्रकारातहि जमिनीची मालकी व्यक्तीकडे राहते पण जमिनीचे एकत्रीकरण व निवडून दिलेल्या कार्यकारी मंडळाच्या योजनेप्रमाणे सहकारी शेती या आवश्यक गोष्टी आहेत जमिनीच्या उत्पादनक्षमतेप्रमाणें मोबदला देऊन सोसायटी जमीनमालकीला मान्यता व पुरस्कार देते. पीक एकत्र वाढविलें जाते. लागवडीचे वगैरे सर्व खर्च भागविल्यानंतर उरलेल्या मालविक्रीतून सभासद आपले श्रम आणि किंवा दिलेली जमीन याच्या प्रमाणात नफावाटणी सभासदाना मिळते

## (४) सामुदायिक शेती संस्था

मोफत अगर भाड्यानें मिळविलेली जमीन व उत्पादनाची इतर साधनें संयुक्त सहकारी शेती संस्थेच्या मालकीची असतात लागवड संयुक्त असते. जमिनीवर वैयक्तिक मालकीच नसल्यामुळे त्याचा मोबदला दिला जात नाही व नफा वाटणी सभासदानी केलेल्या कामाप्रमाणें होते.

तेव्हा कोणत्या प्रकारच्या सामुदायिक शेतीचा पुरस्कार करावा हा प्रश्न उभा राहतो. जमिनीचें एकत्रीकरण व संयुक्त व्यवस्था या सहकारी शेतीत असल्याच पाहिजेत असे दुसऱ्या योजनेंत स्पष्टपणें नमूद केले आहे. १९५८ च्या मे महिन्यात पुणें येथे इंडियन सोसायटी ऑफ ॲग्रिकल्चरल इकॉनॉमिक्सच्या विद्यमानें भरविण्यात आलेल्या सहकारी शेतीवरील परिसंवादात या विषयाची चर्चा झाली अर्थशास्त्रीय सिद्धांतापैकी " केंद्र कार्यालय व कारखाना ( Fivm and the plant)" हें तत्त्व सहकारी शेतीच्या प्रश्नाना लागू करण्याची सूचना पुढें आली. धोका पत्करण्याच्या बाबतीतील महत्त्वाचे निर्णय घेताना तसेच अंतिम नफ्यातोट्याचा हिशेब करतेवेळी ,सबंध सहकारी शेती-संस्थेकडे अधिकार रहावेत मात्र अंतर्गत व्यवस्थेबाबतची काही कामें शेताकडे ( गटाकडे ) सोपवावीत व त्याबाबतीत सर्वांचे हितसंबंध समान ठेवावेत वा ठेवू नयेत असें सुचविण्यात आले जमीन एकत्र केल्याशिवाय अशी संघटना सामान्यत. टिकू शकणार नाही असें सांगण्यात आलें.

ही दृष्टि स्वीकारली तर बेटर फार्मिंग सोसायट्या व टेनंट सोसायट्यामध्ये घटक सभासद स्वत निर्णय घेत असल्यामुळें व स्वत धोका पत्करीत असल्यामुळें या सोसायट्या सेवा सोसायट्यांचा विशेष विकसित प्रकार आहे असें म्हणता येईल व्याख्येंत सूचित केलेली आवश्यक वैशिष्ट्यें असणाऱ्या संयुक्त व सामुदायिक शेती संस्था या देखील सहकारी शेती संस्था ठरतात.

## सहकारी शेती संघटक मंडळ

शेतीची भावी रचना संयुक्त सहकारी पद्धतीची रहावी आणि तीत संयुक्त लागवडीसाठी शेतीचे एकत्रीकरण करावे असें नागपूर ठरावात स्पष्टपणें नमूद केले होते भारत सरकारने हा भाग धोरण म्हणून स्वीकारला व या उद्देशानें कार्यक्रमाची आखणी करण्यासाठी एक संघटक मंडळ नेमलें. अस्तित्वात असलेल्या बऱ्याच सहकारी शेती संस्थाची पहाणी करून या मंडळानें १९५९ च्या डिसेंबरमध्ये आपला अहवाल सादर केला. सहकारी शेती संस्थाची उभारणी, त्याना द्याव्या लागणाऱ्या मदतीचे प्रकार, व कार्यक्रम अमलात आणण्याची यंत्रणा वगैरेविषयी शिफारशी या अहवालात केल्या आहेत सहकारी शेतीचा विस्तार अधिक वेगानें व्हावा यासाठी मार्गदर्शक म्हणून " पायलट प्रोजेक्ट " सुरू करण्याचीही सूचना करण्यात आली आहे.

तिसऱ्या योजनेंतील सहकारी शेतीचा विकास कार्यक्रम बव्हंशी या मंडळाच्या शिफारशीवर आधारलेला आहे सहकारी शेती संस्थांची रचना, आकार, व्यवस्था, तांत्रिक मार्गदर्शन, पैशाचा पुरवठा, प्रशिक्षण, शिक्षण व संशोधन यासाठी करावी लागणारी पूर्वतयारी व इतर गरजा याचा तपशीलवार कार्यक्रम या मंडळाच्या अहवालात आढळतो.

या मंडळानें सहकारी शेतीची केलेली व्याख्या अर्थपूर्ण आहे--

" सहकारी शेती संस्था . हीं शेतकऱ्यानी मनुष्यबळ आणि जमीन वगैरे साधनें एकत्र करून त्याच्या अधिक चांगल्या उपयोगासाठी स्थापिलेली स्वेच्छिक संघटना होय शेतीचे उत्पादन, रोजगारी आणि उत्पन्न वाढविण्यासाठी अशा संस्थेचे बहुसंख्य सभासद शेतीच्या कामात भाग घेत असतात "

सहकारी शेतीच्या दोन महत्त्वाच्या सूत्राचा उल्लेख यात आहे संघटनेचे स्वेच्छिक स्वरूप हें एक आणि जमीन व इतर साधनांच्या एकत्रीकरणाचा आग्रह हें दुसरे स्वेच्छिक स्वरूप टिकवायाचे तर सहकारी शेतीच्या कक्षेत (folds) शेतकऱ्याना आणण्याची कोणत्याहि प्रकारची सक्ती बाद ठरते एकत्रीकरणाची मुदत सामान्यत: पाच वर्षांची असावी व याही काळात सभासदाला बाहेर पडण्यास प्रतिबंध असू नये जमीन देणाऱ्या सभासदाचे मालकी हक्क सुरक्षित रहावेत एवढेच नव्हे तर त्याना पुरस्कारही मिळावा सहकारी शेतीच्या कार्य-

कृषीचे पुष्कळसे टीकाकार सहकारी शेती वाढविण्याच्या कोणत्याहि सरकारी कार्यक्रमांत सक्तीचे तत्त्व अंतर्भूत असते अशी टीका करूं लागल्यामुळें हा मुद्दा निःसंदिग्धपणें स्पष्ट करावा लागला.

" पायलट प्रोजेक्ट "

ज्या राष्ट्रीय विस्तार सेवा विकास गटांत सहकारी कार्यक्रमाची प्रगति झाली असेल तेथे प्रत्येक जिल्ह्यास एक या हिशेबानें अत्यंत काळजीपूर्वक तयार केलेले ३२० पायलट प्रोजेक्ट येत्या चार वर्षांत स्थापण्याची या मंडळानें शिफारस केली. प्रत्येक प्रोजेक्टमध्यें कांही खेडी प्रारंभ करण्यासाठी निवडावी आणि त्यात व त्यांच्या आसपास सहकारी शेती संस्था संघटित कराव्यात. प्रत्येक गटात दहा सोसायटया स्थापाव्यात असें सुचविण्यात आलें आहे. त्याची संघटना व व्यवस्था अशी असावी की भावी विकासाची केंद्रें म्हणून त्या उपयोगी पडाव्यात. सोसायट्यांच्या उभारणीचा कार्यक्रम खालीलप्रमाणें निश्चित करण्यात आला आहे—

| | प्रोजेक्टसंख्या | सोसायटयांची संख्या |
|---|---|---|
| १९६०–६१ | ४० | ४०० |
| १९६१–६२ | ६० | ६०० |
| १९६२–६३ | ९० | ९०० |
| १९६३–६४ | १३० | १३०० |
| | ३२० | ३,२०० |

पायलट प्रोजेक्ट, शिक्षण व प्रशिक्षण यांचा कार्यक्रम, व सहकारी चळवळीचा एकूण विकास यांच्या परिणामी सहकारी शेतीची कल्पना रुजेल व तिसऱ्या योजनेच्या अखेरीस वीस हजार नव्या सोसायटया अस्तित्वात येतील असा अदाज आहे.

### आर्थिक मदत

सहकारी शेती संस्थाना आर्थिक मदत त्यांनी आखलेल्या उत्पादन आणि विकास कार्यक्रमाच्या प्रमाणांत दिली जावयाची आहे. या शिफारसीनुसार पायलट प्रोजेक्टमधील सोसायटयांना खालीलप्रमाणें मदत मिळू शकेल—

| | रु. |
|---|---|
| १) दीर्घ व मध्यम मुदतींची कर्जे | ४,००० |
| २) वखार, (godowns) गोठे वगैरेसाठी कर्जे व मदत | ५,००० |
| ३) भाग भांडवलास वाटणी | २,००० |
| ४) चार वर्षे व्यवस्थापन खर्चासाठी मदत | १,८०० |
| | १२,८०० |

सोसायटयांना लागणारी अल्प मुदतींची कर्जें केंद्रीय सहकारी बँकांनी पुरवावीत.

### शिक्षण व प्रशिक्षण

सहकारी पद्धतीचे फायदे, पद्धति आणि तत्त्वे यांची माहिती शेतकऱ्यांना करून देण्यासाठी द्यावयाचे शिक्षण, हीं पायलट प्रोजेक्ट्सची आणि एकंदरीनें सहकारी शेतीच्या विकासाची महत्त्वाची गरज आहे. म्हणून एक लाख खेड्यापैकी प्रत्येक खेड्यांतून दोन तरुण शेतकरी निवडून त्यांना सहकारी शेती केंद्रांत दोन आठवड्याचा शिक्षणक्रम द्यावा यासाठी, तसेंच सहकारी शेती संस्थांना २६ हजार सेक्रेटरी पुरविण्यासाठीं, १६० सहकारी शेतीची शिक्षण केंद्रें स्थापण्यात यावीत. संशोधन व अध्ययन यांची व्यवस्था करण्यासाठी, त्याचप्रमाणें शिक्षक, खास अधिकारी, सार्वजनिक कार्यकर्ते सरकारी नोकर यांच्या प्रशिक्षणासाठी एक 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ को-ऑपरेटिव्ह फार्मिंग' स्थापावी ही आणखी एक महत्त्वाची शिफारस आहे

या कार्यक्रमाप्रित्यर्थ एकूण खर्च सुमारें ३५.२६ कोटी रुपये होणार असून त्यापैकी २८.६५ कोटी रुपये सोसायट्यांना मदत, ४.२४ कोटी शिक्षण व प्रशिक्षण यासाठी आणि २.३७ कोटी तांत्रिक नोकर वर्गासाठी खर्चले जावयाचे आहेत.

### शिफारशींचा स्वीकार

या मंडळाच्या शिफारशींना राष्ट्रीय विकास मंडळानें ता. १३ सप्टेंबर १९६० रोजी मान्यता दिली असून त्या आता भावी धोरणाचा जणू पायाच समजल्या जातात.

वैयक्तिक शेतकऱ्यांना मदत करण्याच्या ज्या निरनिराळ्या योजना आहेत त्यांचा लाभ सहकारी शेती सोसायट्यांना अग्रहक्कानें मिळतो. खास मदत मिळण्यासाठी मात्र सभासदांची संख्या आणि कार्यक्षेत्र यांच्या बाबतीत किमान आवारमान सोसायट्यांनी प्राप्त केलेलें असावें लागतें. ज्या सोसायट्या सुस्थिर होण्याचा संभव असेल त्यांनाच मदत मिळू शकते भूमिहीन आणि आर्थिक दृष्ट्या दुर्बल असलेल्या शेतकऱ्यांचा प्रामुख्यानें भरणा असलेल्या सहकारी शेती संस्थांना राज्य सरकारनें सोसायटीमागे कमाल रु. २,००० पर्यंत भाग भांडवल पुरवावयाचे असतें. सभासदांनी जमविलेल्या रकमेपेक्षा सरकारी मदत जास्त असता कामा नये आणि ती दहा वर्षांनी परत केली पाहिजे असा नियम आहे. सहकारी शेती आणि सेवा सहकारी संस्था यांना प्रोत्साहन देण्याच्या धोरणाचा भाग म्हणून सहकारी शेती संस्था ही सहकारविकासाची एक पायरी मानावयाची असून समाज विकासामार्फत ग्रामीण अर्थजीवनाचा जो सामान्य सांचा बनविण्यात यावयाचा आहे त्यापेक्षां भिन्न असें तिला समजावयाचें नाही सहकारी शेती संस्थेला लागणारी अल्प मुदतीची कर्जे मध्यवर्ति बँकेनें स्वत किंवा ग्रामीण सेवा सोसायटीनें आपली सोय व स्थानिक परिस्थिति आणि शक्यता याप्रमाणें द्यावयाची आहेत मालाचा पुरवठा, विक्री वगैरे बाबतीत प्राथमिक सेवा सहकारी संस्थांचा पूर्ण लाभ सहकारी शेती संस्थांना घेता आला पाहिजे आणि अशा प्रकारे आपलें सामर्थ्य वाढविता आलें पाहिजे

मंडळानें केलेल्या शिफारशीनुसार सरकारनें द्यावयाच्या मदतीचा आराखडाहि मान्य करण्यात आला आहे सहकारी संस्थांनी खालीलप्रमाणे मदत मिळेल– (१) व्यवस्था खर्चासाठी ३ ते ५ वर्षेपर्यंत एकूण रु. १२०० पेक्षा अधिक नाही इतकी मदत (२) वखार व गोठा यांचे छप्पर बांधण्यासाठी रु ५,००० पेक्षा अधिक नाही इतकी रक्कम ( २५ टक्के मदत व ७५ टक्के कर्ज ) (३) विकास कार्यकार्यक्रमासाठी मध्यम व दीर्घ मुदतीची रु. ४,००० पर्यंतची कर्जे. (४) शिवाय आणखी गरज लागल्यास योजनेच्या शेती विभागातून समाजविकास प्रकल्पाच्या अंदाजपत्रकातून मिळावयाची आहे.

शेतावर अगर शेतीसंबंधित कामांत काम करण्याची तयारी असेल त्यानाच सहकारी संस्थेचे सभासद होता येईल ऐनवाऊ जमीन मालकांना सामान्यत: सभासद म्हणून प्रवेश द्यावयाचा नाही सभासदांनी किमान पाच वर्षे जमीन एकत्र ठेवावयाची असून त्या मुदतीत अपवादात्मक परिस्थितिशिवाय बाहेर पडता येणार नाही. सभासदांनी एकत्र केलेल्या जमिनीचा त्यांना योग्य मोबदलाहि मिळेल. सभासदांची गुरें व अवजारें याचे काळजीपूर्वक आणि रास्त मूल्यमापन करून मग ती सोसायटीनें आपल्याकडे घ्यावी त्यांची किंमत होईल ती अवश्य तितकें भाग भांडवल आणि बाकीची रक्कम सभासदाकडून ठेव म्हणून मानण्यात यावी. सहकारी शेती संस्थेला जरूर तितके मध्यम व दीर्घ मुदतीचे भांडवल उभारतां यावें यासाठी त्यांनी एकत्रीकरणासाठी दिलेली जमीन सोसायटीकडे गहाण टाकण्यासाठी त्याचे मन वळवावें.

### राष्ट्रीय सहकारी शेती सल्लागार मंडळ

सहकारी शेतीचे नियोजन आणि विकास करण्यासाठी "सहकारी शेती सल्लागार" मंडळ नेमण्यात यावें अशी शिफारस समितीनें भारत सरकारला केली. ती मान्य करून १९६० च्या नोव्हेंबरमध्यें २४ सदस्यांचें 'राष्ट्रीय सहकारी शेती सल्लागार मंडळ' नेमण्यात आलें. हें मंडळ देशांतील सहकारी शेतीच्या प्रगतीचा आढावा घेईल आणि वेळोवेळी धोरणात फेरबदल सुचवील कार्यक्रमात जनतेला भाग घेता यावा अशी व्यवस्था करणे, योजनेच्या अमलबजावणीसाठी लागणाऱ्या नोकरवर्गाच्या शिक्षणासाठी व प्रशिक्षणासाठीं व्यवस्था करणें हीहि मंडळाची कामें आहेत. शिवाय खालील कामेहि त्याच्या कक्षेत येतात

सहकारी शेतीविषयी अध्ययनाची संघटना व संशोधनाची योजना, आर्थिक मदतीच्या स्वरूपाविषयी शिफारशी, तांत्रिक देखरेख आणि मार्गदर्शन. राज्याराज्यांतील कामांत सुसूत्रता आणणें व राज्य सरकारे आणि राज्य समित्या यांना त्यांच्या योजना आखण्याच्या कामी मदत करणें हेंहि मंडळाचें काम आहे

मंडळाच्या पहिल्या सभेंत १९६१ च्या एप्रिलपासून पायलट प्रोजेक्ट सुरु करण्याच्या योजनेला मंडळानें मान्यता दिली. तिसऱ्या योजनेच्या पहिल्या वर्षांत ७० सहकारी फार्म योजना चालू केल्या जातील. सहकारी शेतीचे शिक्षण व प्रशिक्षण देण्यासाठी ५० शिक्षण केंद्रें स्थापली जातील

या योजनाबाबत लोकांत उत्साह निर्माण व्हावा यासाठी प्रत्येक राज्य सरकारने सहकारी शेती मंडळें स्थापावीत अशीहि शिफारस मंडळानें केली मद्रासनें १९५८ सालीच एक मंडळ स्थापन केलें होतें.

याशिवाय गुजरात, ओरिसा आणि उत्तर प्रदेश यांनी राज्य मंडळें स्थापन केली आहेत. तसेंच आंध्र प्रदेश, बिहार, महाराष्ट्र, केरळ, पंजाब व राजस्थान यांनीहि राज्यमंडळें स्थापण्याचें ठरविलें आहे. अशा रीतीनें १५ राज्यांपैकी १० राज्यांनी आतापर्यंत राज्य मंडळें स्थापण्याबाबत उपाययोजना केली आहे. जिल्ह्यांतून या कार्यक्रमास जिल्हा परिषदेचें निकट सहकार्य मिळविलें जावें अशीहि सूचना करण्यात आली होती.

### महाराष्ट्रांतील प्रगति

सहकारी शेती संस्थांच्या आराखड्याबाबत राष्ट्रीय सहकारी शेती सल्लागार मंडळाच्या शिफारशी महाराष्ट्र सरकारनेंहि स्वीकारल्या आहेत. शेतावर काम करण्याची ज्याची तयारी असेल किंवा जे पूरक उद्योगांत गुंतलेले असतील त्यांच्यापुरताच सहकारी शेती संस्थांतील प्रवेश मर्यादित असेल. सहकारी शेती संस्थेची किमान सदस्य संख्या १० आणि किमान क्षेत्र ५० ते ६० एकर जिराईत व ३६ एकर बागायती जमीन असे ठरविलें आहे. सहकारी शेती संस्थेत एकत्र आणलेली सभासदांची एकूण जमीन कुळ कायद्यानें ठरवून दिलेल्या कमाल मर्यादेपेक्षा अधिक ठेवता येणार नाही. सभासदत्व काढून घेण्याबाबत असें ठरविण्यात आलें आहे की, जमिनी किमान पांच वर्षें एकत्रित ठेवल्या जातील. ती मुदत पूर्ण झाल्यानंतर योग्य वाटल्यास सभासदाला बाहेर पडण्याचा अधिकार राहील. जरूर तो मध्यम व दीर्घ मुदतीची कर्जे जमविण्यासाठी सोसायटीच्या सभासदांनी आपली एकत्र केलेली जमीन सोसायटीकडे गहाण टाकावी यासाठी त्यांचें मन वळविण्यात यावयाचें आहे. याशिवाय एकत्र केलेल्या जमिनीवर सोसायटीला दुसरा बोजा घालता येईल. सहकारी शेती संस्थांना शेतीशी संबंधित असे उद्योग स्थापण्यास प्रोत्साहन द्यावयाचें हें सरकारी धोरणाचें एक महत्त्वपूर्ण अंग आहे. १९६१–६२ या वर्षांत दहा पायलट प्रोजेक्ट चालू करण्यात यावयाचे असून त्यासाठीं धुळें, चांदा, वर्धा, कोल्हापूर, जळगांव, बुलडाणा व उस्मानाबाद जिल्ह्यांची निवड आधींच झालेली आहे.

### अंमलबजावणींतील अडचणी

सहकारी शेतीच्या क्षेत्रांतील घडामोडींच्या या थोडक्या आढाव्यावरून या सबंध कार्यक्रमाचें वैशिष्ट्य त्याची पद्धतशीर उभारणी याबाबतची स्पष्ट कल्पना येईल. मुख्यत: शेतीतील सहकार हा समाजविकास आंदोलनामुळें होणाऱ्या सर्वसाधारण शेती प्रयत्नांतून व कर्जपुरवठा, खरेदी विक्री, वाटप आणि प्रक्रिया या क्षेत्रांतील सहकाराच्या प्रगतीमधून विकसित व्हावयाचा असतो. त्या त्या स्थानिक नेतृत्वाखालीं स्वेच्छिक जनता आंदोलन आणि ग्रामपातळीवरील समाजविकास आणि सहकार यांची तर्कशुद्ध परिणति म्हणून सहकारी शेती वाढेल तेव्हांच ग्रामीण प्रगतीला तिचा महत्त्वाचा हातभार लागेल.

ग्रामीण अर्थसंवर्धनाच्या सर्वांगीण सहकार विकासाच्या प्रवासांतील पहिला टप्पा कर्जपुरवठा हा मानला तर सहकारी शेती हा त्यांतील एक महत्त्वाचा अध्याय आहे. कारण सहकारी कर्जपुरवठा वगैरेसाठीं जें श्रम व सहकार्य मिळवावें लागतें त्यापेक्षा अधिक श्रम व सहकार्य,












# महाराष्ट्राची सहकारी साखर-कारखानदारी

डॉ. वा. पु. श्रीश्रीमल
मॅनेजर महाराष्ट्र राज्य सहकारी बँक.





खर ही जीवनात रोज लागणारी एक आवश्यक अशी वस्तू आहे. भारतात उंसाचे पीक प्राचीन काळापासून होत आहे परंतु त्याचा गूळ करण्याकडे अधिक उपयोग पूर्वीच्या काळी होई. अठराव्या शतकात पाश्चिमात्य देशात नवे नवे शोध लागले व त्या राष्ट्रात साखर प्रथम तयार होऊ लागली. ती आपल्या देशात विकण्याकरिता येत असे. आपल्या देशांत कच्चा माल जरी उपलब्ध होता तरी यंत्रसामुग्री व शोध इत्यादिंची माहिती नसल्याने सर्व सामुग्री बाहेरून आणून साखर करणें परवडत नसे. या परिस्थितीमुळें १९४३ पर्यंत हा धंदा आपल्या देशात नव्हता, असे म्हटलें तरी चालेल. त्यावेळी देशात अवघे २९ लहान कारखाने होते. या सर्वांचे उत्पादन १,२०,००० टन इतकें होतें. याचा अर्थ सरासरी प्रत्येक कारखान्यात ४००० टन उत्पादन होत असे. महाराष्ट्रातील दोन व आंध्र मधील दोन कारखाने सोडल्यास बाकीचे सर्व कारखाने उत्तर-प्रदेश व बिहार या राज्यात होते.



## उज्ज्वल इतिहास

साखर धंद्यास संरक्षण द्यावें म्हणून लोकांनी सरकारकडे मागणी केली. धंद्याची चौकशी करण्यासाठी १९३०-३१ मध्यें एक कमिशन इंग्रज सरकारने नेमलें व १९३२ साली परदेशी साखरेच्या चढाओढीपासून या धंद्याला संरक्षण मिळालें. या कामी न्या. रानडे, ना. गोखले व लो. टिळक या तीन महान देशभक्तांनी हें संरक्षण मिळावे म्हणून जे प्रयत्न केले त्याचाहि उल्लेख करणे उचितच होईल. त्यावेळी लॉर्ड कर्झन हा हिंदुस्थानात व्हाईसरॉय होता. इ. स. १८९९ च्या मे व जूनमध्यें न्या. रानडे यानी 'टाइम्स' मध्ये साखरेचा धंदा आपल्या देशात कसा वाढविता येईल या विषयावर तीन लेख लिहिले. त्या काळी बीटपासून तयार झालेली ऑस्ट्रिया व जर्मनी या देशातील साखर सर्व जगभर निर्यात होई. यामुळें साहजिकच ब्रिटिश व फ्रेंच साखर कारखानदारांच्या मॉरिशस येथील साखरेवर अनिष्ट परिणाम होऊं लागला. ब्रिटिश सरकारनें साखरआयातीवर निर्बंध घातले. हें धोरण अर्थातच नेहमीच्या खुल्या व्यापाराच्या धोरणापेक्षा वेगळे होते. न्या. रानडे या धोरणाचाच पुरस्कार करीत होते.







ना. गोखले यांनीहि आपल्या बजेटाच्या वेळच्या भाषणातून व इतर वेळींहि भारतात साखरधंदा वाढीस लावण्यासाठी संरक्षण देणें आवश्यक आहे, हेच प्रतिपादन केले. लखनौ येथें ९ फेब्रुआरी १९०७ रोजी त्यांनी केलेल्या भाषणातील उतारा त्यादृष्टीनें मोठाच उद्बोधक आहे. त्यात ते म्हणाले, " एके काळी आपण दुसऱ्या देशास साखर निर्यात करीत होतो पण आज परिस्थिती अशी आहे की, सुमारे ७ कोटी रु. ची साखर आपण आयात करीत आहोत. हिंदुस्थानात व विशेषत. या भागात ऊस खूप पिकतो. आपण निश्चय केला की परदेशी साखर घ्यावयाची नाही व स्वदेशी साखरेलाच प्रोत्साहन द्यावयाचे तर मी असें निश्चयानें सांगू शकतो की, थोडक्याच काळांत आपण आपल्याला लागणारी साखर निर्माण करूं शकू. "

लोकमान्यांनी तर या बाबतीत पद्धतशीर प्रचार केला २२-९-१९०३ च्या " केसरीत " त्यांनी लिहिले होते की, " आपल्याला लागणारी साखर आपल्या देशांतच तयार झाली पाहिजे. पण यासाठी योग्य रीतीनें आखलेली योजना आणि त्याचा पुरस्कार आवश्यक आहे. आपले राष्ट्रीय सरकारच हें उद्दिष्ट साधण्यासाठी कर्तव्य म्हणून याचा विचार करील. " आज हें स्वप्न साकार झालेलें आपण पहात आहोत

## संरक्षण आणि वाढ

१९३२ पासून या धंद्याची प्रगति झपाट्यानें झाली. १९३८-३९ मध्यें कारखान्यांची संख्या १३९ झाली व त्याच्या उत्पादनाचा आंकडा ६,५१,००० टनावर गेला. दुसरे महायुद्ध संपले तेव्हा ( म्हणजे १९४५-४६ मध्यें ) देशात १५३ कारखाने होते आज देशात १७५ कारखाने आहेत कारखान्यांच्या वाढीबरोबर साखरेचे उत्पन्नहि वाढले आहे. १९४९-५० मध्यें केवळ १० लाख टन उत्पादन होते ते ५७-५८ त १९-२० लाख टन म्हणजे जवळ जवळ दुपटीने वाढले. सप्टेंबर १९६१ चे शेवटी ३० लाख टन उत्पन्न झाले आहे. यावरून गेल्या दहा वर्षांत किती प्रगति झाली आहे याची कल्पना येईल असे जरी असले तरी ही वाढ मुख्यतें सुरुवातीला उत्तर हिंदुस्थानात झाली ही गोष्ट विशेषेंकरून लक्षात घ्यावयास हवी एकूण कारखान्यांपैकी १०० कारखाने उ. प्रदेश व बिहार या प्रांतात आहेत संरक्षण काळात अगदी प्रथम पासून हे कारखाने स्थापन झाले असले तरी कार्यक्षमता वाढविण्याचे दृष्टीनें त्यांनीं म्हणावे तितके प्रयत्न केले नाहीत वास्तविक आज १००० टनी प्लँटला १६० लाख रु. पडतात. ही किंमत ज्या वेळीं १४ लाख रु. होती तेव्हा उ. हिंदुस्थानात धंदा प्रस्थापित झाला आहे. परंतु साखरेची किंमत काही आज कमी झालेली नाही. उलट दक्षिण हिंदुस्थानात अलीकडे कारखाने सुरू होऊनहि त्या कारखान्यातील उतारा जगातील इतर साखर निर्माण करणाऱ्या देशाशी तुलना करण्याइतपत चांगला आहे असेच दिसून येते.

शेतकऱ्यात अशी एक म्हण आहे कीं, " साखर कारखान्यात पिकत नसून ती शेतात पिकते. " याचा अ[illegible] याच[illegible] म्हणजेच साखर म्हणजेच ऊस ! साखरेच्या किंमतीत उसाचा वाटा फार मोठा आहे. चांगला ऊस स्वस्त मिळाला तरच अर्थात साखरहि आपल्याला कमी किंमतीत मिळेल. आपण साखर दर टनाला ७०० रु. या भावानें विकतो. बाहेरच्या देशात हीच किंमत ४३५ रु. आहे. ही उत्पादनाची किंमत कमी होण्यावरच आपल्या देशातील साखरेच्या धंद्याचे यश अवलंबून आहे. उ. प्रदेश व बिहार या दोन प्रांतातून ६०% साखर तयार होते परंतु तेथील ऊस हलक्या प्रतीचा असून दर एकरी उत्पन्नहि कमी आहे. साखरेच्या गळिताचा हंगामहि या प्रांतातून कमी आहे. या सर्वांचा परिणाम शेवटी तयार होणाऱ्या साखरेवर होतो. इतर देशांशी तुलना करता असे दिसून येते की, आपल्या देशातील उसाचे एकरी उत्पादन सरासरीनें पाहता अत्यंत कमी आहे

उसाखालील क्षेत्र जरी वाढले तरी दर एकरी उत्पन्न मात्र मुळीच वाढ झाली नाही. ते १५ टनच राहिले आहे या उलट जावा, हवाई येथें तें ५५-६० टन आहे. या सर्वांचा परिणाम असा झाला आहे की, दर एकरात तयार होणाऱ्या उसापासून भारतांत केवळ १.५ लक्ष टन साखर तयार होते. जावा-हवाई येथें तो सहा लक्ष टनाहून अधिक आहे आपणाला उत्पादन वाढण्यासाठी किती प्रयत्न करावयास हवा हें यावरून सहज लक्षात येईल आणि हाच मूलतः सर्व साखरेच्या प्रश्नाचा गाभा आहे देशांतर्गत व बाहेरहि साखरेचा खप वाढवावयाचा असेल तर साखर स्वस्त झाली पाहिजे. त्यासाठी दर्जेदार ऊस कारखान्यांना मिळाला पाहिजे इतर देशांशी तुलना करता आपल्याकडील लोक फारच कमी साखर वापरतात वर्षाला दरडोई साखरेच्या खपाची आपल्याकडील सरासरी १० ते १३ किलो इतकीच आहे चांगले आरोग्य राखण्याचे दृष्टीनेंहि दर माणशी २०.५ किलो इतकें हें प्रमाण वाढावयास हवें इतर देशातील सरासरी अशी आहे

| देश | दर डोई खप |
|---|---|
| इंग्लंड | ५१५ किलो |
| अमेरिका | ४४३ ,, |
| कॅनडा | ४८९ ,, |
| जर्मनी | ३०४ ,, |

या दृष्टीनें विचार करता आपल्या देशात साखरेचा खप वाढण्यास भरपूर वाव आहे असेच दिसून येईल आणि असे जर आहे तर मग ज्या प्रदेशात कमी खर्चात साखर तयार होत आहे तेथें त्याची वाढ झाली पाहिजे हे कोणीहि मान्य करील

साखरधंद्याचे वाढीबरोबर उसाचे लागवडीखालील जमिनीत वाढ होत आहे, हे अगोदर सांगितलेच आहे उ. प्रदेशात ६०% ऊस पिकतो पण तेथील एकरी उत्पादन पाहिले तर सर्वांत कमी आहे असेच दिसून येईल. आणि या प्रदेशातील उत्पन्न वाढल्याशिवाय सरासरी उत्पन्नात वाढ होणार नाही ५८-५९ या वर्षात एकूण उसाखालील

क्षेत्र ५ १७ मिलियन एकर होते. पैकी निम्मे उ. प्रदेश-बिहार या प्रांतांत आहे. निरनिराळया प्रांतातील दर एकरी उत्पन्नाचे पुढील आकडे पहा.

| | ५८–५९ |
|---|---|
| उ.प्रदेश | १०.९८ |
| बिहार | १४.७३ |
| पंजाब | १४.४० |
| महाराष्ट्र | २६.८४ |
| मद्रास | २५.८२ |
| म्हैसूर | २६.१४ |
| आंध्र | ३४.२६ |

दक्षिणेकडील उत्पन्न व उत्तरेकडील उत्पन्न यातील तफावत वरील आंकड्यावरून सहज लक्षात येते.

आपल्या देशांत उंसाची किंमत शेतकऱ्यांना वजनावर दिली जाते यामुळें झाले काय, तर उंसातील साखरेचा उतारा वाढविण्याकडे लक्ष दिले गेले नाही. शेतकऱ्यांना पैसा वजनावर मिळत असल्यानें त्यातून साखर किती तयार होते याचा त्यानी कदापि विचार केला नाही.

साखरेच्या उताऱ्यावर किंमत द्यावी म्हणून नंतर प्रयत्नहि केले गेले. परंतु त्या पद्धतीत काहीं अडचणी आल्यावरून टॅरिफ कमिशन आतां पुनरच त्या प्रकारणाचा अभ्यास करीत आहे.

उंसाखालील क्षेत्र, ऊंस उत्पादन एकरी उत्पादन व साखरेचा उतारा याची प्रत्येक राज्यांतील कल्पना खालील माहितीवरून येईल.

| | एकर (हजारात) | उत्पन्न (हू टन) | एकरी ऊस उत्पन्न | १९५८–५९ साखरेचा उतारा |
|---|---|---|---|---|
| आंध्र | १८३ | ७२७० | ३४२६ | ९.८५ |
| महाराष्ट्र | ३३१ | ८८८४ | २६.८४ | ११ ७५ |
| मद्रास | १४५ | ३७४४ | २५.८२ | ९ २० |
| म्हैसूर | १४७ | ३८४३ | २६.१४ | १०.६० |
| उ.प्रदेश | २९१७ | ३२०२७ | १०.९८ | ९ ६८ |
| बिहार | ४४३ | ६५२६ | १४ ७३ | ९ ४३ |
| पजाब | ५९२ | ८५७० | १४४० | ९ १४ |
| सर्व हिन्दुस्थान | ५१७८ | ७५०३८ | १५ ५२ | ९ ९१ |

महाराष्ट्रांतील उतारा सर्वांत अधिक आहे हे वरील माहितीवरून दिसून येते. एवढेंच नव्हे तर दर एकरी उत्पन्नहि महाराष्ट्रात उ प्रदेश व बिहार या प्रदेशापेक्षा कितीतरी पटीनीं अधिक आहे ५९–६० सालातीलच उत्पन्नाचा विचार केला तर असे दिसून येते की, त्या वर्षीच्या २४.२२ लाख साखरेच्या उत्पन्नापेक्षा उ. प्रदेशातील उत्पन्न १२ २१ लाख टन आहे महाराष्ट्राचा क्रमांक दुसरा असून या प्रांतातील उत्पन्न ३.१६ लाख टन आहे बिहारचा क्रमाक दुसरा होता तो आतां तिसरा आहे त्या प्रांतातील उत्पादन ३ ११ लाख टन आहे. आंध्र १ ३७ लाख टन, मद्रास ८५,००० टन व इतर २ ३३ लाख टन अशी वाटणी आहे.

जगांत आपल्या देशात उसाखालील जमीन सर्वात अधिक असली तरी उत्पन्न मात्र सर्वांत कमी आहे जगातील उसाच्या ३०% आपल्या देशात पिकतो पण केवळ ⅓ जमीन चांगल्या प्रकारे मेहनत घेऊन तयार करून त्यात आधुनिक पद्धतीनें लागवड केली जात असल्या-कारणाने व बराचश्या उसाची लागवड जेथें त्या पिकास अनुकूल स्थिति नाही अशा भागात झाल्या कारणानें साखरेचा उतारा कमी आहे. आतां महाराष्ट्रातील डेक्कन कॅनॉल विभागात सर्व परिस्थितीची अनुकूलता दिसून आल्यानें तेथे अधिक प्रमाणात लागवड झाली आहे. सुरवातीपासून उ प्रदेश व बिहार येथील उत्पादकानी आपल्या उंसाची प्रत वाढविण्याची कधीच काळजी घेतली नाही. त्यामुळें कारखान्याना उत्पादकांना भरपूर किंमत देऊनहि चांगला ऊंस मिळाला नाहीं. याचा परिणाम साखरेची किंमत वाढण्यात झाला आहे या उलट सेंट्रल शुगर-केन कमिटीनें १९४८–४९ सालात पाहणी करून जो अहवाल सादर केला त्यात म्हटले आहे की, " महाराष्ट्रातील ऊस उत्पादनाचा खर्च दर मणास १.०२ रु. आहे तो सर्वांत कमी आहे .उ प्रदेशात तो. १.२२ रु. व बिहार मध्ये १.४९ रु आहे. अशी परिस्थिती असता हा धंदा महाराष्ट्र व इतर दक्षिणेकडील देशातच वाढला पाहिजे असें म्हणणें ओघानेच येते. " गेल्या काही वर्षात निरनिराळया राज्यातून अनेक कारखाने जे स्थापन झाले आहेत त्यावरून वरील वाढ होत आहे याची कल्पना येईल –

**साखर कारखान्यांची संख्या**

| राज्याचें नांव | ४८.४९ | ५३.५४ | ५९.६० |
|---|---|---|---|
| उ प्रदेश | ६५ | ६५ | ७० |
| बिहार | २९ | २३ | २८ |
| पजाब | १ | १ | ६ |
| आंध्र | १० | ११ | ६ |
| महाराष्ट्र | १० | १३ | २६ |
| हिंदुस्थान | १३४ | १३४ | १६८ |

महाराष्ट्रात आज एकूण २७ कारखाने असून त्यापैकी १४कारखाने सहकारी आहेत व ६ नवे थोडया काळातच सुरू होणार आहेत

**महाराष्ट्रांतील धंदा**

इ. स. १९५० पर्यंत महाराष्ट्रात साखर धंदा खाजगी क्षेत्रात प्रस्थापित झाला परंतु तदनंतरच्या काळात सहकारी साखर कारखाते स्थापन झाले व त्यानी पुष्कळ प्रगति केली. महाराष्ट्रांतील साखर कारखान्याचा इतिहास पाहता असे आढळून येते कीं, १९२० साली जेव्हा गोदावरी प्रवरा कॅनॉल बांधला गेला त्यावेळी

स्थापन झाले त्याचा उगम या प्रवरानगरच्या पहिल्या कारखान्यांत सांपडतो.

### प्रवराचा आदर्श

इतर संस्थाप्रमाणेच सुरुवातीला कारखान्याचे स्वरूप लहान होते. उत्पादनाच्या पहिल्या वर्षांत म्हणजे १९५०–५१ त सभासद सख्या ५०० व कारखान्याचे कक्षेतील क्षेत्र ८०० एकर होते. आज सभासद सख्या १५०० चे वर असून उसाखालील क्षेत्र ४७०० एकर आहे. ऊसाचे उत्पन्न एकरी ४२ ते ४५ टन म्हणजे सर्व साधारणपणे सबंध हिंदुस्थानच्या सरासरीच्या पेक्षा तिप्पट जास्त आहे. अशी काही उदाहरणे आहेत की काही भागात शेतकऱ्यानी उत्पन्नाचे बावतीत उच्चांक निर्माण केला आहे. लोहगाव खेड्यातील एका शेतकरी बंधूने एकरी ८० टन उत्पन्न काढले आहे तर दुसऱ्या एका उत्पादकानें १०८ टनाचा उच्चांक गाठला आहे. या आकड्यावरून शेतकऱ्याला जर आपण केलेल्या श्रमपूर्वक उत्पादनाचा योग्य तो मोबदला मिळेल अशी खात्री वाटली तर तो काय करूं शकतो हे वरील उदाहरणावरून दिसून येते. जाता जाता ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे की लोणी कारखान्याच्या कक्षेतील बरीचशी शेती विहिरीवर आहे.

इ. स. १९४८ त कारखाना रजिस्टर झाला तेव्हा ६ लाख रु भांडवल जमविले होते. मुंबई सरकारनें त्या वेळी महत्त्वाचा व सहकारी साखर कारखान्याच्या वाढीच्या दृष्टीने फायद्याचा असा निर्णय घेतला व सरकारचे भांडवल म्हणून ६ लाख रु कारखान्यास दिले इंडस्ट्रिअल फायनान्स कॉर्पोरेशनने २० लाख रु. कर्ज दिलें. अशा रीतीनें कारखाना नोंदल्यानतर वर्षाचे आतच पैशाची व्यवस्था झाली जागा ठरली. जमीन विकत घेतली व मशिनरीसाठी मागणी केली.

### सहकाराची कसोटी

कारखान्याच्या सभासदानी आजवर सहकारी तत्वाचे पालन न चुकता केलें आहे ही गोष्ट कारखान्याच्या यशाला बऱ्याच अंशी कारणीभूत झाली आहे. या कसोटीस सभासद पूर्णपणें उतरले आहेत. १९५०–५१ सालची गोष्ट कारखाना नुकताच सुरू झाला होता. गूळाची किंमत इतकी चढली होती की साखरे ऐवजी गूळ करणेंच अधिक फायदेशीर होते २१ डिसें. १९५० रोजीच पहिले साखरेचे पोते तयार झाले होते. गूळाचा हंगाम सुरू झाला होता व साखरेचे उत्पादन केव्हा सुरू होते हे अनिश्चित होते अशा परिस्थितीत एकाहि सभासदाने बेईमानपणा दाखविला नाही, ही विशेष कौतुकाची गोष्ट आहे सर्वच्या सर्व सभासद एकनिष्ठ राहिले. शांतपणें परिस्थितीला तोंड दिले व थोडासा स्वार्थत्यागहि केला याचा त्याना फायदाच झाला सरकारी धोरण बदललें. १९५०–५१ साली तयार केलेल्या साखरेला इतका भाव आला की पहिल्याच हंगामात उत्पादकाच्या पदरात, भरघोस माप कारखान्याला देता आले

कोणताही कारखाना यशस्वी व्हावयाचा असेल तर त्याला लागणारा कच्चा माल नियमितपणें मिळाला पाहिजे साखर कारखान्याला ताजा व तयार झालेला ऊंस नियमित पुरविला जाणें ही फार महत्त्वाची गोष्ट आहे हे जाणून कारखान्यानें स्वत वरच ऊंस तोडण्याची व तो कारखान्यांत आणण्याची जबाबदारी घेतली यासाठी बैलगाड्या, कामगार, रस्ते नीट ठेवणें या सर्वच गोष्टी कराव्या लागल्या कारखान्याच्या परिसरात आज १४० मैलाचे रस्ते उत्तम रीतीने तयार झालेले आपणास दिसतात. या पद्धतीत सभासदाचा आणखी एक फायदा झाला आहे. त्याना शेतापासून कारखान्याचे अतर किती आहे याचा कधी विचारच करावा लागत नाही

### कारखान्याचा भक्कम पाया

प्रवरानगर कारखान्याचे सभासद म्हणजे छोटे–छोटे शेतकरी आहेत. त्याना त्याच्या पिकाची योग्य किंमत देऊन शिवाय कारखान्यानें आपली ताकदहि वाढविली आहे ६ लाखावर सुरू झालेल्या कारखान्याचे आज खेळतें भांडवल २.८४ कोटी रु आहे या एकाच गोष्टीवरून कारखान्यानें किती प्रगति थोडक्या कालावधीत केली आहे याची सहज कल्पना येते. विशेष लक्षात घेण्याजोगी गोष्ट म्हणजे कारखान्याने सभासदाकडून घेतलेल्या ठेवी २५ लाख रु. च्या आहेत सहकारी क्षेत्रातहि धनसचय ( Capital formation ) करता येतो हेच या ठेवीच्याद्वारे या सहकारी कारखान्यानें सिद्ध करून दिले आहे

कारखाना सुरू झाल्यापासून उत्पादकांना दिल्या जाणाऱ्या उसाच्या भावातहि वाढ झालेली आहे १९५०–५१ सालात दर टनाला ४७ ८ रु. किंमत दिली. हीच रक्कम १९५९–६० सालात ५४ रु. आहे.

प्रवरानगर कारखान्यानें गेल्या दहा वर्षांत सभासदाच्या ऊंसास दिलेल्या भावाचा तक्ता

| वर्ष | टनास भाव रु | बोनस टनास रु | एकूण. |
|---|---|---|---|
| १९५०–५१ | ४५–०–० | २–८–० | ४७–८–० |
| १९५१–५२ | ४२–४–० | २–०–० | ४४–४–० |
| ५२–५३ | ३९–०–० | १–४–० | ४०–४–० |
| ५३–५४ | ५०–४–० | १–०–० | ५१–४–० |
| ५४–५५ | ४९–०–० | १–०–० | ५०–४–० |
| ५५–५६ | ४२–०–० | ०–८–० | ४२–८–० |
| ५६–५७ | ४७–४–० | — | ४७–४–० |
| ५७–५८ | ४६–४–० | — | ४६–४–० |
| ५८–५९ | ४७–४–० | — | ४७–४–० |
| ५९–६० | ५४–०–० | — | ५४–०–० |

आपल्या देशातील १ ६२ रु मण या ठरलेल्या किमतीपेक्षा हे भाव निश्चित चांगले आहेत साखरेचा उतारा हि ११ ३१ ( ५९–६० ) आहे व हंगाम १८४ दिवसांचा आहे. या पहिल्या साखर कारखान्याला अध्यक्ष म्हणून प्रा. ध. रा. गाडगीळ यांच्यासारखे थोर अर्थशास्त्रज्ञ सुरुवातीपासून तें ५९–६० अखेर लाभले हीहि एक भाग्याचीच गोष्ट

# रस्टन

## कार्यशक्ति पुरविणारा दुवा

निसर्गाच्या लहरीपणामुळें, माणूस आतां, कधींहि दगा देणार नाहीं अशा कार्यशक्तीवर विसंबून राहण्यास शिकला आहे — ही शक्ति म्हणजे 'रस्टन' इंजिन. आडव्या व उभ्या बांधणीचीं — वॉटर-कूल्ड व एअर-कूल्ड — 'रस्टन' ऑईल इंजिनें विश्वसनीय व विविध प्रकारें उपयोगी आहेत. हीं इंजिनें शेती, उद्योगधंदे, जहाजें-गलबतें वगैरे अनेकविध क्षेत्रांत अत्यंत फायदेशीर रीतीनें वापरतां येतात.



आडव्या बांधणीचें इंजिन



उभ्या बांधणीचें वॉटर-कूल्ड इंजिन



उभ्या बांधणीचें एअर-कूल्ड इंजिन



रस्टन ॲण्ड हॉन्स्बीं (इंडिया) लि

१ फोर्बस स्ट्रीट मुंबई १

म्हटलें पाहिजे. भारताचे पंतप्रधान यांनी कारखान्यास भेट दिली व कारखान्याच्या कार्याबद्दल प्रशंसोद्गार काढले.

### सहकारी कारखान्यांचा श्रीगणेशा

या कारखान्याबद्दल एवढी तपशीलवार माहिती देण्याचें कारण प्रा. धनंजयराव गाडगीळ यांच्या शब्दांत दिल्यास तें सयुक्तिक ठरेल. "प्रवरा सहकारी साखर कारखान्याची स्थापना व कार्य यांच्या यशस्वितेमुळें सहकारी चळवळीच्या विकासाचें नवीन पर्व भारतामध्यें सुरु झालें तसेंच त्यामुळें काही महत्वाचे निष्कर्षंही निघाले गेले. प्रवरा कारखान्याच्या यशामुळेंच मुख्यत. मुंबई सरकारनें सहकारी पद्धतीवर स्थापन झालेल्या साखर कारखान्यानाच परवाना देण्याचें धोरण सन १९५४ मध्ये अंगिकारलें याचा परिणाम पर्यायानें इतर राज्य सरकारें व नियोजन मंडळ यांच्या धोरणावर झाला. त्यानंतर प्रवरा कारखान्याची संघटना व कार्यपद्धति यांच्या धर्तीवरच सहकारी महाराष्ट्रातील साखर कारखानदारीचा विकास झाला."

या कारखान्याचे अनुकरण होऊन आज १४ कारखाने स्थापन झालेले दिसत आहेत. हा कारखाना कोणत्याच बाबतीत मागे तर नाहीच, उलट प्रतिकूल परिस्थितीतहि सभासदांनी कारखान्याशी एकनिष्ठ राहून सेवा केली आहे व स्वतःचा उत्कर्ष साधला आहे

दुसरा सहकारी कारखाना अहमदनगर जिल्ह्यातच कोपरगांव येथें ४–६–१९५३ रोजीं स्थापन झाला. पहिल्या वर्षी कारखान्याचें कामकाज समाधानकारक झालें नाही. याचा फायदा खाजगी भांडवलदारानी घेऊन असे म्हटले होतें की, " the unfavourable results in the fresh season of the second cooperative actory would serve as a caution to Government. " परंतु या टीकाकारांना कारखान्यानें आपली परिस्थिति सुधारून चोख उत्तर दिलें कारखान्यानें ४८ लाख रु भांडवल जमविले आहे व फायद्यातून आपली गंगाजळी ४० लाख इतकी वाढविली आहे. प्रवरानगर कारखान्याप्रमाणेंच सभासदांकडून २० लाखाच्या ठेवीहि कारखान्याला मिळाल्या आहेत. कारखान्याचे क्षेत्रातील उंसाचा साखरउतारा १० टक्क्याहून ११ टक्के झाला आहे

### खाजगी भांडवलदारांचा विरोध

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत सहकारी साखर कारखान्यांची प्रस्थापना झपाट्यानें करावी असें ठरलें. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेनेंहि आग्रहानें मुंबई सरकारला हेच प्रतिपादन केले. परंतु दुर्दैवानें खाजगी भांडवलदारांनी याला विरोध केला त्यांचे म्हणणें, " ..in the case of cooperative units, should economic principles have been sacrificed at the alter of doctrinaire approach and it is a fine example of a policy thoughtlessly *conceived* and based on large public funds to be placed in the hands of illiterate and inexperienced and liable to force the Government to repent in Course of time."

केंद्र सरकारच्या लायसेन्सिंग कमिटीने चौकशी केली व निर्णय सहकारी कारखान्याच्या बाजूनेच दिला आज महाराष्ट्रात १४ सहकारी साखर कारखाने स्थापन झालेले दिसत आहेत व ६ नवीन स्थापन होणार आहेत.

आपल्या देशांत द्वितीय पंचवार्षिक योजनेच्या शेवटी एकूण ५६ सहकारी साखर कारखान्याना परवाने देण्यात आले. त्यांना भाग–भांडवलाच्या रूपाने ६ कोटी ४९ लक्ष रुपये उपलब्ध झाले. शिवाय इंडस्ट्रियल फायनान्स कॉर्पोरेशनकडून त्याना जवळ जवळ रु २१ कोटी ६६ लक्ष दीर्घ मुदतीच्या कर्जाच्या रूपानें मिळाले आहेत. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटपर्यंत एकूण ३० कारखाने सुरु झाले. या सर्व सहकारी कारखान्यांतून एकूण ४१ लक्ष टन इतका ऊंस गाळला गेला व जवळ जवळ ४.३५ लक्ष टन साखर तयार झाली हें प्रमाण देशातील एकूण साखरेच्या उत्पादनापैकी १४.७% इतकें आहे.

महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्याच्या एकंदर व्यवस्थेबद्दलची माहिती देण्यापूर्वी निरनिराळ्या राज्यातून जे सहकारी साखर कारखाने निघाले त्यांची माहिती येथें दिल्यास उपयुक्त ठरेल

### गुजराथ

गुजराथ राज्यात एकूण ३ सहकारी साखर कारखाने स्थापन झाले. त्यापैकी १९६०–६१ मध्यें २ कारखाने सुरू झाले. त्यानी एकूण साखरेचें उत्पादन २.८० लक्ष टन केले.

### आंध्र

आंध्रमध्यें १९५१ च्या इंडस्ट्रीज ( डेव्हलपमेंट अँड रेग्युलेशन ) अॅक्टपूर्वी एक सहकारी साखर कारखाना स्थापन झालेला होता. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत सहा कारखान्याना परवानगी देण्यात आली होती व तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत आणखी दोन कारखान्याना परवानगी देण्यात आली आहे. यापैकी फक्त २ कारखाने १९६०–६१ ला चालू होते व दोन्ही कारखान्यातून एकूण १.४० लक्ष टन साखरेचे उत्पादन झाले

### मद्रास

मद्रास राज्यात एकूण सहा कारखान्याना परवाना देण्यात आला. त्यापैकी तीन कारखान्याना दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत व तीन कारखान्याना तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत परवाना दिला आहे दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत परवाना देण्यात आलेल्या तिन्ही कारखान्याकडून १९६०–६१ मध्यें २.३० लक्ष टन इतके साखरचे उत्पादन झालें.

### म्हैसूर

म्हैसूर राज्यात दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत एकूण तीन सहकारी साखर कारखान्याना परवाना देण्यात आला त्यापैकी दोन

कारखान्यानी १९६०–६१ मध्ये उत्पादनाला सुरुवात केली होती व तिसऱ्या कारखान्याचा Trial season (प्रायोगिक स्वरुपात) चालू आहे तिन्ही कारखान्याचे साखरेचे उत्पादन २९० लक्ष टन माले होते.

### पंजाब

पहिल्या पचवार्षिक योजनेत पंजाब राज्यांत तीन कारखान्याना परवाना देण्यात आला दुसऱ्या व तिसऱ्या पचवार्षिक योजनेत आणखी तीन कारखान्याना परवानगी देण्यात आली आहे. या सहा कारखान्यापैकी दुसऱ्या पचवार्षिक योजनेत तीन कारखान्यानी साखरेच्या उत्पादनाला सुरुवात करून १९६०–६१ मध्ये त्यानी ४.७० लक्ष टन इतके साखरेचे उत्पादन केले.

आसाम, बिहार व ओरिसा या राज्यातून प्रत्येकी एकेक कारखाना उभारला जाणार आहे. त्यापैकी आसाममधील कारखान्यानी १९६०–६१ मध्ये उत्पादनाला सुरवात करुन एकूण ७० हजार टन इतक्या साखरेचे उत्पादन केले.

केरळमध्ये २ सहकारी साखर कारखान्याना तिसऱ्या पचवार्षिक योजनेत परवाना देण्यात आला परंतु अजूनहि त्याचे काम चालू आहे

महाराष्ट्रात १४ सहकारी साखर कारखाने सुरु झाले आहेत व आणखी ६ कारखाने उभारले जाणार आहेत, ही गोष्ट आपल्याला भूषणावह अशीच आहे. या सर्व सहकारी साखर कारखान्यातून निर्माण झालेल्या एकूण २९.५४ लाख टन साखरेपैकी ४.३५ लाख टन साखर १९६०–६१ सालात तयार केली हे प्रमाण १४.७२% आहे

या २० कारखान्याची जिल्हानिहाय विभागणी खालीलप्रमाणे आहे.

महाराष्ट्रांतील कारखान्यांची जिल्हानिहाय विभागणी.

| जिल्हा | चालू कारखाने | नवीन | एकूण. |
|---|---|---|---|
| अहमदनगर | ५ | १ | ६ |
| कोल्हापूर | ३ | २ | ५ |
| पुणे | २ | १ | ३ |
| नाशिक | १ | १ | २ |
| सातारा | २ | — | २ |
| सागली | १ | — | १ |
| सोलापूर | — | १ | १ |
| | १४ | ६ | २० |

### सेन्ट्रल कमिटी फॉर शुगर फॅक्टरीज्

सहकारी साखर कारखाने स्थापन करावे या कल्पनेला जशी चालना मिळाली त्याबरोबरच या कारखान्याची स्थापना शासनमुद्ध होण्यासाठी अनेक गोष्टींचा विचार करणे आवश्यक होते. ऊसाचे क्षेत्र, पाण्याचा प्रश्न, जागेची निश्चितता, जमिनीबाबतचे प्रश्न, वाहतुकीची साधने, कारखान्यास लागणारे भाडवल इ० गोष्टींची तपशीलवार माहिती मिळवणे जरूर होते शिवाय तज्ज्ञ मंडळी व सरकारी अधिकारी याच्याशी सल्लामसलत केल्यावेरीज पुढे पाऊल टाकणे शक्य नव्हते या सर्व गोष्टीचा विचार व्हावा म्हणून दि. २८ जुलै १९५४ रोजी मुंबई राज्य सहकारी बँकेच्या सभागृहात मुंबई प्रॉव्हिन्शिअल को–ऑपरेटिव्ह इन्स्टिटयूटचे अध्यक्ष सर जे. के. मेहता याच्या अध्यक्षतेखाली नियोजित सहकारी कारखान्याच्या प्रमोटर्सची एक सभा झाली सभेस प्रा ध रा. गाडगीळ, श्री. वैकुंठभाई मेहता, श्री. व्ही. पी वर्दे, श्री. विखे पाटील आदी मंडळीहि उपस्थित होती. ही सभा महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने आयोजित केली होती.

### मध्यवर्ति समितीची स्थापना

सभेतील चर्चेतून असे ठरविण्यात आले की, ज्या ज्या भागातून सहकारी साखर कारखाने स्थापन करण्यासाठी अर्ज आले आहेत त्या भागातील माहितीच्या आधारे प्रत्येक प्रपोझलवर निर्णय घेण्यासाठी एक मध्यवर्ति समिती नेमावी या समितीचे अध्यक्ष म्हणून प्रा गाडगीळ याची नियुक्ती करण्यात आली. या समितीने आपला निर्णय, सरकारला प्रत्येक प्रपोझलचा अभ्यास करून नतरच कळवावा असे ठरले

त्याचप्रमाणे त्या त्या भागातील विशिष्ट स्थानिक परिस्थिती विचारात घेऊन कामाची कार्यपद्धति ठरविण्यास समितीने मदत करावी हा विचारहि सर्वमान्य झाला या समितीमुळे सर्व साखर कारखान्याच्या कार्यपद्धतीत एक प्रकारचा सुसगतपणा व एकसूत्रीपणा येण्यास पुष्कळच मदत झाली या समितीचे सचिव म्हणून काम करण्याची जबाबदारी माझ्यावर टाकण्यात आली होती याच समितीचे रुपातर अगोदर ठरल्याप्रमाणे "महाराष्ट्र राज्य मध्यवर्ती साखर कारखाना मडळ (फेडरेशन)" असे झाले या मंडळाचे कार्य महाराष्ट्रातील सर्व सलग्न सहकारी साखर कारखान्याचे भाडवल, तात्रिक बाबी, मनुष्यबळ इ० सर्व प्रश्न सोडविण्याचे आहे

सहकारी कारखान्याची स्थापना होऊन ते यशस्वी व्हावेत यासाठी किती मोठमोठ्या लोकानी प्रयत्न करून तपश्चर्या केली याची माहिती वरील विवेचना वरून लक्षात येईलच. कारखाना यशस्वी व्हावा यासाठी त्याबाबत प्रथमपासूनच कमीशनें सर्व परिस्थितीची पाहणी करून मगच शिफारसी केल्या.

### मिनिस्टर्स कमिटी फॉर को–ऑप शुगर फॅक्टरीज्

सहकारी कारखान्याचा व्याप वाढत होता त्याबद्दलच्या शिफारशी लक्षात घेऊन केंद्र सरकारकडे परवाने देण्यासाठी शिफारस करता यावी व इतर प्रश्नाचा अभ्यास करता यावा म्हणून १९५४ साली राज्य पातळीवर मुंबई सरकारने एक 'मिनिस्टर्स कमिटी' नेमली. या कमिटीवर अर्थ,

महसूल, सहकार, उद्योग व सार्वजनिक बांधकाम या खात्याचे मंत्री सभासद असून, प्रा. ध. ग. गाडगीळ व श्री व्ही. पी. वर्दे हे बिनसरकारी सभासद होते. सदर कमिटीत कालांतराने फरक होऊन महाराष्ट्र राज्य सरकारच्या मुख्यमंत्र्यांचे अध्यक्षतेखालीं ती आज काम करीत आहे. उसाचे भाव ठरविणें, देखरेख, मॅनेजिंग डायरेक्टरची नेमणूक करणें इ० कामें ही कमिटी करते.

उत्पादक, सहकारी कार्यकर्ते यांच्याबरोबर सरकारनेंहि प्रथमपासून या कारखान्यांना उत्तेजन दिलें आहे. सरकारनें साखर कारखान्यांचे भाग खरेदी करून प्रत्यक्ष उभारणीमहि आपला हातभार लावला आहे. ३० जून १९६० रोजीं संपणाऱ्या वर्षअखेर १४ कारखान्यांचे जमा भाग भांडवल ४७० २१ लाख रु. होते. पैकी सरकारी भांडवल १५० लाख रु. आहे.

### क्षेत्र व उत्पादन

महाराष्ट्रांतील प्रचलित १४ व नियोजित ६ कारखान्यांच्या कक्षेत ७३ ते ७४ हजार एकर ऊसक्षेत्र आहे. महाराष्ट्र राज्यात उसाखालील एकूण क्षेत्र २ ९५ लाख एकर आहे. खाजगी साखर कारखान्यांचे क्षेत्र ९९ हजार एकर आहे. प्रत्येक सहकारी कारखान्याचे १००० ते २००० पर्यंत उत्पादक सभासद असून हे सभासद अनेक खेड्यांतून विखुरलेले आहेत. कारखान्यांचे क्षेत्रांत १५ पासून ८१ पर्यंत खेडी आहेत. १ ते ५ एकरात ऊस पिकविणारेच सभासद बहुसंख्य आहेत. प्रत्येक कारखान्याची उत्पादन शक्ति प्रतिदिनी १००० टन असावी असे सरकारी धोरण आहे. कारखान्याच्या १० मैलाच्या परिसरात एकूण उसाखालील क्षेत्र ४,००० एकर असावें लागतें.

महाराष्ट्रांतील कारखान्यांची मुहूर्तमेढ प्रवरा कारखान्याने रोवली. पहिले पोतें १९५० सालीं तयार झालें. या कारखान्याची सुरवात ५००–८०० टनी जुन्या स्कोडा मशिनरीवर झाली. १९५५–५६ त १२०० टनी अद्ययावत प्लॅंट कारखान्याने बसविले. १९५५–५६ ते ६१ या काळात १४ कारखान्यांनी ७४ लक्ष ७० हजार पोतीं साखर तयार केली. ही प्रगति कशी झाली ते खालील माहितीवरून स्पष्ट होईल.

| वर्ष | कारखान्यांची संख्या | गळित केलेला ऊस (टन) | निर्माण केलेली साखर (पोतीं) ( लाखांमध्यें ) |
|---|---|---|---|
| १९५५–५६ | २ | १ ८९ | १.८९ |
| १९५६–५७ | ३ | ३.६४ | ४.०५ |
| १९५७–५८ | ८ | १०.१४ | १०.९८ |
| १९५८–५९ | १२ | ११ ३६ | १२.९८ |
| १९५९–६० | १३ | १६ ०६ | १८ ७४ |
| १९६०–६१ | १४ | २२ ४६ | २६.०६ |
| | | ६५ ५५ | ७४ ७० |

महाराष्ट्रातील ५० टक्के साखर उत्पादन हे सहकारी साखर कारखाने करूं लागले आहेत. तिसऱ्या योजनेअखेर हेच उत्पादन ६५ टक्क्यापर्यंत जाईल अशी खात्री आहे

### कार्याचे स्वरूप

सहकारी साखर कारखान्याना भांडवली खर्चाचा फार मोठा बोजा उचलावा लागला. १९५५ ते ५७ पर्यंत कारखाना उभारण्यास ८५ ते ९० लाख रु. खर्च येई. सभासदाकडून १० लाख रु., राज्य सरकारकडून १० लाख रु. भांडवल म्हणून, इंडस्ट्रिअल फायनान्स कॉर्पोरेशनकडून कर्ज ४५ लाख व उरलेले २०–२५ लाख रु. चे कर्ज मध्यवर्ति बँकेकडून घेऊन हा खर्च भागविला जाई. आज हा खर्च १६० लाख रु. इतका वाढला आहे शेतकऱ्याना २० लाख रु. सरकारकडून २० लाख भांडवल म्हणून जमवावे लागतात. इंडस्ट्रियल फायनान्स कॉर्पोरेशनचे कर्ज लांब मुदतीचे ८५ लाख रु. व बँकेचे कर्ज (मध्यम मुदतीचे) ३५ लाख रु. नवीन कारखान्याला घ्यावे लागते

शेतकरी सभासदाला, एक एकर उसाचे क्षेत्राला एक हजार रु. चा एक भाग या प्रमाणात कारखान्याचे भाग घ्यावे लागतात. ऊसाची किंमत राज्यसरकार ठरवून देईल त्याप्रमाणे पोटनियमानुसार दिली जाते. या योजनेमुळें कारखान्याचे भाग भांडवल वाढविण्यास मदत झाली आहे. इंडस्ट्रिअल फायनान्स कॉर्पोरेशन व बँक याच्याकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड शक्य तितक्या लवकर करण्याची जबाबदारी कारखान्यावर असते. या बाबतीत प्रवरानगर कारखान्याने आपले कर्ज मुदतीच्या अगोदरच परत करून चांगला आदर्श निर्माण करून ठेवला आहे. नमूद करण्यास आनंद वाटतो की, कोणत्याहि कारखान्याने कॉर्पोरेशनच्या कर्जाचा हप्ता चुकविला नाही

इंडस्ट्रिअल फायनान्स कॉर्पोरेशनने मोठ्या रकमेची दीर्घ मुदतीची कर्जे कारखान्याना दिल्यामुळेंच हे कारखाने उभारणें शक्य झालें, ही कर्जे मिळण्यास अर्थात् बराच अवधि लागतो त्यामुळें महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेला तांबडतोब तात्पुरती सोय करावी लागते बँकेने मध्यम मुदतीची ७ वर्षें मुदतीची कर्जेहि कारखान्याना दिली आहेत साखर उत्पादनाचे कार्य सुरु झाल्यावर कॅश क्रेडिटच्या रूपाने चालू खर्चासाठी ७० ते १०० लाख रु. प्रत्येक कारखान्याला महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने याशिवाय दिले आहेत.

१९६०–६१ च्या काळात साखर उत्पादन सर्व देशात वाढलें. पण साखरेच्या महाग किंमतीमुळे देशातर्गत व बाहेरहि मालाला उठाव झाला नाही. कारखान्यांजवळ साखरेचे साठे मोठ्या प्रमाणावर पडून राहिले. त्यामुळें दैनंदिन व आवश्यक खर्च भागविण्यासाठी प्रत्येक कारखान्यासाठी जवळ जवळ १। कोटी रुपयापर्यंत रकमेची तरतूद बँकेला करावी लागली. एप्रिल १९६२ अखेर बँकेने पाच कारखान्याना इंडस्ट्रीयल फायनान्स कर्जपोटी रु. ४ २५ कोटी रकमेची तरतूद केली. शिवाय मध्यम मुदतीचे कर्ज १२ कारखान्याना रु. ४ ०० कोटी रकमेपर्यंत देण्याची व्यवस्था करण्यात आली. चालू खर्च भागविण्यासाठी ९ कारखान्याना एकूण रु. ९ ६३ कोटी रक्कम मजूर केली ही निरनिराळी कर्जे मिळून एप्रिल १९६२ अखेर बँकेने सहकारी कारखान्याना दिलेल्या कर्जाची रक्कम १७ कोटी ८८ लाख रु. आहे. या शिवाय मध्यवर्ति बँकाना पाच साखर कारखान्याना कर्ज देता यावे म्हणून त्याना ३ कोटी ६ लाख रु कर्जे बँकेने दिली होती, ती निराळीच अर्थात रिझर्व बँकेने या बँकेला वेळोवेळी कर्जपुरवठा केल्यामुळेंच ही गरज भागविता आली

### व्यवस्था

सहकारी साखर कारखान्याची व खाजगी कारखान्याची व्यवस्था व कारभार यात काही सूक्ष्म पण महत्त्वाचे फरक आहेत दोन्हीही कारखान्यात ' जनरल बॉडी ' च्या हाती सर्वाधिकार असतात हे खरे. फरक एवढाच की, खाजगी " जॉइंट स्टॉक " कारखान्यात भाग धारण केलेल्या प्रमाणात मताचे अधिकार असतात तर सहकारी कारखान्यात सभेला हजर असलेल्या प्रत्येक सभासदास फक्त एका मताचाच अधिकार असतो जनरल बॉडीच्या नियंत्रणाखाली संचालक मंडळ कारभार बघत असते सर्वसाधारणपणे संचालक मंडळात १९ सदस्य असतात. १० उत्पादकांतर्फे, १ सोसायट्यांतर्फे, एक सरकारचा व एक बँकेचा प्रतिनिधी, १–२ इंडस्ट्रियल फायनान्स कॉर्पोरेशनतर्फे व मॅनेजिंग डायरेक्टर व एक तज्ज्ञ पहिले मंडळ रजिस्ट्रार, प्रमोटर्स व बँकेच्या सल्ल्याने जाहीर करतात ते तीन वर्षासाठी असते तदनंतर निवडून दिलेल्या सदस्यांचे मंडळ काम पहाते. सरकारतर्फे प्रत्येक विभागात सहकारी कारखान्यासाठी डेप्युटी रजिस्ट्रार नेमलेला असतो तो कारखान्यावर देखरेख ठेवतो.

या १४ कारखान्यांची थोडक्यात माहिती देणारा तक्ता पुढील पानावर दिला आहे

### कारखान्यापुढील प्रश्न

महाराष्ट्रातील साखर कारखान्यांनी अल्पावधीत किती प्रगति केली आहे याची कल्पना या सर्व माहितीवरून येईल या कारखान्यापुढें आता काहीच प्रश्न नाहीत अशी कल्पना करणे मात्र चुकीचे होईल सहकारी कारखान्याना आर्थिक गरजा भागविण्यासाठी निरनिराळ्या संस्थाकडून रकमा आणाव्या लागतात स्वत च्या पायावर उभें राहता येईल इतकी साधनसंपत्ति या कारखान्याना वाढवावी लागेल त्याचप्रमाणे माल साठविण्यासाठी गुदामेंहि भरपूर उपलब्ध नाहीत ऊस उत्पादनाचा खर्च कमी होण्यासाठी पाण्याची सोय, योग्य दरात खताचा पुरवठा, अधिक साखर असलेल्या उसाची निर्मिती या गोष्टींचाहि विचार झाला पाहिजे सरासरीने उसाचे एकरी उत्पादन ४२ टनापर्यंत आहे पाण्याची अधिक सोय उपलब्ध असल्यास ही सरासरी ५० ते ६० टनापर्यंत नेणें अशक्य नाही

महाराष्ट्रातील मराठवाडा विभागातहि काही भागातून कमी खर्चात उसाची लागवड होऊ शकेल सध्याचे खाजगी क्षेत्रातील कारखाने इतके वाढले आहेत की, आता त्यात आणखी वाढ होणे शक्य नाही. तेव्हा सहकारी कारखानेच यापुढें अधिकाधिक स्थापन होणें हें योग्य

## चौदा सहकारी साखर कारखान्यांचा कार्यविस्तार

| क्र.नं. | सहकारी साखर कारखाना | स्थापना | हद्दीतील गावें | उत्पादक सभासद | गळीत कार्यक्षमता टन (प्रतिदिनी) | एकूण गुंतलेले भांडवल ५९-६० | आजपर्यंत एकूण उत्पादन (लाखात) | कारखान्या खालील क्षेत्र (एकर) | रिकव्हरी ६०-६१ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १) | प्रवरा | ३१-१२-४८ | ४१ | १,५०४ | १२०० | २,८४,१५,५१३ | १२.१० | ४,५३९ | ११.६० |
| २) | कोपरगाव | ४-६-५३ | ५९ | ८८३ | ८०० | २,५९,४७,५६० | ९.४० | ३,६०८ | ११.५८२ |
| ३) | श्रीराम | २४-७-५४ | ५९ | १,४४२ | ८०० | १,८२,२१,४५३ | ६.०३ | २,८०० | १२.०९ |
| ४) | राहुरी | ३-११-५४ | ५१ | १,४३२ | १००० | २,४५,९७,१९८ | ६ ८५ | ४,८७७ | ११.७० |
| ५) | अशोक | १-१२-५४ | ३७ | ७३२ | १००० | २,१८,९५,४२२ | ५ ०४ | ३,०६९ | ११.९९ |
| ६) | माळेगाव | २४- २-५५ | १५ | १,७१६ | १००० | २,०१,५१,०६१ | ६.५३ | ३,६६९ | १२ ५९ |
| ७) | राहता (गणेश) | १- ३-५५ | ३३ | १,०४६ | १००० | २,३०,१२,३७२ | ६.१९ | ३,७२० | ११ ५७ |
| ८) | कृष्णा | २८- ७-५५ | ७२ | १,७७५ | १००० | ७१,०५,८३२ | ०.३३ | ३,५०० | ९ ७६ |
| ९) | श्री छत्रपति | ६- ८-५५ | १६ | ७७१ | ८०० | १,४२,३२,६७९ | ५.२८ | २,५३५ | ११.७६ |
| १०) | गिरणा | १- ८-५५ | ३३ | १,२०२ | १००० | २,२६,१८,६९४ | ४.४० | ३,५६४ | १० ९४ |
| ११) | वारणा | २७- ९-५५ | ५१ | २,०६५ | १००० | १,६४,६७,५२१ | २ ५३ | ३,९९९ | १२.५५ |
| १२) | पचगंगा | १-१०-५५ | ८३ | २,०४५ | १००० | २,०८,४१,१२७ | २ ८८ | ५,१०० | ११ ६६ |
| १३) | भोगावती | १८-१०-५५ | ३७ | १,६५७ | १००० | २२,७४,५६५ | २.८८ | ३,००० | ११.०६ |
| १४) | शेतकरी | ८- ९-५७ | ७१ | १,३६१ | १००० | १,१४,७०,१६१ | ३.२५ | ३,०२६ | ११.६४ |

ठरते. परंतु सध्या बाजारातील चढाओढीला हे कारखाने ज्या प्रमाणात तोंड देऊ शकतील त्यावरच त्यांचे खरे यश अवलंबून आहे. साखर उत्पादनापासून ती गिऱ्हाईकाचे हाती पडेपर्यंत संपूर्ण व्यवस्था सहकारी क्षेत्रात आणणे जरूरीचे आहे. कारखान्यातील प्रश्नहि सोडवावयास हवेत. विशेषत: सभासदांचे हक्क, मॅनेजिंग डायरेक्टरचे संचालक मंडळाशी संबंध इ० प्रश्नाकडे बोट दाखविता येईल. याशिवाय सर्व कारखान्यांच्या साखरेची एकत्रित विक्रीव्यवस्था कशी अंमलात आणता येईल याबाबत अद्याप विचारहि व्हावयाचा आहे.

खाजगी कारखान्यांची टीका विफल ठरली आहे. आता सहकारी कारखान्यांनी सिंहावलोकन करून आपल्यातील उणीवा नाहीशा केल्या पाहिजेत. त्या जितक्या लवकर कमी होतील तितकेच ते अधिक फायदेशीर ठरणार आहे.

### ग्रामीण जीवनांत झालेला बदल

सहकारी कारखाने स्थापन झाल्यामुळे महाराष्ट्रातील ग्रामीण जीवनात फार मोठा बदल घडून आला आहे हें निश्चित. ग्रामीण नेतृत्वाला वाव मिळून एक प्रकारचा आत्मविश्वास लोकांत निर्माण झाला आहे. आपआपल्या भागात शेतकरी लोकांना योजना समजावून देऊन सहकारी संस्था स्थापन करणे, त्यासाठी मोठ्या प्रमाणावर भाग भांडवल जमा करणे, धंद्याची उभारणी करणे व ती सहकारी शिस्तीचे पालन करून चालविणे हें स्थानिक कार्यकर्त्यांच्या परिश्रमाशिवाय शक्य झाले नसते. कोटीचा व्यवहार करणारे नेतृत्व महाराष्ट्रातील खेड्यातून निर्माण झाले ही आपल्याला अभिमान वाटण्याजोगी गोष्ट आहे.

ऊस उत्पादन धंद्यात साखर कारखान्यामुळे जशी वाढ झाली त्याच बरोबर शेतकऱ्याचे जीवनात स्थैर्य आल्यानें इतर शेती उत्पादनातही तो जास्त प्रमाणात लक्ष घालू शकला व उत्पादन वाढवू शकला. उदाहरणार्थ, धान्योत्पादनासाठी चांगल्या प्रकारचे बी–बियाणे वापरून व सुधारलेल्या प्रकारची शेती–अवजारे वापरून उत्पादन वाढविणे, कपाशीसारखी पिके घेणे, तसेच शेतीकरिता पाणीपुरवठा पुरेसा व्हावा म्हणून विहीरी खणणे व त्यावर एजिन्स बसविणे ह्या व अशा तऱ्हेनें शेतकऱ्याच्या आर्थिक जीवनांत क्रांति झाली आहे.

ग्रामीण विभागात सहकारी साखर कारखाने निघाल्या कारणाने शेतकऱ्याच्या सामाजिक व शैक्षणिक जीवनातही बरीच प्रगति झाली आहे. प्रत्येक कारखान्याच्या परिसरात आता प्राथमिक ते हायस्कूलपर्यंत शैक्षणिक सोय झाली आहे. कारखान्याचे सभासद अशा शालेय संस्थास खर्चाकरिता अनुदान म्हणून कारखान्यास पुरविलेल्या ऊसाचे प्रमाणात रक्कम आदा करितात. तसेच कारखान्याचे सभासद व कारखान्याचे परिसरातील शेतकरी यांना आरोग्यविषयक मदत, कारखान्याने नेमलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यामार्फत स्वल्प खर्चात मिळू शकते. शेतकऱ्याच्या गुराढोरासही तातडीची वैद्यकीय मदत कारखान्यावर मिळत असल्याने बऱ्याच प्रमाणावर प्राण व वित्तहानीहि वाचली आहे. आज शेतकऱ्यास शेतीची अवजारे व एंजिन दुरुस्तीकरिता तालुक्याच्या ठिकाणी धाव घ्यावी लागत नाही. कारखान्याच्या वर्कशॉपमधून ही सोय होऊ शकते.

ह्या व अशा प्रकारच्या सर्व सोयी सहकारी साखर कारखान्याच्या परिसरात शेतकऱ्यास उपलब्ध झाल्यानें त्याचे जीवनात सुख व समृद्धि निर्माण झाली आहे.

ह्या लेखाचा समारोप करायचा आल्यास पुनश्च प्रा. धनंजयराव गाडगीळ यांच्याच शब्दात तो करणे उचित ठरेल. कारण आपल्या देशात सहकारी आर्थिक घडणीच्या कामात त्यांचा फार मोठा वाटा आहे. किंबहुना, महाराष्ट्रात तर श्री. वैकुंठभाईनंतर जर कोणी ह्या सहकारी क्षेत्रात वैचारिक क्रांति व प्रत्यक्षांत त्याचे आचरण केले असेल तर डॉ. गाडगीळ यांचेच नाव प्रामुख्याने घ्यावे लागेल. प्रा. धनंजयराव गाडगीळ यांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे " **सहकारी साखर कारखानदारीचा विकास म्हणजे भारतामध्यें स्वातंत्र्योत्तर काळांत सहकारी संघराज्य स्थापन करण्याच्या दिशेनें टाकलेलें सर्वांत महत्त्वाचें पाऊल होय असें म्हटलें असता अतिशयोक्ति होणार नाहीं. उत्पादकांच्या सहकारी संस्थेमध्यें प्रत्यक्ष उत्पादन करणारे घटक सामुदायिक कार्य करीत असतात. परस्पर सहकार्याच्या बळावर कमजोर घटकांना जोमदार बनण्यास मदत करणें ही अशा सहकारी संस्थांची कसोटी आहे.** व ती तशीच असावी. सहकारी संस्था ही मुख्यत: व्यवसाय करणारी संघटना असून या दिशेने संस्थेने केलेल्या कार्यावरून तिच्या यशाचे मूल्यमापन करावयाचे असते. या यशासाठी अनेक कसोट्या लाविल्या जातात. त्यापैकी आर्थिक सामर्थ्य व कार्याचा विस्तार या दोन प्रमुख आहेत. याशिवाय व्यापक भूमिकेवरून विचार करता, भविष्य काळात या प्रयोगातून निघालेले निष्कर्ष व त्यामधून निर्माण होणाऱ्या आकांक्षा यांना अधिक महत्त्व आहे. ग्रामीण जनतेमध्ये या कारखान्याच्या यशामुळे निर्माण झालेलें जादा उत्पादन, आणि हें जादा उत्पादन जनतेमध्ये पुन: विभागले गेल्यामुळे निर्माण झालेल्या समाजाचे सुस्थितीला अत्यंत महत्त्व आहे. गरीब व अशाश्वत उत्पादनाच्या प्रदेशात वर्तुळा ( खर्चवेंच वजा जाता येणारे जादा उत्पन्न ) राहात नाही, तर शाश्वत उत्पन्नाच्या परंतु पिळल्या जाणाऱ्या प्रदेशातील जादा उत्पादन, शहरी विभागाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या सावकार अथवा व्यापारी वर्गाकडे खेचले जातें. अशा परिस्थितीत ग्रामीण जनतेचा एका विवक्षित मर्यादेपलीकडे विकास होऊ शकत नाही. उत्पादनाची शाश्वती, व्यापाराची अनुकूल परिस्थिति, खर्चवेंच वजा जाता शिल्लक राहाणारे जादा उत्पादन आणि अशा रीतीनें राहिलेल्या वर्तुळाच्या जादा उत्पादनाचा उपयोग ग्रामीण जनतेमध्ये फिरून होणे या सर्व बाबींचा एकत्रित परिणाम होऊन ग्रामीण विभागाचा सातत्याने विकास होण्यास सुरुवात होते"

सहकारी कारखान्याच्या अनुभवाचे अनुषंगानें इतर पिकावर प्रक्रिया करून उत्पादनाचे उद्योगधंदे स्थापन करावेत या कल्पनेलाही चालना मिळाली आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने प्रा. गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली सहकारी उद्योग मंडळ नेमले आहे व गेल्या वर्षभरात मंडळाने प्राथमिक कार्यहि बरेच केलें आहे. भुईमूग, तांदूळ, कापूस या पिकापासून तेल, पेंडीचे तेल, राईस ब्रॅन ऑईल इ. उद्योगधंदे काढण्यासाठी पाहाणीही झाली आहे. या सर्वांना कारणीभूत असलेली १९४५ ची प्रा. गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली भरलेली परिषद व त्यात घेतलेले निर्णय सहकारी क्षेत्रात चिरस्मरणीय झाले आहेत.




# सहकारी खरेदी विक्री संघाचें यशापयश

श्री. वा.पु.नी. गायतोंडे
मडा. महाराष्ट्र राज्य ख.वि.संघ



हाराष्ट्र राज्य को-ऑपरेटिव्ह बँकेचा (पूर्वीच्या बॉम्बे स्टेट को-ऑपरेटिव्ह बँकेचा) सुवर्ण महोत्सव साजरा झालेला पहाण्याचे व त्यात भाग घेण्याचे भाग्य मला लाभले हा मी माझा फार मोठा सन्मान समजतो सुमारे ३५ वर्षे या उदात्त संस्थेची विविध प्रकारे सेवा करण्याचे भाग्य मला लाभले ह्या काळात महाराष्ट्रातील तसेच कर्नाटक, गुजराथ प्रांतातील खेड्यामधील जीवन जवळून पहावयास मिळालें त्यामुळे सहकारी व विविध क्षेत्रांतील नेत्यांशी माझा घनिष्ट संबंध आला तसेच आता चांगल्या भरभराटीस आलेल्या लोकांच्या आणि सहकारी चळवळीच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त कामगिरी बजाविणाऱ्या काही सहकारी संस्थाचा पाया घालण्याची संधीही मला लाभली होती. कै. राव-बहादुर तालमाकी यानी माझ्या मनात सहकारी चळवळीविषयी जिज्ञासा उत्पन्न केली आणि तिचा अभ्यास करण्यास प्रवृत्त केलें. त्यानंतर बँकेच्या अधिकाऱ्यानी, नोकरीच्या सुरुवातीच्या काळात मला बरेच उपयुक्त शिक्षण दिले, आणि पुढे नंतर श्री. वैकुंठभाई मेहता यांच्या मार्ग-दर्शनाखाली काम करण्याची संधी मला प्राप्त झाली. त्याकाळी ग्रामीण भागातील विविध प्रकारच्या संस्थाना उपयोगी पडण्याची तसेंच महा-राष्ट्रातील सहकारी बँकेच्या व्यवसायाला हातभार लावण्याची संधी मला मिळाली. या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने माझ्या पूर्वी काम केलेल्या थोर व्यक्तींना तसेच महाराष्ट्रातील सहकारी चळवळी-मधील ज्या थोर नेत्याच्या सहवासात काम करण्याचे सद्‌भाग्य मला लाभले त्या सर्वांना मी नम्रपणे आदरांजली वाहतो या बँकेच्या व सहकारी चळवळीच्या सुरुवातीच्या काळात श्री रमणीकराय मेहता, कै. श्री. एम जी. देवधर आणि श्री. डी. आर काळे यानी जी कामगिरी केली ती अविस्मरणीय आहे, त्याच्याबरोबर बँकेत नोकरी करण्याची संधी लाभली, त्या सर्वांना, बँकेच्या सुरुवातीच्या काळात बँकेच्या पुढें जे कठीण प्रश्न उभे राहिले आणि सहकारी संस्थाना रोजच्या रोज या कठिण प्रश्नाना योग्य प्रकारे तोंड देण्यासाठी किती कौशल्य आणि संघटना शक्ती लागली असेल, याची कल्पना आहे, त्या आम्हा सर्वांना ह्या काळात वर उल्लेखिलेल्या व्यक्तींनी जी महान कामगिरी बजावली तिचा विसर पडणे शक्य नाही

फारच थोड्या लोकांच्या लक्षात असेल की ही बँक स्थापन करणाऱ्या सहकारी प्रमुखाना प्रथमपासूनच शेतकऱ्यांना सहकारी



संस्थाद्वारें देण्यात येणारे कर्ज, शेतीपासून होणारे उत्पादन व विक्री यांची सांगड घालावी लागते, याची पूर्ण कल्पना होती. प्रारंभीच्या काळांत शेती मालाच्या विक्रीशी आणि शेतीला लागणाऱ्या वस्तूंच्या पुरवठ्याशीं बँकेचा संबंध अगदीं जवळचा होता. १९४० सालपर्यंत हीच स्थिति होती. बँकेच्या अनेक शाखा, सभासदांच्या शेतांत उत्पन्न झालेला माल विकण्याचें व त्यांना खत, बियाणें व अवजारें आदि शेतीला लागणारा माल पुरविण्याचें काम करीत असत; व त्यासाठीं स्वतंत्र दुकानेंही चालवीत असत सध्यांच्या खरेदी आणि विक्रीच्या ज्या सहकारी संस्था निघाल्या आहेत त्यांचा उगम त्यावेळीं बँकेनें चालविलेल्या ह्या दुकानांतून सांपडेल ! मला स्वत:ला अशी दुकानें चालवावी लागत असत आणि मला चांगलें आठवतें कीं, १९२५ साली बँकेला जेव्हा मालेगाव येथे सहकारी विक्री संस्था स्थापन करावयाची होती तेव्हा मला स्वत:ला शेतकऱ्याकडे जाऊन जे पिक शेतकरी बाजारात विक्रीस घेऊन येतो तो माल त्यानें सहकारी दुकानाद्वारें विकावा अशी विनंती करावी लागत असे आणि त्याचे मन वळवावे लागत असे. बँकेनें शेतकऱ्याचे सहकारी कापूस पिंजण्याचे व त्याच्या गासड्या बांधण्याचे कारखाने काढण्यातही पुढाकार घेतला तसेंच मुंबईतील्या सहकारी साखर कारखाने काढण्यातही संघटित प्रयत्न केले. किर्लोस्कर नागर, ऑईल इंजिन्स, पंपींग सेटस्, बियाणें इत्यादि अवजारांचा उपयोग करण्यास बँकेनें प्रोत्साहन दिलें. तसेंच सुधारलेले बी बियाणें, कापूस, गहूं आणि ऊस यांच्या चांगल्या जाती यांचाही वाढत्या प्रमाणात शेतकऱ्यांनी उपयोग करावा म्हणून बँकेनें प्रयत्न केला. सर्व साधारणपणें व्यापाराचे व्यवहारात भाग घेणें हें बँकेचे काम नसतें परंतु शेतकऱ्यास कर्ज देणारी संस्था या नात्यानें शेतकी उत्पादनाची विक्री करण्यासाठी संघटित संस्था उभारणें, तसेंच, शेतकऱ्याला चांगलें पिक काढण्यासाठीं योग्य ती साधनें व अवजारें पुरविणे आणि कर्जाचा उपयोग शेती उत्पादनासाठींच व्हावा आणि झालेले उत्पादन चांगल्या भावानें विकलें जावें व शेतकऱ्याला कर्जमुक्त होता यावें म्हणून विविध प्रकारच्या संस्था बँकेनें अस्तित्वात आणल्या हळूहळू बँकेनें या विविध प्रकारच्या सहकारी विक्री व इतर व्यावसायिक संस्था यांच्यावर दैनंदिन व्यवहाराचा भार सोपवून आपलें अंग त्याच्यातून काढून घेतलें. सहकारी पतपेढ्यांच्या सभासदांना त्यांच्या पिकाला लागणारें भांडवल प्रत्येक पिकाच्या, पीक उत्पादन व गरजेप्रमाणे हंगामाचेवेळी देण्याची "पीक कर्ज" पद्धत अमलात आणली. त्यामुळें जमीन तारणाच्या ऐवजी पीक-तारणावर कर्ज देण्याची, सहकारी कर्ज पुरवठ्याची प्रचलित पद्धत अमलात आली

शेतीसंघटन समितीच्या सूचनेनुसार शेतकऱ्यात त्यांच्या पीक उत्पादन गरजेप्रमाणें पुरेसें कर्ज देण्याची जबाबदारी बँकेने पत्करली आणि १९५० मध्यें डायरेक्टर बोर्डानें सहकारी पतपेढ्यांना आणि विशेषत: कर्ज पुरवठा करणाऱ्या मध्यवर्ती बँकांना उद्देशून धोरण स्पष्ट

करणारा आदेश दिला. पिकें तारण ठेवून कर्ज देण्याचे मूळ तत्त्व त्या आदेशात ग्रथित करण्यांत आले. त्याच आदेशामध्यें पिकाची विक्री सहकारी संस्थामार्फत करणें आणि पिकाच्या तारणावर कर्ज देणें याची सांगड घालण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. परंतु पिकें काढण्यासाठी हल्ली फार मोठ्या प्रमाणावर कर्ज देण्यात येत असले तरी त्याची सांगड शेती उत्पादनाच्या विक्रीशी घालण्याचा त्या आदेशात मुख्य जो भाग होता त्या दृष्टीने फारच थोडे प्रयत्न केलेले आढळतात

अशा प्रकारे सध्याच्या महाराष्ट्र राज्य को–ऑपरेटिव्ह बँकेच्या लोकप्रियतेचा, सहकारी चळवळीसाठी ती करीत असलेल्या उपयुक्त कामगिरीचा आणि सहकारी कर्ज पुरवठा करण्याच्या बाबतीतील तिच्या स्थानाचा योग्य तो आढावा घ्यावयाचा तर सहकारी कर्जपुरवठ्याशी सहकारी विक्रीची सांगड घालण्याचा जो प्रयत्न बँकेने प्रथमपासून केला त्याकडे दुर्लक्ष करता येणार नाही.

पीक तारणावर देण्यात येणाऱ्या कर्जाचा कितपत उपयोग होतो याचे मूल्यमापन करण्यासाठी प्राध्यापक डॉ. जी. कर्वे याच्या अध्यक्षतेखाली जी समिती बँकेने नेमली तिनेही सहकारी संस्थाच्या द्वारे शेतकऱ्यांना पिकाच्या तारणावर जे कर्ज देण्यात येते. त्याचा पुरेपूर उपयोग व्हावा आणि एकूण सहकारी संस्थाच्या द्वारे जे कर्ज उपलब्ध होते त्याचा नीट फायदा शेतकऱ्याना व्हावा म्हणून सहकारी विक्री संस्था कार्यक्षम करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली; व त्यावर विशेष भर दिला.

हें सर्व लक्षांत घेतले असता असें आढळून येईल की, काही खरेदी विक्री संस्था जरी अत्यंत उपयुक्त असे कार्य करीत असल्या, तरी एकदरीत सहकारी पद्धतीनें क्रयविक्रय करणें आणि सहकारी पद्धतीनें पिकांच्या दर्जा सुधारणें ह्या बाबतीत प्रयत्न फारच अपुरे आहेत

ज्या ठिकाणी सहकारी खरेदी–विक्री संस्था कार्यक्षम व संघटित आहेत त्या ठिकाणी सहकारी कर्ज पुरवठा पद्धतशीर होऊन पिकाचा दर्जा सुधारत असून उत्पादनाचे प्रमाणहि वाढत आहे आणि शेतकऱ्याची कर्ज फेडीची शक्ती वाढत आहे याची उदाहरणे अनेक ठिकाणी दृष्टोत्पत्तीस येतात. यामुळें सहकारी क्रयविक्रय व सहकारी पतपुरवठा याचे अन्योन्य संबंध कसे निगडीत आहे हें सिद्ध करण्याचे कारण उरतच नाही.

ज्या ठिकाणी सहकारी खरेदी-विक्री संस्था कार्यक्षम आहेत तेथें बाजारपेठेचे नियंत्रण करणे सोपे जाते असें आढळून येते. तसेच कर्ज फेडही वक्तशीर होते आणि सहकारी विक्री संस्था जेथे चांगल्या प्रस्थापित झाल्या आहेत तेथें थकबाकीचे प्रमाणही कमी आढळून येते. तेव्हा पिकांचा दर्जा सुधारण्यास, ग्रामीण कर्जाचा पुरेपूर उपयोग होण्यास व शेतकऱ्यांचे राहणीमान सुधारण्यास, सहकारी क्रयविक्रय संस्था प्रस्थापित करून त्या दृढमूल केल्या पाहिजेत हे आता निर्विवाद असून सर्वमान्य झाले आहे.

मग असा प्रश्न उद्भवतो की, बँकेने या बाबतीत पुढाकार घेऊन ५० वर्षे पुरे झाली असली तरी सुद्धा सहकारी पतपेढ्याप्रमाणें सहकारी विक्री संस्थाची वाढ सपाट्याने का झाली नाही आणि,सूपमा प्रयत्न करून हि शेतीला उपयोगी अशी अवजारे, खतें इत्यादिचा व्यवहार व शेतात उत्पन्न होणाऱ्या पिकाची विक्री सहकारी संस्थामार्फत का होत नाही ? सहकारी विक्रीला पुरेशी साथ मिळत नाहीं याची कारणे काय आहेत याची जर काळजीपूर्वक तपासणी केली तर असें आढळून येते कीं, या संस्था आणि त्याचे नेते यांना सहकारी विक्री संबंधीची स्पष्ट कल्पनाच नसते, आपले सभासद किंवा सभासद नसलेले जे कोणी आपल्याद्वारें माल विकतील तो माल विकून त्यावरील दलाली मिळविणे, या पलीकडे त्याचा व्यवहार जात नाहीं.दुसरे मुख्य कारण असे कीं, या संस्था एकाकीपणे काम करीत असतात आणि नियंत्रित वस्तूंची विक्री करून तेवढ्यावरच संतुष्ट रहातात. कारण त्यांत निश्चित अशा उत्पन्नाची खात्री असते तिसरें म्हणजे जिल्हानिहाय, तालुकानिहाय व गांवोगांवी असलेल्या अशा विविध प्रकारच्या संस्थांमध्यें अन्योन्य संबंध किंवा त्यांच्या व्यवहारांत एकसूत्रीपणा नसतो आणि शेवटी म्हणजे त्या संस्थेत काम करणाऱ्या नोकरवर्गाचा किंवा कार्यकर्त्यांचा आपल्या संस्थेवर जो विश्वास, निष्ठा असावयास पाहिजे तो नसते. त्यामुळें सहकारी विक्रीसंघटना दुबळी व अकार्यक्षम दिसून येते. निरनिराळ्या सहकारी संस्था एकत्र येऊन व्यवहार न करता, सभासद असूनही, सहकारी संघटनेला डावलून स्वतंत्रपणें खाजगी व्यापाऱ्याशी व्यवहार करताना आढळतात पाश्चात्य राष्ट्रांत सभासद संस्थांची संघटनेवर जी निष्ठा दिसून येते तशी भारतातील सहकारी संस्थातून दिसून येत नाहीं आपल्या संघटनेशीं इमानदार राहून अंतर्गत शिस्त राखणे हे क्वचितच् आढळून येते.

" आम्ही आमचे व्यवहार हाताळण्यास पूर्णपणे स्वतंत्र आहोत " असें काहीं संस्थाचे लोक मोठ्या अभिमानानें म्हणत असतात. ज्या संस्था सरकारच्या भाडवलवर व बँकेच्या आर्थिक व्यवहारावर वाढलेल्या दिसतात त्या संस्था देखील सहकारी क्रय-विक्रय संघटनेशीं संबंध ठेवत नाहीत. विशेष म्हणजे, सरकार या दोन्ही संस्थात भागीदार असूनही व सहकारी व्यावसायिक संघटना स्थापन करण्याच्या बाबतीत अत्यंत उत्सुक असूनही या संस्थाना काटेकोरपणें सहकारी क्रयविक्रय संघटनेचा आश्रय घेण्यास भाग पाडत नाही याचा परिणाम असा होतो की सरकारकडून या संस्थाना मिळणाऱ्या आर्थिक सहाय्याचा खाजगी व्यापारी आपले बळण चालविण्यास उपयोग करतात आणि सहकारी नियोजनाचा फायदा घेत असतात व ज्या हेतूने सरकार व जनता सहकारी संस्थाना प्राधान्य देतात तो हेतू साध्यच होत नाही !

सहकारी संस्था आणि सहकारी कारखानें यांना सरकारकडून आर्थिक सहाय्य दिले जाते व काही बाबतीत सवलतीही दिल्या जातात असें असूनही त्या सहकारी संस्थामार्फत मालाची विक्री करण्याचे नाकारतात स्वतः सहकारी क्रय विक्रय संस्थेचे सभासद असून ही त्या खाजगी व्यापाऱ्यामार्फत मालाची खरेदी–विक्री करणेंच पसंत करतात. अशी अनेक उदाहरणें आढळून येतात जरी सभासदानीं आपल्याशीं एकनिष्ठ रहावें असा त्याचा आग्रह असतो तरी स्वतः मात्र आपण ज्या मध्यवर्ती संस्थेशीं निगडीत आहोत किंवा ज्या सहकारी खरेदी विक्री संस्थेचें सभासद आहोत तिच्याशीं एकनिष्ठ रहाणें वा तिची शिस्त पाळणें त्यांना अनावश्यक वाटतें.

सहकारी क्रयविक्रय संस्थाचा मूळ हेतू, शेतकऱ्याला शेती उत्पादनास

लागणारी साधने पुरविण्यापासून, ते त्याच्या शेती मालाची वर्गवारी करून व प्रक्रिया करून योग्य भावानें थेट ग्राहकांना विक्री करण्यापर्यंत सर्व व्यवहार हाताळणें हा आहे. गताचा पुरवठा, शेती मालाची प्रतवारी, त्याची योग्य प्रकारे साठवण करणें व मालाचा दर्जा वाढविणें इ० सर्व बाबतीत या संस्था शेतकऱ्यांच्या उपयोगी पडत असतात. ग्रामीण विभागांत तर अशा संस्थांच्या पद्धतशीर विक्री करण्याच्या उपक्रमाला फार मोठें महत्त्व आहे. शेतांत पैदा झालेले पीक एकत्र करणें, त्यांच्यावर आवश्यक ती प्रक्रीया करून व त्याची प्रत लावून व्यवस्थित विक्री करण्यासाठी कोठाराची व वाहतूकीची व्यवस्था करणें, वगैरेबाबत नियोजन असावें लागतें; आणि त्यास अनुसरून कार्यक्षमतेनें तो व्यवहार करण्याचा अनुभवही असावा लागतो. तरच विक्री पद्धतशीर व यशस्वी होते. जर निरनिराळ्या सहकारी संस्थांनी आपापल्या पुरते व्यवहार करण्याची प्रवृत्ति सोडून देऊन, सर्वांचे व्यवहार सूत्रबद्ध केले, तर सहकारी क्रयविक्रय संस्था नुसत्या जुजबी सवलतीपुरत्या उपयोगी न राहता धंद्याच्या वाढीच्या दृष्टीनें व्यवहारातील धोका पत्करण्यासही समर्थ होतील. सहकारी क्रयविक्रय पद्धतीचा उपयोग केल्यामुळें यंत्रसामग्रीचा उपयोग करून शेतीमालाची प्रक्रीया करणें, परपेठातून विक्री करणे व व्यापारी व्यवहार वाढविणें शक्य होईल. व व्यापाराचा अनुभव मिळवून बाजारपेठाशी संबंध जोडणें, संशोधन आणि जाहिरात याचा अवलंब करून मालाची मागणी वाढविणें अशाप्रकारें सहकारी क्रयविक्रय व्यवहाराची प्रतिष्ठा व उपयुक्तता वाढविता येईल. अगदी किमान म्हणजे शेतकऱ्याला आपल्या उत्पादनास योग्य भाव मिळवा यासाठी संघटीत होता येईल. शेतकऱ्याची सहकारी विक्री संस्था नुसती अस्तित्वात आली तरी आपोआपच बाजारातील इतर व्यापाऱ्यात शेतकऱ्याकडून भाव पाडून माल घेण्याची जी प्रवृत्ती आहे तिला आळा बसेल. आणि बाजारपेठातून व्यापाऱ्यांनी संप केला तरी गरजू शेतकऱ्याला कमी भावात आपल्या मालाची विक्री करणें भाग पडणार नाही.

परंतु वर उल्लेखलेले लाभ, शेतकऱ्याच्या पदरी पडावेत म्हणून शेतकऱ्याकडूनही सहकारी संघटनेला सहकार्य मिळणें आवश्यक आहे. सहकारी संस्थांतून मोठ्या प्रमाणात मालाची विक्री झाली पाहिजे. जर, मोठ्या प्रमाणात सहकारी व्यवहार वाढले नाहीत तर सहकारी विक्री संस्थाना सध्याच्या बाजारपेठेतील पद्धति बदलणें, खर्चाची बचत करणें, कोठारे बांधून मालाची निगा ठेवणे व मालास चांगली किंमत मिळविणें, शक्य होणार नाही. आणि दुर्दैवाची गोष्ट अशी की, सहकारी क्रयविक्रय संस्थाना हीच मोठी अडचण आहे. त्यामुळेंच त्याना शेतकी मालाची विक्री चांगल्या प्रकारे करण्यात यश येत नाही. सभासदानी आपल्या शेतातील सर्व किंवा निदान ठराविक मर्यादेपर्यंत तरी पीक विक्रीसाठी आपल्या सहकारी विक्री संस्थाकडे पाठविले नाही तर सहकारी संस्था कशा कार्यक्षम होतील ? जर सभासदानी कर्ज मिळविण्यापुरतेच सहकारी संस्थाचे सभासद व्हावयाचे व इतर व्यवहारांत, व्यापारी अगर सावकार यांच्याशी पूर्ववत संबंध ठेवावयाचे असें आचरण केलें तर सहकारी नियोजन कसें यशस्वी होईल ? या गोष्टीची जाणीव सभासदांना असली पाहिजे. नाहीतर शेतकरी सभासद क्वचितशः व्यापाऱ्यांच्या आमिषांना बळी पडण्यानें, सहकारी संघटना कोलमडून पडण्यास विलंब लागणार नाही. इतकेंच नव्हे तर सहकारी नियोजनाचा फायदाहि शेतकऱ्याना मिळणार नाही उलट अप्रत्यक्षपणें हा लाभ मिळवून देण्यास जी सहकारी विक्री संघटना कारणीभूत झाली तिलाच उपरनिर्दिष्ट वागण्यानें हे शेतकरीसभासद दुबळी करीत आहेत. व त्यामुळें हा लाभ सतत चालू रहाण्याचे साधनहि नाहीसे होईल. समाईक विक्री केल्याने जे फायदे होतात त्याचे महत्त्व लक्षात घेऊन सभासदानी आपल्या संघटनेशी पूर्णपणें एकनिष्ठ राहून आपला माल सहकारी संस्थाद्वाराच विकणें हे त्याच्याच हिताचे आहे. ही गोष्ट त्याच्या मनावर बिंबविली पाहिजे आणि तसा आग्रहही ठेवला पाहिजे. ह्या संस्था आपल्याच आहेत ही भावना त्याच्या अंतःकरणात रुजली पाहिजे.

कार्यक्षम, अनुभवी आणि व्यवहारांत तज्ञ व विश्वासू असा नोकर वर्ग असणें हें सहकारी संघटनेच्या वाढीस अत्यंत जरूरी आहे. अनुभवी व विश्वासू नोकरवर्ग असल्यास व्यवहारातील धोका बराच कमी होईल.

तालुका वा जिल्हा बाजारपेठेतील संस्थाना अशी माणसे मिळणें शक्य होणार नाही. निरनिराळ्या ठिकाणच्या बाजारपेठा आणि ग्राहक यांच्याशी संपर्क ठेवून बाजारभावाची, गिऱ्हाइकाच्या धोरणाची दैनंदिन माहिती मिळवून व्यवहार करण्याकरितां मध्यस्थ व केंद्रीय संस्थाची आवश्यकता असते.

कार्यक्षम नोकरवर्गाचे नेमणुकीनें, मध्यवर्ती संघटनाचे व्यवहार सूत्रबद्ध करून धूर्ततेनें सांभाळल्यास क्रयविक्रय व्यवहारात जो धोका पत्करावा लागतो तो कमी होईल तसेंच नफ्यातील काही भाग राखून ठेवल्यास जरी थोडाबहुत धोका पत्करावा लागला तरी तो नुकसान भरून काढण्यास उपयोगी पडेल. सर्वांचा असा राखीव निधी एकत्र केल्यास अधिक फायद्याचें ठरेल अशा प्रकारची कार्यक्षम व प्रभावी क्रयविक्रय सहकारी संघटना लवकरच अस्तित्वात आली नाही तर बाजारपेठाचे नियंत्रण करणे, कोठारासाठी आर्थिक सहाय्य देणें इत्यादि उपाय जरी सरकारने योजले तरी त्याचा फायदा शेतकऱ्याना घेता येणार नाही. गेल्या काही वर्षांत सहकारी पतसंस्था, मध्यवर्ती बँका, क्रयविक्रयसंस्था व सहकारी प्रक्रीया कारखाने यात सरकारने भांडवल बरेंच गुंतविले आहे. आणि त्याना आर्थिक मदतही दिली आहे परंतु सूत्रबद्ध धोरणाचा व त्याच्या व्यवहारातील एकसूत्रीपणाच्या अभावामुळें प्रत्येक संस्था आपल्या पुरतेच आकुंचित व्यवहार करतात त्यामुळे त्या आपले उद्दिष्ट सफल करू शकत नाही उदा० सहकारी कारखाने किंवा प्रक्रीया संस्था यांच्या व्यवहाराचा सहकारी संघटनेपेक्षा खाजगी व्यापाऱ्यानाच फायदा मिळतो साखरेची विक्री, कारखान्याना लागणाऱ्या मालाची खरेदी खासगी व्यापाऱ्याकरवी होत असते सहकारी क्रय-विक्रय संस्थाना या सहकारी कारखानदारीचा फायदा अगर व्यवहार मिळत नाही. या धोरणानें सहकारी क्रयविक्रय व्यवहाराची प्रतिष्ठा कशी वाढेल ?

सरकारी कर्जासंबंधी भारत सरकारनें श्री. वैकुंठलाल मेहता याच्या

अध्यक्षतेखालीं जी समिती नेमली, ती आपल्या अहवालात असें म्हणते कीं, "कर्ज व उत्पादन आणि विक्री ह्या कार्यांचें सुसूत्रीकरण हें शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. शेतकऱ्यांनीं काढलेल्या जादा पिकाचा पुरेपूर लाभ त्याच्या पदरांत पडावयास हवा असेल तर त्याच्या पिकाला जास्तीत जास्त भाव मिळेल या दृष्टीनें प्रयत्न होणें आवश्यक आहे. चांगल्या प्रकारें विक्रीची सोय झाल्यास उत्पादनावर त्याचा परिणाम होईल हें न सांगताच लक्षांत येण्यासारखें आहे." म्हणून समितीच्या मतें, सहकारी विक्रीचा जो विभाग आहे, त्याच्या मार्गांत येणाऱ्या अडचणी दूर करून तो चांगल्या तऱ्हेनें सुसंघटित करण्यासाठीं जास्तींत जास्त प्रयत्न करणें अत्यावश्यक आहे. कर्ज आणि शेतकऱ्यानें काढलेले पीक यांची सांगड घालण्यासाठींच केवळ सहकारी विक्रीचा उपयोग होईल असें नव्हे तर शेतकऱ्याच्या पिकाला चांगला भाव मिळवून देण्यासाठींही सहकारी विक्री संघटना उपयोगी पडेल. वरीलप्रमाणें मत व्यक्त करून समितीनें शिवाय असेंही म्हटलें आहे कीं, "सहकारी विक्री संघटनांना शेतकऱ्यांकडून, त्याचा शेतीमाल विकत घेणें शक्य झाल्याशिवाय, सहकारी विक्रीचा लाभ शेतकऱ्यांना नीटपणें घेता येणार नाहीं. अशा प्रकारें शेतकऱ्यापासून मोठ्या प्रमाणावर माल खरेदी करण्यामध्यें जो धोका आहे आणि त्यामुळें जें संभाव्य नुकसान आहे, त्यापासून सहकारी विक्री संघटनांना संरक्षण देण्यासाठीं, सरकारनें एक किमान किंमत ठरवून अवश्य तर या सहकारी विक्री संघटनांकडून त्या किमान किंमतीला आपण माल विकत घेऊं अशी हमी दिली पाहिजे. अशा तऱ्हेचें धोरण सरकारनें निश्चितपणें स्वीकारलें पाहिजे. सरकारनें शेतकऱ्याला किमान किंमती मिळवून देण्याचें व किंमती स्थिर राखण्याचें उद्दिष्ट स्वतः पुढें ठेवलें आहे. त्या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठीं उपरनिर्दिष्ट धोरण, हें अंगभूत भाग म्हणून समजावें; आणि या सहकारी विक्री संस्थाकडून विकत घेतलेलें धान्य, साठवून ठेवून, ऐन

वेळी जेव्हा धान्याची टंचाई भासेल तेव्हां बाजारात विक्रीला काढावें व अशा तऱ्हेनें किमती स्थिर राखण्यास त्यांचा उपयोग करावा " समितीनें या ज्या सूचना केल्या आहेत, त्यायोगें शेतकऱ्याला निश्चित किमतीची हमी देणें सहकारी विक्री संघटनांना शक्य होईल यात शंका नाही. परंतु या सूचनांचे परिणाम काय होतील याचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे सरकारनें ठरवून दिलेल्या, किमान किमतीपेक्षा बाजारभाव जेव्हां जास्त असेल तेव्हां शेतकऱ्याला खाजगी व्यापाऱ्यांना धान्य विकणें सोयीचें वाटेल कारण सहकारी विक्री संघटना, सरकारनें ठरविलेल्या किमान किमतीपेक्षा अधिक किमतीला धान्य विकत घेण्याचे साहस करतील हें असंभवनीय आहे. कारण यांत शंका आहे. याच्या उलट जेव्हां बाजारभाव सरकारी किमतीच्याही खाली असतील तेव्हा मात्र शेतकरी, सहकारी विक्री संघटनांकडे धाव घेतील आणि आपलें सर्व पीक हे त्यांनी त्याची प्रत न पहाता, सरकारने बांधून दिलेल्या भावाला विकत घ्यावें अशी अपेक्षा करतील यामुळें अशावेळी ह्या सहकारी विक्रीसंस्थांना, स्वत:च्या भांडवलापेक्षा जास्त भांडवल उभें करून हे धान्य वा पिक विकत घ्यावें लागेल. साहाजिकच त्यातून अनेक प्रश्न निर्माण होतील. सिलोनमध्यें अशीच व्यवस्था जेव्हा सरकारनें केली तेव्हा तेथील सहकारी विक्री संघटनांना त्यासाठी भांडवल उभें करणें, माल साठविण्याची व्यवस्था करणें इ० अनेक प्रश्नांना तोंड देण्याची पाळी आली. किमान किमत ठरवून दिल्यामुळेंच शेतकऱ्याला आपल्या पिकास निश्चित ठराविक किमत येईल याची हमी मिळेल. तसेंच भाव खाली उतरल्यास, सहकारी विक्री संघटनांना शेतकऱ्यांच्या उपयोगी पडण्यासाठी इतर व्यापाऱ्याप्रमाणें धोकाहि पत्करावा लागेल आणि बाजारपेठेंत स्वत:चे वळण बसवावें लागेल. सहकारी क्रयविक्रय संघटनांना, मोठ्या प्रमाणावर व्यवहार करणें, शक्य झाल्याशिवाय बाजारपेठांत वळण बसविणें शक्य होणार नाही, किंवा अशाप्रकारचे व्यवहार यशस्वीरित्या हाताळण्यासाठी योग्य ती यंत्रणा प्रस्थापित करता येणार नाही केवळ किमती सरकारी भावापेक्षाही खाली उतरतील तेव्हाच खरेदी करण्यानें, सहकारी विक्री संस्था तग धरूं शकणार नाहीत अशातऱ्हेनें स्वत:चा विकास करण्यासाठी किंवा समितीनें केलेल्या सूचना सरकारनें स्वीकारल्या आणि तदनुसार काम करावयाचे झाले, तरीसुद्धां सहकारी विक्री संस्थांना स्वत:ची सूत्रबद्ध संघटना उभारावी लागेल; आणि सर्व व्यवहाराचें सुसूत्रिकरण करावें लागेल अन्यथा सरकारला मुद्धा समितीच्या सूचना अंमलात आणणें कठीण होईल या ठिकाणी हें नमूद करणें आवश्यक वाटतें की समितीनें सुचविलेल्या धर्तीवर, त्या वेळच्या मुंबई सरकारने प्रयोग म्हणून एक लहानशी योजना आपल्या पुरवठा खात्याच्या कार्यक्रमाचें अंग म्हणून हातीं घेतली होती. त्यावेळी सहकारी संस्था आणि सरकार यांना काही अडचणींना तोंड द्यावें लागलें होतें. तेव्हा धोका पत्करावयाचा असला तरीसुद्धा, क्रयविक्रय संघटनांची उभारणी योजनापूर्वक कार्यक्रम आखून केल्याशिवाय, अशा सहकारी संस्थांना, सरकारनें किमती संबंधीचें धोरण स्वीकारलें तरी देखील शेतकऱ्यांचे सर्व धान्य विकत घेण्याची जबाबदारी शिरावर घेणें शक्य होणार नाही हे आढळून आलें. हा अनुभव या प्रश्नाची निकड अधिक प्रभावीपणे लक्षात आणून मनांत बिंबवतो. केंद्रीय शेतकी मंत्री डॉ पंजाबराव देशमुख यांनी हैद्राबाद येथें १९५५ साली भरलेल्या सहकार आणि विक्री परिषदेपुढें केलेल्या भाषणात सहकारी विक्री संघटनांचे महत्त्व प्रतिपादन करतांना असें म्हटलें होतें की, –

"मी वारंवार सांगत आलो आहे त्याप्रमाणें येत्या कांहीं वर्षांत मालाची विक्री करणें कठिण होऊन बसणार आहे. केवळ किमती रोखून धरण्याचा हा प्रश्न नाहीं, तर उत्पादनाची आणि वांटपाची आंखणी अशा पद्धतीनें केली पाहिजे कीं, आपण योजलेल्या प्रत्येक उपायाचा लाभ शेतकऱ्यांना ( उत्पादकांना ) प्रत्यक्षपणें झाल्याचें दृष्टोत्पत्तीस आलें पाहिजे. कारण शेतकरीवर्ग हाच आपल्या कष्टकरी जनतेचा फार मोठा आणि महत्त्वाचा भाग आहे. अर्थातच् याचा फायदा ग्राहकानाही होणार आहे. प्रत्येक योजना सुचवितांना आपण ह्या दृष्टीकोनातून पाहिलें पाहिजे. अशा प्रकारे नियंत्रित बाजारपेठा प्रस्थापित करावयाच्या असतील तर त्याच्या व्यवस्थेत शेतकऱ्याचा दृष्टिकोन प्रभावी ठरला पाहिजे. म्हणजेच शेतकऱ्याला त्यांत प्रामुख्यानें प्रतिनिधीत्व मिळालें पाहिजे. शेती मालाची प्रतवारी ठरवून तिचा प्रभाव पडावा, अशा अपेक्षेनें ह्या गोष्टी मोठ्या प्रमाणावर पद्धतशीरपणें करून, शेतकऱ्यास या सर्व सवलतींचा लाभ मिळेल अशीच योजना आखली पाहिजे. आणि त्याच्या चांगल्या मालाची त्याला जास्तीत जास्त किमत मिळेल याबद्दल दक्ष राहणें आवश्यक आहे. वहातुकीची व्यवस्था व माल वहाण्याचे दर अशा पद्धतीनें किंवा अशा रितीनें निर्धारित केले पाहिजेत की, मोठ्या बाजारपेठांत माल विक्रीला नेणे सहज शक्य व्हावें. माल साठविण्याची कोठारें व गोदामें अशा ठिकाणी बांधली पाहिजेत कीं, शेतकऱ्याला त्याचा सर्वांत प्रथम फायदा मिळाला पाहिजे. व्यापारविषयक धोरण, विशेषत: परदेशी व्यापारातील वाटे (Quota) ठरविणें या विषयीची आंखणी आणि घोषणा अशातऱ्हेनें व अशावेळी झाल्या पाहिजेत की त्याचा शेतकऱ्याला अधिकाधिक लाभ होईल खरें सांगावयाचें तर सामान्य माणसाच्या राहणीचें मान सुधारणें व त्याचें उत्पन्न वाढविणें, हें जें केंद्रीय योजनेचें मुख्य उद्दिष्ट आहे, त्याचें एक अविभाज्य अंग समजूनच सहकारी विक्री संघटनेच्या विकासाचा कार्यक्रम आंखण्यांत आला पाहिजे. अत्यंत तुटपुंज्या साधनांनिशी शेती करणाऱ्या लोकांची संख्या फार मोठ्या प्रमाणावर आहे, आणि त्यांच्याजवळ विक्रीसाठी धान्यही फार थोड्या प्रमाणात असते अशा परिस्थितींत आपणास विक्री संघटनेंच्या विकासाचा कोणताही कार्यक्रम अमलात आणणें शक्य होणार नाही. प्रत्येक क्षेत्रांत सोयीस्कर अशा सहकारी संस्था संघटित केल्या तरच हें शक्य होईल."

पुणें येथें १९५६ साली भरलेल्या सहकारी संघटनांच्या प्रादेशिक परिषदेचें उद्घाटन करताना डॉ धनंजयराव गाडगीळ यांनी पुढील विचार प्रदर्शित केलें.

" दुसऱ्या पंचवार्षिक योजनेची जी आंगणी केली आहे; तीमध्यें कर्ज देणाऱ्या संस्थांची वाढ, विक्री करणाऱ्या संस्थांच्याच जोडीनें होणें आवश्यक, असें प्रतिपादन केलें आहे. सहकारी विक्री संस्थामध्यें पुरेशी वाढ झाल्याखेरीज सहकारी पतपेढ्यांची वाढ इष्ट तेवढी होऊं शकणार नाहीं. सगळ्यांत महत्त्वाची गरज म्हणजे या सहकारी विक्री संघटना एखाद्या व्यापारी संस्थेप्रमाणें चालविल्या पाहिजेत. कर्ज देण्याचा व्यवहार कसा करावा, याची तत्त्वें त्या मानानें फार थोडी आहेत, आणि सोपी आहेत. थोडेंसे तारतम्य वापरलें तर त्याचा अवलंब यशस्वीपणें करतां येईल. त्यांत फारसें नुकसान होण्याचा धोका नसतो. परंतु सहकारी विक्री संस्थांचा व्यवहार कसा आणि कोणत्या तत्त्वांवर चालवावा हे समजणें तितकें सोपें नाहीं. तें गुंतागुंतीचें आणि तांत्रिक आहे. या ठिकाणी हे लक्षात ठेवलें पाहिजे कीं, अनेक वर्षं व्यापार करून मिळवलेला पिढीजात अनुभव व्यापाऱ्याच्या किंवा धंदेवाल्याच्या संग्रही असतो. त्यांना ती कला उपजत प्राप्त झालेली असते. अशा यावबगार लोकांशी सहकारी विक्री संघटनांना सदा झगडावयाचा असतो. म्हणून सहकारी विक्री संघटनांनीं आपला व्यवहार एखाद्या कुशल व्यापाऱ्याप्रमाणें धंदा म्हणून मन लावून केला पाहिजे. या संस्थांच्या पदाधिकाऱ्यांनी व कार्यकर्त्यांनी तें तंत्र अवगत करून घेतलें पाहिजे. अनेक बाजारपेठांची परिस्थिति सुधारण्यासाठी, त्यांचे नियमन करण्यासाठीं, उपाययोजना करण्यात येत आहेत. परंतु विक्रीसंघटना स्वतःच समर्थ असल्याशिवाय नियंत्रित बाजारपेठा शेतकऱ्याच्या पदरांत खरोखरच फायदा टाकू शकणार नाहींत म्हणून ठिकठिकाणच्या स्थानिक सहकारी विक्री संस्था समर्थ बनविणें आणि त्यांचें स्वैर्य टिकून राहील अशी परिस्थिती निर्माण करणें, हीच सर्वांत प्रथम अत्यंत महत्त्वाची गरज आहे,

बॉम्बे स्टेट को–ऑपरेटिव्ह बँकेचे चेअरमन श्री. आर् जी. सरैय्या यानीं १९५४ साली, वार्षिक सभेंत केलेल्या भाषणात, सहकारी पतपेढ्या यशस्वी होण्यासाठी त्यांच्या जोडीला समर्थ, कार्यक्षम अशा सहकारी विक्री संघटना अस्तित्वात येणें किती निकडीचे आहे ते प्रतिपादन करताना असे सांगितले की,

" सहकारी संस्थाकडून शेतकऱ्याना द्यावयाच्या कर्जांच्या बाबतीत वेगवेगळ्या संस्थांची संघटना कशी असावी ? त्याच्या मध्यवर्ती बँकाकडून त्यांचें नियमन कसें व्हावें इ० संबंधीची पद्धत आपण निश्चित केली आहे आणि त्याचे स्वरूपही निश्चित केले आहे. परंतु त्याच्या इतकीच महत्त्वाची अशी दुसरी एक संघटना सहकारी क्रयविक्रय क्षेत्रातही केली पाहिजे. सहकारी विक्री संस्थाचा कारभार, त्यांचे अंतर्गत शिस्त व परस्पर संबंध व त्यांना आवश्यक असणारे भांडवल पुरविणें, या सर्व बाबी कोणत्या पद्धतीनें कराव्या हे ठरविणें, आवश्यक आहे. तसेंच सहकारी पतपेढ्या आणि सहकारी विक्री संघटना यांची सांगड घालून त्या अधिक प्रभावीपणें कार्यक्षम होतील अशी उपाययोजना करणें अत्यंत निकडीचें आहे.

" शेतकऱ्याना कर्ज देण्याच्या संघटनाचा विचार करण्यासंबंधी नेमलेल्या ॲग्रिकल्चरल क्रेडिट ऑरगनायझेशन कमिटीनेंहि (१९४८) सहकारी कर्जपुरवठा व सहकारी खरेदीविक्री संस्था, ह्या एकमेकास पोषक कशा होतील अशा प्रकारची सूत्रबद्ध व प्रभावी संघटना असावयास पाहिजे, अशी शिफारस केली होती या सर्व प्रश्नांचा काळजीपूर्वक विचार करण्याची वेळ आता आली आहे तेव्हा सरकारनें त्यासाठीं एक समिती नेमून तिला या प्रश्नाचा साकल्यानें विचार करून, सहकारी विक्री संस्थाचें योग्य प्रकारे सुसूत्रीकरण कसें करावे व त्याचा भावी विकास कसा करावा याबाबत चौकशी करून शिफारसः करावयास सुचवावें. या प्रश्नाची निकड लक्षात घेता आणि विविध अधिकाऱ्याकडून सहकारी विक्री संघटना प्रभावी करण्यासाठी जे उपाय सुचविण्यात येत आहेत व सहकारी खरेदी विक्री संस्थाचे अनुभव व निरनिराळ्या समित्यांच्या शिफारशी लक्षात घेऊन संकलित विचार व निश्चित सूचना करण्यासाठी अशा समितीची आवश्यकता आता निर्माण झाली आहे. "

तेव्हा पूर्वीचा अनुभव, सध्याच्या गरजा व अपेक्षा लक्षात घेतां ठराविक वेळात, नियोजीत विकास साधण्यासाठी, सूत्रबद्ध खरेदी विक्री संघटनेची आवश्यकता लक्षात घेऊन ह्या सर्व प्रश्नांचा विचार करावयास पाहिजे आणि सहकारी खरेदी विक्रीसंस्था केवळ कमिशन एजंट म्हणूत नव्हे तर व्यापारी संघटना या नात्यानें शेती मालाच्या खरेदी विक्रीचे व्यवहार करण्यास समर्थ करावयास पाहिजे, त्यासाठीं सभासदामध्यें निष्ठा व सहकारी शिस्त निर्माण करावयास पाहिजे. संस्थेची अंतर्गत शिस्त व संस्थेच्या सभासदांनी स्वीकारलेल्या नियमांचें कसोशीनें पालन, या सहकारी विक्री संघटनेच्या मुलभूत गरजा आहेत. असें झाले नाही तर खाजगी आणि सहकारी व्यवहारात फारसा फरक उरणार नाही. फरक एवढाच राहील की, सहकारी संघटनाना सरकारकडून जें आर्थिक सहाय्य व पाठिंबा मिळतो त्याचा उपयोग सहकारी संघटना वाढवण्यास न होता व्यक्तिगत व्यवहार वाढविण्याकडे होईल.

सहकारी संघटनाचे प्रभावीपणें सूत्रीकरण करणें आणि त्यांना आर्थिक दृष्ट्या समर्थ करणें हें कार्यहि अत्यंत महत्वाचे आहे याची सतत जाणीव असावयास हवी आजकाल खरेदी विक्री संघाच्या मध्यवर्ती संघटना फारशा प्रभावी नाहींत घटक संस्थाचा त्यांवर विश्वास नाही आणि त्या स्वतंत्रपणें व एकाकीपणें स्वतःचे व्यवहार करीत असतात. सहाजिकच घटक संस्था मोठ्या जिकीरीनें सभासद होतात व थोडेसे भाग भांडवल गुंतविण्या पलिकडे त्या ह्या मध्यवर्ती संस्थाच्या व्यवहारात फारसें लक्ष घालीत नाहीत

याबाबत प्रत्यक्ष उदाहरणच द्यावयाचे झाले तर, ते म्हणजे सरकारकडून भरपूर प्रमाणांत आर्थिक सहाय्य मिळत असलेलें सहकारी साखर कारखानें होत. हे स्वतः सहकारी क्षेत्रांत मोठे यश मिळविल्याची ग्वाही देतात. मात्र ते क्रयविक्रय संस्थेचे सभासद व भागीदार असूनही आपल्या संघटनेमार्फत व्यवहार करण्याचे नाकारतात आणि त्याचें कारण असें सांगतात कीं, खाजगी व्यापाऱ्यांकडून व व्यक्तींकडून आपल्याला अधिक लाभ होतो आपल्या सहकारी साखर कारखान्यांसारख्या भरपूर विकसित अशा संघटित संस्था आपल्याच संस्थेवर असा जो अविश्वास दाखवितात, त्यामध्ये सहकारी ध्येयवादाचा विचार असतो

कां ? आपल्या स्वतःच्या सदस्यांकडूनच पाठिंबा मिळाला नाहीं तर सहकारी विक्री किंवा व्यवसाय संघटना कशा जगतील ? कित्येक वेळा ज्याचे प्रतिनिधी मध्यवर्ती सस्थेच्या संचालक मंडळाचे सदस्य असतात, अशा सहकारी सस्थासुद्धां आपल्या क्रयविक्रय संघटनेमार्फत आपला व्यवहार करीत नसल्याचे आढळून येते. यामुळें जेव्हां घटक सहकारी संस्थानीं आपल्या मध्यवर्ती संघटनेशी इमानी राहिलें पाहिजे आणि त्याचे सर्व व्यवहार मध्यवर्ती संघटनेकडून सूत्रबद्ध झाले पाहिजेत असे प्रतिपादण्यात येते, त्यावेळी सक्ती करणें हे लोकशाही कारभाराच्या आणि स्वयंस्फूर्त कार्याच्या तत्त्वाविरुद्ध आहे असा त्याचा अर्थ करून लोकच त्याविरुद्ध गिल्ला करण्यात येतो. परंतु जेव्हा एखादी सहकारी संस्था, मध्यवर्ती खरेदी विक्री संघटनेची सभासद बनते तेव्हा त्या संघटनेला पाठिंबा देण्याचे आणि तिचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी, तिला समर्थ आणि प्रभावी बनविण्याचे वचन आपणहून स्वतःवर घालून घेते या अभिप्रेत असलेल्या तत्वाचा विसर सोयीस्कर असला तरी सहकारी चळवळीचें जे उद्दिष्ट त्यास श्रेयस्कर निश्चितच नाही ! जेव्हा सहकारी संस्थाना, सरकार आर्थिक सहाय्य देऊन पाठिंबा देते तेव्हा त्या संस्थेसारखीच उद्दिष्टें असलेल्या इतर सहकारी संस्थाना पाठिंबा देणें हे त्या संस्थांचे कर्तव्यच ठरत नाहीं काय ?

म्हणून केवळ सहकारी विक्री संघटनेच्या यशासाठीच नव्हे तर राष्ट्रीय योजनेचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं सुद्धां संस्थेची शिस्त व सुसूत्रीकरण, यावर विविध सहकारी संस्थातून भर देणें आवश्यक आहे. विशेषत. सरकारनें ज्या संस्थातून भांडवल गुंतविलें आहे किंवा ज्या सस्थाना सरकारकडून सहाय्य मिळाले आहे, त्याच्यावर तरी हे बंधन असले पाहिजे. तसेच शेतमालाची विक्री सहकारी सस्थामार्फत करण्यासाठी आणि शेतकऱ्याला लागणारीं अवजारें, खत इ० साधनें सहकारी संस्थाद्वारे पुरविण्यासाठीं, एक नियोजित कार्यक्रम असला पाहिजे.आणि या सर्व सहकारी संस्थाना आणि तिच्या सभासदांना आपल्या सहकारी संघटनेशी इमानी राहाण्याचा दंडक घालून दिला पाहिजे. जे आपल्या सहकारी संस्थाचे नियम पाळणार नाहींत. अशाना आर्थिक सहाय्य देण्याचें प्रसंगी नाकारूनसुद्धां हा दंडक पाळावयास लावला पाहिजे, हे केलें तरच सहकारी विक्री आणि खरेदी संघटना यशस्वी होतील.

हा लेख संपविण्यापूर्वी, निरनिराळ्या सहकारी सस्थातील नातें कसें असावे, या संबधी महाराष्ट्र राज्य सहकार युनियननें, श्री डी. ए. शहा यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या समितीनें, जे पुढील विचार प्रदर्शित केले आहेत त्याकडे मी सहकारी संस्थाचे व नेत्याचे लक्ष वेधूं इच्छितो.

समिती म्हणते, "विविध प्रकारच्या सहकारी सस्थांना आणि त्यांच्या मध्यवर्ती संघटनाना परस्परांच्या हितासाठीं, एकत्र आणण्यास पुष्कळच वाव आहे. सहकारी चळवळींची जसजशी वाढ होत जाईल तसतसा हा वाव अधिकाधिक प्रमाणात मिळेल. म्हणून आमच्या मतें सहकारी सस्थाना सूत्रबद्ध करण्याची वेळ आता आली आहे

" मालाची खरेदी, उत्पादन, व त्यावरील प्रक्रिया, उत्पादनासाठी लागणाऱ्या साधनाची निर्मिती व विक्री या सर्व साखळीचा प्रत्येक दुवा, सहकारी संस्थांनी जोडलेला आहे, असे आज आपल्याला दाखविता येणार नाही. याउलट कोणत्याही एका वस्तूच्या उत्पादनापासून विक्रीपर्यंतच्या व्यवहाराची तपासणी केली तरी असे आढळून येईल की यातील फारच थोडे व्यवहार सहकारी संघटनांच्याद्वारा होतात. "

"सहकारी कार्यकर्ते आणि सहकारी संस्था याना, पुष्कळ वेळा ज्या संस्थाना सरकारकडून प्रत्यक्ष आर्थिक सहाय्य होत नाही अशा संस्थानासुद्धा, नोंदणी फी, प्राप्तीकरातून सूट, इत्यादी रूपाने सरकारकडून संरक्षण मिळते; याचा विसर पडतो. खाजगी व्यापाऱ्याप्रमाणे सहकारी संघटनांना प्रत्येक ठिकाणी स्पर्धेस तोंड द्यावे लागत नाही. प्रत्यक्ष आर्थिक मदत किंवा किमत आणि इतर खरेदीच्या, पुरवठ्याच्या किंवा वाटपाच्या बाबतीत प्राधान्य इ० अनेक तऱ्हेनी या संस्थांना, सरकारकडून संरक्षण मिळते व सामाजिक आणि राष्ट्रीय उद्दिष्ट साधण्याच्या दृष्टी-कोनातून या गोष्टीचे समर्थन केले जाते. सहकारी संस्था आणि कार्यकर्ते जेव्हा जेव्हा त्याना हवे असेल, तेव्हां तेव्हां, आपल्याला संरक्षण हवे म्हणून मागणी करण्यास कचरत नाहीत मग असा प्रश्न निर्माण होतो की, करदात्या लोकांवर बोजा टाकूनही, ज्या सहकारी संस्था तग धरतात त्याचे आपल्या इतर सहकारी संस्थाबाबत काहीच कर्तव्य नाही काय ? सहकारी चळवळीतील प्रत्येकाने हा प्रश्न जर स्वतःच्या मनाशी विचारला तर त्याचे उत्तर होकारार्थीच येईल. पण असे असूनही फारच थोड्या सहकारी संस्थाना, आपण हे कर्तव्य अंशतः तरी पार पाडले आहे असा दावा करता येईल. जे लोक स्वतःला आर्थिक सहाय्य व इतर सवलती या बाबतीत प्राधान्य मिळावे असे प्रतिपादन करतात त्यांनी स्वत ही तसाच तऱ्हेचा दृष्टीकोन इतर सहकारी संस्थाबाबत स्वीकारून त्यांना प्राधान्य देणे आणि त्यांच्याशीच व्यवहार ठेवण्याचा निश्चय करणे हे त्याचे प्राप्त कर्तव्यच ठरते, हे उघड आहे. याला मर्यादा फक्त त्याच्या सामर्थ्याचीच राहील. त्याची सांपत्तिक कमी पडली तर गोष्ट निराळी. उदा० सरकार खादी आणि हातमागाचे कापड याना आर्थिक सहाय्य देते ग्रामीण उद्योगधंद्याना किमतीच्या बाबतीत प्राधान्य देते आणि मालाच्या विशिष्ट दर्जाच्या बाबतीत काही अशी सवलतहि देते अशा स्थितीत सुव्यवस्थित रीतीने चालविलेले साखर कारखाने, आणद येथील दुध उत्पादन संघ, मध्यवर्ती स्वरूपाच्या आर्थिक सहकारी संस्था यानी थोडेसे जास्त पैसे खर्च करून खादी किंवा हातमागाचे कापड, ग्रामोद्योगाद्वारे तयार केलेले लाकूडसामान ( फर्निचर ) तसेच सहकारी औद्योगिक संस्थानी तयार केलेल्या वस्तू, याचा वापर करण्यावर कटाक्ष का ठेवू नये ? हे सर्व तर बाजूलाच राहू द्या पण याहीपेक्षां पुढची गोष्ट म्हणजे ज्या बाबतीत सहकारी संस्थाचा माल खरेदी करण्यासाठी ज्यादा खर्च करावा लागत नाही, अशा बाबतीतसुद्धा या सहकारी संस्थाकडे दुर्लक्ष करून, खाजगी व्यापाऱ्यांशी करार करताना आढळतात. प्रत्येक सहकारी संस्थेने कोणताही आर्थिक व्यवहार करताना तो खाजगी व्यापाऱ्यांशी किंवा व्यापारी संस्थांशी करण्याऐवजी सहकारी संस्थांशी करता येणार नाही का? असा विचार करावा आणि जरूर तर थोडीशी झीज सोसूनही सहकारी संस्थाकडूनच माल घेण्याचा (किंवा विकण्याचा ) कटाक्ष ठेवावा. जर अनेक सहकारी संस्थानी हा मार्ग अवलंबिला तर ज्या इतर सहकारी संस्थाना सरकारचे सहाय्य घ्यावे लागते किंवा सवलती मागाव्या लागतात, त्या काही काळानंतर, मागण्याची आवश्यकता भासणार नाही.

" सहकारी संस्थाच्या, ह्या सहकारी संघटनांना भविष्य काळांत फार मोठे महत्त्व प्राप्त होणार आहे. सर्वांच्या सर्व लोकसंख्या नाहीतरी लोकसंख्येचा बराचसा भाग सहकारी संघटनात समाविष्ट होवून व्यवहार करू लागण्यास या सहकारी संस्थाच्या परस्पर पूरक सहकार्याने सध्याच्या विविध सहकारी संघटनाचे सामर्थ्य तर वाढेलच परंतु ज्या अनेक क्षेत्रात सध्या सहकारी संस्था मुळीच अस्तित्वात नाहीत तेथेहि त्या निर्माण करणे आणि इतर सहकारी संस्थाच्या बळावर त्याना दृढमूल करणे सहज शक्य होईल व अशा प्रकारे आरंभाला माल जेथे तयार होतो तेथपासून तो माल ग्राहकाच्या हाती पडेपर्यंतचे, सर्व व्यवहार सहकारी संस्थामार्फतच पार पडतील व सहकारी चळवळीचे अंतिम उद्दिष्ट साध्य होईल."

" उत्पादन, त्याचे वाटप आणि त्याचा वापर या आर्थिक सांखळीमधील सर्व दुव्याचे सहकारीकरण करण्याची आवश्यकता जर लक्षांत घेतली गेली, तर विविध प्रकारच्या सहकारी संस्था, जिच्या अवयवासमान आहेत अशा सहकारी चळवळीला जिवंत स्वरूप प्राप्त करून दिले पाहिजे हे मान्य करावेंच लागेल. जेव्हा स्थानिक संस्था व सरकार याजकडून सहकारी संस्थाना प्राधान्य व सहाय्य मिळाले पाहिजे अशी अपेक्षा बाळगण्यांत येते त्याचवेळी इतर सहकारी संघटनानाही, अस्तित्वात असलेल्या सहकारी संस्थाकडून प्राधान्य मिळणे आवश्यक आहे. हे तत्व मान्य झाले तर विविध प्रकारच्या सहकारी संस्थात फलदायी असे सुसंवादी संबंध प्रस्थापित करण्याचे कार्य सफल होईल "★








# ...तील विणकर सहकारी संस्था संघटन व संघर्ष

...न. एस. कुलकर्णी
...निबंधक सहकार खाते नागपूर



दर्भात हातमागाचा धंदा पुरातन असून त्याची व्याप्ति सर्व भारतात पसरली आहे १९५१ च्या शिरगणतीत विदर्भात ८७,५९० हातमाग अस ल्याचे नमूद करण्यात आले आहे त्यापैकी ५९५८८ हातमाग नोंदविण्यात आले आहेत जिल्हानिहाय हातमागाची संख्या खालीलप्रमाणे आहे –

| | |
|---|---|
| नागपूर | ४३,४८३ |
| चांदा | १७,०९३ |
| भंडारा | ११,२२६ |
| बुलडाणा | १,३३८ |
| अमरावती | ६,८११ |
| वर्धा | १,९६६ |
| अकोला | ४,२१२ |
| यवतमाळ | १,३५१ |
| एकूण | ८७,५९० |

**संस्थाची संख्या वाढत चालली-**

युद्धकाळात सुताच्या वाटपावर असलेल्या नियंत्रणामुळे, तेव्हापासून विणकराच्या सहकारी संघटना करून, त्याच्या मार्फत सूत वाटपाचे काम हाती घेण्यात आले आहे १९५२ साली "अखिल भारतीय हातमाग मंडळ" अस्तित्वात आल्यावर हातमागाच्या धंद्याच्या उन्नतीसाठी विविध योजना हाती घेण्यात आल्या. १९५६ साली असलेल्या संस्थाची संख्या १६८ वरून १९६१ साली २८८ वर गेली ती खालील प्रमाणे –

| जिल्हा | कार्यशील सहकारी संस्था | अकार्यशील संस्था | गुंडाळलेल्या संस्था | एकूण |
|---|---|---|---|---|
| नागपूर | १२० | ३८ | ७ | १६५ |
| भंडारा | १८ | २० | १ | ३९ |
| चांदा | १२ | २७ | ५ | ४४ |
| वर्धा | ६ | — | २ | ८ |
| अमरावती | ८ | ५ | १ | १४ |
| यवतमाळ | २ | १ | २ | ५ |
| अकोला | ५ | १ | १ | ७ |
| बुलडाणा | ३ | — | ३ | ६ |
| एकूण | १७४ | ९२ | २२ | २२८ |



ह्या संस्थान नोंदलेल्या सभासदाचे ४२,५७१ हातमाग असून त्यापैकी ४१,३५६ मागावर प्रत्यक्ष उत्पादन चालू आहे. विणकर सहकारी संस्थाना आपले काम करण्यासाठी असलेल्या गरजाचा विचार करून विविध प्रकारचे आर्थिक सहाय्य देण्यात येत आहे. ह्या सहाय्याचे मुख्यत: चार भाग पाडता येतील.–

(१) भांडवलासाठी (२) तांत्रिक सुधारणेसाठी
(३) मालाच्या विक्रीसाठी (४) इतर योजनासाठी.

**भांडवलासाठी योजना**

सुरवातीस सहकारी खात्यामार्फत सेस फंडातून, कार्यशील भांडवलाकरिता लागणाऱ्या भांडवलाचा पुरवठा, मागाच्या प्रमाणात सहकारी संस्थाना करण्यात येत असे. हल्ली रिझर्व्ह बँकेकडून कलम १७ (२) ब (ब) खाली, मध्यवर्ती बँकेमार्फत बँकेच्या सर्वसाधारण दरापेक्षा शेकडा दीड कमी दराने, रक्कम पुरविण्यात येते. हल्ली राज्य, सहकारी बँकेला शे. अडीच दराने व मध्यवर्ती बँकेला शे. ३ दराने हे कर्ज मिळत असून त्याच दराने त्याना ते प्राथमिक विणकर सहकारी संस्थाना द्यावे लागते. ह्यात सरकारने शे. ६६ पर्यंत नुकसान आल्यास हमी घेतली असून शिवाय बँकांना शे. अडीच प्रमाणे सबसिडी मंजूर केली आहे ह्या योजनेखाली देण्यात आलेल्या आर्थिक सहाय्याची माहिती खालीलप्रमाणे आहे:–

| वर्ष | संस्था | मिळालेले कर्ज |
|---|---|---|
| ५७–५८ | २ | १३२०० |
| ५८–५९ | ४८ | ४२२०८१ |
| ५९–६० | ११ | ९०५०० |
| ६०–६१ | ३८ | ३५३७५० |

ह्या योजनेखाली प्राथमिक संस्थेला दर मागामागे ३०० रुपयाप्रमाणे कर्ज देण्यात येते. मात्र ह्यातून संस्थेचे स्वतःचे भांडवल वजा करण्यात येते. ह्या वर्षी १० लाख रुपयाचा कर्ज पुरवठा करण्यांत आला आहे. ह्या कर्जाच्या पद्धती प्रमाणे हे कर्ज मार्च पर्यंत परत फेडावयाचे असून ह्याचे स्वरूप "कॅशक्रेडीटचे" आहे. विक्री होईल तशी रक्कम संस्थानी आपल्या बँकेच्या खात्यांत जमा केली पाहिजे. व जरूर पडेल त्याप्रमाणे ती काढली पाहिजे, म्हणजे कर्ज परत करताना संस्थेवर एकदम ताण पडणार नाही. शिवाय प्रत्येक मागा मागे जे ३०० रु. प्रमाणे कर्ज देण्यात येते ते पुरेसे नाही असे आढळून आले. त्यामुळे अखिल भारतीय हातमाग मंडळाच्या वतीने ही कर्जाची मर्यादा नुकतीच वाढविण्यात आली असून त्यामुळे विणकर व सहकारी संस्थाना कार्यशील भांडवलाकरिता प्रति मागास रु. ५०० या दराने कर्ज देण्यांत येईल. ह्या योजनेचे फायदे विणकर संस्थाच्या लक्षांत आले असून, प्रतिवर्षी कर्जाची मागणी वाढत आहे. नोकरीचे काम करणाऱ्या विणकरांना मागामागे २०० रु. प्रमाणे कर्ज देण्यात येते.

ह्याशिवाय व्यक्तिगत विणकरांना सहकारी संस्थाचे सहभागी होण्यासाठी १,१८,८६२ रु. चे कर्ज देण्यांत आलें शिवाय संस्थेने गोळा केलेल्या भाडवलाइतकें भाडवलही देण्यांत येते. त्याप्रमाणे ११ संस्थाच्या भाडवलांत सरकारने २०६३०० रु. इतकी भागीदारी स्वीकारली आहे.

### तांत्रिक सुधारणासाठी सहाय्य

हातमागाचे उत्पादन वाढविण्यासाठी आवश्यक असलेली हत्यारें व अवजारें यांच्या खरेदीसाठी मदत देणे फार आवश्यक आहे. "ट्ट्रूमचे प्लाय शटलूम मध्ये रूपांतर करणे अत्यंत जरूरीचे आहे. तसेच मागावर "टेकअप मोशन अटॅचमेन्ट" बसविल्यास हातमागाचे उत्पादनहि वाढते. तसेच वार्पिंग मशिन रोलर टेम्पलस, वारनिंशिंग होल्डस ह्यासाठी मदत देण्यात येते. एकदर किंमतीच्या ७५ टक्के कर्ज म्हणून देण्यात येते व २५ टक्के अनुदान म्हणून देण्यात येते. दुसऱ्या योजनेत ८७ संस्थाना एकूण २४५५३४ रु. ह्या कामासाठी देण्यात आले.

(ब) सहकारी संस्थांना आपले सूत आपल्या कारखान्यात रंगविता यावे म्हणून मोठ्या, मध्यम व लहान आकाराच्या रंग कारखान्यासाठी आर्थिक सहाय्य देण्यात येते. रंग कारखान्याच्या आकाराप्रमाणे भाडवल व व्यवस्थापनासाठी खर्चहि मंजूर करण्यात येतो ह्या योजनेखाली १३०४४५ रु. सहकारी संस्थाना देण्यात आले.

### यंत्रमागासाठी अनुदान

(क) हातमागाचे यंत्रमागात रूपांतर केल्याशिवाय व उत्पादनाचा खर्च कमी केल्याशिवाय स्पर्धेत हातमाग धंदा टिकणार नाही ही "कानुगो कमेटीची" शिफारस १९५६ साली स्वीकारण्यात आली तेव्हापासून हातमागाचे यंत्रमागात रूपांतर करण्याचा कार्यक्रम आपल्या राज्यांत मोठ्या प्रमाणावर हाती घेण्यांत आला आहे. ३० हजारापेक्षा कमी लोकवस्ती असलेल्या गावांत वीज उपलब्ध असल्यास यंत्रमागासाठी सहाय्य देण्यात येते. यात यंत्रमागाची किंमत, त्यासाठी लागणारे सुटे भाग, विजेचे कनेक्शन इत्यादींचा समावेश असून प्रत्येक यंत्रमागामागें रु. ४१,७९८ चे कर्ज व अनुदान सोसायट्याना मजूर करण्यात आलें आहे. या योजनेखाली विदर्भांत खालील आर्थिक सहाय्य देण्यात आले.

| नं. | वर्ष | यंत्रमागाची संख्या | आर्थिक कर्ज | सहाय्य अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | १९५८–५९ | १०५ | ४,८३,१८० | १७,६४० |
| २. | १९५९–६० | ७५ | ३,४०,८६३ | १६,३५० |
| ३. | १९६०–६१ | १६० | ७,२९,००० | ३४,८८० |
| | | ३४० | १५,५३,०४३ | ६८,८७० |

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत ह्या योजनेवर विशेष भर देण्यांत आला असून १,२२५ हातमागाचे यंत्रमागात रुपांतर करावयाचे असून त्यासाठी ६२ लाख रुपयाची तरतूद करण्यात आली आहे.

### मालाच्या विक्रीसाठी योजना

विदर्भातील हातमागाचे उत्पादन वार्षिक १६ कोट वार इतके आहे त्यातील सहकारी क्षेत्रात येणाऱ्या हातमागावर सरासरी २ कोट वार इतके कापड दरवर्षी काढण्यात येते ह्यात मुख्यत्वें प्रसिद्ध असलेल्या नागपुरी पातळाचे उत्पादन जास्त असून धोतरें, शर्टिंग वगैरेचाही समावेश होतो. मालाच्या विक्री शिवाय सोसायट्यांच्या उत्पादनात वाढ होऊ शकत नाही व विणकराचा रोजगार अव्याहतपणें चालू शकत नाही. म्हणून उत्पादनासाठी ज्याप्रमाणे सहाय्य देण्यात येते. त्याचप्रमाणें हातमागाच्या कापडाचा उठाव व त्या धंद्यातील रोजगार सतत चालू राहावा, ह्या दृष्टीने योजना आखण्यात आल्या आहेत हातमागाच्या कापडाचा उत्पादन खर्च लक्षात घेऊन त्याच्या विक्रीवर सूट देण्याची योजना १९५४ पासून अमलात आलीं आहे. ह्या सुटीच्या तरतुदीमुळे हातमाग कापडाच्या विक्रीचे प्रमाण वाढले आहे. दुसऱ्या योजनेत, एकूण विणकर संस्थाना रु. ११,७५,१५० इतकी रक्कम रिबेट म्हणून देण्यात आली असून त्यासाठी २,१०,६५० रु. ची तरतूद करण्यात आली आहे.

### विक्रीकेन्द्रासाठी सहाय्य

ह्या व्यतिरिक्त मालाची विक्री करण्याकरता विक्री केन्द्रे उघडण्यासाठी सहकारी संस्थाना आर्थिक सहाय्य देण्यात येते. प्राथमिक संस्था प्रमाणेंच विदर्भाच्या विणकर सहकारी संस्थेस व जिल्हा औद्योगिक संघाना विक्री केंद्रे उघडण्यासाठी भाडवली व अनावर्त खर्चाचे सहाय्य देण्यात येते. अशा प्रकारची १३ विक्री केंद्रे उघडण्यासाठी संस्थाना २,५२,५८५ रु. चे सहाय्य देण्यात आले. तिसऱ्या योजनेत ह्यासाठी ९४,००० रु ची तरतूद करण्यात आली आहे.

सहकारी संस्थाच्या कापडाच्या विक्रीसाठी सरकारने नागपूर येथें विक्री केंद्र चालविली असून त्याच्यामार्फत झालेल्या विक्रीचे आकडे खालील प्रमाणे आहेत :

| वर्ष | विक्री |
|---|---|
| १९५८–५९ | ५०,२९४ |
| १९५९–६० | १,२७,०९१ |
| १९६०–६१ | १,५४,२०५ |

### विक्रीसाठीं फिरती मोटार

ह्या व्यतिरिक्त विणकर सोसायट्याच्या मालाची विक्री वाढविण्यासाठी व त्याच्या मालाचा प्रचार करण्यासाठी सरकारमार्फत एक फिरती मोटार ठेवण्यात आली असून, तिचा उपयोग विक्रीकरण्याचे कामी चांगला होत आहे असें आढळून आले आहे संस्थाकडून अल्प मोबदल्यात हें काम करण्यात येत असल्यानें, ही योजना त्याच्या दृष्टीने किफायतशीर आहे ह्या मोटारीतून ह्या वर्षी १९,९८७ रु चे हातमागाचे कापड विकण्यात आले. गिऱ्हाईक वाढविण्याच्या व ग्रामीण संस्थेचा

# बिटको ग्राईप

म र पू र कॅल्सीयमयुक्त

नेहमीं दिल्याने लहान मुलें सशक्त, बांदेसुद व गुटगुटीत होतात.





# बिटको

## काळी टूथ पावडर

नेहमीं वापरल्यानें दांत मोत्यांसारखे स्वच्छ व चकचकीत होतात.






माल दूरवर पोहचविण्याच्या दृष्टीने ह्या योजनेचा लाभ अधिक होईल, अशी अपेक्षा आहे. विक्रीच्या दृष्टीने हातमागाच्या कापडावर प्रमाणतेचे शिक्के मारण्याचे काम हाती घेण्यांत आले आहे. ह्यासाठी वेगळा नोकर वर्ग सरकारने ठेवला असून संस्थांच्या मालाची विक्री होण्याच्या दृष्टीनें ह्याचा फायदा होत आहे. चांगले काम करणाऱ्या विणकर सहकारी संस्थाना उत्तेजनार्थ बक्षिसे देण्याची योजना असल्याने, संस्थांना अधिक चांगले काम करण्यांत उत्तेजन मिळत आहे.

### सुताची गिरणी

विणकरांच्या सहकारी संस्थाना आज योग्य भावांत जरूर तें सूत मिळत नाही. गेल्या दहा वर्षामागे कापडाचे उत्पादन प्रामुख्याने ४० नंबरी सुताचे असे. परंतु आता ह्यांत झपाट्याने बदल होत असून उत्पादनासाठी ६० नंबर ते ८० नंबरपर्यंत सूत वापरण्याकडे कल वाढत चालला आहे. हे सूत मुंबई व दक्षिण भारतातील गिरण्यांतून संस्थाना त्यांच्या एजंटामार्फत घ्यावे लागते. संस्थाना जरूर असलेल्या सुताची गिरणी विदर्भात काढून ही समस्या सोडविण्याचे ठरले असून, सुरवातीस १२ हजार चात्याची योजना आखण्यात आली आहे. ह्या गिरणीचे भाडवल विणकर संस्था ७५ लक्ष इतके घेतील व ते घेण्यासाठी सरकारकडून त्यांनी घ्यावयाच्या भाडवलाच्या ७५ टक्के रक्कम कर्ज म्हणून देण्यात येईल. इतर वसुली ३ वर्षानंतर सुरू करून पुढे ७ वर्षांत पूर्ण करण्यांत येईल. इतर सरकारी संस्था १५ लक्ष रुपयाचे भाडवल घेतील व सहानुभूतिदर्शक सभासदासाठी एक लक्ष रुपये भांडवल ठेवण्यात आले आहे. अशा रीतीने १० लक्ष रु. संस्था व व्यक्ती मिळून एकत्र झाल्यावर सरकार १० लक्ष रु. गुंतविणार आहे. इतर रक्कम सरकारच्या हमी वरून, राज्य सहकारी बँकेकडून मिळवून देण्यांत येईल. ह्या गिरणीत अदाजे ६,७५,००० पौंड इतके मासिक सूत काढण्यात येईल. ह्या गिरणीमुळे सुताच्या पुरवठ्याचा प्रश्न कांहीं अंशी सुटण्यास मदत होईल भाडवल जमविण्यास व इतर संबंधीत कामकाज करण्यासाठी समिती निवडण्यात आली असून तिनें आपलें कामहि सुरू केले आहे लवकरच ही गिरणी सुरू करण्यात येईल अशी अपेक्षा आहे.

### विणकरांची वसाहत

विणकराच्या धद्याला आवश्यक ते सहाय्य देण्यासाठीच्या इतरहि अनेक योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. त्यात विणकरांच्या वसाहतींचा विशेष उल्लेख करणें जरूर आहे. विणकराच्या सहकारी संस्थाना धद्याच्या दृष्टीनें सोईस्कर अशा वसाहती उभारण्यासाठी दुसऱ्या योजनेत रु. ३,६८,००० देण्यात आले असून तिसऱ्या योजनेतहि त्याचा समावेश आहे.

### उत्तेजनासाठी कार्यक्रम

वरीलप्रमाणें हातमाग धद्याच्या उन्नतीसाठी सहाय्याची तरतूद करून सहकारी संस्थामार्फत विणकराच्या धद्याला उत्तेजन देण्याचा कार्यक्रम हाती घेण्यात येऊन सात वर्षे झाली आहेत. त्यामानाने धद्याच्या मूलभूत समस्या सुटण्यास विशेष मदत झाली किंवा नाही हा मुख्य प्रश्न आहे. ह्या धद्यात, पूर्वीपासून ज्यानी आपले सर्वस्व जमविले आहे त्यांच्या हातातच अजूनहि प्रामुख्याने हा धदा राहिला आहे असे दिसते. सहकारी संस्थाचे अस्तित्व भासत असले तरी अजून त्याच्या हातात धंद्यातील उत्पादनाच्या व विक्रीच्या भागापैकी एक चतुर्थांश भाग सुद्धा नाही असे दिसते ह्याच्या कारणमीमांसेतच पुढच्या प्रयत्नाची दिशा कशी असावी हे दिसून येते, व त्या दृष्टीने आवश्यक असणाऱ्या प्रयत्नांची संघटना व तिचे प्रमाण कसे विशाल असणें आवश्यक आहे हें समजून येईल

### तात्पुरत्या व कायम सवलती

धंद्याच्या उत्तेजनासाठी विक्रीवरील सूट व इतर मिळणाऱ्या सवलती ह्या तात्पुरत्या स्वरूपाच्याच असून त्यांच्याकडे त्याच दृष्टीने पाहणे अत्यत आवश्यक आहे. सध्याची प्रवृत्ती तशी नसून बऱ्याच वेळा ह्या कायम स्वरुपाच्या तरतुदी आहेत, असा समज निर्माण होतो. व त्यामुळें स्पर्धेत टिकण्यासाठी जें प्रयत्न करणे आवश्यक आहे तिकडे द्यावयास पाहिजे तितके लक्ष दिले जात नाही. मालाच्या कायम उठावासाठी हातमागाच्या धद्यात भिन्न-भिन्न प्रकारचे वाण काढून नवे गिऱ्हाईक निर्माण करणे जरूर आहे. पुष्कळ वेळा सहकारी संस्थाची प्रवृत्ति अशा स्वरूपाचा बदल अगिकारण्याच्या विरुद्ध असते उलटपक्षी सहकारी संस्थेने आपल्या सभासदाना असे बदल, आपल्या उत्पादनात करण्यास प्रवृत्त करून त्यासाठी सक्रिय सहाय्य केले पाहिजे. अशारीतीनें काही सहकारी संस्थांनी आपल्या सभासदांना उत्पादनात महत्त्वाचे बदल करावयास लावल्यामुळें त्या जनतेच्या गौरवास पात्र झाल्या आहेत

ह्याचप्रमाणे संस्थेला व्यवहारात अधिक कार्यक्षमतेने काम करण्यासाठी, तिचा उभारणी भक्कम आर्थिक पायावर करण्याची आवश्यकता आहे हे निर्विवाद आहे. त्यासाठी उत्पादनाच्या कर्जाचा जास्तीत जास्त उपयोग, सभासदाना उत्पादन वाढविण्यासाठी करून त्याना अधिक रोजगार देण्यास्तव करणें जरुरीचे आहे. संस्थेच्या भाडवलाच्या आधारावर तिला आपल्या धद्याची उलाढाल अधिक करता आली पाहिजे अशारीतीनें उलाढाल वाढवूनच, संस्थेला आपल्या अधिक सभासदाची आर्थिक उन्नति करता येईल अनुभव मात्र असा आहे की, असलेल्या भाडवलावर आपला व्यवहार कितीपट वाढविता येईल याचा विचार जसा धद्यातील चाकरगार आसामी करितात तसा प्रयत्न फारच थोडचा सहकारी संस्थाकडून होतो व त्याच वेळी ज्या संस्था याप्रमाणे काम करण्यात यशस्वी होत नाहीत, त्याना आपल्या संस्थेच्या व्यवस्थापनाचा खर्च, कर्जावरील व्याज, भाडेंव इतर खर्च झेपत नाही जेणें करून परिणामी त्या संस्था कार्यक्षम होऊ शकत नाहीत म्हणून संस्थेच्या व्यवहाराची आखणी नियोजनपूर्वक व पद्धतशीर रीतीने करणें जरूर आहे तसेच सभासदाच्या हिताची दूरगामी दृष्टी ठेवून विचार करणे व व त्याना उत्पादनाची मजुरी देताना ती बाजारात चालू असणाऱ्या दराइतकीच आहे हें पाहणें आवश्यक आहे. सहकारी संस्थेच्या सभासदानें संस्थेतून तात्पुरती किती मजुरी मिळते याचा विचार न करता आपल्याबरोबरच इतर सभासदाचे व पर्यायानें संस्थेचे हित आहे हें लक्षात ठेवून वागणें हितकर होय

### आपुलकी व निष्ठा आवश्यक

विणकराच्या सहकारी संघटना या धंद्याच्या संस्था असल्या कारणानें साधारण कर्ज देणाऱ्या संस्थेपेक्षा त्यांचे काम निराळ्या स्वरूपाचें व विशेष गुंतागुंतीचे आहे. सभासदाला संस्थाविषयी आपुलकी व निष्ठा असल्याशिवाय त्या संस्था यशस्वी होणें फार कठीण आहे. अशा प्रकारची निष्ठा बऱ्याच सहकारी संस्थांच्या सभासदांनी दाखविली असली तरी ही भावना अजून सर्वसामान्य सभासदांत वाढीस लागली पाहिजे. सूत पुरविणाऱ्या व वेळेवर कर्ज देणाऱ्या आसामींच्या जागी सहकारी संस्था आली असल्यानें सभासदांनी आपल्या निष्ठेचा मोहरा तिकडे वळवला तरच संस्थेला आपल्या कार्यांत यश मिळेल. या निष्ठेची जोपासना करणें सहकारी संस्थांच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत अगत्याचे आहे. यासाठी संघटनेचे महत्व, व्यापारासाठी तिची आवश्यकता व शक्ति सोदाहरण विणकरांना पटवून दिली पाहिजे तसेच सहकारी संस्थांच्या सभासदांना, संघटनांच्या यशासाठी आवश्यक लागणारे ज्ञान देण्याची व्यवस्थाहि केली पाहिजे. अशा प्रकारचे प्रयत्न झाल्यास परिस्थिति सुधारण्यास मदत होईल हे निश्चित. सहकाराची मूलतत्त्वें सभासदांना समजावून सांगून, त्यांच्याकडून ती अमलांत आणली जातात किंवा नाही हे आज पाहण्यात येत नाही किंबहुना सहकारांतील बचत, काटकसर व परस्पर साहाय्य ह्या सर्व महत्त्वाच्या अंगांची अभिवृद्धि करण्यावरच सहकारी संस्थांचे यश अवलंबून आहे!

सुताच्या पुरवठ्यासाठी व मालाच्या विक्रीसाठी प्राथमिक विणकर सहकारी संस्थांची संघटना असणें अत्यंत आवश्यक आहे. १९३८ साली व्यक्तिगत विणकर सभासदांनी "सी. पी. एण्ड बेरार विव्हर्स को–ऑपरेटिव्ह सोसायटी लि" अशी संस्था प्रथम स्थापन केली. सुरवातीपासूनच ह्या संस्थेस वार्षिक रु. १२,५०० कायमचे भांडवलाकरता व व्यवस्थापकीय खर्चाकरिता मदत मिळत असे. युद्धकाळामध्यें विणकरांना सुताचा पुरवठा योग्य दरानें व्हावा ह्यासाठी सुताच्या पुरवठ्याचे व भावाचे नियंत्रण करण्यात आले. त्याचवेळी बऱ्याच प्राथमिक विणकर सहकारी संस्था अस्तित्वात आल्या. ह्या सर्व संस्था "सी.पी. अँण्ड बेरार सेन्ट्रल विव्हर्स सोसायटीच्या" सभासद झाल्या. १९४८ साली सुताच्या धंद्यामध्यें आलेल्या मंदीमुळे सोसायटीजवळ साठवलेल्या सुताची विक्री करणे तिला फार कठीण झाले व बाजारामध्यें नियंत्रित दरापेक्षा कमी भावात सुत मिळूं लागल्या कारणानें संस्थेनें मागवलेल्या सुताचा उठाव होणे प्राय. अशक्य झाले ह्यामुळे संस्थेस आपल्याजवळील सुताचा साठा कमी भावाने विकावा लागला. १९४८ सालापासून संस्थेने खालीलप्रमाणें सुताचा पुरवठा केला.

| | |
|---|---|
| १९४८–४९ | १,७३,०६,७८३ |
| १९४९–५० | ९०,३६,९१२ |
| १९५०–५१ | १,५०,१७,७९० |
| १–७–५१ ते ३१–१२–५१ | ९७,२९,०४१ |

त्याचप्रमाणे संस्थेने पक्का माल तयार करण्याच्या ऑर्डर्स घेऊन तो पुरविण्यामध्यें यश संपादन केले. १९४८ सालापासून १९५१ पर्यंत दर

वर्षी अदाजे ७ लाख रुपयांचा माल संस्था विकत असे. त्याचबरोबर रंगणीचा कारखाना चालविल्यामुळें प्राथमिक विणकर सहकारी सस्थाना योग्य भावात चागले रगकाम सस्थेकडून करून मिळत असे. १९५० साली मंदीमुळे आलेला तोटा १९५२ साली भरून काढून संस्थेने १,९३,६४३ रु नफा केला होता. १९५२ साली पुन्हा हातमाग कापडाच्या धद्यात मदी आल्या कारणाने तिच्या कामकाजावर परिणाम झाला १९५१ साली संस्थेचे भाडवल २,५४,०२४ असून इतर निधी १,०७,२४५ इतका होता. १९४८ साली संचालक मडळाच्या सभासदानी बहुमताने अध्यक्षावर अविश्वासाचा ठराव आणल्या कारणानं मा. रजिस्ट्रार यानी संचालकमंडळ बरखास्त करून सस्था ऑफिसर इन्चार्जच्या ताब्यात दिली. ही व्यवस्था १९४८ सालापासून ५२ पर्यंत चालू राहिली. १९५२ साली आमसभा बोलावून सचालक मडळाची पुन्हा निवड करण्यात आली. व संस्थेचा कारभार त्याचे स्वाधीन करण्यात आला. १९५२–५३ सालामध्यें सार्वत्रिक मदीमुळें हातमागाच्या धद्यावर मोठा परिणाम होऊन सर्व विणकर सहकारी सस्थांना आर्थिक दृष्ट्या फार कठीण परिस्थितीस तोड द्यावे लागले ह्याचा परिणाम सुताच्या विक्रीवर होऊन ५२–५३ साली संस्था फक्त ५० १, ५३१ रुपयाचे सूत प्राथमिक सस्थाना विकू शकली. बाजारामध्यें स्वस्त दराने सूत मिळत असल्यानें सस्थेजवळील सूत प्राथमिक सस्था घेईनाश्या झाल्या. कपडयाची विक्री कमी झाल्याकारणाने ऑर्डरप्रमाणे केलेले उत्पादनसुद्धा व्यापारी घेईनासे झाले. त्यामुळें सस्थेला आपला उत्पादन विभाग बंद करावा लागला ह्याबरोबरच रंगणी कामातील आवक निम्याहून कमी झाली. श्री कोटक आणि कम्पनी ह्याचे मार्फत सुताचा पुरवठा करण्याची संस्थेची योजना पूर्णपणें बद पडली. एकदर हातमाग धद्याच्या व विणकर सहकारी संस्थाच्या दृष्टीनें हें वर्ष फार वाईट गेले. तरी १९५३ सालीं २७२ प्राथमिक सस्थानी व व्यक्तीनी मिळून २,७३,७८३ रुपयाचे शेअर्स घेतले होते. त्याचप्रमाणे २,३८,००० रुपयांचा निधी सस्थेजवळ जमा होता.

१९५३ सालापासून मंदीमुळें प्राथमिक सहकारी सस्था उत्पादन करण्याम तयार होत नव्हत्या. १९५४–५५ साली सस्थेला उत्पादनकाम करण्यासाठी व मालाच्या विक्रीसाठी भारत सरकारकडून भरघोस आर्थिक मदत करण्यात आली. १९५३–५४ साली कार्यशील भाडवलासाठी ३०,६००, १९५४–५५ साली २ लाख व ५५–५६ साली १,४८,८०० रु. इतके बिनव्याजी कर्ज देण्यात आले त्याचप्रमाणें मालाच्या विक्रीसाठी सेस फडातून ५५–५६ साली १६,६२,००० रु बिनव्याजी कर्ज मजूर करण्यात आले. ह्या कर्जामुळें संस्थेला प्राथमिक विणकर सहकारी समित्याकडून माल खरेदी करणे शक्य झाले व दूरवर पसरलेल्या विणकराना मजुरी मिळवून देण्यात सस्थेला यश प्राप्त झाले. १९५३–५४ साली १,०५,००० रुपये ५४–५५ साली २,३२,००० रु. ची व ५६–५७ साली ९,७२,००० रु ची खरेदी सस्थेनें प्राथमिक सस्थाकडून केली. अशा रीतीने खरेदी करण्यात आलेल्या मालाच्या विक्रीकरिता विक्रीकेन्द्रे उघडण्यासाठी मोठ्या प्रमाणावर अनुदान देण्यात आले १९५४–५५ साली दिलेल्या ६६,४४० रु. च्या अनुदानाने सस्थेने ११ विक्रीकेन्द्रे उघडली व ह्या केंद्रातून ८,१८,७२१ रुपयाचा माल सस्था विकू शकली. १९५५–५६ साली देण्यात आलेल्या ९९,२४९ रुपयाच्या अनुदानातून संस्थेनें २० विक्रीकेंद्रें उघडून १८,८२,००० रु चा माल विकला अशा रितीनें १९५३ साली डबघाईस आलेल्या हातमागाच्या धद्यात, सस्थेस वेळेवर मिळालेल्या आर्थिक सहाय्याने माल खरेदी करिता येऊन, व त्याची विक्री करून सस्था स्थावर होऊ शकली. ह्या काळात सस्थेने केलेलें कार्य, हातमाग धंद्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. सुताच्या विक्रीचे कामही सस्थेने चालू ठेवले व १९५४–५५ साली ११ लाख रुपयाचे तर १९५५–५६ साली २४,८८,००० रु चे सूत प्राथमिक सस्थाना पुरवले. १९५४–५५ साली पुन्हा धदा जोरात चालू झाल्याने ५४,००० रु. व ५६–५५ साली १,३३,००० रु इतका नफा झाला प्रसिद्धीसाठी संस्थेने आपले नमुने सेन्ट्रल मार्केटिंग आर्गनायझेशनच्या मुंबई, मद्रास व कलकत्ता येथील कार्यालयात पाठवले. व व्हेनिस येथील प्रदर्शनातही आपल्या कापडाचे नमुने प्रदर्शनात ठेवले. १९५५ साली सस्थेचे नाव "मध्यप्रदेश बुनकर केंद्रीय समिती" मर्यादित असे ठेवण्यात आले. व ३–६–५५ पासून व्यक्तिगत सभासदाचे सभासदत्व रद्द करण्यात येऊन, केंद्रीय समिती फक्त प्राथमिक समित्याचीच संस्था रहावी असे ठरले. १९५५ साली २७२ प्राथमिक सस्था ह्या सस्थेशी सलग्न होत्या. तिचे शेअर भाडवल २,४३,८४६ रु असून रिझर्व्ह फंड ३,९७,००० रु व इतर निधी १, २१,००० रु इतके होते. १९५५ साली २,३७,७७१ रु खर्च करून सस्थेने स्वत.ची भव्य इमारत बांधिली. ह्या इमारतीमुळें भाड्याचे रूपांत सस्थेस दर वर्षी ८,००० रु. ची बचत झाली.

भाषावार प्रातरचनेमुळे "मध्यप्रदेश विणकर केन्द्रीय सहकारी समितीचे" विदर्भ व महाकोशल असे दोन भाग झाले संस्थेचे विभाजन विदर्भात, शति ५७ आणि महाकोशल भागास ४३ ह्या प्रमाणे झाले. १९५६ साली सस्थेचे शेअर भाडवल १,३८,५५५ रु. इतके होते. १९५७ पासून भारत सरकारनें कार्यशील भाडवलाकरता व मालाचे विक्रीकरता रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया मार्फत कर्ज देण्याची योजना सुरू केली १९५७ साली सस्थेनें २९ लाख रुपयाचे सूत खरेदी केले व ३१ लाख रु. सुताची विक्री केली. त्याचप्रमाणें इतर धदा कमी झाल्यानें सस्थेच्या आमदानीत फरक पडून १९५७ साली सस्थेस ५९,४९० रु इतके नुकसान सोसावे लागले त्यावेळी सस्थेजवळ ७,९५,००० रु चा तयार माल शिल्लक होता १९५७–५८ साली विदर्भ को–ऑपरेटिव्ह बँकेकडून सरकारी ग्यारटीवर ४,५८,००० रु सस्थेने कर्जाऊ घेतले. तसेच पुढे ५८ साली मालाचे तारणावर आणखी ५,३६,००० रु. कर्ज घेऊन धदा वाढविण्याचा प्रयत्न केला १९५७–५८ साली व्यापार समाधानकारक झाला नाही कारण जुना माल, भाव कमी करून विकावा लागला. तरी १९५८ साली सस्थेस ४३,००० रु इतका निव्वळ नफा झाला ह्याच वर्षी सस्थेने ५४,००० रु खर्च करून, नवीन डिझाईनचे उत्पादन करण्याकरिता पचाटर्न मेकिंग फॅक्टरीची स्थापना केली. तसेच








# विदर्भातील सहकारी घरबांधणी

श्री. जी. एस. (भाऊजी) पत्की



अन्नवस्त्राइतकीच निवारा ही देखील जीवनातील एक आवश्यक बाब आहे. घर बांधण्याची कला मानवास जेव्हां अवगत झाली त्या काळापासून स्वतःच्या मालकीचे लहानसें का होईना घर आपल्या हयातीत बांधता यावें हें स्वप्न प्रत्येकजण पहात आला आहे; तशी महत्त्वाकांक्षा त्याने उराशी बाळगली आहे ! आधुनिक युगात ही जाणीव वर्धिष्णु पावत आहे आणि सर्व ठिकाणी जीवनमान जसजसें प्रगत होत चाललें आहे तसतसें हें स्वप्न प्रत्यक्षात साकार होण्यासारखी परिस्थिति आज निर्माण झाली आहे.

आपलें राज्य तर लोककल्याणकारी आहे ! दारिद्र्य नि दुर्गंधी यांचें निर्मूलन करण्यासाठी तर, आपण आपल्या सर्व योजना आखल्या आहेत. प्रत्येक नागरिकाला, निदान कमीत कमी जीवनोपयोगी सुखसोयी तरी उपलब्ध व्हाव्या, हेंच तर आपलें उद्दिष्ट ! ! त्या दृष्टीनें गृहनिर्माण योजनेला विशेष स्थान प्राप्त व्हावें हें स्वाभाविकच होय ! आणि यामुळेंच आमचे योजनातज्ञ गृह निर्माणाच्या योजनेसाठी अधिकाधिक निधी देण्यास प्रवृत्त झाले आहेत, या योजना हाती घेण्यासाठी नव-नवीन खाती व संघटना निर्माण करीत आहेत; विशेषतः कमी उत्पन्नाच्या लोकांसाठी त्यांचे खास प्रयत्न आहेत कारण हे लोक मध्यम व त्यापेक्षा कनिष्ट अशा वर्गातूनच आलेले असतात

विदर्भातील गेल्या पाव शतकाच्या अनुभवानें, आमची अगदी पूर्ण खात्री पटली आहे की, फक्त सुव्यवस्थित अशा 'सहकारी गृह निर्माण संस्थांच्याद्वारेंच हा बिकट प्रश्न परिणामकारकरित्या सोडविणें शक्य होईल कोणतीहि योजना, मग ती सहकाराच्या क्षेत्रातील वा अन्य क्षेत्रातील असो, त्या संस्थेचा पाया भाडवल होय ! आता आमच्या सोसायटीनें, आपल्या विद्यमान समृद्धतेनें व लोकप्रियतेनें, देशामध्यें मानाचे स्थान पटकावलें व ती स्वतःच्या पायावर सर्वस्वी उभी राहिली, हें जरी खरे असलें तरी सर्वच सहकारी गृह निर्माण संस्थाना आमच्या प्रमाणेंच कर्तृत्व दाखविता येईल, असे म्हणता येणार नाही अशा संस्थांचे जे प्रवर्तक असतात त्यांच्या सहकार्याच्या भावनेवर व सेवाभावी वृत्तीवरच बऱ्याचशा गोष्टी अवलंबून असतात प्रत्येक संस्थेचे यशापयश बऱ्याचश्या प्रमाणात प्रवर्तकाच्या निष्ठेवरच अवलंबून असते. प्रत्येक सहकारी संस्थेच्या कार्यकारी मंडळात अशी कार्यप्रवण नि ध्येयनिष्ठ माणसें सापडतीलच असें सांगता येत नाही. 'विदर्भ प्रीमियर



को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी' ला जें अपूर्व यश लाभलें त्याचें श्रेय तिच्या कार्यकर्त्यांना नि पदाधिकाऱ्यांना दिलें पाहिजे. या संस्थेंत पैसे गुंतविणाऱ्यांचा विश्वास, त्यानी संपादन केला; त्यामुळेच मोठमोठ्या रकमा, लोकानी ठेवींच्या स्वरूपात सोसायटीत ठेवल्यात ह्या 'ठेवी' आणि त्याद्वारे व्यक्त होणारा जनतेचा विश्वास हेंच तर सोसायटीचें सामर्थ्य ! सहकारी गृह निर्माणासाठी भांडवल निर्माण करण्याच्या महत्त्वाच्या प्रश्नाला या ठिकाणी आपणाला तोंड द्यावें लागतें. या संस्थांची उत्पन्नाची साधनें कमालीची मर्यादित असतात त्यापैकी अनेकांना कर्मात कमी शेअर भांडवल उभारणें देखील कमालीचे विकट जाते. कारण त्याच्या सभासदांपैकी बरेचसे लोक जेमतेम गुजराण करणारे असतात. "ठेवी" ठेवून अगर अल्प बचत करून त्याना सोसायटीच्या भांडवलांत पुरेशी भर टाकणें जमत नाही. अशा असहाय्य परिस्थितीत या सोसायट्याना मदतीसाठी, अन्यत्र प्रयत्न करणें भाग पडतें. सहकारातून समृद्धीचे युग निर्माण करण्याचा संकल्प सोडलेल्या आपल्या सरकारकडे, त्यानी सहाय्याच्या अपेक्षेनें पाहिलें तर तें सर्वथैव वस्तुस्थितीस धरूनच होईल माझ्या मतें प्रत्येक विभागाचा समतोल विकास साधावयाचा असेल तर मध्यवर्ति (Apex) संस्था स्थापन करणें, हाच श्रेयस्कर मार्ग होय. अशा संस्थांच्याद्वारेच राज्य सरकार व मध्यवर्ति सरकार प्राथमिक संस्थाना अनुदान, कर्ज किंवा मदत देऊ शकतील. एखा विशिष्ट विभागाच्या स्थानिक गरजा काय आहेत, त्याचे योग्य मूल्यमापन करणें, सरकारी पातळीवरील सोसायटीला नेहमीच शक्य होईल असें नाही.

भांडवलाचा व्यवस्थित पुरवठा झाला तर शहरातील व ग्रामीण विभागांतील घरबांधणीचें काम अर्थातच् अप्रतिहतपणे चालू राहील. तथापि एक गोष्ट या बाबतीत लक्षात ठेवली पाहिजे की, इमारतीच्या बांधकामाचे सामान वेळेवर न मिळाल्या कारणानें, अमर्याद कालपर्यंत, बांधकाम कदापिही खोळंबून रहाता कामा नये. सीमेंट, लोखंड व पोलाद यासारख्या परवान्यावर मिळणाऱ्या वस्तु, वेळेवर मिळू न शकल्यामुळें बांधकाम कमालीचे खोळंबून राहिलें तर त्यामुळें सभासदाची कुचंबणा होऊन त्यांची परिस्थिति बिकट तर होईलच, शिवाय बांधकामाचा खर्चहि बराच वाढेल व त्यामुळे पूर्वीचे सर्व अदाज कोलमडून पडतील. असें कदापि घडता कामा नये. तेव्हा या कामाला वेग प्राप्त व्हावा व तें सर्वच दृष्टीनें स्वयंपूर्ण व्हावें, याकरिता या सोसायट्याना पोलाद व सीमेंट यांचा आवश्यक तो पुरवठा अग्रीदरच करण्यात यावा; किंवा त्यांच्या विभागांतील या वस्तूंच्या वितरणाची व्यवस्था त्यांच्यावर सोपविण्यात यावी. अशी व्यवस्था करण्यात आली तर शहरे व खेडी यामधून गृहनिर्माणाचा प्रश्न सुलभतेनें व यशस्वीपणें सोडविण्यास मोठीच मदत होईल. कारण त्यामुळें आवश्यक वस्तु मिळण्याच्या मार्गांतील अडचणी नाहीशा होतील.

'विदर्भ प्रीमियर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी' नें जी प्रगति केली व उद्दिष्ट साधले त्याची ओळख महाराष्ट्रातील लोकाना करून दिल्याशिवाय, माझ्या प्रस्तुत लेखाची पूर्तता होणार नाही सदरहू संस्थेशी माझा अनेक वर्षे निकटचा संबंध आहे हे सांगावयास मला मोठा अभिमान वाटतो

'विदर्भ प्रीमियर को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी' ही केवळ विदर्भ आणि महाराष्ट्र यामध्येंच पहिली आहे असें नसून कदाचित संबंध देशात देखील तिच्या तोडीची अन्य संस्था नसेल. तिचे एक वैशिष्ट्य असें आहे की, केंद्र व राज्य सरकाराचे अनेक मंत्री, कित्येक राज्यपाल, सहकारी खात्यातील वरिष्ठ अधिकारी व देशाच्या सर्व भागातील सहकारी क्षेत्रातील इतर तज्ज्ञ, या सर्वांनी तिची मुक्त कंठानें प्रशंसा करून गौरव केला आहे. 'स्वावलंबी अर्थव्यवस्था' हें ह्या संघटनेचे वैशिष्ट्य असून, त्यामुळें ती आमच्या अभिमानाचें आणि जनतेच्या कौतुकाचें स्थान बनली आहे. सरकारकडून कोणत्याहि प्रकारची आर्थिक मदत न घेतां केवळ जनतेच्या पाठिंब्यावर अवलंबून राहून सोसायटी सांप्रतचा दर्जा प्राप्त करून घेण्यांत यशस्वी झाली आहे. सोसायटीला मर्यादितच पूर्वीच्या विदर्भ कोऑपरेटिव्ह बँकेकडून (आतां महाराष्ट्र स्टेट कोऑपरेटिव्ह बँक) मदत मिळाली आहे. परंतु शेअर भांडवला व्यतिरिक्त तिच्या भांडवलाचा मुख्य हिस्सा, सारख्या वाढत असलेल्या ठेवींच्या द्वारेच मिळाला आहे ह्या ठेवींची रकम आज ६० लाखाच्या घरात गेली आहे. तिनें गुतविलेले भांडवल १२ लाख रुपयापेक्षा जास्त असून तें सर्वच दृष्टीनें सुरक्षित व भक्कम आहे. कर्ज घेणाऱ्या सभासदाच्या नावावर ६४ लाखापेक्षा जास्त रकम पडलेली आहे; तर सोसायटीकडे गहाण पडलेल्या घराची किंमत अर्धाच कोट रुपये आहे. म्हणजे पुरेसें तारण आहे, हें सिद्ध होतें. यावरून सोसायटीची आर्थिक परिस्थिति किती भरभक्कम आहे तें स्पष्टपणें दिसून येत आहे.

सतत विस्तार पावत असलेल्या नागपूर शहराच्या नव्या व जुन्या भागात हजारों घरे बांधण्यास सोसायटीनें आपल्या ५००० सभासदांना मदत केली आहे, हें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाही. मला सांगण्यास आनंद वाटतो, की आमचे लोकप्रिय मुख्य मंत्री श्री यशवंतराव चव्हाण व माजी सहकार मंत्री श्री भारदे (आता सभापति, विधान सभा) तसेंच सहकार खात्याचे इतर वरिष्ठ अधिकारी, आमच्या सोसायटीनें जी भरीव प्रगति केली, त्यानें इतके प्रभावित झाले आहेत की, सोसायटीनें, नागपूर शहरात अधिक घराच्या वसाहती (Colonies) उभारण्याची जी योजना आखली आहे, त्या कार्याला चालना देण्यासाठी तिला दहा लाख रुपयाचे कर्ज देण्याचे राज्य सरकारनें ठरविलें आहे. सोसायटीच्या मालकीच्या दोन भव्य इमारती शहराच्या मध्यवस्तीमध्यें असून, तिनें आपल्या नोकर वर्गासाठीहि एक वसाहत बांधण्याचे ठरविलें आहे

गृहनिर्माणाचा प्रश्न यशस्वी रीतीनें सोडवायचा असेल तर इतर गृहनिर्माण सहकारी संस्थानी आमच्या संस्थेच्या कार्याचा व तिच्या कार्यप्रणालीचा आदर्श नजरेसमोर ठेवावा असें मी निःसंकोचपणें व आत्मविश्वासानें सुचवीन आमच्या सोसायटीचे कार्यकारी मंडळ व नोकर वर्ग यानी सोसायटीचे उद्दिष्टपूर्तीसाठी जें सहकार्य केलें त्याबद्दल मी त्याचा आभारी आहे









# सहकारी संघाचे स्थान व मूलगामी प्रभाव

श्री. मोतीलाल फिरोदिया
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ



हकारी चळवळ, जनतेनें स्वयंस्फूर्तीनें आणि स्वतःच्या गरजा, स्वावलंबनानें पूर्ण करण्या साठीं सुरुं केलेली चळवळ होय! "संघटना हेंच सामर्थ्य"--हाच आजच्या भारतीय विकासाचा मूलमंत्र होय !" अल्प उत्पादनाच्या जनतेला स्वतंत्रपणें व सन्मानानें जगण्याचा मार्ग या चळवळीनें दाखविला आहे. या चळवळीचे अनेक फायदे आहेत. तशीच अनेपथ्येंही आहेत परतु, प्रत्येकजण बहुधा या फायद्याकडेच लक्ष देत असतो व जबाबदाऱ्याची योग्य जाणीव ठेवली जातेच असे नाही. यासाठी सहकारी चळवळीची प्रकृति निरोगी ठेवून ती सुदृढ करणारी एक त्रयस्थ संघटना अस्तित्वांत असणें अत्यावश्यक आहे. अशा संघटना म्हणजेच सहकारी संघ होय सहकारी सस्था आणि सघटना याची दोषविरहीत घडण उभारण्याच्या कामाला जे अत्यत महत्त्वाचे स्थान आपल्या देशाच्या आर्थिक नियोजनात देण्यात येत आहे तें यासाठीच !

हल्ली जगातील बहुतेक देशात सहकारी सघ स्थापन झाले आहेत. कित्येक देशात हे संघ व्यावसायिक संघटनापासून अलिप्त असून स्वतंत्रपणें कार्य करीत आहेत काही ठिकाणी उदा:, स्वीडन् स्विझर्लंड, जर्मनी वगैरे देशात सर्व सहकारी सोसायट्याच्या ज्या धाऊक संस्था आहेत, अशा सस्थाचा एक भाग सहकारी संघाचे कार्य करीत असतो घटना आणि रचना स्थानपरत्वें वेगवेगळी असली तरी साधारणत सहकारी सघाचे कार्य कमीअधिक प्रमाणांत सर्व जगात सारख्याच स्वरुपाचे असल्याचे आढळून येते.

मनुष्य प्राणी हा जात्याच समाजप्रिय आहे आणि संघटीत स्वरुपात रहाण्याच्या ह्या प्रवृत्तीतूनच मनुष्यानें आजवर अंगिकारिलेल्या प्रत्येक गोष्टीचा जन्म होत आलेला आहे सहकारी तत्त्वाचा विकास हा मानवाच्या ह्या समाजप्रियतेच्या गुणवत्तेतूनच झाला असून सहकारी कार्यपद्धती ही आर्थिक व्यवहार चालविण्याची पद्धती म्हणून,आजकाल बहुविध व्यवहारात स्वीकृत झाल्याचे आढळून येईल सहकारी सघाचे कार्याचा विचार करतेवेळी, सहकारी चळवळ ही केवळ आर्थिक चळवळ नव्हे हे निक्षून लक्षात ठेवणे अत्यत आवश्यक आहे चळवळीचा मूळ उद्देश सभासदाचे जीवनमान सुधारून त्यान चागले व सपन्न नागरीक म्हणून जगता येण्याची शक्यता निर्माण करणें हा आहे हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी विविध प्रकारची आर्थिक कार्यें हाती घेणें ही ह्या चळवळीची साधनें होत.



राज्य सहकारी संघाचे स्थान सहकारी चळवळीमध्यें वाढत जाणार आहे. सहकारी कर्ज किंवा सहकारी खरेदी विक्री यापुरती ही चळवळ यापुढे मर्यादित राहाणार नसून, सहकारी शेतीची व सहकारी उद्योग-धंद्याची प्रगति द्रुतगतीनें होत आहे. खेड्याचा आर्थिक विकास, सहकारी संस्थांच्या कार्यक्षमतेवरच अवलंबून राहणार आहे. खेड्यांतील व जिल्ह्यांतील सहकारी संस्थांची राज्य पातळीवरील सर्वश्रेष्ठ संस्था म्हणून राज्य सहकारी संघाची जबाबदारी फार मोठी असून, त्यांची क्रियाशीलता, सहकारी संघटना व सरकार यावरील प्रभाव, यावरच भारतीय सहकारी चळवळीचे भवितव्य अवलंबून आहे. सहकारी संस्था, जनता व सरकार या तिहीमधील दुवा म्हणून संघाच्या कार्यावर सहकारी चळवळीची प्रगति अवलंबून राहील. योग्य व कार्यक्षम सहकारी कार्यकर्ते तयार करणें, सहकारी चळवळीच्या विचाराचा प्रचार करणें, चळवळीच्या कामाचा आढावा घेऊन सहकारी संस्थाना योग्य तें मार्गदर्शन करणें व सहकारी संस्थाबद्दल धोरण ठरवितांना सरकारला सल्ला देणें अशा नानाविध कार्यक्रमाचा, राज्य सहकारी संघांच्या कार्यक्षेत्रांत समावेश होतो.

सहकारी संघाचे, आद्य आणि अत्यंत महत्त्वाचे कर्तव्य म्हणजे सहकारी चळवळीतील कार्यकर्ते आणि सहकारी संस्थातील सभासद यांना शिक्षण आणि प्रशिक्षण देणें व सहकारी शिक्षणाच्या सर्व शाखांतील कार्यात, समतोलपणा राखून, तज्ञ शैक्षणिक संस्था म्हणून काम पहाणे होय. शैक्षणिक कार्यास सहकारी चळवळीच्या सुरवातीपासूनच अत्यंत महत्त्वाचे स्थान देण्यात आले आहे. इ. स. १८४४ मध्यें इंग्लंड ह्या देशात रॉशडेल या गावी पहिली सहकारी संस्था स्थापन झाल्यावर एक आठवड्याचे आतच संस्थापकांनी सभासदांच्या शिक्षणाच्या कार्यक्रमास अग्रहक्क देऊन तो हाती घेतला. ही गोष्ट सहकारी चळवळीत सहकारी शिक्षणाचे स्थान किती महत्त्वपूर्ण आहे हेच दर्शविते

सहकारी संस्थातील कामाचे स्वरूप प्रामुख्यानें दोन प्रकारचे असते एक तात्त्विक व दुसरे व्यावहारिक स्वरूपाचे सहकारी संघटनेंत काम करणारे कार्यकर्ते केवळ माहितगार असूनच भागत नाही तर त्यांची आपल्या कार्यावर अविचल निष्ठा असावयास पाहिजे. सहकारी चळवळीच्या कार्यप्रणालीवर विश्वास व आस्था नसलेली, निव्वळ पगारी माणसें नेमून, सहकारी चळवळीचा विकास साधता येणार नाही. सहकारी संघटना ह्या निव्वळ नोकरांच्या संघटना नसून, निष्ठावंत कार्यकर्त्यांची सहोदर भावनेनें, सामुदायिक सुखासाठीं सतत कार्यरत असलेली ती जणूं कुटुंबच होत ! ऑफिसचे काम सांभाळणें, हिशेब सभाळणें, संबंधित शेतकरी, समाज कार्यकर्ते व सरकारी अधिकारी यांचेशी नीट संबंध ठेवणें, याबाबतीत सहकारी कार्यकर्ते कार्यक्षम



असल्याशिवाय सोसायटीचे काम यशस्वी होणार नाही. सहकारी संस्थाचे खरे काम खेड्यातच आहे. त्यामुळे ग्रामीण जीवनाशी समरस होऊन त्यांतील अडचणी व गरजांचा अभ्यास, सहकारी संस्थातील पदाधिकाऱ्यांचा असणें अत्यंत आवश्यक आहे. राज्य सहकारी संघानें, जिल्हा सहकारी बोर्डाच्या मदतीनें असे कार्यकर्ते शिकवून तयार केले पाहिजेत. याबाबत मार्गदर्शन करणारा रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीच्या रिपोर्टातील पुढील परिच्छेद महत्वाचा आहे :

"For what is involved is no less than the creation by the state of a large body of trained and enthusiastic workers, both men and women, who are willing to share the life of rural India, strive to understand the needs of all classes including the weakest and, in administering to those needs within the particular sphere allotted to them, prove themselves businesslike and efficient no less than keen and symapathetic."

खेड्यांतील लोकाशी सहानुभूतीनें वागून सुद्धां, सहकारी संस्था धंदेवाईक दृष्टिनें चालवू शकतील असे कार्यकर्ते शिकवून तयार करणें हें काम राज्य सहकारी संघाचें आहे हा दृष्टिकोण ध्यानात घेतल्यास, सहकारी चळवळीचे निव्वळ तात्त्विक शिक्षण पुरेसें होणार नाही त्याचबरोबर प्रत्यक्ष व्यवहाराची माहिती, शिक्षण घेणाऱ्या कार्यकर्त्यांना होणें अगत्याचे आहे. यासाठीं रोजच्या अभ्यासक्रमाबरोबर या क्षेत्रांत प्रत्यक्ष काम करणाऱ्या कार्यकर्त्यांची व्याख्याने घडवून आणून, अनुभवाचे बोल ऐकण्याची संधि कार्यकर्त्यांना उपलब्ध करून देणें इष्टच होय त्याचप्रमाणें विशिष्ट मुदतीचा शिक्षणक्रम पुरा केल्यानंतर एखाद्या यशस्वी सहकारी संस्थेमध्यें त्या कार्यकर्त्यानें काही महिने तरी उमेदवारी केली पाहिजे. अशा रीतीनें सहकारी चळवळीचें पुस्तकी (academic) शिक्षण अनुभवी कार्यकर्त्यांचें मार्गदर्शन व प्रत्यक्ष पहाणी यांच्या सहाय्यानें कार्यक्षम कार्यकर्ते राज्य सहकारी संघाला तयार करतां येतील.

पाश्चात्य राष्ट्रात, विशेषत. ग्रेटब्रिटनमध्यें, प्रत्येक सहकारी संस्थेची, स्वतंत्र अशी शिक्षण समिति असते व सभासदाचे शिक्षणासाठी ती निरनिराळे कार्यक्रम आंखते. यामुळें सर्व सभासदाची शिक्षणाची जबाबदारी सहकारी संघावर पडत नाही. ह्या शिक्षण समित्या अशा प्रकारें कार्य करितात की, त्यांच्या कार्याला प्रचाराचें स्वरूप येत नाही व सभासद या शिक्षणाच्या कार्यक्रमाकडे आत्मीयतेनें पाहतात. आपल्या देशात, सहकारी शिक्षणाचे क्षेत्रांत, काहीं राज्यात, जिल्हा सहकारी बोर्ड, विभागीय सहकारी बोर्ड अशा संघटना कार्य करीत असल्या तरी, अद्याप ल्हान सोसायट्यांनी, अशा शिक्षण संस्था प्रस्थापित केल्याचे आढळून येत नाही तरी काहीं मोठ्या संघटनानी, या दिशेनें पाऊल टाकणें अत्यावश्यक आहे. परदेशात, सहकारी संघटनेबद्दल आत्मीयता निर्माण होण्याचे दृष्टीनें महिला मडळें ( women's guild ) आणि युवकमडळें ( Youth clubs ) स्थापन झाले आहेत. या मडळाच्या द्वारें सहकारी संघटनेच्या कार्याचा सदस्याना परिचय करून देण्यात येऊन, सहकारी चळवळीविषयी त्याना आत्मीयता वाटावी असा प्रयत्न करण्यात येतो. अशा प्रकारची मडळें सुरू करण्याच्या दृष्टीनें यथोचित पावलें टाकण्यास, आपल्याकडील पुरोगामी विचाराच्या सहकारी संघांनी सुरुवात करणें हितप्रद ठरेल व समाजातील सर्व स्थरात, सहकारी तत्त्वाचा प्रसार होण्यास त्यामुळें मोठीच मदत होईल असा आत्मविश्वास वाटतो. निदान प्रयोग म्हणून शुभारंभ करण्यास तर मुळीच प्रत्यवाय नसावा. सहकारी चळवळीतील वेगवेगळ्या क्षेत्रातील सहकारी संस्थामध्यें परस्परनिगडीत साखळी निर्माण करून त्याचे प्रश्न सोडविण्याचे कामीं, त्या सर्वांना शिक्षण व प्रशिक्षण देऊन, सहकारी तत्त्वाच्या प्रचाराद्वारें, आणि विशेषत विविध प्रकारच्या सहकारी-संस्थामध्यें, सामजस्य व सौहार्द निर्माण करण्याचे कार्य, राज्य सहकारी संघाने पवित्र कर्तव्य म्हणून करणे उचित होईल.

सहकारी चळवळ जनतेसाठी आहे. जनतेला या चळवळीच्या कामाची-व तिच्यापासून मिळणाऱ्या फायद्या-तोट्याची माहिती व्हावी, यासाठीं मोठ्या प्रमाणात प्रचार होणें आवश्यक आहे खेडेगावातील लोकाची वर्तमानपत्रे वाचण्याची आवड वाढत चाललेली आहे. राज्य सहकारी संघाला जिल्हा सहकारी बोर्डामार्फत निदान साप्ताहिकें तरी चालविता येतील या साप्ताहिकात सोप्या भाषेत सहकारी चळवळीची माहिती देण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. सरकारचे सहकारी संस्थाबद्दलचें धोरण अशा वृत्तपत्रात माहिती म्हणून देण्यात यावे. अखिल भारतीय सहकारी संघानें इंग्रजी किंवा हिंदी साप्ताहिक काढावें व राज्यातील जिल्हा सहकारी बोर्डांची साप्ताहिकें प्रादेशिक भाषेत निघाल्यास सहकारी चळवळीचा प्रचार सर्वत्र होण्याचे कार्य सुकर होईल. भारतीय सहकारी संघाच्या पत्रात, देशोदेशीच्या सहकारी चळवळीचा अनुभव देण्यात येईल व त्याचे लोण प्रादेशिक भाषेतील सहकारी पत्राच्याद्वारे जनतेपर्यंत पोहचेल तसेंच राज्यातील जिल्ह्यामध्ये, सहकारी संस्थाची माहिती इतर जिल्ह्यांतील लोकाना नसते निरनिराळ्या जिल्ह्यात चाललेल्या सहकारी प्रयोगाची माहिती जनतेला असणे जरूर आहे यशस्वी सहकारी संस्था किंवा कार्यकर्ते याचीहि माहिती सहकारी पत्राना देता येईल. केवळ यशस्वी संस्थाचा प्रचार करून चालणार नाही ज्या सहकारी संस्था अपेशी ठरलेल्या आहेत त्याचीहि माहिती किंवा प्रसिद्धी देण्यास सहकारी पत्रानें मागेंपुढें पाहू नये अशा गोष्टी उजेडात आणण्याचे काम सहकारी संघालाच करता येईल यामुळें सहकारी चळवळीतील खाचखळग्याची कल्पना जनतेला व चळवळीच्या कार्यकर्त्यांना येईल त्याचप्रमाणें अधिकारी लोकाची व्याख्यानें जनतेसाठी

योजून चळवळीचा प्रचार संघाला यशस्वीपणें करिता येईल. कारण राज्यात, सहकारी पतपुरवठा, बँकिंग, खरेदीविक्री किंवा गुदामें यात निपुण व हुषार असे कोण कार्यकर्ते आहेत हें केवळ राज्य सहकारी संघालाच हेरून काढता येईल. आणि असे हे चांगले कार्यकर्ते प्रचाराच्या कामासाठीं नेमल्यास प्रचार चांगला होईल. राज्य सहकारी संघाला, प्रादेशिक मार्फत सहकारी संस्थांचे लघु चित्रपट तयार करता येतील. अशिक्षित जनतेत प्रचारासाठी चित्रपट हें अगदी योग्य व प्रभावी साधन आहे. पतपेढी, खरेदी-विक्री किंवा सहकारी साखर कारखाने या संस्थांचे चित्रपट बनविल्यास लोकांना सहकारी संस्थांचे काम कसें चालतें याचे चालतें बोलतें सुस्पष्ट स्वरूप कळून येईल.

उपरिनिर्दिष्ट विवेचनावरून, चळवळीच्या प्रचाराची जबाबदारी असलेल्या या संघटनेनें प्रचार आणि प्रसिद्धीच्या सर्व साधनांचा पुरेपूर उपयोग करून घेणें अत्यंत आवश्यक आहे, हें निर्विवाद होय. प्रचाराची सर्वोत्तम साधनें म्हणजे नियतकालिकें व वाङ्मय प्रसिद्धकरणें होय ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे. मात्र नियतकालिकांतून निव्वळ चळवळीची स्तुतीच करण्याचे धोरण ठेवले तर हा उद्देश सफल होऊं शकत नाही. दुर्दैवानें, हल्ली बहुतेक सहकारी नियतकालिकें असा एकांगीच प्रचार करून सहकारी चळवळीचे केवळ गोडवेच गाताना आढळून येतात. सहकारी चळवळीच्या यशस्वितेची अपूर्वाई विषद करीत असतानाच या चळवळीत असलेल्या दोषांकडे डोळेझाक करणे योग्य ठरणार नाही. निर्भीड पण विधायक टीका करण्याचे धैर्य व सामर्थ्य या सहकारी नियतकालिकांत असलेच पाहिजे. अर्थात्, हें धैर्य आणि सामर्थ्य, सहकारी संघ, आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र असेल तरच संपादिता येईल. या बाबतीत ग्रेटब्रिटनचे उदाहरण आदर्श होय. इंग्लंडमध्यें सहकारी नियतकालिकें प्रसिद्ध करण्यासाठीं स्वतंत्र संघटना निर्माण झाली असून तिच्या मार्फत चळवळीतील गुणावगुणांची चर्चा केली






जाते. भारतातील सहकारी संघांना देखील हें कार्य हाती घेऊन स्वत चे स्वातंत्र्य टिकवितां येईल.पण त्यासाठी सहकारी संघांची जडण व घडण स्वतंत्र्य व सुस्थिर पायावर उभारलेली असण्याची नितांत गरज आहे.

केवळ शिक्षण व प्रचार यांच्यापुरतें आपलें काम मर्यादित न ठेवतां जनतेंत सहकारनिष्ठा कशी.वाढेल याचाही पद्धतशीर प्रयत्न राज्य सहकारी संघाला करावा लागणार आहे. बरेच जण सहकारी पेढ्यांकडून कर्ज घेतात पण खरेदीविक्री सहकारी संस्थांमार्फत करीत नाहीत. यासाठी या लोकांची सहकारनिष्ठा वाढविण्यासाठी विशेष प्रयत्न सहकारी संघाला करावा लागेल. सहकारी ग्राहकसंस्थांची वाढ-जशी व्हावयास पाहिजे तशी झाली नाही. तरी जनतेंत व विशेषतः शहरी भागांत सहकारी ग्राहक संस्थांचा प्रचार खास करून सहकारी संघाला करता येईल.

सहकारी संस्थांच्या कामाचा आढावा घेणें व त्यांतील गुण दोषांचें संशोधन करणें हें कामही चळवळीच्या वाढत्या व्यापामुळें आवश्यक होणार आहे. सरकारतर्फे तर तपासणी होतेच पण सहकारी संघानें सुद्धा सहकारी संस्थांच्या कामाकडे डोळ्यात तेल घालून लक्ष दिले पाहिजे सहकारी संस्थांचे जमाखर्च मिळवून, सहकारी संस्थांचा अनाठायी खर्च कोठे होतो याचा शोध सहकारी संघानें लावला पाहिजे. संशोधनाच्या क्षेत्रातील तज्ज्ञ लोकांकडून याबाबतीत संघाला मदत घ्यावी लागेल कार्यकर्त्यांची नैतिक वानउघाडणी करण्याचे कामहि संघाचे कक्षेत मोडते. कर्ज मंजूर करणारे इन्स्पेक्टर शेतकऱ्याकडून लाच घेतात किंवा स्वत. विमा एजंट असल्यास शेतकऱ्याना सक्तीने विमे उतरविण्यास भाग पडतात. शेतकऱ्याची अशा प्रकारापासून जपणूक करण्याचा मार्ग सहकारी संघाला शोधावा लागेल.

सध्याच्या परिस्थितीत, एक विशेष महत्त्वाची गोष्ट दिसून येते ती अशीकी, बऱ्याचशा सहकारी संस्था सरकारी मदत घेऊनहि तोटयात चाललेल्या आहेत. सुरवातीला प्रयोगावस्थेत सहकारी चळवळ तोटयात चालाल्यास क्षम्य आहे. पण जर वर्षानुवर्षे या संस्था काही फायदा करूं शकल्या नाही तर ही चळवळ अपेशी होईल व जनतेचा विश्वास उडेल सहकारी संस्था या (Businesslike proposition) धंदेवाईक कशा होतील व नफा कसा काढतील यावद्दल अभ्यास करून उपाय सुचविणें हें काम संघास निस्पृहपणें करावें लागेल. कोणत्याही धंद्यामध्यें, उत्तम व्यवस्था करून नफा मिळविणें ही महत्त्वाची बाब आहे. परंतु सहकारी संस्था व खाजगी व्यापार यामध्यें मुख्य फरक आहे की सहकारी संस्था निव्वळ नफेबाजी करीत नाहीत. उदाहरणच घ्यायचे झाले तर सहकारी साखर कारखान्याचे घेता येईल साखरेचा उत्पादन खर्च कमी झाल्याशिवाय साखरेला बाजारपेठ मिळणार नाही यामाठी ऊसाचा उत्पादन खर्च व किंमत कमी करावी लागेल. ऊसाची किंमत ऊसाच्या वजनापेक्षा साखरेच्या उताऱ्यावर द्यावी या गोष्टीची समज शेतकऱ्याला, सहकारी संघाचे कार्यकर्ते चांगल्या प्रकारे देऊ शकतील शेतकऱ्याच्या फायद्यासाठी निर्भीडपणें त्यांना काही गोष्टी सुनावण्याचे काम, राज्य सहकारी संघासारखी निस्पृह संस्थाच करू शकेल. सहकारी चळवळीचा खरा हेतु म्हणजे गरिबातल्या गरीब माणसास मदत करणें हा होय पण आपल्याला असें दिसतें की सहकारी खरेदी विक्री संघाचा फायदा एखादा मोठा व्यापारी घेतो व लहान शेतकऱ्याला म्हणावा तसा त्या संघटनेचा लाभ होत नाही किंवा सहकारी पतपेढीचे कर्ज, जितके मोठ्या शेतकऱ्याच्या वाटयाला येते तितके लहान शेतकऱ्याना मिळत नाही व्यावहारिक अडचणीमुळे, ह्या अन्यायाचे निर्मूलन कदाचित् तावडतोब करता येणार नाही पण याबाबतीत काही उपाय सुचविण्याचे काम, राज्य सहकारी संघाला करावेच लागेल

सहकारी संस्थांची बाजू सरकारपुढे माडणें हेंहि एक संघाचे काम होईल. सहकारी संस्थांना देण्यात येणारी आर्थिक मदत किंवा तांत्रिक सहाय्य याबद्दल सहकारी संघाचा सल्ला मोलाचा होईल. एखादी सहकारी संस्था अपेशी झाल्यास सरकार तिची मदत कमी करील अशा वेळीं त्या संस्थेकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें संघ पाहू शकेल सरकारी नियमाच्या काटेकोरपणाच्या चौकडीत (Red tape) जर सहकारी संस्थेवर अन्याय झाला तर सहानुभूतीचा मानवी दृष्टिकोन (Human approach) सहकारी संघाला घेता येईल. त्याचप्रमाणे सहकारी संस्थांवर खाजगी उद्योगधंद्याचे आक्रमण होते व या चढाओढीत सहकारी संस्था मागें पडतात. खाजगी व्यापाऱ्यानी जादा किंमत व रोख पैसे अशी सवलत दिल्यानें सहकारी खरेदी-विक्री संघामार्फत मोठी खरेदी विक्री होत नाही. सहकारी सोसायटीला गावातल्या सावकाराला तोंड द्यावें लागते. सहकारी खाणकामगार सोसायटी असेल तर खाजगी कॉन्ट्रॅक्टर ज्या लबाडया करतो, त्या सहकारी संस्थेला जमत नाही व म्हणून ती मार खाते. या सर्व ठिकाणी जो खाजगी व्यापाऱ्याना त्रास होतो त्याच्याबद्दल संघटित आवाज केवळ सहकारी संघच उठवू शकेल व सरकारपुढें सहकारी संस्थाची बाजू एकमुखानें माडली जाईल. त्यापासून काही प्रमाणात तरी सुधारणा होईल

सहकारी संस्थाबद्दलचे कायदे करताना सरकारला राज्य सहकारी संघ सल्ला देऊ शकेल सहकारी सोसायटयावर घालण्यात येणारे निर्बंध संघाच्या सल्ल्यानतर घातल्यास चळवळीस मारक होणार नाहीत किंवा, समजा, सहकारी शेतीबाबत सरकारला निर्णायक पाऊल टाकायचे आहे. अशा वेळी सहकारी कार्यकर्त्यांचा मगदूर, जनतेची तयारी व ग्रामीण भागातील बरीवाईट परिस्थिति याबद्दलचा अचूक निर्णायक सल्ला सरकारला राज्य सहकारी संघ देऊं शकेल चालू संस्थांबद्दल तर सल्ला देण्याचे काम संघ करीलच शिवाय कोणत्या क्षेत्रात सहकारी संस्था काढणें इष्ट आहे, या बाबतीत सल्ला देण्यास संघ ही योग्य संस्था आहे. संघाजवळ जो तज्ज्ञ नोकरवर्ग व कार्यकर्त्यांचा संच आहे, त्याच्या मदतीनें स्थानिक साधनसामुग्रीच्या सहाय्याने, लहान लहान उद्योगधंदे सहकारी डेअरी किंवा प्रोसेसिंग करण्याचे कारखाने अशा नव्या योजनासुद्धा सरकारपुढें माडण्याचे काम संघाला करता येईल

सहकारी संघाचे आणखी महत्त्वाचे कार्यक्षेत्र म्हणजे, सहकारी संघटनेला व्यावहारिक मार्गदर्शन करणें हें होय त्या मार्गदर्शनाचे स्वरूप, सहकारी संस्थाची स्थापना, त्याची जोपासना व वाढ, त्याचा दैनंदिन कारभार, त्याची तपासणी, सहकाराशी संबधित असलेल्या सर्व प्रश्नाचा

अभ्यास करणें, त्यांस प्रोत्साहन देणें, त्यासाठीं संशोधन करणें, असें विविध प्रकारचें आहे. सहकारी क्षेत्रात, सुधारलेल्या देशात, हल्ली या कार्यासाठी, सहकारी संघानी स्वतंत्र विभागच निर्माण केले आहेत.

सहकारी संघांनीं, सहकारी संघटनांना, सुस्पष्ट, सुयोग्य मार्गदर्शन करण्याचें आपलें प्रमुख कर्तव्य उत्कृष्टरित्या, पार पाडावयाचें असेल तर त्यासाठीं, संशोधन विभागाची स्थापना करणें केवळ हितप्रदच नव्हे तर अवश्यमेव आहे. देशांत किंवा राज्यांत विखुरलेल्या विविध विभागात, कोणत्या संस्था कार्य करितात, त्यांची आर्थिक परिस्थिति कशी आहे, त्यांचे कार्यातील अडचणी कोणत्या आहेत, नवीन संस्था स्थापन होण्याची शक्यता, कोणत्या प्रकारच्या संघटना विशेष यशस्विता संपादन करू शकतील, या संघटनांबाबतचा, स्थानिक जनतेचा उत्साह किती आहे, स्थानिक साधनसामुग्रीची उपलब्धता, आदिबाबत अद्यावत नित्य माहिती संशोधन विभागाकडे असणें चळवळीचा व्याप सुस्थिर आणि सुदृढ करण्याच्या दृष्टीनें आवश्यक आहे. पाश्चात्य राष्ट्रात, प्रत्येक सहकारी संघ, संशोधन विभागाद्वारे, संस्था स्थापन करण्यापासून, तो त्यांच्या कार्यालयाची सजावट, किंवा दुकानाची मांडणी करून देण्यापर्यंत, सयुक्तिक मार्गदर्शन करण्यात अग्रेसर असल्याचें आढळून येते.

इंग्लंड, स्वीडन, जर्मनी, डेन्मार्क, स्वित्झर्लंड, व इतर कांही राष्ट्रात अलिकडे सहकारी संस्थांच्या यशाचे मूल्यमापन करण्याची व्यवस्था, सहकारी संघांनीं केलेली आहे. सहकारी संस्थेच्या एखाद्या विशिष्ट व्यवहाराची किंपत प्रगति झाली आहे, या संबंधांत संस्थेला खात्री करून घेतां यावी, यासाठीं या संघानी, विविध ठोकताळे व आडाखे निर्धारित केले आहेत. सहकारी संघाचे अधिकारी, या संस्थांची तपासणी करून, त्यांच्या व्यवहाराबाबत योग्य तो अभिप्राय व्यक्त करितात, पुढील व्यवहारासाठी सल्ला देऊन यथायोग्य मार्गदर्शन करितात. उपरिनिर्दिष्ट कार्य नीटपणें पार पाडण्यासाठी, संशोधन व आकडेशास्त्र विभागाची, सहकारी संघाना नितांत निकड आहे. हे दोन विभाग, सहकारी संघानी, आपल्या कार्यक्षेत्रांत समाविष्ट केल्यानंतर, त्याशिवाय आणखी एक सल्लागार मंडळ स्थापन करावे. जेणेंकरून संबंधित सहकारी संस्थांना व त्यांच्या सभासदांना, गरजेनुसार त्यांचा सल्ला व मार्गदर्शनाचा लाभ मिळेल. मात्र अशा प्रकारें प्रस्थापित केलेल्या सल्लागार मंडळाला व संशोधन खात्यातील तज्ज्ञांना त्यांना उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारें स्पष्ट सल्ला देण्याची मोकळीक असलीच पाहिजे. संस्थांच्या चालकांचे त्यांचेवर कोणत्याही प्रकारचें दडपण असणें अत्यंत अनिष्ट असून ते सहकारी चळवळीच्या निकोप वाढीस मारक ठरेल.

नविन संघटना स्थापन करण्याचे बाबतीत तर, सहकारी संघांनी अत्यंत दक्षतेचें धोरण स्वीकारलें पाहिजे. केवळ इतर ठिकाणीं अशाच प्रकारच्या संस्था स्थापन झाल्या आहेत, म्हणून चढाओढीच्या दृष्टींतून, किंवा सरकारी धोरण, अशा संघटनाना मदत करण्याचे आहे यास्तव नवीन संस्था स्थापन करण्याची जी प्रवृत्ती आजकाल दिसून येते ती थांबविलीच पाहिजे. इतकेच नव्हे तर, नवीन संस्था प्रस्थापित

करण्यापूर्वी सहकारी संघाचा सल्ला सरकारनें घेणें हितावह ठरेल, अशी सूचना या संदर्भात करणे इष्ट वाटते.

कार्यकर्ते व जनता यांना योग्य मार्ग दाखविणें व सरकारला निस्पृह रीतीनें सल्ला देणें अशी महत्त्वाचीं कामें करण्यासाठीं राज्य सहकारी संघ आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र असणें जरूर आहे. राज्य सहकारी संघ व जिल्हा सहकारी बोर्ड याना शिक्षण प्रचार, संशोधन या कामासाठी लागणाऱ्या खर्चाची तरतूद झाली पाहिजे. हा खर्च अनाठायी जाणार नाही अशी दक्षता घेतली पाहिजे. राज्य सहकारी संघ हा दीपगृहासारखा आहे. त्याला स्वतंत्रपणें व समर्थपणे काम करण्याची संधि मिळाल्यास सहकारी संस्थाची कार्यक्षमता वाढीस लागेल.

सहकारी संघटनेंत कार्य करणाऱ्या सभासदाना याची जाणीव आहे कीं, सहकारी चळवळीच्या अगदी आरंभापासूनच, सरकारचा हेतु, सहकारी कार्यकर्त्यांना सहकारी शिक्षण देऊन तयार करावे जेणेंकरून पर्यायाने सहकारी चळवळी संबधाचे सर्व प्रश्न त्याचे त्याना सोडविता येणें सुलभ आणि सुकर व्हावे हा होता. त्या वेळच्या सरकारनें या ज्या अपेक्षा,सहकारी कार्यकर्त्यांकडून केल्या होत्या त्याबाबत मुंबई प्रांतापुरतेच लिहावयाचे झाले तर, ह्या राज्यात सहकारी संस्थानी केलेली स्पृहणीय प्रगति,बिनसरकारी सहकारी कार्यकर्त्यांच्याच प्रयत्नातून झालेली आहे ही गोष्ट आतां सर्वत्र मान्यता पावली आहे. इतकेंच नव्हे तर आपले पंतप्रधान पं. जवाहरलालजी नेहरू व इतर राष्ट्रीय पुढाऱ्यानी आदर्श म्हणून तिची मुक्तकंठानें स्तुतीहि केली आहे.

सहकारी चळवळीचे नेतृत्व, हळूहळू सहकारी संघटना व त्यात कार्य करणारे कार्यकर्ते याजकडे कसें जाईल या धोरणाची ह्या राज्यात विधायक आखणी करण्यात आली असून त्या दृष्टीनेंच आजवर पावलें टाकण्यात आली आहेत स्वातंत्र्यप्राप्तीनंतर १९२५ च्या सहकारी कायद्यात १९४८ मध्यें, व आता १९६० च्या सहकारी सोसायट्याच्या कायद्यात रजिस्ट्रार याना दिलेलें सर्व वा कोणतेही अधिकार, महाराष्ट्र राज्यातील सहकारी सोसायट्याच्या कोणत्याही संघाकडे सोपविण्याची जी तरतूद करण्यात आलेली आहे ती मोठीच सूचक व उद्‌बोधक होय सहकारी चळवळीच्या नियंत्रणाचे, नियोजनपूर्वक लोकशाहीकरण करण्याचे आश्वासन देऊन, सहकारी संस्थांच्या विकाससंबंधाचे आणि नियमनासंबंधाचे अधिकार सहकारी संस्थाच्या संघटनाकडे सोपविण्याची जी तयारी सरकारने दाखविली आहे, त्या संधीचा आपल्या राज्यांतील सहकारी चळवळीतील कार्यकर्ते, विधायक दृष्टिकोनांतून संपूर्ण फायदा घेऊन राज्य सरकारच्या व राष्ट्रीय सरकारच्या सहकारी चळवळीबाबतच्या अपेक्षा पूर्ण करून दाखवितील अशी आशा आहे ही आशा फलद्रूप करण्याचे कार्यी, राज्यसहकारी संघ, ह्याची जबाबदारी फारच मोठी आहे. किंबहुना त्यांच्या कर्तृत्वाची ही कसोटी असून, सहकारी संघ, सहकारी संघटना व सरकार यांच्यावर, आपल्या कार्यप्रणालीनें किती प्रभाव पाडतात या संदर्भात हे संघ, जी यशस्विता संपादन करतील, ह्यावरच त्यांची उपयोगिता ठरणार असून, एक प्रकार त्याचें अस्तित्वच पणाला लागणार आहे. हें उद्दिष्ट साध्य होण्यासाठीं आवश्यक असलेलें निरलस, निरपेक्ष, उत्तम, नैष्ठिक नेतृत्व महाराष्ट्राला परंपरागत लाभलें आहे हें त्याचें मोठें सौभाग्यच होय !

सहकारी चळवळीचा प्रभावी प्रसार करण्यासाठी, कार्यप्रणाली निर्धारित करून, ती कार्यप्रवण करण्याचे कार्यी राज्य सहकारी संघ, सहकारी संघटनेतील सभासद व नेते याचे संपूर्ण सहकार्य जरी त्याना मिळाले तरी त्याच्या भूमिकेला सरकारचे सहाय्य मिळविण्यात हे संघ कितपत यशस्वी होतात व सरकार वेळोवेळी सहकारी चळवळीबाबत जी धोरणें ठरविते, त्यावर किती प्रभाव पाडूं शकतात, या गोष्टीवर सहकारी संघाच्या यशस्वितेचें फलित बव्हंशानें अवलंबून आहे. सरकार आणि त्याची सहकारी खात्याची यंत्रणा याच्याशी केव्हा केव्हां संघर्षही निर्माण होण्याची शक्यता आहे. अशा वेळी, जनतेच्या हिताची जोपासना करण्यासाठीं, सहकारी चळवळीची अस्मिता टिकवून तिचा गौरव वाढविण्यासाठीं संघानें आपलें सर्वस्व पणाला लावून प्रभावी लोकमत तयार करण्याचे कर्तृत्व, कर्तव्य बुद्धीनें बजावणें ही कर्तव्यपरायणता संघाचा मानदंड ठरेल. सहकारी चळवळीस सरकार अनुकूल असेल तर चांगलेच, आणि सुदैवानें आज ते थोडयाबहून प्रमाणात, ( सहकारी संघटनेंतील धुरीणाच्या पुण्याईनें ) आपल्या राज्यात आहेही ! परंतु भविष्य काळात, सरकारी धोरण एकाच पद्धतीनें राहील असे सहकारी कार्यकर्त्यांनी गृहीत धरणें अयोग्य ठरेल. यासाठीं सहकारी संघटनेचें अंतर्गत सामर्थ्य, "सामर्थ्य आहे चळवळीचे, जो जो करील तयाचे ।" ही समर्थवाणी लक्षांत ठेवून, वाढविणें याची नितांत निकड आहे. हा दृष्टिकोन सहकारी संघानी सतत नजरेसमोर ठेविला पाहिजे यादृष्टीनें इग्लंडचे उदाहरण मोठेंच प्रेरक होय इंग्लंडमध्यें सहकारी चळवळीचे मार्गांत, सरकारनें अडथळे आणावयाचे धोरण ठरविल्यानंतर, चळवळीनें राजकारणात शिरण्याचा निर्णय घेतला आणि आज संघटनेचे ३० प्रतिनिधी त्या देशाचे पार्लमेंटमध्यें निवडून दिले जातात त्यामुळें संघटनाना निर्वेधपणें चांगले कार्य करण्यास उत्तेजन मिळते. सहकारी चळवळीची निकोप आणि प्रभावी वाढ होण्यासाठीं तिची कार्यक्षमता वाढवून ती संपूर्णपणें स्वावलंबी करण्याकडे मन लावून प्रयत्न करावयास पाहिजेत सहकारी संस्था स्वावलंबी झाल्याशिवाय त्या खऱ्या अर्थानें 'सहकारी' ह्या संज्ञेस प्राप्त ठरणार नाहीत. सहकारी संघाना त्या दृष्टीनें अद्याप फार मोठी कामगिरी पार पाडावयाची आहे सहकारी समाजवादाचें शिखर गांठून, भारतीय भाग्योदय घडवून आणण्याचें ध्येय साकार करण्यांत, सहकारी संघाच्या कार्याचें मोठेंच महत्त्व आहे. ह्या कार्यास आवश्यक असलेलें धैर्यवादी नेतृत्व सहकारी संघ करेल अशी आशा वाटते. सहकारी संघाच्या अस्तित्वाचा हा आत्माच होय ! ह्या कार्यी सचावत केलेल्या संघर्षांवरच, निष्ठीपरत्वेंवरच सहकारी संघाच्या सुयशाची इमारत उभी आहे !! ॐ ॐ ॐ




# सहकारी विचारांची उत्क्रान्ति

श्री आर. जी. सरैय्या







हकारी चळवळीचा प्रारभ या देशात सरकारनें सावकाराच्या पकडीत सापडलेल्या शेतकऱ्याना स्वस्त दरानें कर्ज पुरविण्याचे साधन या दृष्टीनें झाला आज ती चळवळ राष्ट्राच्या विकासाच्या, विशेषत: ग्रामीण विभागातील आर्थिक धोरणाना, मूर्त स्वरूप देण्याचें महत्त्वाचे साधन म्हणून सरकार वापरीत आहे गेल्या पाच दशकांच्या काळांत, सहकाराच्या तत्वज्ञानांत पुष्कळच महत्त्वाचे फरक घडून आले. या त्रोटक आढाव्यात त्या सर्वांचा परामर्श घेणें शक्य नसल्यामुळें त्यापैकी थोड्या आणि मुख्यत. शेती उत्पादकाला कर्ज पुरविण्याच्या बाबीचाच, विचार करण्याचें मी योजिलें आहे

सर्वांत महत्वाचा बदल घडून आला आहे तो या चळवळीचा राज्य-सरकाराशीं असलेल्या संबंधाबाबत. या चळवळीचा पुरस्कार आणि तिला लाभलेलें प्रोत्साहन केंद्र आणि राज्यसरकारानी दिलें यात संशय नाही, परंतु स्वातंत्र्या-पर्यंत, किंबहुना, ऑल इंडिया रुरल क्रेडिट सर्व्हे–कमिटीच्या शिफारशी स्वीकारण्यात येईपर्यंत, सरकारी धोरण हें मुख्यत: सहकारी सोसायट्या स्थापणें, त्यांचे हिशेब तपासणें, आणि त्यांच्या दैनंदिन कार्याबाबत सर्वसाधारण मार्गदर्शन करणें एवढ्यापुरतेंच मर्यादित होतें. सर्वांगीण आर्थिक विकासाचें महत्त्वाचे स्थान म्हणून या चळवळीकडे पाहिलें जात नव्हतें. फार काय, सर होरेस प्लंकेट तिला सहकारी धोरण म्हणत, सहकारी चळवळ नव्हे. सहकारी संघाच्या मदतीनें शेतकऱ्याच्या कर्जपुरवठ्याचा आणि ग्रामीण कर्जबाजारीपणाचा प्रश्न सुटेल अशी आशा सरकारला वाटे अशा काही प्रयत्नाच्या निष्फळतेकडे लक्ष्य वेधून अधिक भरीव धोरण स्वीकारण्याची कामगिरी पहिल्यानें ॲग्रिकल्चरल फिनान्स सबकमिटीनें बजावली सावकार वर्गाची मक्तेदारी नष्ट करण्यासाठी पर्यायी, मध्यास्थपी, कर्जपुरवठा संघटना असली पाहिजे, ती निमसरकारी असली पाहिजे, केवळ स्थानिक पुढाकार व प्रयत्न यावर अवलंबून राहून चालणार नाही असें या कमिटीचे मत होतें म्हणून जेथें सहकारी चळवळ, सरकारी मदतीनें, जबाबदारी पत्करण्याइतकी मजबूत होती तेवढ्या प्रान्ताखेरीज अन्यत्र, ॲग्रिकल्चरल स्टेट क्रेडिट कॉर्पोरेशन्स प्रस्थापित करण्याची जोरदार शिफारस या कमिटीनें केली या कामासाठी स्टेट कॉर्पोरेशन्स स्थापण्याची शिफारस या देशातील कोणत्याच राज्यानें स्वीकारली नाही परतु मुंबईच्या बिनसरकारी सहकारी कार्य-

कर्त्यांनीं १९४८ सालीं एक ऐतिहासिक निर्णय घेतला. प्रत्येक ऐपतवान शेतकऱ्याला कर्ज पुरवितां येईल अशा प्रकारें सहकारी कर्ज पुरवठा यंत्रणा सरकारच्या सक्रिय मदतीनें उभारण्याची जबाबदारी पत्करण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यावेळच्या मुंबई राज्य सहकारी बँकेचा अध्यक्ष म्हणून या निर्णयाशी निगडित असण्याचें भाग्य मला लाभलें होतें.

तरी सुद्धां सहकारी चळवळींत, सरकारनें अधिक प्रत्यक्षपणें व सक्रिय भागीदारी पत्करली पाहिजे अशी शिफारस मात्र रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनेंच केली. सहकाराच्या आद्य पुरस्कर्त्यांनी ठरविलेलें मर्यादित उद्दिष्ट साध्य करण्यातही सहकारी चळवळीला अपयश आलें होतें तरीहि तिच्या वाढीला अधिक अनुकूल अशी परिस्थिति निर्माण करून ती यशस्वी केली पाहिजे असा त्या कमिटीचा विश्वास होता. कमिटीच्या मतें :

> " सहकारी कर्जपुरवठ्याची पुनर्घटना करणें हाच केवळ प्रश्न नाहीं, तो परिणामकारकपणें आणि दुर्बलांच्या हितासाठी काम करूं लागेल अशी परिस्थिति निर्माण करण्याचा खरा प्रश्न आहे. आजच्या परिस्थितीनें ज्यांना दलित व दुर्बल बनविलें आहे तीच माणसें प्रचलित परिस्थिति बदलूं शकणार नाहींत. परिस्थिति बदलूं पहाणाऱ्या शक्ति या निदान ज्या शक्तींचा प्रतिकार करावयाचा त्यांच्या इतक्या तरी सामर्थ्यशाली हव्यात या शक्ति केवळ सहकारानें निर्माण होणार नसून सरकार आणि सहकार यांच्या संयोगानें निर्माण होणार आहेत. "
>
> ( विभाग २— सर्वसाधारण अहवाल पृ. २७९ )

या कमिटीनें अशी शिफारस केली की सहकारी कर्ज पुरवठा आणि मार्केटिंग संस्थांच्या भाग भांडवलात व व्यवस्थेंत सर्व पातळ्यांवर सरकारनें भागीदारी पत्करावी. सहकारी संस्थांशी सरकारचा असा प्रत्यक्ष संबंध आला म्हणजे असहाय शेतकऱ्यांवर मजबूत पकड ठेवून राहिलेल्या खेड्यांतील, सावकार व व्यापारी-सावकार लोकांशी बरोबरीच्या नात्यानें स्पर्धा करण्याइतकें सामर्थ्य सहकारी संस्थांना येऊं शकेल.

सागाहून १९५५ सालीं पाटणा येथें भरलेल्या दुसऱ्या सहकार कॉंग्रेससाठी आलेल्या बिनसरकारी सहकार कार्यकर्त्यांनीं ही शिफारस स्वीकारली सहकार हा स्वावलंबी असला पाहिजे आणि सरकारी भागीदारीमुळें सरकारी हस्तक्षेप येईल व सहकारी संस्थांचें स्वातंत्र्य व स्वायत्तता नष्ट होईल म्हणून सरकार पासून अलिप्त राहिलें पाहिजे ही सहकारी चळवळीची पुरातन तात्त्विक भूमिका पुष्कळशी सोडून देण्यात आली आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या व पिळल्या जाणाऱ्या पुष्कळशा लोकांनीं सहकाराच्या पायावर संघटना केली म्हणून तेवढ्यानेंच ते मजबूत अगर सुस्थित होऊ शकत नाहींत ही वस्तुस्थिति अशा प्रकारें मान्य करण्यात आली दुर्बळांनी सहकारी संघाचे सभासदत्व पत्करलें की, पतन सबलांना उपलब्ध असलेले फायदे व सवलती त्यांना मिळूं शकतील असें गृहीत धरून या देशातील सहकारी चळवळीचा प्रारंभ झाला होता सरकारी भागीदारी मान्य करणें म्हणजे दुर्बल हे स्वतःच्या शक्तीवर अपेक्षित यश मिळवूं शकत नाहींत या गोष्टीला एक प्रकारें मान्यता देणेंच होतें बिनसरकारी सहकारी कार्यकर्त्यांना परिस्थितीची जाणीव होती. त्याचप्रमाणें सरकारी भागीदारीनें लोकांची उपक्रमशीलता नष्ट होऊं नये व सोसायट्या या सहकारी संस्थांच्या रजिस्ट्रारच्या नेतृत्वाखालील खात्याच्या वेगवेगळ्या शाखा बनू नयेत याचीही काळजी त्यांना होती म्हणून कॉंग्रेसनें सरकारी भागीदारी स्वीकारतांनाच कांही अटी घातल्या. सहकारी संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे निर्णय फेटाळण्याचे अधिकार सरकारला असूं नये व कार्यकारी मंडळावर सरकारी सभासद तीनपेक्षा अधिक असूं नयेत या त्या अटी होत . निरनिराळ्या राज्य सरकारांनी ही गोष्ट मान्य केली आणि सहकार विकासाच्या पहिल्या पंचवार्षिक योजनाचें सरकारी भागीदारी हें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य झालें. गेली कांही वर्षें ही व्यवस्था एकंदरीनें समाधानकारकपणें चालली आहे, सहकारी संस्थांना मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे आणि सरकारी भागीदारीशिवाय शक्य झाली नसती इतकी आश्चर्यकारक प्रगतीहि सहकारी चळवळीनें केली आहे.

दुसरा महत्त्वाचा बदल सहकारी कर्जपुरवठ्याच्या रचनेसंबंधींचा आहे. १९०४ सालीं पहिला सहकारी सोसायट्यांचा कायदा पास झाला तेव्हा असें वाटलें होतें कीं, कर्जपुरवठा करणाऱ्या प्राथमिक शेती सहकारी पतपेढ्या ' अमर्यादित ' स्वरूपाच्या असल्या की, त्या गरजेपेक्षां अधिक पैसा जवळ असणाऱ्यांचा पुरेसा विश्वास संपादन करतील आणि आपल्या गरजू सभासदांच्या फायद्यासाठीं तो पैसा आकर्षूं शकतील. त्यामुळें सोसायट्यांच्या फेडरेशन्सची तरतूदही त्या कायद्यानें केली नाहीं. परंतु, अगदी लौकरच असें आढळून आलें कीं, सभासदांची संयुक्त आणि वेगवेगळी जबाबदारी कायम ठेवूनही सोसायट्यांना पुरेसा पैसा उभारता आला नाही आणि शहरी भागांतूनच ग्रामीण भागाकडे पैसा न्यावा लागेल. यासाठी सोसायट्यांची फेडरेशनें बनविणें, त्यांचें मुख्य ठाणें नागरी विभागात, जेथें पैशाच्या व्यवहाराचा जरूर तो अनुभव आणि शिक्षण असलेले सार्वजनिक कार्यकर्ते मिळण्यासारखे असतात तेथें ठेवणें अवश्य आहे हें उघड झालें. १९०४ चा कायदा १९१२ सालीं दुरुस्त करून त्यांतील दोष काढून टाकण्यात आले व सहकारी चळवळीला निरनिराळ्या जबाबदाऱ्या व कामें अंगावर घेता यावीत अशी सोय करण्यात आली संलग्न सोसायट्यांना पैसा पुरविण्यासाठीं कांहीं राज्यात मध्यवर्ति सहकारी बँका स्थापन करण्यांत आल्या. शिखरस्थानीं प्रांतिक सहकारी बँक, मधल्या पातळीवर मध्यवर्ति बँक आणि तळाशीं प्राथमिक पतपेढ्या अशी तीन थरांची रचना १९१५ सालीं मॅक्लेगन समितीनें सुचविली. या शिफारसीप्रमाणें प्रत्येक राज्यात प्रांतिक सहकारी बँका स्थापन झाल्या तथापि मध्य पातळीवरील संघटनेची सुस्पष्ट कल्पना नव्हती पुष्कळ राज्यांनी सोसायट्या आणि व्यक्ति यांचे संमिश्र सभासदत्व असलेल्या मध्यवर्ति सहकारी बँका सुरू केल्या त्यांचे कार्यक्षेत्र कांहीं वेळां संबंध जिल्ह्याइतकें व्यापक असे तर कांहीं वेळा एक अगर दोन तालुक्यापलीकडे नसे. कांही राज्यात प्रादेशिक सहकारी बँकांनी आपल्या शाखा चालूच ठेवल्या कधी कधी मध्यवर्ति बँकेच्या कार्यक्षेत्रात येणाऱ्या विभागातही शिखर बँकेनें आपल्या शाखा सुरू केल्या तथापि, हळूहळू शिखर बँकेनें, प्रादेशिक बँकेनें, मध्यवर्ति बँकेचे जें कायदेशीर कार्यक्षेत्र असेल त्या विभागात अगर उद्यो-

गांत आक्रमण करूं नये हे स्पष्ट झाले त्याचप्रमाणे तालुका पातळीवर ल्हान घटक ठेवण्याऐवजी, प्रत्येक जिल्ह्यांत एक सुस्थिर आणि कार्यक्षम व्यवस्थेची मजबूत मध्यवर्ति बँक असणें इष्ट आहे हेंहि मान्य करण्यांत आलें. जिल्हा हा कारभाराचा घटक मानून, निरनिराळ्या योजनाकार्याचा अंमल सुरू झाला तेव्हा जिल्ह्याच्या ठिकाणीं एकच मध्यवर्ति बँक असण्याची गरज प्रकर्षानें भासूं लागली. शिवाय योजनामध्यें, सहकार विकासाचा जो कार्यक्रम आखण्यात आला आहे त्यासाठीहि स्थानिक स्वायत्तता व कल्पकता याची गरज पुष्कळ प्रमाणांत लागणार होती. यागोष्टी जिल्हा पातळीवर स्वायत्त आणि सुस्थिर घटकाखेरीज शक्य नसल्यामुळें एक मध्यवर्ति जिल्हा बँक ठेवण्याच्या कल्पनेला आणखी मजबुती आली. म्हणून सहकारी विचारानें अखेरीस तीन थराच्या फेडरल स्वरूपाच्या सहकारी पतपुरवठ्याच्या यंत्रणेचा स्वीकार केला आहे– शिखर बँक, जिल्हा मध्यवर्ति बँक व ग्रामीण प्राथमिक सोसायट्या–प्रत्येकीनें, आपापल्या क्षेत्रांत, वरील पातळीवरील संघटनेकडून आक्रमण न होता, काम करावयाचे वर नमूद केलेली उद्दिष्टे एकदा स्पष्ट झाल्यानंतर कृति सुरु झाली व मला नमूद करावयास आनंद वाटतो की, महाराष्ट्र राज्यांत वरील घडण संपूर्णतया अस्तित्वांत आली आहे, शिखर बँकेने जिल्ह्यातून व्यवहार काढून घेतला आहे, आणि तालुका बँकानी विलीन होऊन जिल्ह्यांत एक मजबूत मध्यवर्ति बँक बनविली आहे त्यामुळे शिखर बँक ही आतां वाढावा आणि तुटी यांचा समतोल साधणारी संघटनाच राहिली नसून एका सुसंघटित अशा रचनेचे नेतृत्व करूं लागली आहे.

याशिवाय आणखी एक अत्यंत महत्त्वाचा बदल, सहकारी चळवळ आणि देशाची मध्यवर्ति बँक यांच्या संबंधाबाबत झाला आहे. रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया कायदा १९३४ साली पास झाला हा कायदा बनविणाऱ्यानी देशाच्या आर्थिक जीवनांतील शेतीचे महत्व ओळखून, सरकारला व इतराना ग्रामीण पत पुरवठ्याचा प्रश्नाबाबत सल्ला देण्यासाठी एका खास शेती कर्जपुरवठा विभागाच्या स्थापनेची तरतूद केली. शेतीमालाचे उत्पादन व विक्री यासाठी राज्य सहकारी बँकाना पैसा पुरविण्याची व्यवस्था करणेंहि बँकेला या कायद्यामुळें शक्य झाले स्थापनेनंतर पुष्कळ वर्षें, किंबहुना १९४७ मध्यें स्वातंत्र्याचे आगमन होईपर्यंत रिझर्व्ह बँकेची अंतिम धनकोची भूमिका कायम होती बहुजन समाजाची मुक्ति सहकारी चळवळी खेरीज होणार नाहीं हें मान्य असूनही तिनें सहकारी चळवळीच्या विकासांत कोणतेंहि सक्रिय लक्ष्य पुरविलें नाहीं. शेतीला पतपुरवठा हें काम स्वभावत:च किचकट आहे. तें हातीं घेण्यानें, सबंध देशाची आर्थिक सुस्थिरता टिकवून ठेवण्याचे काम सोपविलेल्या संस्थेची, स्थिरता धोक्यात येईल म्हणून मध्यवर्ति बँकेनें शेती कर्ज पुरवठ्याच्या कामात गुतून पडू नये असे पश्चिमेकडील जुन्या मध्यवर्ति बँकांची धोरणे आणि कार्यप्रणाली स्वीकारलेल्या या बँकेला वाटे. उलट मध्यवर्ति बँकेचे, सक्रिय साह्य मिळाल्याखेरीज प्रगति होणे शक्य नाही असें सहकारी कार्यकर्त्यांचे मत असल्यामुळें रिझर्व्ह बँकेनें दृष्टिकोन बदलावा असें त्याचे दडपण येत होतें. तथापि, इष्ट तो बदल स्वातंत्र्यानंतर सुदैवाने घडून आला ज्या देशात शेती हें राष्ट्रीय उत्पन्नाचे मुख्य साधन आहे आणि जेथील ३/४ पेक्षां अधिक लोकसंख्या शेतीवर अवलंबून आहे तेथें, शेती उत्पादन आणि विक्री याना अधिक सुस्थिरता लाभेल अशी आर्थिक मदत मध्यवर्ति बँकेने केली पाहिजे या तत्वानुसार बँकेने अधिक निर्णायक कामगिरी पत्करली १९५१ सालीं बँकेनें महत्त्वाच्या सरकारी व बिनसरकारी सहकारी कार्यकर्त्यांची एक अनौपचारिक परिषद् भरविली त्यातून शेती पतपुरवठ्याबाबत स्थायी सल्लागार समिति अस्तित्वात आली आणि अ० भा० ग्रामीण पतपुरवठा पहाणी करण्यासाठी एक समिति नेमण्यांत आली. ही पहाणी चालू असताना, सहकारी चळवळीबाबत अधिक उदार धोरणाकडे नेणारे काही उपक्रम रिझर्व्ह बँकेनें सुरू केले. बँकेने स्वीकारलेल्या या उदार धोरणांच्या आणि उपायाच्या तपशीलात शिरण्याचें कारण नाही. प्रत्येक 'उचल', बारा महिन्याचे कर्ज मानणें, जेथे शिखर बँक ही मध्यवर्ति भांडवलपुरवठा संस्था म्हणून काम करीत असेल, तेथें अल्पमुदतीच्या कर्जासाठी प्राथमिक क्रेडिट सोसायटीची सही काम भागविण्यास पुरेशी मानणे, यासारख्या गोष्टीचा या संदर्भात उल्लेख करता येईल या धोरणानें सहकारी चळवळीला प्रचंड उठाव दिला. ग्रामीण कर्जपुरवठ्याचे गुंतागुंतीचे प्रश्न सरकारी भागीदारी व राष्ट्राच्या मध्यवर्ति बँकेची मदत यामुळें ती सोडवूं शकेल अशी एक नवी आशा निर्माण झाली.

योजनानी सहकारी संस्थामार्फत पुरवावयाच्या शेतीकर्जांचे इष्टांक ठरवून दिले. त्यातून जनतेच्या आकांक्षा व्यक्त होत होत्या परंतु सारख्या वाढत चाललेल्या मागण्या पुरविण्याची साधनें सहकारी चळवळीजवळ नव्हती. त्यामुळे हे अंतर रिझर्व्ह बँकेनें भरून काढावें अशी मागणी वाढत गेली. अखेर काही राज्यांत शेतीकर्जांचा मोठा भाग रिझर्व्ह बँकेनें दिलेल्या पैशातून पुरविला जाऊं लागला. वेगाने विकास पावत असलेल्या अर्थजीवनांत, रिझर्व्ह बँकेवर पुष्कळसें अवलंबून रहावें लागणें ही गोष्ट सहज समजण्यासारखी होती मात्र स्वावलंबन आणि परस्पर सहाय्य ही सहकाराची परंपरेने चालत आलेली तत्त्वे सोडून द्यावयाची नसतील तर नजीकच्या भविष्यकाळात न साधले तरी दीर्घकालाअंती, स्वावलंबी होण्याच्या अंतिम उद्दिष्टावर भर देणे अवश्य झाले रिझर्व्ह बँकेनें दिलेली आर्थिक मदत सहकारी संस्थानी योजनेनुसार ठरविलेली कर्जपुरवठ्याची उद्दिष्टें पुरी व्हावीत येवढ्याचसाठी नसून देशात, सुस्थिर आणि मजबूत अशी सहकारी बँकिंगची घडण कायम व्हावी यासाठी दिली जात आहे हेंहि आग्रहपूर्वक सांगणें अवश्य होतें. रिझर्व्ह बँक आणि सहकारी संस्था यांची अन्योन्य भूमिका यथार्थतेनें वैकुंठ मेहता समितीच्या अहवालात स्पष्ट केली आहे

आणखी एक महत्त्वाचा बदल प्राथमिक शेती कर्जपुरवठा सोसायट्यांची घटना, आकार आणि कार्य यांच्याबाबत झाला आहे. १९०४ चा व १९१२ चा सहकारी कायदा तसेच त्यासंबधीचे इतर राज्य सरकाराचे कायदे यानी, एका खेड्यातील अगर समाजातील व्यक्तींच्या लहानशा गटाची प्राथमिक सोसायटी गृहीत धरली होती सोसायटीच्या कर्जाला सर्वजण संयुक्तपणें व वेगवेगळे जबाबदार रहावयाचे असले तर परस्पर ज्ञान आणि देखरेख या गोष्टी आवश्यक होत्या व या पद्धतीनें त्या

साधत होत्या. सहकार हा आर्थिक सुस्थितीपेक्षां वैयक्तिक विश्वासावर अधिक अवलंबून होता व म्हणून प्राथमिक सोसायटया फक्त अमर्यादित जबाबदारीच्या स्थापाव्या लागत. याच नमुन्याच्या सोसायटया धनकोंमध्यें विश्वास उत्पन्न करूं शकतील आणि बाहेरून कर्जाचा पुरवठा अखंड चालू ठेवतील असें वाटले होते. १९३० मधील आर्थिक मंदीच्या काळात, कित्येक सोसायटयांची वाढ खुंटली व ज्यांनीं आपली देणी अगर जामिनकीची जबाबदारी भागविली होती त्यानाही, अमर्यादित जबाबदारीची सक्ती करणे बँकाना भाग पडलें. परिणाम असा झाला की की काही राज्यात भावी संघटना मर्यादित जबाबदारीच्या पायावर उभारण्यांत आल्या तर दुसऱ्यानी जात जामिनकीऐवजी मालमत्तेचें तारण सुरू केलें. या घटना जुन्या रॅफेसेन पद्धतीच्या सहकारी कर्जपेढयाच्या कल्पनेशी अगदी विसंगत होत्या. कर्जाची रक्कम अधिकाधिक प्रमाणांत जमिनीच्या किमतीवरुन ठरू लागली आणि ज्यांच्या जमिनी होत्या, विशेषतः जे मोठे व मध्यम जमीनदार होते त्यांच्यापुरताच कर्जपुरवठा मर्यादित झाला. रूरल क्रेडिट सर्व्हेच्या पहाणीतील या निष्कर्षामुळें, सहकारी चळवळ पन्नास वर्षे चालूनही निष्फळ ठरली असल्याचा निर्णय कमिटीनें दिला. प्राथमिक सोसायटया देशात सुरू करण्याचा उद्देश मुख्यतः त्यांनी स्वस्त कर्जे पुरवावीत हा होता व त्यामुळें बहुतेक सोसायटया त्याच वर्गातील होत्या. आर्थिक मंदीनंतर, कित्येक तज्ज्ञ समित्यांनी असा निर्णय दिला की, कर्ज पुरविण्याला अवास्तव महत्त्व, हा सर्व पद्धतींतील महत्त्वाचा दोष होता, व सहकार जर शेतकऱ्याला खरोखरी उपयोगी व उपकारी ठरावयाचा असेल तर त्यानें केवळ कर्जाचीच गरज न भागवितां कर्ज, विक्री, पुरवठा वगैरे सर्व गरजा भागविल्या पाहिजेत. रिझर्व्ह बँकेच्या शेती कर्जपुरवठा खात्यानें, आपल्या पूर्वीच्या अहवालात ग्रामीण कर्जप्रश्नाचे एक उत्तर म्हणून विविध कार्यकारी सोसायट्या स्थापणें मार्ग सुचविला होता. त्या कल्पनेनें प्रत्येकाच्या कल्पनाशक्तीची पकड घेतली आणि सोसायटयांचे उपनियम कर्जाशिवाय, इतर विविध चळवळींचा अंतर्भाव करिता यावा अशा प्रकारे दुरुस्त करण्यात आले. त्याचे उद्देश स्पष्ट केल्यानंतर, मर्यादित जबाबदारीचा आग्रह धरणे क्रमप्राप्त झालें. अमर्यादित जबाबदारीमुळें सभासदांना परस्परांचा निकट परिचय असणें अवश्य होते. त्यामुळें प्राथमिक सोसायटींचा आकार सुरवातीस लहान ठेवण्याची कल्पना होती. मर्यादित जबाबदारीच्या सोसायटया स्थापन झाल्यानंतर, निकट संपर्काची गरज कमी झाली व जात जामिनकीची जागा भरीव तारणानें घेतल्यानंतर, जवळपासच्या चार पाच खेडयाइतक्या विस्तृत कार्यक्षेत्राच्या सोसायटयाही स्थापन करता येऊ लागल्या. तथापि रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनेंच खेडयाच्या गटाला व्यापणाऱ्या आणि कर्जपुरवठयाच्या प्राथमिक कार्यापलीकडे एजन्सी पद्धतीनें अनेक कामें पत्करणाऱ्या मोठया आकाराच्या सोसायटयांची आग्रहपूर्वक शिफारस केली. दुसऱ्या योजनेंत, भावी संघटनेचा पाया म्हणून या सूचनेचा स्वीकार करण्यात आला आणि अशा दहा हजार सोसायटया स्थापाव्यात आणि त्यात सरकारने भागीदारी पत्करावी असें ठरलें. तथापि, मागाहून सोसायटीच्या आकाराविषयी देशभर मोठा वादविवाद झाला. अखेर वैकुंठ मेहता कमेटीने, अधिकारातील क्षेत्र आणि वस्ती याविषयी निश्चित मर्यादा असलेल्या सोसायटयांची सूचना करुन हा प्रश्न निकालात काढला. समितीनें सुचविलेला नमुना, सभासदाचे समान हितसंबंध असावेत आणि त्यांना परस्पराचें ज्ञान असावें हा सहकारी कार्यकर्त्यांचा दृष्टिकोन आणि प्रत्येक सोसायटी, स्वावलंबी आर्थिक घटक असली पाहिजे हा शुद्ध धंदेवाईक दृष्टिकोण यांचा मेळ बसविणारा आहे. आता अस्तित्वांत आलेल्या नमुन्यानें, गेल्या पन्नास अगर त्यापेक्षा अधिक वर्षांच्या अनुभवाची दखल घेतली आहे आणि भावी काळाचे आव्हान या सोसायटया स्वीकारूं शकतील अशी यावरुन आशा वाटते.

सहकारी पतपुरवठा, ज्यांना भरीव जामिनकी देणे शक्य होते त्यांच्याकडे खेंचला जात होता आणि ज्यांना जामिनकी देणें शक्य नव्हते ते खेडयातील सावकार व व्यापारी-सावकार यांच्या हवाली केले जात होते, हें वर सांगितलेंच. तसेंच केवळ जमिनीची किंमत ध्यानीं घेऊन, त्या किंमतीचा अशमात्र इतकेंच कर्ज देण्याची प्रवृत्ति वाढत होती. त्यामुळें उत्पादनाची गरज भागविण्यास पुरेल इतके कर्ज मिळत नव्हते आणि बाकी रकमेसाठी शेतकऱ्याला सावकार अगर व्यापारी यांच्याकडे जावें लागे. हा दुहेरी व्यवहार, व्यापाऱ्यापेक्षा सोसायटीला घातुक ठरे कारण, काही तरी करून व्यापारी आपली वसुली आधी करुन घेत. ही परिस्थिति समाधानकारक नव्हती. म्हणून मुंबई सरकारनें जे जमीनमालक भाडेकरी म्हणून शेती करीत, त्यांना अपेक्षित पिकाच्या अंदाजावर, शेतीच्या खर्चांतील अंतर ध्यानांत घेऊन कर्जे देण्यास सुरवात केली व देशाला एक नवी दिशा दाखविली. या पद्धतीचें सार असें होतें की, पिकाच्या उत्पादनासाठी कर्ज दिलें जाई आणि पिकाच्या विक्रीच्या उत्पन्नांतून तें फेडावयाचे असे. ही "पीककर्ज" पद्धति म्हणून ओळखली जाणारी पद्धति, सर्व देशभर स्वीकारली जावी असे अ. भा. रूरल क्रेडिट सर्व्हे कमिटीनें सुचविलें. आणि आता शक्य तितक्या लौकर तें उद्दिष्ट गाठलें जावयाचे आहे. "पीक कर्ज" पद्धतीचें यश विक्री आणि प्रक्रिया यांची कर्जपुरवठयाशी सांगड घालण्यावर अवलंबून आहे. महाराष्ट्रात चालू असलेल्या पुष्कळशा साखर कारखान्यावरुन हें चांगल्या प्रकारे सिद्ध होतें. शेतीकर्जाची रक्कम तसेंच कर्जदारांची संख्या वाढविण्यासाठी, सहकारी साखर कारखान्यांच्या धर्तीवर शेती मालाच्या प्रक्रिया करण्याचें काम वाढत्या प्रमाणात हाती घेतलें पाहिजे. सहकारी संस्थामार्फत दिले जाणारे कर्ज, जमीन विचारात घेण्याऐवजी, अपेक्षित पीक विचारात घेऊन द्यावयाचे असेल, तर विक्रीच्या पैशातून कर्ज फेडीची हमी घेऊ शकणाऱ्या संस्थामार्फतच तयार पीक विकलें जाईल अगर त्यावर प्रक्रिया केली जाईल याची खात्री हवी. या बाबतीत आता पर्यंतचें कार्य उत्साहवर्धक नाही. तथापि, या देशांतील सहकारी कर्जपुरवठयाचे भवितव्य सहकारी विक्री व प्रक्रिया यांच्याशीं निगडीत आहे हें सर्व संबंधितांनी ओळखणें जरूर आहे. या बाबतच्या उणीवा, शक्यतो लौकर काढून टाकण्यासाठी, अधिक निकराचा प्रयत्न केला जाईल अशी आशा आहे.

प्रारंभीं जेव्हा सहकारी संस्थांनी, वैयक्तिक जामिनकीवर व मागाहून जमिनीच्या भरीव जामिनकीवर, कर्जे दिलीं तेव्हा कर्जांच्या तिरनिराळ्या






# सहकारी चळवळ, अनुसूचित प्रदेश व टोळ्या : समीक्षा

श्री. वैकुंठभाई मेहता



नुसूचित प्रदेश आणि टोळ्या याच्यासंबंधी नेमलेल्या ( ढेबर ) मंडळानें, आपल्या अहवालात, अनुसूचित टोळ्यांच्या समस्या संबंधी जे प्रकरण प्रारंभी घातले आहे, त्याच्या शेवटच्या भागात काही निष्कर्ष काढले आहेत. ह्या निष्कर्षांबाबत विवेचन करिताना त्यांना अनुलक्षून पंतप्रधानांचे एक वचन उद्धृत केले आहे. ते ( पंतप्रधान नेहरू ) म्हणतात, " **ह्या टोळ्यातील लोकांना त्यांच्या स्वतःच्या परंपरेनुसार आणि स्वतःच्या बुद्धीचा उपयोग, करून स्वतःचा उत्कर्ष करून घेण्यास, आपण सहाय्य केले पाहिजे.** " तेव्हा अशा जमातीची उन्नती घडवून आणण्यासाठी योजना आखण्यापूर्वी, आपल्याला या टोळ्यातील लोकांच्या परंपरा, त्यांच्या भोवतालची भौगोलिक परिस्थिती आणि त्यांचे कौशल्य ही नीट समजावून घेतली पाहिजेत. वर उल्लेख केलेल्या प्रकरणात इतरत्र असे म्हटले आहे की, ह्या टोळ्या विकासाच्या विविध अवस्थेत असलेल्या आढळतात तेव्हा त्या टोळ्यांच्या भिन्न परंपरा, वातावरण आणि प्रवृत्ति यांचा विचार केल्याशिवाय, त्यांच्या विकासासंबंधीच्या योजना आखणे अत्यंत कठीण आहे.

**नियोजन मंडळानें तिसऱ्या पंचवार्षिक योजनेसंबंधीच्या अहवालांत असें म्हटले आहे कीं, टोळ्यातील लोकांचा सहकारी पद्धतीनें विकास करण्यास अनुकूल असे अनेक घटक अस्तित्वांत आहेत** नियोजन मंडळाच्या या सूचनेचा विचारसुद्धा, पंतप्रधानांचे जे वचन वर दिले आहे, त्याच्या अनुषंगानेंच केला पाहिजे निरनिराळ्या टोळ्यातील लोकांच्या विकासाच्या योजना, त्यांच्या त्यांच्या प्रवृत्तींशी सुसंगत अशाच आखल्या पाहिजेत काही टोळ्या अशा आहेत की, ज्यांतील कुटुंबे एकमेकांपासून दूर अशा एकाकी घरात रहातात तर दुसऱ्या काही अशा आहेत की ज्यांच्या झोपड्या खेड्यातील लोकांप्रमाणेंच एकमेकांपासून अगदी जवळ असतात जमिनीच्या सार्वजनिक मालकीबद्दल, साधारणतः अज्ञान आढळत नाही परंतु काही परंपरा मात्र त्यांच्यात अशा आढळतात की, आपल्यापेक्षाही त्यांच्यात व्यक्तिमत्वाला अधिक मान असलेला आढळतो काहीही असलें तर एवढे मात्र खरें की, सर्वसाधारणपणें **टोळ्यातील गटात एकात्मतेची जाणीव अधिक असते. आणि टोळ्यातील लोकांची जमात ही प्रत्यक्षांत अनेक ठिकाणी अस्तित्वांत आहे याच कारणामुळे सहकारी पद्धतीच्या संघटना, या टोळ्यातील**



लोकांच्या अर्थव्यवस्थेत, क्रांतिकारक बदल घडवून आणण्यास, अत्यंत सोयीस्कर ठरतील.

नियोजित अर्थव्यवस्थेच्या प्रणालीचा स्वीकार केल्यानंतरच " सहकार " हे आपल्या सामाजिक धोरणाचे एक अंग बनले आहे हें जरी सत्य असले तरी, त्यापूर्वीहि आपल्या देशात सहकारी चळवळीच्या सुरुवातीला घडलेल्या कांही उल्लेखनीय घटना येथें नमूद करणें योग्य ठरेल. बिहारमधील छोटा नागपूर येथें जवळ जवळ चार दशकांच्या पूर्वी, रांची येथील परदेशी मिशनऱ्यांनी, भारतीय सहकारी चळवळीच्या इतिहासात, मला वाटतें कदाचित् पहिल्यादाच, संथाळ व इतर टोळ्या याना कर्ज पुरविण्यासाठी एक फार मोठी सहकारी संघटना उभारण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी फार उपयुक्त ठरलेल्या ह्या मोठ्या संघटनेचा आज मागमूसही लागत नाही तेव्हां त्या संस्थेचा उगम आणि ऱ्हास याबाबत विचार करण्याचें कांहीच कारण नाही बिहार तसेंच ओरिसा, मध्यप्रदेशातील कांही भाग, वऱ्हाड आणि मुंबई राज्यात, आदिवासी भागात, सहकारी चळवळीच्या अगदी प्राथमिक अवस्थेतसुद्धा सहकारी धान्य बँका काढण्यात आल्या आहेत.

ह्याच सुमारास ( त्यावेळी मुंबई राज्याचा एक भाग असलेल्या ) गुजराथमधील पचमहाल जिल्ह्यात, दोहद आणि झालोद तालुक्यातील भिल्लासाठी, सहकारी पतपेढ्या काढण्यांत आल्या होत्या. यासाठी या जातींना सहकारी पद्धतीनें संघटीत करण्याचा पहिला पद्धतशीर प्रयत्न करण्याचे श्रेय प्रामुख्यानें श्री. ठक्करबाप्पा ( श्री. अमृतलाल व्ही. ठक्कर ) यानाच द्यावें लागेल. त्यानीं ह्या वेळी दोहद येथें भिल्ल सेवा मंडळ स्थापन केले होते केवळ त्यांनीच पुढाकार घेतला म्हणून राज्य सहकारी बँकेनें ( त्यावेळी बॉम्बे स्टेट प्रॉव्हिन्शियल को-ऑपरेटिव्ह बँक ) तेथें आपली शाखा उघडण्याचे मुंबई सरकारच्या संमतीनें ठरविलें. त्या बँकेनें, जो विकास कार्यक्रम आखला त्यामध्यें केवळ शेतकऱ्याना कर्ज पुरविण्याच्या नित्याच्या कार्याचाच समावेश नव्हता तर शेतीमालाचा साठा करणें आणि विक्री करणें, बियाणाचा, धान्याचा व आवश्यक अशा घरगुती सामानाचा पुरवठा, सभासदाना उधारीवर करणें; इत्यादी गोष्टींचाही समावेश त्यात होता त्यानुसार खेड्यातून किंवा झोपड्याच्या छोट्या छोट्या गटातून, प्राथमिक संस्था अस्तित्वात आणण्यात आल्या आणि त्या बँकेच्या शाखेला जोडण्यात आल्या तसेंच मध्यवर्ती खेड्यातून, शेतीमाल विशेषत अन्नधान्ये, याच्या विक्रीसाठी आणि योग्यवेळीं बी-बियाणाचा व धान्याचा पुरवठा उधारीवर करण्यासाठी, दुकाने उघडण्यात आली पगारी नोकराकडून हिशेब ठेवण्याची पद्धत असा मध्यवर्ति संघ अस्तित्वात आणण्यात आली आणि सुरवातीच्या काळात तर तिच्यावर सहकारी खात्याकडूनच देखरेख करण्यात आली आणि या पहिल्याच प्रयत्नाला जरी सहजासहजीं फळ आले नसले तरी ही बाब विशेष उल्लेखनीय आहे की, या ज्या प्राथमिक संस्था ४० वर्षांपूर्वी अस्तित्वात आल्या, त्यांपैकी फारच थोड्या गुंडाळाव्या लागल्या. ह्या संस्थानीं त्यावेळी घातलेल्या भक्कम पायावरच, आज स्थिर अशी त्याच्या कार्याची इमारत उभी राहिली आहे त्या भागात चांगल्यापैकी विकसित झालेला सहकारी खरेदी-विक्री संघ आज असून त्या संघान पूर्वी मध्यवर्ती बँकेनें सुरू केलेल्या दुकानाची सूत्रें स्वत:कडे घेऊन हें कार्यक्षेत्र व्यापिलें आहे.

राज्य सहकारी बँक आपल्या शाखेद्वारे जें काम करीत होती तें काम मध्यवर्ती जिल्हा सहकारी बँकेनें आपल्याकडे घेतले आहे. गुजराथ मध्यें किंवा जुन्या मुंबई राज्यातच नव्हे तर अखिल भारतात, पचमहाल जिल्हा हा एकमेवच असा प्रदेश असेल की जेथें सहकारी चळवळीचा प्रसार इतक्या त्वरेनें होऊन तिने हितप्रद, विकसित स्वरूप धारण केलें. भिल्ल वस्ती असूनही सहकारी चळवळ प्रभावी ठरली हें तर उल्लेखनीय असें वैशिष्ट्य होय !

ढेबर कमिशनच्या अहवालानुसार, टोळ्यांच्या वस्तीपैकी नव्वद टक्के लोक शेतीव्यवसाय करतात. तेव्हां सहकारी संस्थाना, मुख्यत: शेतकरी वर्गाला संघटीत करून, सहाय्य करावयाचें हेंच काम करावें लागणार आहे. या शेतकऱ्याना कर्जपुरवठा करणें हें जरी कार्याचे प्रमुख अंग असले तरी ह्या टोळ्यातील लोकाना जें जुने देणें झालें आहे, तो प्रश्न सोडविण्याच्या आवश्यकतेवरच नियोजन मंडळ व ढेबर कमिशन यांनी विशेषत्वानें भर दिला आहे. अनेक राज्यातून कायद्यानें व शासनानें काढलेल्या निरनिराळ्या आज्ञान्वयें, जुन्या कर्जात सूट देण्याची, वा ठराविक रक्कम कमी करून ती कर्जें निकालांत काढण्याची व्यवस्था करण्यात येत असून " सावकारी " वर नियंत्रणहि घालण्यात येत आहे. ढेबर कमिशननें केलेल्या पाहणीवरून असें आढळून आलें आहे की, उपरनिर्दिष्ट उपाययोजना, देशाच्या फारशा भागात परिणामकारी ठरल्या नाहीत. ढेबर कमिशननें याबाबत केलेल्या तपशीलवार सूचना, शक्य तितक्या लवकर विचारात घेणें अत्यंत आवश्यक आहे. कारण मंडळानें असे निवेदन केले आहे की टोळीवाल्याच्या आर्थिक स्थैर्याला व विकासाला ही जुनी कर्जें ( Past debts ) हा एक भयावह गंभीर धोका आहे. ह्याचबरोबर ढेबर कमिशननें असेंहि सुचविले आहे की, शेतकऱ्याला अन्य मार्गानें कर्ज पुरविण्याची कार्यक्षम सोय उपलब्ध करून देण्यावरच त्याला मागील कर्जाच्या फेऱ्यातून सोडविण्यासाठी अथवा सावकारापासून संरक्षण देण्यासाठी सरकारनें केलेल्या उपाय योजनांचे यशापयश अवलंबून आहे.

भारतातील सहकारी चळवळीबाबत जी आकडेवारी उपलब्ध आहे ती अपूर्ण वाटते. कारण वन्य जातीच्या किंवा टोळ्याच्या वस्तीतील सहकारी शेतकी पतपेढ्या, त्याची सभासदसंख्या आणि साधनसंपत्ती याबाबत स्वतंत्र आकडेवारी उपलब्ध नाहीं, परंतु नियोजन मंडळानें दिलेल्या माहितीच्या आधारे ढेबर कमिशनने पुढील आकडेवारी आपल्या अहवालात दिली आहे · आंध्रप्रदेश ८, आसाम ३८०, बिहार २१, केरळ ३४, मध्यप्रदेश ७६, महाराष्ट्र ( गुजराथ धरून ) २७२, राजस्थान ३९, पश्चिम बंगाल ८, हिमाचल प्रदेश ४२, त्रिपुरा ३५. या सहकारी संस्थाच्या स्वरूपात राज्यनिहाय फरक असेल. एखाद्या राज्यात व्यापक प्रमाणात कार्य चालू असेल तर दुसऱ्या राज्यात बाहेरचे पगारी संचालक नेमले असतील, ह्या संस्थाचे हे कांहीं फरक सोडले तर

त्यांचें सर्वसाधारण स्वरूप प्राथमिक शेती संस्थाप्रमाणेंच आहे. परंतु व्यवहारात मात्र देशांतील बहुतेक भागातील या संस्थाचे कार्य विविधोद्देशी किंवा सेवा सहकारी संस्थाच्या कार्यप्रणालीस अनुसरून त्याप्रमाणें अथवा शक्य तेवढ्या कर्जाचा पुरवठा, त्याची विक्रीशी सांगड घालून करण्याची जी पद्धत अंगिकारण्यात येते तदनुसार होत असेल कीं काय, या विषयी मात्र शंकाच आहे.

या बाबतीत दोहद भागातील अनुभव लक्षात घेण्यासारखा आहे. या अनुसूचित टोळ्याच्या बाबतीत, कर्जपुरवठा आणि विक्री यांची सांगड घालणें, इतर भागापेक्षाही विशेष आवश्यक आहे आणि आजच नव्हे तर फार पूर्वीपासून अशी आपत्तीपासून संरक्षण म्हणून योग्य ते निर्बंध पाळण्याची परंपरा चालत आलेली आहे. आतां आणि यापुढें तरी या लोकाच्या अज्ञानाचा आणि असहाय्यतेचा फायदा घेऊन नफा कमविणाऱ्या लोकाच्या हातात, या सहकारी संस्था ठेवता कामा नयेत ह्या विभागात कार्य करणाऱ्या संस्था, ह्या; त्या जमातीतील व्यक्तींनी बनविलेल्या रीतसर प्राथमिक संस्था असाव्यात किंवा दोहदप्रमाणे मध्यवर्ती संघटनेच्या स्थानिक शाखा असाव्यात. त्या शाखाचे काम अशा संघटनांना जबाबदार असतील अशाच प्रतिनिधींच्या मार्फत चालावें या सिवाय राज्यामध्यें जेव्हा विकासाचे कार्यक्रम आखले जातील तेव्हा हे लोक कर्ज देण्यास पात्र आहेत की नाही, कर्ज परत मिळेल याची हमी आहे काय, ग्राहकांच्या गरजा भागण्याइतके कर्ज मिळण्याची तरतूद आहे कीं नाही? आवश्यक ती सामाजिक कर्तव्यें पार पाडण्याची त्यांची कुवत, या सर्व गोष्टी ध्यानात घेण्यात याव्यात, असें ढेवर कमिशननें प्रतिपादिलें आहे. कमिशननें असें म्हटलें आहे की, या टोळीतील लोक, जीवनातील सर्व व्यवहाराकडे सकलित दृष्टिकोनातूनच पहातात. ते त्याचे लौकिक, धार्मिक, उत्पादनाला उपयुक्त, उत्पादनाच्या दृष्टीने कुचकामी असे वेगवेगळे कप्पे पाडीत नाहीत; आणि सर्वच व्यवहार सारखेच आवश्यक आहेत असे मानतात

पूर्वीच उल्लेखिलेल्या प्रमाणें सहकारी चळवळीच्या अगदी सुरुवातीच्या अवस्थेंत, काही राज्यातील आदिवासी विभागात धान्य गोळा, धान्याच्या गगाजळी अथवा धान्याच्या बँका स्थापन झाल्या होत्या आणि त्या सहकारी कायद्याखाली नोंदण्यात आल्या होत्या. याशिवाय महसूल खात्यानें चालविलेल्या किंवा अस्तित्वात आणलेल्या धान्य बँका वेगळ्या होत्या. या संस्थाचा मुख्य उद्देश, त्यांना लागणारे भांडवल पैशाशिवाय अन्य स्वरूपात उभे करून, धान्य साठवावयाचे व हें साठवलेलें धान्य पेरणीच्या वेळीं किंवा प्रत्यक्ष उदरनिर्वाहासाठी उधारीवर पुरवावयाचे आणि अशा प्रकारे आदिवासी लोकांना, पावसाळ्यामध्यें वर्षानुवर्षे भासणारी गरज भागवावयाची हाच होता. उपरनिर्दिष्ट काम करितांना सर्वमान्य नियमाचे पालन करणें आणि हिशोब नीट ठेवणें फारच कठीण जाते. हे खरे असले तरी सुद्धां, अशा तऱ्हेच्या धान्य बँका संघटित करण्याची मागणी, देशातील टोळीजनाकडून फार मोठ्या प्रमाणावर करण्यात आली आहे असें ढेवर कमिशननें आपल्या अहवालात नमूद केलें आहे.

गेल्या काही वर्षांत, बऱ्याच धान्य बँका स्थापन झाल्या आहेत असें आढळून येते. १९५९–६० ची आकडेवारी दर्शविते की, अशा संस्थांची एकूण संख्या ९७४० होती. ह्या धान्यबँकाच्या सभासदांची संख्या ११,५१,३२५ व त्याचे एकूण भांडवल ४ कोटी २४ लक्ष रुपये होते ढेवर कमिशननें आपल्या अहवालात जे आकडे दिले आहेत तदनुसार ही संख्या मात्र बरीच कमी असल्याचे आढळून येते बिहारमध्यें ६४४, ओरीसात ७१०, राजस्थान १२, बगाल १३६, असे हे आकडे कमिशनच्या अहवालात आढळतात. याखेरीज पूर्वीच्या मुंबई राज्यातसुद्धा नोंदण्यात आलेल्या अशा बऱ्याच धान्य बँका होत्या. रिझर्व बँक ऑफ इंडियाच्या शेतीकर्जविषयक खात्याच्या सल्ल्यानुसार, ओरिसामध्यें काही धान्य बँकाचे रुपांतर अनेक विविध कार्य करणाऱ्या संस्थात करण्यात आलेले आहे. तेथे या संस्था शेतकऱ्यांना निरनिराळ्या सोयी उपलब्ध करून देतात व रोकड कर्जे सुद्धा देतात; व ती वसूल करतान टोळी जनामध्यें नाण्याचा वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागल्यामुळे ढेवर कमिशननें उल्लेखिलेल्या या धान्य बँकाची मागणी जरी फार काळ चालू राहिली नाही तरी पुढें त्याचें रुपान्तर कार्यक्षम अशा पतपेढ्यात करणें फारसें कठीण होणार नाही, याबाबत दक्षता बाळगली पाहिजे. त्या दृष्टीनें त्यांना योग्य तें उत्तेजन दिल्यास उपयुक्त ठरेल. हे करणें शक्य व्हावें म्हणून ढेवर कमिशननें धान्याचे साठे उभारताना, तें भांडवल म्हणून उभारावें, आणि सरकारनेंही त्यामध्यें भागीदार व्हावे असे सुचविले आहे. यामुळें या धान्य बँका आपल्या सभासदाच्या, रीतसर मागण्या संपूर्ण रित्या पुरवू शकतील तसेंच धान्याचे साठे वारंवार तपासण्यासाठी आणि त्याच्या व्यवहारावर व हिशोबावर नियंत्रण ठेवण्यासाठी कडक तपासणीची व्यवस्था होणें आवश्यक आहे; यावर कमिशननें विशेष भर दिला आहे.

या वन्य विभागातील लोकांपैकी फार मोठी संख्या, शेतकी व्यवसाय करते हे जसें खरे आहे, त्यावरोबरच त्यातील अनेक लोक जंगलात काम करतात हीही वस्तुस्थिति आहे. जंगलातून मार्ग काढणें, झाडें पाडणें, कोळसा तयार करणें, जंगलातील उत्पादन गोळा करणें, लांकूड तोडणें अशा विविध प्रकारच्या व्यवसायात हे लोक गुतलेले असतात. सरकार किंवा खाजगी ठेकेदार त्यांचा जंगल-कामगार म्हणून उपयोग करतात. स्वराज्यापूर्वी, या लोकांना फारच कमी वेतन मिळत असे. तदनतर मुंबई व इतर काही राज्यात, सरकारनें हुकूम काढून त्यांना किमान वेतन मिळण्याची सोय केली, व ह्या टोळीजनाची शोचनीय स्थिती सुधरविण्याचा प्रयत्न केला, असे असले तरी जंगलांतील झाडें पाडण्याचे ठेका घेणारे लोक, या लोकांना रोजगारीची जरुर आहे, हे हेरून, त्यांच्या असहायतेचा फायदा घेऊन या लोकांना चांगले पिळून काढतात या जाचातून आदिवासी मजुरांची सुटका करावी म्हणून कै. बाळासाहेब खेर यांच्या नेतृत्वाखाली, मुंबई सरकारनें जंगलातील झाडें तोडण्याचा ठेका खाजगी मालकास न देता जंगल कामगाराच्या सहकारी संस्था बनवून त्यांना देण्याच्या कार्यी प्रोत्साहन देण्याची प्रथा पाडली; व मधल्या दलालाचे उच्चाटन करण्याचा

घर बांधले. पहिली पंचवार्षिक योजना सुरू होण्याच्या अगोदर, या सर्वांचा कार्यक्रम आखण्यात आला होता मुंबई राज्याची पहिली पंचवार्षिक योजना जेव्हा आखण्यात आली त्यावेळी अशा सहकारी संस्थाना मान्यता देण्याची व सहाय्य देण्याची तरतूद मुद्दाम केली होती. आता अशा तऱ्हेच्या जंगल कामगार सहकारी ( Forest labour societies ) संस्था प्रस्थापित करणें हे " सहकारी संघटनें" संबंधीच्या राष्ट्रीय योजनेचे एक अंग बनले आहे

जंगल कामगारांच्या संस्था बनवून, त्याना जंगलातील झाडें तोडण्याचा ठेका द्यावयाचा असें सरकारचें जंगलविषयक धोरण असले तरीसुद्धा, टोळ्यांची भरपूर वस्ती असलेल्या अनेक राज्यात, अजूनही जंगल कामगारांच्या सहकारी संस्था बनविण्याच्या बाबतीत फारशी प्रगति झाली नसल्याचे दिसून येते, ही खेदाची गोष्ट होय पश्चिम महाराष्ट्र व गुजरात येथील अशा संस्थांची संख्या २०५ आहे विदर्भात २१ आहे. तर आंध्र प्रदेशात ५५, राजस्थानमध्ये २९, आसाममध्यें ४, त्रिपुरात ३, तर बिहार ओरिसामध्यें एकही नाही अशी ही आकडेवारी आहे. मुंबई राज्यात अशी इष्ट प्रथा पाडण्यात आली की, या संस्थांचे संघटन व संचालन हें आदिवासी प्रदेशात समाजकल्याणाच्या कार्याला वाहिलेल्या समाजसेवकानी वा त्यांच्या संस्थानी आपल्या हाती घ्यावें जंगल खात्यातील कनिष्ठ अधिकारी किंवा सुद्द टोळीजनातील गुंड लोक यांच्याकडून सहकारी संघटनाच्या सभासदांची पिळवणूक होऊं नये. आणि परस्पर सहाय्य व स्वावलंबन या पायावर त्यांची निकोप वाढ व्हावी या दृष्टीनें नियोजन मंडळानें असें सुचविले आहे की, समाज कल्याण संस्थानी अशा संस्था संघटित कराव्या व त्या चालविण्याची कामगिरी आपल्याकडे घ्यावी

मुंबई राज्यांत अशा तऱ्हेच्या ज्या सहकारी संस्था स्थापन झाल्या त्याचा अनुभव असा आहे की, या संस्थांच्यामुळें सभासदांना, त्यांनी केलेल्या कामाचा मोबदला पूर्वीपेक्षा अधिक मिळतो परंतु त्यांना सतत वर्षभर काम मिळविणें व पुरविणें या संस्थांना शक्य होत नाही सतत काम मिळणें हे आर्थिक स्थैर्य आणि सामाजिक दर्जा या दृष्टीनें अत्यावश्यक आहे. म्हणून आतां काही सुस्थापित अशा जंगल कामगार संस्थानी इतर कामासाठी उदा० सार्वजनिक बांधकामें इ० साठी कामगार पुरविण्यास ठेके घेण्याची सुरुवात केली आहे त्याचप्रमाणे ग्रामोद्योग सुरू करून या कामगारांना सतत काम पुरविण्याची सोय केली तर ते सुद्धां उपयुक्त ठरेल. नियोजन मंडळाला असें आढळून आले आहे की, अशा प्रकारचे ग्रामोद्योग सुरू करण्याच्या दृष्टीनें फारशी प्रगति या संस्थानी अद्याप केलेली नाही. विशेषत जंगलातच उपलब्ध असलेल्या कच्च्या मालाचा उपयोग करून त्यापासून विविध वस्तू बनविण्याचे कुटीरोद्योग, अशा सहकारी संस्थानी वा वसवी कामगाराच्या सहकारी संघटनानी, सुरू केलेले दिसत नाहीत ढेबर कमिशन म्हणते की अशा वन्य जातींच्या प्रदेशात तीन प्रकारचे ग्रामोद्योग सुरू करता येतील. (१) ग्राहक उपयोगी असा माल तयार करणारे उद्योगधंदे (२) कातडी कमाविणें इ० सारखे संस्कार करणारे उद्योगधंदे (३) कसबी कामगारांच्या वा कारागीरांच्या हातून निरनिराळ्या उपयुक्त वा कलात्मक वस्तू बनविण्याचे व्यवसाय, या क्षेत्रात संघटित प्रयत्न करण्यासाठी एक महत्त्वाची सूचना ढेबर मंडळानें केली आहे ती सूचना अशी की, "जेथें कच्चा माल उपलब्ध असून त्यासाठी स्थानिक किंवा बाहेरची बाजारपेठ उपलब्ध असते, अशा ठिकाणी तो कच्चा माल मुळी बाहेरच जाऊं द्यावयाचा नाही, हे तत्त्व अंगीकारण्यात यावें व त्यावर संस्कार करून तो तयार माल म्हणूनच, विक्रीस बाहेर पाठवावा असें धोरण निर्धारानें अवलंबिण्यात यावें अर्थात् त्यासाठी पडणारी किंमत, तांत्रिक अडचण किंवा वाहतुकीचा खर्च, यामुळे जर पक्का माल बनविणें परवडणारे नसेल अशा अपवादात्मक परिस्थितीतच तो कच्चा माल म्हणून बाहेर पाठविला जावा " ह्या बाबतीतील योग्य ते सहाय्य अखिल भारतीय हातमाग मंडळ किंवा खादी ग्रामोद्योग मंडळ यानी या संस्थाना द्यावे. परंतु त्याशिवाय प्रत्येक राज्य सरकारनेंही आपल्या टोळीजन कल्याणखात्यामध्यें एक स्वतंत्र विभाग उघडावा; असें ढेबर कमिशनने सुचविले आहे या विभागात अशा संस्थांच्या कार्यकर्त्यांना शिक्षण देण्याची, तांत्रिक सहाय्य देण्याची, व भांडवल पुरविण्याची व्यवस्था करण्याचे कार्य दक्षतेनें केलें पाहिजे

या टोळ्यांच्या वस्तीत शेतीचा व्यवसाय ज्या पद्धतीनें आज करण्यात येतो त्यात सुधारणा करण्यासाठी सहकारी पद्धत ही फारच सोयीस्कर अशी पद्धत आहे उदा० लागवडीच्या पद्धतीत सुधारणा करावयाची झाली तर त्यासाठी व्यक्तिमात्राला भेटून प्रयत्न करण्यापेक्षा संयुक्त प्रयत्न केला, सामुदायिक रीत्या सर्वांना एकत्रित आणून सुधारणा करावयाला लावली तर तो प्रयत्न अधिक प्रभावी ठरण्याची शक्यता आहे. हा बदल सावकारा आणि शेतकऱ्यांच्या संमतीनें व स्वखुशीनेंच झाला पाहिजे. जर सहकारी शेती, संयुक्त शेती किंवा एखादा ठेका घेण्यासाठी या लोकांचे गट सहकारी, संस्थाचे स्वरूपात संघटित केले तर त्यांच्यात इष्ट तेच सामाजिक बदल स्वयंस्फूर्तीनें घडून येतील कोणतें पीक काढावें हे ठरविणें आणि पीक काढण्याच्या नवीन पद्धतीचा अवलंब करणें त्या योगें सोपे जाईल या दृष्टीनें पहाता हा दृष्टिकोन लक्षात ठेवून या टोळीजनासाठीं, जेव्हा मोठ्या प्रमाणावर जमीन दिली जाते तेव्हा त्यांची एखादी वस्ती एकत्र वसवून, त्यांना सहकारी पद्धतीनें संघटित करणें, हे केव्हाही इष्ट ठरेल या शेतकऱ्यांच्या वसाहती कशा उभाराव्यात यासंबंधी ढेबर कमिशननें अनेक मौलिक सूचना केल्या आहेत. ह्या सूचनांच्या प्रत्यक्ष अमलबजावणीच्या वेळी संघटनेच्या सहकारी तत्त्वाचा स्वीकार करून, त्याचा अंतर्भाव ह्या शिफारसी कार्यान्वित करताना करणे, हितावह होईल कारण, अनुभवाअंती असे आढळून आले आहे की, संघटनेच्या तत्त्वाचा व सहकारी पद्धतीचा अवलंब केल्याशिवाय टोळीजनांना दिलेल्या जमिनीचा उपयोग कायम स्वरूपात त्यांना फारसा होत नाही, ज्यावेळी एखादी शेतजमीन किंवा डोंगराच्या बाजूकडील जमीन, ही धरणाच्या पाण्याखाली बुडून जाण्याचा संभव असतो तेव्हा त्या जमिनीच्या मालकांना दुसरीकडे जमिनी देऊन, त्यांची सोय लावण्याचा प्रयत्न केला जातो त्यावेळी

देशील या टोळीजनांना सहकारी पद्धतीनें संघटित करून तदनंतर शेत-जमीनी त्यांच्या स्वाधीन केल्या तर तें अत्यंत हितावह ठरेल

सर्वसाधारणपणें, अनुसूचित टोळ्यातील लोकांच्या ज्या सहकारी संस्था संघटित केल्या जातील त्याची उद्दिष्टें जितकी सर्वंकष ठेवता येतील तितकी ती ठेवावी. बियाणें पुरविण्यासाठी त्याचा साठा, शिवाय आपल्या सभासदाना रोज लागणाऱ्या मालाचा साठाहि या संस्था तर करतीलच. या दोन गोष्टींचा या सहकारी संस्थाच्या उपक्रमात निश्चित पणें अंतर्भाव करणें अत्यंत आवश्यक आहे. एखाद्या ठिकाणी दुसऱ्या एका समाजकल्याणकारी संस्थेनें अशी व्यवस्था अगोदरच केलेली असेल तर गोष्ट वेगळी ; पण असे असले तरी सुद्धा वरील संस्थाबाबतची उद्दिष्टें निश्चित करावीत आणि त्यामध्यें ग्रामपंचायत किंवा जमातींची पंचायत अथवा शेती विषयक या औद्योगिक उत्पादकाची एखादी स्वतंत्र संस्था ज्या गोष्टी योग्य प्रकारे करू शकेल, त्याचा अंतर्भाव या संस्थेच्या उद्दिष्टात नसावा. अशा तऱ्हेनें कार्य निश्चित करणें हे सूत्रबद्ध विकासाला मारक ठरेल असें मानण्याचे मुळीच कारण नाही. उलट ह्यामुळें सामुदायिक जबाबदारी व परस्पर सहकार्याची भावना वाढण्यास मदतच होईल. अद्यापहि टोळी जनात जमातीचे नातें जोडण्याची पद्धति अस्तित्वात आहे हें खरे आहे परंतु ती नाती, सामाजिक क्षेत्रातच अधिक परिणामकारक असतात. आर्थिक विकासाच्या बाबतीत संयुक्त प्रयत्न करावेत, हा अर्थानेच अशा जमातीचे नातें मानणाऱ्या, सामाजिक गटाच्या बाबतींतसुद्धा नवाच दृष्टिकोण आहे. आर्थिक उन्नतीसाठी सामुदायिक प्रयत्न करण्याची संवय, अद्याप त्याच्या अंगवळणी पडावयाची आहे.

म्हणून ढेबर कमिशननें सुचविल्याप्रमाणें, आदिवासींच्या सहकारी संस्था संघटीत करीत असतांनाच किंवहुना तत्पूर्वीच या लोकाना प्रायः सहकाराची तत्त्वें आणि त्यांचें पालन ह्या बद्दलचें शिक्षण देणें आवश्यक आहे. ह्या अनुसूचित टोळ्या वेगवेगळ्या राहतात, आणि त्यातील बहुतेक लोक निरक्षर असल्यानें, उपरिनिर्दिष्ट शिक्षण त्याना देणें हें एक प्रकारें महाकठीणच काम होय हें मान्य केलेंच पाहिजे. तरीपण या प्रश्नाची, जी दुसरी बाजू आहे त्या दृष्टिकोनातून पाहिलें तर हें काम थोडें सोपेही आहे. कारण जमातीचें नातें मानण्याची पद्धत ज्या समाजातून नष्ट झाली आहे अशा समाजापेक्षा या टोळीजनात, सामुदायिक समान हक्क व समाईक नफा सगळ्यानी समप्रमाणात वाटून घ्यावा ही कल्पना लवकर पचनी पडून रुजण्यासारखीआहे सहकारी शिक्षणाच्या बाबतीमध्यें आदिवासी किंवा आदिम जाती सेवा मंडळाना महत्त्वाची भूमिका पार पाडतां येईल. कारण सहकाराचें शिक्षण देण्याचें कार्य, हें सामाजिक शिक्षणाइतकेंच महत्त्वाचें आहे. असा दृष्टिकोण स्वीकारून या स्वयंस्फूर्त संघटनानी ह्या कार्याला आपल्या कार्यक्रमात, अग्रस्थान देणें आवश्यक आहे. ★★★



सहकार म्हणजे शांतीमय प्रचंड क्रांती !
सहकारी चळवळ ही लोकशाही मनोवृत्ति तयार करण्याची शाळा !!
सहकार ही ज्ञानप्रेरक शक्ति आहे !!!
संस्थेच्या प्रमुखाची प्राज्ञता, त्याच्या सहकारी संचालकाची सूज्ञता,
वर्गवारी सेवकाची तज्ज्ञता, सभासदांची कृतज्ञता, आणि जनता जनार्दनाची समयज्ञता हें सहकारी संस्थेचें पंचीकरण आहे. !!!!

*  *  *

" शेतकऱ्यांनी आतां फक्त शेती मालाचें उत्पादनातच समाधान न मानता त्या मालावर क्रिया व प्रक्रिया करणें हे कर्तव्य मानले पाहिजे. व हें कार्य सहकारी चळवळीच्या कार्यकर्त्यांनीं नेटानें हाती घेतले पाहिजे ह्या क्षेत्रात भरपूर वाव असून शेतकऱ्याचा त्यातच फायदा आहे. शेतकऱ्याच्या संस्करण संस्था म्हणजे, सहकार, शेती व कारखानदारी याचा त्रिवेणी संगम होय "

मा. भाऊसाहेब हिरे
३० मार्च १९६१ धुळे

*  *  *

" सहकारी संस्था ह्या प्रामुख्यानें लोकानी स्वयंस्फूर्तीनें काढलेल्या लोकहितासाठी चालणाऱ्या व विशुद्ध लोकशाही तत्त्वाचा अवलंब करणाऱ्या अशा संस्था असावयास पाहिजेत. म्हणूनच सहकारी चळवळीच्या यशस्वीततेसाठी, सामुदायिक हिताची दृष्टि असणारे प्रामाणिक लोकहितदक्ष कार्यकर्ते असणे निकडीचें आहे. "

मा भाऊसाहेब हिरे. नाशिक

# talking about banks

**There is more in banking with the STATE BANK OF INDIA** than the mere possession of a bank account—first class service, security and safety and ability to obtain friendly and helpful advice and information when required




**You will always find a friend at**

## THE STATE BANK OF INDIA

*India's Leading Bank*






# स्पर्धे पेक्षां परस्परपूरक संयोग साधावा

सर होमी मोदी



आपण औद्योगिकरणावर, दिवसेंदिवस अधिकाधिक भर देत असलो तरी आपल्या अर्थकारणाचा कणा शेती हाच आहे व भावी कालातही तोच राहील तेव्हा शेतकऱ्याला पुरेशी व वेळच्या वेळी मदत करणे हेंच प्राप्त घडीचे आपले महत्त्वाचे प्रश्न होत. प्रस्तुत क्षेत्रात सहकारी चळवळीला महत्त्वाची कामगिरी बजावावी लागणार आहे. साधारणपणें नियम असा आहे की, मर्यादित भांडवल असलेल्या व्यापारी बँका, केवळ शेतजमिनीच्या तारणावर, लांब मुदतीची कर्जें देण्यास नाखूप असतात. अशा परिस्थितीत ती जबाबदारी शेवटी सहकारी संस्था नि बँका यांच्यावर येऊन पडते. स्वाभाविकच आहे की, अशा संस्थांची व बँकांची धारणाच मूलत अशा प्रकारच्या खास गरजा भागविण्यासाठीच झालेली असते

अलिकडच्या काळात, व्यापारी बँकांनी आपल्या कार्याचा पसारा खेडयापाडयांतून वाढविलेला असला तरी त्यांनी आपलें क्षेत्र सोडून अन्यत्र आक्रमण करणे योग्य नव्हे, नि ते इष्टहि नाही; त्याचप्रमाणे त्यांच्यामध्यें आणि सहकारी संस्थांमध्यें एकमेकांना मारक नि जाचक अशी स्पर्धा होणेंहि श्रेयस्कर नाही. सरळ सरळ शेतीच्या कामासाठी, तसेच जमिनीमध्यें सुधारणा घडवून आणावयाच्या योजनांसाठी कर्ज देणें, ह्या गोष्टींचा अंतर्भाव सहकारी संस्थांच्या कार्यक्षेत्रात निश्चितपणे होतो. तर व्यापारी बँकांनी, शेतात पिकणाऱ्या, कच्च्या मालापासून पक्का माल बनविण्यासाठी अथवा त्या मालाला बाजारपेठ मिळवून देण्याच्या उद्देशानें खेडयाच्या आजूबाजूला छोटे उद्योगधंदे काढण्याकरिता नि कारखाने उभारण्यासाठी, भांडवल पुरविणे हें आपले कार्यक्षेत्र मानावें अशा रीतीने दोन्ही जातीच्या बँकांना, आपापल्या कार्यक्षेत्रात, एकमेकांना पूरक असा संयोग साधून, आपल्या ग्रामीण अर्थकारणाच्या सर्वांगीण विकासाला हातभार लाविता येईल

शहराच्या ठिकाणी "व्यापारी बँका नि राज्य सहकारी बँका, यांच्यामध्यें, दैनंदिन स्वरूपाचा असा अधिक सरळ संपर्क अनेक स्वरूपात आढळतो या ठिकाणी राज्य सहकारी बँका तर परस्पर सहकारी कार्यपद्धतींचा परमोच्च बिंदूच होत ! याशिवाय, राज्य सहकारी जमीन-तारण बँकांचे ( स्टेट् कोऑपरेटिव्ह लँड मार्गेज बँक्स् ) कर्जरोखे हे व्यापारी बँकांना, आपलें भांडवल गुंतविण्यास योग्य असें सरकारमान्य



ारण वाटते. इतकेंच नव्हे तर, रिझर्व्ह बँक सहकारी बँकांना सवल- .च्या दरानें मोठाल्या रकमा कर्ज म्हणून देते. हें कर्ज रिझर्व्ह बँक ज्या निधीतून देते, की जो व्यापारी बँकांच्या शिलकी रकमांचा बनलेला असतो. याचा अर्थ असा की, सहकारी क्षेत्रात अशा प्रकारच्या कार्याला व्यापारी बँका, अप्रत्यक्षरित्या हातभार लावतात यावरून असें दिसून .ईल, की व्यापारी बँका नि सहकारी बँका, यांना एकमेकांच्या भूमिका समजून घेण्यास आणि जोडीनें काम करण्यास भरपूर वाव आहे. तसेंच परिणामी ही कार्यपद्धती दोघांच्याहि फायद्याचीच ठरणार आहे.

महाराष्ट्र स्टेट कोऑपरेटिव्ह बँकेला, तिच्या या सुवर्णमहोत्सव प्रसंगी मी मनापासून धन्यवाद देतो नि अशी इच्छा व्यक्त करतो, की भविष्यकाळांत तिची आणखी जास्तीतजास्त प्रगति व भरभराट होवो !

***

※ ※ ※

" सहकारी शील निर्माण झाल्याशिवाय सहकारी संस्था शिस्तबद्ध होणार नाहीत सहकारी चळवळीची निकोप वाढ होण्यासाठी " साधकास वाव व बाधकास मज्जाव करणें" हे तत्त्व अमलांत आणलें पाहिजे. सहकारी संस्थाबरोबरच त्या गावाची सर्वांगीण सुधारणा घडवून आणण्यावरच सहकारी चळवळीचें यश अवलंबून आहे. "

सहकारमंत्री भारदे
नाशिक







# सद्यःस्थिती व भविष्यकाळ सहकार्याच्या दृष्टीकोणाची अिप्तता

श्री. ए. डी. श्रॉफ




रताच्या सर्वांगीण विकासामध्यें, आर्थिक सहकार्याचा वाटा, बँका कितपत उचलतात, या दृष्टीनें सहकारी व व्यापारी बँकाच्या पारस्परिक सहकार्याच्या परिस्थितीचा विचार करणें योग्य होईल. केवळ संस्थेच्या दृष्टीनें विचार करता, प्रथम दर्शनी असे दिसून येईल की, सर्वांना उत्तम रीतीनें वाव मिळेल, अशाच रीतीनें या बँकाचा आर्थिक व्यवहार चालला पाहिजे गुणवत्तेच्या दृष्टीनें विचार करता या प्रश्नाचे महत्त्व जरा वेगळेंच आहे. आज जरी भांडवल उपलब्ध होत असलें तरी आपल्याला पाहिजे त्या पद्धतीनें त्याचे चलन होत नाही. तें सर्व बाजूनी सहजतेनें खेळतें रहात नाही विशेषतः अर्धविकसित अर्थव्यवस्थेत, क्रयशक्तीला पुरेशी चालना मिळत नाही, त्यामुळे ज्या खऱ्या अर्थानें सर्वांगीण विकास साधणे आवश्यक असतें, तो पुरेसा साधला जात नाही पैसा उपलब्ध करून देणाऱ्या विविध प्रकारच्या संस्था आज आहेत, त्या अनेक तऱ्हानी उत्तम रीतीने उपयोगी पडतील, यात शंका नाही, परंतु भाववाढ न होऊ देता, त्या विकास कार्याला कितपत उपयोगी पडू शकतील, हा महत्त्वाचा प्रश्न आहे एखाद्या संस्थेची अमूक एका क्षेत्रात उत्तम गति चालते, पण निव्वळ त्याच क्षेत्रात तिने आपलें अद्वितियत्व अथवा विशेषत्व प्रस्थापित करण्यानेंच कार्यभाग साधत नाही, तर भविष्य काळातील विकास साधण्यासाठी, त्या संघटनेची त्याग करण्याची किती उत्सुकता व तयारी आहे यावर तिच्या कार्याचे मूल्यमापन अधिष्ठित असतें ह्या भूमिकेवरून सहकारी व व्यापारी बँकाच्या कार्यपद्धतीत फरक कोठें आहे व त्याचे एकमेकाना सहकार्य कोणत्या क्षेत्रात होऊ शकेल, हे पाहाणें आवश्यक आहे.

या दोन्ही बँकाचे कार्यक्षेत्र किती व्यापक आहे, याचा आपण प्रथम विचार करूं या. गेल्या पाच वर्षांत आपण कमालीची प्रगति केली आहे. सर्व सहकारी संस्थाचें एकूण खेळतें भांडवल ( यात शेअर भांडवल, उसनवार घेतलेली रक्कम, अनामत रकम व राखीव निधी याचा अंतर्भाव होतो, ) १९५१ साली जें ३५२ कोटी होतें तें १९५५ साली अवघे ३९१ कोटीपर्यंत वाढलें परंतु त्यानंतर त्यात झपाट्याने वाढ होत गेली व १९६० साली ते १,०८३ कोटी रुपयापर्यंत वाढलें शेड्यूल व नॉन शेड्यूल बँकाचे खेळतें भांडवल १९५० सालच्या डिसेम्बरमध्यें १,१७९ कोटी रुपये होतें. १९५५ सालच्या डिसेम्बरमध्यें १,२२७ होतें व १९६० च्या डिसेम्बरमध्यें तें २,०७६ कोटी झाले गेल्या पाच वर्षांतील



आकडे घेतले तर आपल्याला असे दिसून येईल की, सहकारी क्षेत्रात भांडवलाची वाढ १७७ टक्के झाली. तर व्यापारी बँकांच्या भांडवलात ६९ टक्के वाढ झाली. केवळ भांडवलामध्ये ही जी भरमसाट वाढ झालेली दिसते, याचे कारण एक बँक दुसऱ्या बँकेकडून उसनवारी करते, ज्यामुळे भांडवलामध्ये दुप्पट वाढ झालेली दिसते. तथापि या उसनवारी-च्या तत्त्वाने, सहकारी बँकांच्या क्षेत्रात व्यापक रूप धारण केले आहे. प्राथमिक सहकारी संस्थांनी व्यक्तींना दिलेल्या कर्जांची रक्कम गेल्या पाच वर्षात १६३ टक्क्यांनी वाढली आहे. याच मुदतीत व्यापारी बँकांची कर्जाची रक्कम अवघी ७३ टक्के वाढली.

आजच्या सर्वसाधारण अर्थव्यवस्थेचे स्वरूप कसे आहे, याची कल्पना जी कर्जे खाजगी क्षेत्रात देण्यात आली त्याच्या पुढील आकडेवारीवरून दिसून येईल

**देण्यांत आलेलें कर्ज** ( कोटींमध्यें )

| | | |
|---|---|---|
| प्राथमिक शेतकी ऋणसंस्था | १७८ | |
| प्राथमिक बिनशेतकी ऋणसंस्था | १०७ | |
| जमीन गहाणवट बँका | ४८ | |
| राज्य सहकारी आणि मध्यवर्ती जिल्हा सहकारी बँका ( व्यक्तींना देण्यात आलेलें कर्ज ) | ०७ | |
| | | ३४० |
| स्टेट बँक ऑफ इंडिया | २३२ | |
| इतर शेडयूल्ड बँका | ७७४ | |
| नॉन शेडयूल्ड बँका | ३१ | |
| | | १,०३७ |
| इंडस्ट्रिअल फिनान्स कॉर्पोरेशन | ४१ | |
| स्टेट फिनान्शिअल कॉर्पोरेशन्स | १७ | |
| आय. सी. आय. सी. आय. | ६ | ६४ |
| बिन संघटित विभाग ( व्याज-बट्ट्याचा धंदा करणारे वगैरे ) | | |
| ठोकळ अदाज | | ३०० |
| | | १,७४१ |

आता भविष्यकाळाचा विचार करता, अलिकडच्या काही वर्षांत जी प्रगति झाली आहे, तिच्यापेक्षा यापुढील प्रगति, निश्चित कमी दैदीप्यमान असणार नाही. १९६० सालच्या जूनमध्ये, सहकारी बँका व संस्थांच्या ( बिनशेतकी ऋण संस्था वगळून ), यांचे शेअर भांडवल ७४ कोटींपर्यंत वाढलें. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत ते १८० कोटींपर्यंत ( किंवा १४३ टक्क्यांपर्यंत ) वाढविण्याचे ठरलें आहे. अनामत रक्कम १६७ कोटींवरून ३८६ कोटींपर्यंत किंवा १३७ टक्क्यांनी वाढेल, असा अंदाज आहे. सार्वजनिक क्षेत्रात शेती, छोटे-छोटे भांडवली धंदे, घरबांधणी वगैरेंच्या विकासासाठी, २०० कोटींपर्यंत रक्कम, त्याच्या निधीतून मिळू शकेल आणि या रकमेचा बराचसा भाग सहकारी क्षेत्रात बहुतांशी उपलब्ध होऊ शकेल. अशा रीतीने त्यांची आर्थिक परिस्थिति भक्कम झाल्यानंतर प्राथमिक सोसायट्या आपले कर्ज २५० कोटींवरून ७०० कोटींपर्यंत म्हणजे १८० टक्क्यांनी वाढवू शकतील. व्यापारी बँकांच्या वाढत्या बोलावण्याचे म्हणजे नियोजन मंडळाने काही अंदाज बांधलेला नाही. नियोजन मंडळ फक्त सूक्ष्मरूपें करून निर्धारित ठेवी-भांडवल ( Fixed investment ) करीत जाईल, याचाच विचार करते. संघटित औद्योगिक क्षेत्रात, बँकांच्या कर्जात १,२५० कोटींपर्यंत वाढ होईल अशी अपेक्षा आहे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत, सार्वजनिक क्षेत्रात पैशाचा पुरवठा १,००० कोटींवरून ३,१०० कोटींपर्यंत वाढेल, अशीहि आशा आहे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत ही वाढ अवघी ३३ टक्के होती. तिच्याशी तुलना करता ही वाढ ३५ टक्क्यांनी झाली आहे. यावरून साधारण अंदाज असा बांधता येईल की, व्यापारी बँकांचे सर्वांचे स्रोत जे गेल्या पाच वर्षांत ७३ टक्क्यांनी वाढले ते पुढील पाच वर्षांत आणखी ७५ ते ८० टक्क्यांनी वाढेल.

या सर्व आकडेवारीवरून आपल्याला असे सिद्ध करता येईल की, सहकारी व व्यापारी बँकांना, एकमेकांच्या मार्गात न येता आपापली प्रगती फार मोठ्या प्रमाणावर सहज साधता येईल. या दोन्ही जातींच्या बँकांचा परस्परांशी व्यवहार कसा चालतो, त्याचा आढावा घेऊन, त्या प्रत्येकीने राष्ट्रीय अर्थव्यवस्थेत कोणती महत्त्वाची कामगिरी बजावली त्याचा शोधक्यात अंदाज बांधणें फायदेशीर ठरेल.

आपलें भांडवल वाढविण्याबाबतची, आपली (व्यापारी बँकांची) उत्सुकता आपण समजू शकतो. परंतु एका महत्त्वाच्या मुद्याकडे आपल्याला दुर्लक्ष करून चालणार नाही. तो हा की, शेडयूल्ड बँका या केवळ भांडवल पुरविण्याच्या संस्था नाहीत, तर त्या चलनव्यवस्थेचाच एक भाग आहेत. त्यांचे भांडवल जरी केवळ असले तरी या बँका केवळ पैसा गोळा करून, तो एका खात्यातून दुसऱ्या खात्यात फिरवीत नाहीत, तर आपल्या पतीवर भांडवल उभें करतात. तेव्हा या बँकांची महत्त्वाची जबाबदारी अशी की, त्यांनी आपला व्याप अशा रीतीने वाढविला पाहिजे की, ज्यायोगें जनतेचा त्यांच्यावर अटळ विश्वास बसला पाहिजे. आज अर्थव्यवस्थेचे सतत आधुनिकरण होत आहे. बँकांचा विकास होऊन राहिला आहे. आर्थिक क्षेत्रात त्यांची गरज जास्त जास्त वाढू लागली आहे. तेव्हा ह्या सर्व दृष्टीने, या बँकांनी आपली कार्यक्षमता वाढविली पाहिजे व लोकांचा विश्वास संपादन केला पाहिजे. सर्वसाधारणतः, मागणी असेल, तिच्यावर अशा रीतीने नियंत्रण असावे की, ज्यामुळें आर्थिक स्थैर्य संपादन करता येईल व त्याचे उद्देशाने बँकांच्या कायद्याचे संयोजन झाले पाहिजे. पैसे उसने घेणाऱ्या लोकांच्या काही जाती आहेत. त्यांचा विचार सामाजिक भूमिकेवरून करावा लागतो. त्यांना खास सवलती द्याव्या लागतात, काही सूट द्यावी लागते. त्यामुळें असे काही प्रश्न उपस्थित होतात की, बँकांना त्यांच्याकडे लक्ष द्यावें लागतें, परंतु ह्या क्षणी हें ही लक्षात वाळगले पाहिजे की या गोष्टी त्यांच्या जबाबदारीच्या क्षेत्राबाहेरच्या असतात.

सरकारी क्षेत्रातून वारंवार अशी सूचना केली जाते की, छोट्या

उद्योगधंद्यांना कर्ज देण्याच्या बाबतीत, आणि मध्यम प्रतीची कर्जे देण्याच्या बाबतीत, बँकांनी थोडें धाडस दाखवावें. एका विशिष्ट मुद्यापर्यंत आणि कांही विशिष्ट परिस्थितीत, बँकानी आपल्या कार्यक्षेत्राच्या बाहेर जाऊन कर्ज देणें त्याच्या हिताचे होईल. अर्थात् ह्या बाबतीत आपण पुढील गोष्टीचा प्रामुख्यानें विचार केला पाहिजे. बँकेचे जे सर्वसाधारण व्यवहार आहेत, त्यांचा व्याप वाढवितांना या कर्जाचे स्वरूप मदतरूप असलें पाहिजे. आणि ह्याबाबतीत त्यांनी जे लोक अनामत रक्कम ठेवतात, त्याच्या हितसबंधाचे रक्षण केलें पाहिजे. आणि त्याशिवाय ही अनामत रक्कम प्रमाणाबाहेर वाढून, तिच्यामुळें भाववाढ होणार नाही अशी खबरदारीहि घेतली पाहिजे लहान बँकांचें मोठ्या बँकात सामीलीकरण करायचे आणि त्याचे पुन:संघटन करण्याचे जें धोरण आहे, त्याला गेल्या कांही वर्षांत, अधिकृतरित्या चालना मिळालेली आहे. आणि हें धोरण प्राप्त परिस्थितीत. सयुक्तिकहि आहे. गेल्या दहा वर्षांत नॉन् शेड्युल्ड बँकाची संख्या ५४१ वरून २५२ पर्यंत घसरली आहे. आणि त्याच्या कचेऱ्यांची संख्या १५४५ वरून ७८९ पर्यंत उतरली आहे.

स्थानिक लहान बँका आणि मोठ्या बँका, ज्याच्या शाखा सर्व देशात पसरल्या आहेत, याच्या मधील महत्त्वाचा फरक असा की, या लहान बँका कर्ज देण्याच्या बाबतीत फार धाडस दाखवतात त्याचा परिणाम जसा अनेकदा इष्ट झाला आहे तसाच कांहीं बाबतीत तो क्वचित् अनिष्टहि झालेला आहे. एका बाजूनें अशा तक्रारी अनेक कार्यक्षेत्रांत ऐकू येतात की स्थानिक बँका बंद केल्यामुळें, कांहीं खऱ्याखऱ्या लहान व्यापाऱ्यांच्या आणि उद्योगपतीच्या मार्गांत अडचणी निर्माण झालेल्या आहेत. परंतु लहान बँकाचे मोठ्या बँकात सामीलीकरण करण्याचे जे धोरण आहे तें प्रसंशनीय आहे. कारण त्यामुळे बँकाच्या देवाणघेवाणाच्या व्यवहारात, आवश्यक कडकपणा आलेला असून बँकाच्या एकदर स्वरूपाला भक्कमपणा व स्थैर्य प्राप्त झाले आहे

आता आपण सहकारी बँकांच्या व्यवहाराकडे वळू या. या ठिकाणी एका महत्त्वाच्या मुद्यावर भर दिला पाहिजे तो म्हणजे ह्या बँकांत भांडवल जें असते त्याचे स्वरूपच वेगळें असते. त्याचें खरें कार्य लोकानी सहकारी भावनेनें एकत्र यावे, आपली परिस्थिति सुधारण्याचे कोणते मार्ग आहेत ते जाणून घ्यावेत आणि अडीअडचणीत सहकारी सभासदाना मदत करणें हें आहे. हें जे त्याचे खरे कार्य त्याचे महत्व दोन कारणासाठी आहे. स्वत:ला मदत करण्यासाठी सहकारी भावनेनें संघटना उभी करणें, ही जी प्रेरक भावना आहे तीच मूलत: महत्वाची आहे हें ही कार्य तेवढेंच आवश्यक आहे. समाजाचा जो अर्धविकसित वर्ग आहे, त्याला पुरेशा सवलती मिळत नाहीत, मग तो शेतावर अथवा कारखान्यात काम करणारा असो, त्याला स्वत:च्या पायावर उभे रहाण्यास मदत करणें. त्याबरोबरच ह्या संबंधांत हें लक्षात ठेवावयास पाहिजे कीं, उत्पादनाचा दर्जा वाढविणें आणि उत्पन्नाची कार्यक्षमता वाढविणें ह्या दोन गोष्टी विशेष महत्त्वाच्या आहेत. अशा प्रकारचे जें कार्य आहे तें मोठ्या प्रमाणावर आणि शक्य तो व्यवहार्यतेच्या भूमिकेवरून स्वीकारलें पाहिजे. आणि यासाठी भांडवलाची अडचण भासतां कामा नये, अडचण भासलीच तर ती आवश्यक संघटनाच्या उणीवेचीच असावी. तेव्हा सहकारी बँकेचे जें तत्त्व आहे, त्यामध्यें मुख्य बाब शेतकरी, इतर कारागीर वगैरेना आवश्यक पैसा अशा रितीनें पुरवायचा, की, त्यात कोठेंही द्विरुक्ति, फसवाफसव वगैरे मार्गानें या पैशाचा अपव्यय न होता, जेणें करून ती संस्था उत्कर्षासाठी, हितप्रद व फायदेशीर ठरावी हें उद्दिष्ट साध्य होईल. ह्या दृष्टीकोनातून सहकारी ऋणको संस्था, (शहरातील नागरी सहकारी बँकाचा अपवाद सोडून) आणि व्यापारी बँका याची परस्पर सहकार्य करण्याची परिस्थिति कशी काय आहे याची पहाणी केली पाहिजे. ही पाहणी करतांना महत्त्वाची गोष्ट म्हणजे शेती, उद्योगधंदे किंवा व्यापार या सर्वांचा प्रमुख जो सामान्य माणूस आहे त्याला उत्तम रीतीनें मदत कशी करतां येईल तें पहाणे. यातून दोन व्यवहार्य प्रश्न उत्पन्न होतात, तें म्हणजे (१) सामान्य माणसाला कर्ज देणे. आणि (२) त्याच्याकडून ठेवी वगैरेच्या रूपानें निधी उभा करणे.

सहकारी भांडवलामध्यें ही जी विलक्षण वाढ अलिकडे झालेली दिसते, ती रिझर्व बँक व राज्य सरकारें यानी अवाढव्य निधी कर्जरूपानें व मुख्य भांडवलच्या स्वरूपांत ह्या संस्थाना दिला म्हणूनच. १९५६ साली रिझर्व बँकेनें सहकारी क्षेत्रात दिलेलें कर्ज १४कोटी होतें तें १९६१ मध्यें १११ कोटीपर्यंत वाढलें. दुसरी गोष्ट अशी की, सहकारी बँकाचे कामकाज व्यवस्थित चालावें म्हणून त्याना सवलतीचे दरानें व्याज, दैनंदिन खर्चासाठी मदत वगैरे सहाय्य मिळतें सहकारी बँकाना अशा रीतीनें मदत करण्याचा सरळ अर्थ असा होतो, की, जर अशा रीतीनें या बँकाना मदत मिळाली नाही, तर त्याच्या पैशाचा उपयोग सर्वसाधारण माणसाला त्याच्या अटीवर होणें शक्य नाही. परतु व्यापारी बँका मात्र अशा प्रकारची मदत न घेता देखील, सर्व साधारण माणसाला मदत करूं शकतात, हा दोहो मधील लक्षात घेण्यासारखा महत्त्वाचा मुद्दा होय. तसेंच संघटित "नाणे बाजारा" च्या या कार्यपद्धतीवरून हें दिसून येतें की, शेतकरी व कारागीर वर्गाच्या कर्जाच्या मागण्या या अशा असतात की, त्या कधी पुऱ्या पडणेंच शक्य नाही. तेव्हा ज्या सहकारी धनको संस्था व्यवस्थित रित्या कार्यक्षम आहेत, त्यानी त्यांच्या जवळच्या पैशाचा विनियोग योग्य रीतीनें कसा होईल ते पाहिलें पाहिजे खरे सागावयाचे म्हणजे, त्याना जी मदत व अन्य तऱ्हेनें सहकार्य म्हणून करण्यात येतें त्याचा अर्थच हा की, त्या चातुर्यानें व शहाणपणानें वागतील व आपल्या संघटना कौशल्याचा उपयोग अशा रीतीनें करतील की, जेणेंकरून शेतकरी आणि कारागीर या वर्गाला पैशाचा उपयोग अधिक प्रमाणांत विधायक कार्यासाठी करता येईल, ह्या संघटनाकडून विशेषत्वानें हीच अपेक्षा असते.

प्रत्यक्षात खेड्यापाड्यांतून जें कर्ज दिलें जातें त्याचे संपर्कक्षेत्र अर्थातच् व्यापक असणें शक्य नाही शेड्यूल्ड बँका जें कर्ज देतात तें फक्त अल्प मुदतीचे खेळतें भांडवल असतें. व ह्यासाठी त्या (बँका) चागलें तारण पहातात आणि फायद्याची मर्यादा व्यवस्थित साभाळतात. शेतकऱ्याना कर्ज देणाऱ्या ज्या प्राथमिक संस्था असतात, त्याच्या कर्जाची मुदत. ही बहुतांशी फक्त एक वर्षाची असते. अलिकडे भांडवल पुरवितांना

एक अशी नवीन प्रवृत्ति आढळते की, तारणाचा आग्रह धरावयाचा नाही. हेतु हा की, दिलेल्या भांडवलाचा उत्पादनाकरितां समाधानकारकपणें उपयोग व्हावा. ही एक विधायक प्रवृत्ति आहे खरी, परंतु ती बँकाना स्वीकारता येणें शक्य नाहीं. शेतकरी धनको संस्थांनी जें १६९ कोटीचें कर्ज १९६० सालच्या जूनमध्यें दिलें, त्यापैकी शेतीच्या प्रत्यक्ष कामासाठीं देण्यांत आलेलें कर्ज १२८ कोटीचें होतें व बाकीचें ४१ कोटीचें कर्ज हें शेतीची अवजारे वगैरे कायम स्वरूपाच्या वस्तु खरेदी करण्यासाठीं वापरण्यात आलें.आता ज्या बिगर शेतकरी सोसायटयांनी (उदाहरणार्थ शहरांतील बँका) जें कर्ज दिलें, त्याचें स्वरूप अर्थातच वेगळें होतें. त्या ११७ कोटीच्या एकूण कर्जापैकी, ज्या कर्जाची वर्गवारी करता येणार नाही अशा किरकोळ कामासाठी ६५ कोटीचें भांडवल खर्ची पडलें आणि ज्या कर्जाचा विनियोग पोटापाण्याच्या कामासाठी करण्यात आला त्याची संख्या ३७ कोटीपर्यंत होती. शेडयूल्ड बँकांनी दिलेल्या कर्जाचा आकडा १९६१ सालच्या ऑक्टोबर महिन्यात १,१०० कोटीपर्यंत फुगला होता. परंतु त्यापैकी शेतीच्या कामी अवघें ६ कोट आहे म्हणजे ही रक्कम १ टक्क्यापेक्षा कमी आहे हंगामाच्या ऐन मोसमांत देखील शेतीचें कर्ज, कधी ४० कोटीपेक्षा जास्त वाढत नाही शेतीच्या क्षेत्रात पैसे कर्जाऊ मिळण्याची जी तंगी जाणवते, तिच्यामुळेंच, व्याजाचे दर भरमसाट संभवतात. तरी देखील ही गोष्ट या ठिकाणीं नमूद करावयाला हरकत नाहीं. कीं प्राथमिक शेतकरी धनको संस्था महाराष्ट्रात साधारणतः ७½ टक्के व्याज आकारतात, तर पंजाबात हा व्याजाचा दर ७¾ टक्के असतो. व्यापारी बँका जो दर आकारतात. त्याच्याशीं तुलना करतां, हा दर परवडणारा नाहीं असें म्हणता येणार नाही.

आता छोटया उद्योगधंद्यांना कर्ज देण्याच्या बाबतींत, सरकारी अधिकारी असा आग्रह धरतात कीं, बँकांनीं त्यांच्या गरजा भागवाव्या. उद्योगधंद्यांना बँकांनी दिलेलें कर्ज १९६० सालच्या ऑक्टोबरमध्यें ५६३ कोटीच्या घरांत गेलें होतें. परंतु जे छोटे उद्योगधंदे खरोखरच लायक होते व ज्यांना खास सवलत देणें श्रेयस्कर होतें त्यापैकी कितीं जणांना योग्य प्रमाणात भांडवल पुरविण्यांत आलें हें सांगता येणें कठीण आहे. सहकारी संस्थांना जें कर्ज उद्योगधंद्यासाठी देण्यात आलें त्यापैकी ४ कोटी अॅपेक्स बँकांचें होतें, १० कोटी मध्यवर्ति बँकांचें होतें व ६ कोटी बिगर शेतकरी प्राथमिक बँकांचे होतें. छोटया उद्योगधंद्यासाठी स्टेट बँकेची जी खास योजना आहे ती आता २६०० उद्योगधंद्यांना लागू करण्यांत आली आहे. त्याच्या साठीं मंजूर झालेली रक्कम ९ कोटीची असून त्यापैकी आतापर्यंत अवघे ४ कोट खर्ची पडले आहेत. परंतु इतर बँकांनी मात्र ' गॅरंटी ऑर्गनायझेशन ' नें दिलेल्या सवलतीचा फायदा अद्यापपावेतों घेतलेला नाहीं या ' गॅरंटी ऑरगनायझेशन ' म्हणजे हमी देणाऱ्या संस्थेनें, छोटया उद्योगधंद्यासाठीं ४ कोटी रुपयापर्यंत रक्कम मंजूर केलेली असताना देखील स्टेट बँकाखेरीज इतर बँकांनी दिलेला हिस्सा काही ४० लाखापलीकडे गेलेला नाही.

भविष्यकाळात छोटया उद्योगधंद्याचे क्षेत्रातील उत्पादनवाढीस

निश्चितपणें अधिकाधिक वाव आहे. आणि हें एक क्षेत्र असें आहे की, कर्ज देणाऱ्या सहकारी व व्यापारी बँकांनी परस्पर पूरक सहकारी भावनेनें एकत्र येऊन, ह्या लघुउद्योगांना मदत करणें हितप्रद ठरेल. या प्रश्नाकडे आपण राष्ट्रीय दृष्टिकोनातून पाहिलें तर तीन गोष्टी ठळकपणें दिसतात (१) आर्थिक मदतीची प्रवृत्ति (२) धनकोंच्या संघटनेमध्यें दिसून येणारा फरक. (३) ऋणकोंना मदत देण्याचे स्वरूप. आतां आर्थिक मदत करण्याचा जो भाग आहे, म्हणजे कमी व्याजाच्या दरानें पैसे देणें, त्याचा फायदा सहकारी ऋणको संस्थांना मिळाला पाहिजे; तो व्यापारी बँकांच्या तिजोरीत जाता कामा नये. परंतु बँकांना त्यांची संघटणा व कार्यपद्धति सुधारण्यास अशा रीतीनें मदत करावी की जेणे करून त्यांच्या भांडवलाचा ओघ हा छोट्याउद्योगधंद्यात, ज्यांना कर्जाची गरज आहे, त्यांच्याकडे विशेष प्रमाणात वळेल, जेणेंकरून त्यांचा फायदा होईल. संघटणेत जर सुधारणा झाली व ती जास्त कार्यक्षम झाली, तर भांडवल पुरविण्याच्या बाबतीतील जो खर्च होतो त्यात निश्चित काटकसर होऊ शकेल. क्षणभर हा किफायतीचा मुद्दा जरी आपण बाजूला ठेवला आणि आज कर्जाची मागणी वाढते आहे, व सहकारी संस्थांना ती पुरविता येणें शक्य नाही, ही गोष्ट जमेला धरूनही, व्यापारी बँकांनीं अधिक मोठ्या प्रमाणात कर्जें का दिलें पाहिजे त्या गोष्टील प्रामुख्यानें तीन सबळ कारणें आहेत. ( आज ही कर्जाची गरज असंघटित अशा क्षेत्राकडून काही अंशी भागविली जात आहे. ) पहिली गोष्ट अशी कीं हें भांडवलाचें असें क्षेत्र आहे कीं जेथें चलनवाढीचा धोका नाहीं. उलटपक्षी सहकारी बँकांना रिझर्व्ह बँक कर्ज पुरवठा करीत असल्यानें, तेथें चलनफुगवट्याचा धोका अभिप्रेत असल्याची शक्यता आहे. दुसरी गोष्ट अशी की या क्षेत्रात बँका शिरल्या तर त्यावरून हें सिद्ध होईल की जे लोक पैसे उसने घेतात, ते तारणाच्या सर्व अटी काटेकोरपणानें पाळण्यास पूर्ण समर्थ आहेत व कर्ज फेडीची त्यांची ऐपत वाढलेली आहे, आणि अशी प्रवृत्ति वाढीला लागावी हाच तर अशा प्रकारच्या आर्थिक मदतीमागचा हेतु असतो. शेवटची महत्त्वाची गोष्ट अशी की, अगदी लहान लहान गावातील अधिकाधिक लोकांना, बँकाचा फायदा घेण्याची सोय उपलब्ध झाली तर त्यामुळें राष्ट्रीय जीवनाच्या प्रवाहात ह्या विभागातील लोक आपोआप ओढले जातील. आणि ज्यायोगें निश्चितया लोकांचे आर्थिक दृष्ट्या हित होईल हें तर उघडच आहे. त्याशिवाय सामाजिक व्यवहारात सुधारणा होण्यास मदत होईल हा फायदा वेगळाच.

छोट्या उद्योगधंद्याना तारण म्हणून हमी देण्याची ही जी यंत्रणा आहे, ती निर्माण करण्याच्या मागचा हेतु लोकांच्या सध्याच्या संघटणा पद्धतीत बदल घडवून आणणें हा आहे. समजा अतिकी दक्षता घेऊनही जर नुकसान झालें व सरकारवर बँकाची नुकसान भरपाई देण्याचा प्रसंग आला तर ती आर्थिक मदत ठरेल यावरून असें दिसून येईल की, या हमी पद्धतीचा जास्तीत जास्त उपयोग सहकारी बँकांनी करून घेणें, हें त्यांच्याच हिताचे आहे या प्रश्नाची अत्यंत महत्त्वाची बाजू, जर कोणती असेल तर ती छोट्याउद्योगधंद्याना मदत करणें हीच होय हें असे क्षेत्र आहे की, जेथें भांडवलाचा अत्यंत चांगल्या रितीने उपयोग होऊ शकेल मात्र जे लोक पैसे उसने घेतात त्यांना, साधन सामुग्रीचा उपयोग, कच्च्या मालाची खरेदी, वगैरे बाबतीत योग्य मार्गदर्शन झालें पाहिजे आणि बाजारपेठेचे तंत्र समजण्याइतकी बुद्धिमत्ता त्यांच्या ठिकाणी असली पाहिजे यासाठींच तर सहकारी भांडवलाचे विशेषकरून महत्त्व आहे. छोट्या उद्योगधंद्यांना मदत करण्यासाठी ही जी योजना आहे, त्यामध्यें व्यापारी बँकांनी भाग घेणे हे त्यांच्याहि दृष्टीनें हिताचेच आहे छोट्या उद्योगधंद्यांची भक्कम पायावर उभारणी करणें हाच तर हेतु प्रधान आहे. वास्तव सरकार व सर्व धनको संस्था हें उद्दिष्ट साधण्यासाठी जारीचे व संघटित प्रयत्न करतील अशी दृढ आशा बाळगायला हरकत नाही.

शेवटी प्रश्न येतो ' ठेवी ' वाढविण्याचा ज्याचे उत्पन्न मर्यादित आहे, त्यांना काटकसर करण्यास उत्तेजन देणें, ही अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. आणि ठेवी घेणाऱ्या संस्थामधील स्पर्धेमुळे, जर बचत करण्याची प्रवृत्ति जनतेंत वळावली तर ती स्वागतार्हच घटना होय ! मात्र एक गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे की, निरनिराळ्या बँकातून व इतर संस्थातून लोक ठेवी ठेवतात, त्याला तशीच काही विशिष्ट कारणे असतात. बँकेतून ज्या ठेवी ठेवण्यात येतात त्यामुळे तिची कार्यक्षमता वाढते, असें साधारणपणें मानलें जातें. आणि सहकारी सोसायट्यातून ठेवी ठेवणें म्हणजे फायदेशीर व्यवहारात भांडवल गुंतविणें होय, असें मानलें जातें. अर्थात् अशा सोसायट्यांचा फायदा प्रत्येक ठेवीदाराला निरपवादपणें मिळाला पाहिजे. आता सरकारनें राष्ट्रीय बचत योजना रोखे आणि अल्पबचत योजना रोखे विकण्यासाठी मोहीम सुरू केल्यामुळें, ठेवीदाराच्या सहकारी सोसायट्यावर त्याचा विपरित परिणाम काही अंशी झाला आहे आणि म्हणूनच बहुधा सरकारच्या या मोहिमेबाबत तक्रारी ऐकू येत असाव्यात. काही का असेना, सहकारी संस्था ठेवीदाराच्या ज्या ठेवी मिळवितात, केवळ त्यावरच त्यांची पैसे कर्जाऊ देण्याची पत अवलंबून असते, असे म्हणणें योग्य होणार नाही. शेतकऱ्यांच्या क्रेडिट सोसायट्यांचे खेळतें भांडवल १९६० सालच्या जूनमध्यें २२४ कोटी होतें आणि यात ठेवी दारांची रकम अवघी ११ कोटी होती; उलट पक्षी कर्जाच्या खात्यात १६९ कोटी रुपये होते. बिगर शेतकरी क्रेडीट सोसायट्यात १३७ कोटींच्या खेळत्या भांडवलात ठेवीदाराच्या ठेवी ८२ कोटी रुपयाच्या होत्या. आणि कर्जाच्या खात्यात ११७ कोटी रुपये होते. म्हणजे ठेवीच्या १४३ टक्के ही रक्कम होती. सेंट्रल बँकांच्या बाबतीत कर्जें ठेवीच्या १८४ टक्के होती व अॅपेक्स बँकाच्या बाबतीत कर्जें २१६ टक्के होती प्रमाणत: शेडयूल्ड बँकांशी तुलना करता ही हिस्सेराशी ६२ टक्के आहे.

या संक्षिप्त विवेचनावरून, सर्वसाधारणत असा निष्कर्ष काढता येईल की, प्रत्येक बँकिंग संस्था उपरोक्त क्षेत्रात, आपल्या खातेदाराची कोणती वैशिष्ट्यपूर्ण व खास सेवा करण्यास समर्थ आहे, त्यावर तिच्या यशाचें रहस्य अवलंबून आहे सहकारी सोसायट्यांनी, आपल्या कार्यपद्धतीची गुणवत्ता निश्चितपणें वाढविली पाहिजे, या गोष्टीवर रिझर्व बँकेच्या गव्हर्नरांनी वारंवार भर दिला आहे तशी सुधारणा जर घडून आली, तर या सोसायट्यांच्या विकासाला काही सीमाच उरणार नाही. आणि निश्चिततया हें स्पष्टच आहे कीं, सरकारी क्रेडीट सोसायट्या व व्यापारी बँका यांच्यामध्यें स्पर्धा होणें अपरिहार्य असलें तरी, त्यांनी एकमेकांना सहाय्य करून सुसंवादी राखणें दोहोंच्याही हिताचेंच आहे कारण, उभयतांपैकीं कोणाहि एकाचा विकास, विधायक मार्गानें झाला तर त्यामुळें दुसऱ्या पद्धतीच्या बँकींग व्यवसायाच्या कार्याला हमखास बळकटी येईल; एवढें खास !

★★★







# भारतीय भाग्योदयासाठीं सहकार्य आवश्यक

*श्री. श्रीयांसप्रसाद जैन*

















शाच्या आर्थिक विकासाबरोबर, भारतीय बँक व्यवसायानेंही, गेल्या पन्नास वर्षांत, झपाट्यानें प्रगति केली आहे. या व्यवसायाचे दोन विभाग आहेत. एक, 'जॉइंट स्टॉक' बँका, यालाच 'कमर्शियल' बँका म्हणतात. दुसरा, सहकारी बँका. कमर्शियल बँका खरकी चलनाचे व भारतीय बँकिंगचे व्यवहार करतात. या बँकाचे, त्यांच्या उत्पन्नाप्रमाणें दोन गट पाडण्यात आले आहेत एक 'शेड्यूल' व दुसऱ्या 'नॉन-शेड्यूल' बँका. सहकारी बँका तीन पातळीवर असतात. त्यांतील सर्वांत वरची म्हणजे राज्य सहकारी बँक, त्याच्या खाली जिल्हा किंवा तत्सम पातळीवरील जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक व सर्वांत खालच्या पातळीवर प्राथमिक स्वरूपात सेवा सहकारी संस्था या नागरी बँका यांचा समावेश होतो. या दोन्ही विभागातील बँक व्यवसायाची मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे. फरक इतकाच की सहकारी बँकांना सरकार सर्व प्रकारे मदत करतें आणि कमर्शियल बँकांची वाढ त्यांच्यावरच सोडून देण्यात आली आहे.

सहकारी बँक व कमर्शियल बँक यात मूलभूत फरक आहे असें मानणें योग्य नाही. उभयतांचे ध्येय जवळ जवळ एकच आहे. इतकेंच काय पण निधी उभारण्याची पद्धत, बँकिंगचे धोरण व कामाची पद्धत यातही काहीं फरक नाही. फक्त फरक आहे दृष्टिकोनातच आणि त्यामुळें स्वरूपही थोडें निराळें आहे एवढेंच! सहकारी बँक आपल्या सदस्यांनाच कर्ज देते. सदस्य व्यक्ति असेल किंवा संस्था असेल. कर्ज देताना तारण ही बाब दुय्यम असते. सहकारी बँका द्रव्य तारणापेक्षा, वैयक्तिक जामिनावर जास्त भर देतात. कमर्शियल बँका, कर्जदाराची परतफेडीची कुवत पाहतात, तसेंच द्रव्य तारणाला जास्त महत्त्व देतात. शिवाय सहकारी बँकांच्या सदस्याप्रमाणें, त्यांना इतरही बाबी पुऱ्या कराव्या लागतात.

दृष्टिकोनात हा फरक असल्यामुळें, सहकारी बँकांच्या सदस्यांत कर्जदारांचा जास्त भरणा असतो व कर्ज देण्याबाबतचे धोरण ठरविण्यात, त्यांचे मत प्रभावी ठरतें. अर्थातच कमी दरात कर्ज मिळविण्याकडे त्यांचे प्रयत्न असतात व त्यामुळें बँकांच्या भाडवलावर योग्य मोबदला मिळत नाही. या उलट कमर्शियल बँका, आपले भाडवल जनतेतून उभारतात. भाडवलात पैसा गुंतविणारे लोक कर्जदारच असतात असें नाही, तर आपल्या शिलकीचा, आपल्याला भरपूर फायदा मिळावा म्हणून ते

कमर्शियल बँकांच्या भांडवलांत पैसा गुंतवितात. सहकारी बँकांच्या सदस्यांना प्रत्येकी एकच मत देण्याचा अधिकार असतो या उलट कमर्शियल बँकांच्या शेअर होल्डर्संना, गुंतविलेल्या भांडवलाच्या प्रमाणांत मतदानाचा हक्क असतो.

सहकारी बँकांना, छोट्या लोकांकडून पाठिंबा मिळतो तर कमर्शियल बँकांना, समाजाच्या सर्व थरातून पाठिंबा मिळतो. यामुळे सहकारी बँकांना शेती-अर्थकारणावर लक्ष केंद्रित करावें लागलें आहे त्यासाठी रिझर्व बँक, सवलतीच्या व्याजाच्या दरानें भांडवल पुरविते. विविध पातळीवर धोरण पत्करण्यासाठी, विविध पद्धतींचा अवलंब करण्यात आला आहे. कमर्शियल बँका, व्यापार उद्योगधंद्यालाच फक्त कर्जे देतात. कारण व्यापार व उद्योगधंदे चांगले तारण देऊं शकतात. रिझर्व बँक, कमर्शियल बँकांना आपल्या आर्थिक धोरणाशीं सुसंगत अशा प्रकारें शेवटचा उपाय म्हणून उसनी रक्कम देते.

स्वातंत्र्यपूर्व काळात, कमर्शियल व सहकारी बँकांचे कार्यक्षेत्र अगदीं वेगळें होतें. यावरून कमर्शियल बँका, तालुक्याची ठिकाणें, शहरें व काही व्यापारी केंद्राच्या पलिकडे, ग्रामीण भागात का पोहोंचू शकल्या नाहींत हें स्पष्ट होईल. अर्थात् याला काही तुरळक अपवाद आढळतील. या उलट सहकारी बँका व पतपेढ्या खेड्यापर्यंत पोहोंचू शकल्या. गेल्या एक तपांत, उभय विभागांतील बँकांच्या दृष्टिकोनात बराच बदल झाला आहे. सहकारी खरेदी विक्री व संस्करण संस्थांचा जसा विकास झाला तशी सहकारी बँकांना शहरांतून शाखा उघडण्याची गरज भासू लागली. त्याच वेळी छोटे उद्योगधंदे, कारागीर व बडे शेतकरी यांना कर्जे पुरविण्यासाठीं, कमर्शियल बँकांना, अविकसित प्रदेशांत जाऊन शाखा उघडाव्या लागल्या मागासलेल्या व आर्थिक दृष्ट्या अविकसित प्रदेशात, प्रथम सहकारी बँकांनी कार्य सुरू केलें ही गोष्ट मात्र मान्य करावयास पाहिजे. एका ठराविक मर्यादेपर्यंत विकास झाला म्हणजेच कमर्शियल बँका तेथें जातात. सहकारी बँकांना, स्वाभाविकत:च किमान आवश्यक धंदा मिळतो. शिवाय नव्या शाखा उघडण्यासाठी सरकार सहकारी बँकांना मदत देतें. उलट कमर्शियल बँकांना नव्या शाखा उघडण्यात येणारा तोटा, आपल्या इतर नफ्यातून भरून काढावा लागतो

दोन्ही प्रकारच्या बँका, दोन निरनिराळ्या ठिकाणी एकत्र येतात. उभय प्रकारच्या बँकांचे क्षेत्र निराळें असल्यामुळें कर्ज देण्याबाबत हितसंबंधांचा संघर्ष निर्माण होतच नाही परंतु ठेवी स्वीकारण्याबाबत, परिस्थिती निराळी आहे सहकारी बँकांना, याबाबत जास्त फायदा मिळतो कारण सहकारी बँकांच्या ठेवीदारांना करात सूट मिळते. सरकारचें धोरण असें आहे की, निमसरकारी व सरकारी मदत मिळणाऱ्या संस्थांची खातीं सहकारी बँकांत असावी कमर्शियल बँकांना, जनतेचा चांगला पाठिंबा मिळतो सहकारी बँकांच्या मानानें, कमर्शियल बँकांच्या ठेवीत जी गेल्या एक तपात वाढ झाली आहे त्यावरून हें सुस्पष्टपणें सिद्ध होतें. सहकारी बँक व्यवसायाची, अद्यापहि पुरेशी वाढ झालेली नाहीं उभयतांच्या वाढीतील हें अंतर, हळू हळू कमी होईल कारण सहकार विभागाला प्रोत्साहन देण्याचे व त्याच वेळी खासगी विभागावर जास्त जास्त नियंत्रणें घालण्याचे सरकारचे धोरण आहे

कर्जे देण्याच्या धोरणाबाबत काय फरक आहेत हें यापूर्वी विषद केलें आहेच. आणखी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती अशी कीं करात सवलत मिळत असल्यामुळें, सहकारी बँकांना व्याजाचा कमी दर देऊनहि ठेवी मिळतात. या बँका, त्या मानानें कमी व्याजानें कर्जे देऊं शकतात. याला नागरी सहकारी बँका अपवाद आहेत. त्याचप्रमाणें, सहकारी बँका त्यांच्याकडे असलेल्या रकमेपैकी बराच भाग, कर्जाऊ देण्यासाठी वापरूं शकतात. पण, कमर्शियल बँकांचे तसे नाहीं. आकडेवारीवरून, असें निदर्शनांत येते कीं बँक व सेंट्रल फायनान्सिंग एजन्सी, ठेवींच्या १४० टक्के रक्कम कर्जाऊ देऊं शकतात तर कमर्शियल बँकांबाबत हें प्रमाण, त्याच्या निम्यानें आहे.

बँकिंग व्यवसायाच्या इतिहासाचें, परिशीलन केल्यास, असें आढळेल की सहकारी बँका व कमर्शियल बँका यांचे नातें अगदीं जवळचे आहे. बऱ्याचशा व्यापाऱ्यांचे सहकारी बँकांशी संबंध असतात. राज्य पातळीवर, उभयतांत बऱ्याच मोठ्या प्रमाणात सहकार्य आहे. सुवर्ण महोत्सव साजरा करणाऱ्या महाराष्ट्र स्टेट को- ऑपरेटिव्ह बँकेची स्थापना, या शतकाच्या पहिल्या दशकांत, एका सामग्री उद्योगधंद्याच्या प्रवक्त्याच्या प्रेरणेनेंच झाली आहे व तीन वर्षांपूर्वीपर्यंत या बँकेचीं सूत्रें एका व्यापाऱ्याकडेच होती व सदर व्यापारी हा 'दी फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्सचा अध्यक्ष' होता. एका प्रमुख कमर्शियल बँकेनें-स्टेट बँक ऑफ इंडिया नव्हे-या बँकेला चलन बाजारांत आणलें हें उघड आहे इतर राज्यांतही अशी उदाहरणें देता येतील. परंतु मी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचा मुद्दाम उल्लेख केला आहे, कारण या बँकेच्या व इतर बँकांच्या प्रगतीत जो फरक आहे तो खासगी व्यवसायाचे सहकारी बँकांशी असलेल्या सहकार्याच्या प्रमाणामुळें आहे. दोन्ही पद्धतीवरील बँकांचे उद्दिष्ट एकच आहे, कार्यपद्धतींत काय तो फरक आहे. या विधानाचें सत्यत्व यावरून अधिकच पटते !

भावी आर्थिक विकासाच्या दृष्टीनें, कमर्शियल व सहकारी, दोन्ही बँकांना महत्त्वाची कामगिरी बजावावयाची आहे व अनिष्ट स्पर्धा न करता फायदा मिळवावयाचा आहे. हें उभयतांना जसें आव्हान आहे तशीच विकास साधण्याची सुसंधीहि आहे. भारतीय बँक व्यवसायाच्या या दोन्ही शाखा मजबूत करण्याच्या समस्या सारख्याच आहेत या समस्या म्हणजे उच्च श्रेणीची व्यवस्था, बँकिंगच्या सवलतींत वाढ, ठेवींमध्यें वाढ व भुत्पन्न एकत्र करणें. दृष्टीकोणातील तफावत कमी होत आहे. प्रामाणिकता हेंच भांडवल, मानण्याची सहकारी बँकांची शपथ असली तरी तारणाकडे त्यांनी दुर्लक्ष केलेले नाही. कारण ठेवीदारांचे पैसे आपण वापरीत असल्याची त्यांना जाणीव आहे. आज पत असलेल्या व्यक्तीला कर्ज देण्याऐवजी, पतयोग्य कारणासाठी, कर्ज देण्यावर त्यांचा अधिक भर आहे. परंतु व्यवहार्य गरजेनुसार हें ध्येय बदलण्याच्या समस्येला त्या तोंड देत आहेत. उत्पादन कार्यक्रमासाठी, कमर्शियल बँका छोट्या माणसाच्या आर्थिक गरजांकडे अधिकाधिक लक्ष पुरवू लागल्या आहेत. स्वत:चें वैशिष्ट्य न घालविता, उभय क्षेत्रांनी, एकमेकांतील सहकार्य वाढविण्यासाठीं आपलें ध्येय, धोरण व व्यवहार यांत बदल केला पाहिजे. यातच भारतीय बँकव्यवसायाचें हित व उज्ज्वल विकासाच्या आशा-आकांक्षांचें बीज आहे. ! त्यायोगेंच उभय क्षेत्रें भारताचा भाग्योदय घडवून आणू शकतील !!






# व्यापारी व सहकारी बँकांचे देशाच्या आर्थिक विकासातील स्थान

श्री [illegible]



रतीय अर्थव्यवस्थेच्या विकासाबरोबर, देशांतील बँकिंग धंद्याची वाढ झाली पाहिजे हें क्रमप्राप्तच होय. देशाच्या विकासासाठी, सहकारी क्षेत्रासह खासगी क्षेत्राला, नित्य, व्यापक व वाढतें कार्य बजावावयाचे आहे. साहजिकच व्यापारी व सहकारी बँकांवर सामाजिक कर्तव्य म्हणून एक महत्त्वाची जबाबदारी येऊन पडते. जनतेकडून होणारी बचत गोळा करून, पतपुरवठा म्हणून तिचा वापर करण्याचें काम चढत्या श्रेणीनें या बँकांना केलें पाहिजे. आपल्या देशाची प्रगतीच्या दिशेनें, जी आगेकूच होत आहे त्या कार्यांत व्यापारी व सहकारी बँकांची, नेमकी जबाबदारी कोणती आहे हें दर्शविण्याचा या लेखात प्रयत्न केलेला आहे.

या दोन्ही प्रकारच्या बँका, बव्हंशीं एकमेकांना पूरक अशाच आहेत. या दोघांतील स्पर्धेचे क्षेत्र फारच तोकडें आहे. खरें पाहता या बँका वेगवेगळ्या क्षेत्रांत काम करीत असतात याचे कारण असें कीं, एकाच प्रकारच्या बँका, दुसऱ्या बँकांच्या अंतर्गत असलेल्या क्षेत्राच्या गरजा, भागवू शकत नाहीत. सहकारी बँका प्राधान्येकरून शेतकी अर्थव्यवस्थेला मदत करीत असतात. सहकारी बँकांनीं स्वत करितां हें जें क्षेत्र निवडलें आहे त्या क्षेत्रात प्रवेश करण्यास व्यापारी बँका स्वाभाविकतःच उत्सुक नसतात असें स्पष्टपणें दिसून येतें.

स्वातंत्र्यापूर्वी व नंतर कांहीं वर्षे व्यापारी बँका, केवळ व्यापारासाठींच मदत करीत होत्या. देशाचा नियोजित आर्थिक विकास सुरू झाल्यापासून औद्योगीकरण झपाट्यानें होऊ लागलें. साहजिकच या बँका औद्योगिक उभारणीसाठी, अधिकतर प्रमाणात पतपुरवठा करू लागल्या.

बँकांच्या आर्थिक व्यवहाराची, गेल्या दहा वर्षांत जी वाढ झाली त्याकडे पाहता, काही विशेष गोष्टी चटकन् ध्यानात येतात. सन १९५० मध्यें, कर्जाचें ठेवींशी प्रमाण ४६ टक्के होतें, तें १९६१ साली ६१ टक्के झालें. यावरून गुंतवणुकीपेक्षा कर्जे देण्यावर कसा भर देण्यात आला आहे हें स्पष्ट होते सन १९५१ ते १९६० या दहा वर्षांत केलेल्या पतपुरवठ्याची छाननी केल्यास निव्वळ व्यापारापेक्षा, औद्योगीकरणांत गुंतलेल्याना, जास्त प्रमाणांत सहाय्य केलें जात आहे असें दिसते उदाहरणार्थ, या काळांत



उद्योगांना ७५ टक्के अधिक पतपुरवठा करण्यांत आला आहे एकूण पतपुरवठ्यांत, औद्योगिक संस्थांना होणाऱ्या पतपुरवठ्याचे प्रमाण ३२ टक्क्यांवरून ५१ टक्क्यांपर्यंत वाढलें. आर्थिक विकासाबरोबरच व्यापारी क्षेत्राच्या पतपुरवठाविषयक गरजाहि वाढणें हें स्वाभाविक व सयुक्तिकच होय.

गेल्या दहा वर्षांत, ठेवींत जी प्रचंड वाढ झाली त्यामुळें या सर्व क्षेत्रांना त्यांच्या जरुरीप्रमाणें पतपुरवठा करणें बँकांना शक्य झालें. पहिल्या योजनेपेक्षां दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत, ठेवींत विशेष वाढ झाली. वाढ होण्याचा हा दर मात्र, प्रत्येक वर्षी निरनिराळा असा होता. पतपुरवठ्यात वाढ होत जाण्यासाठीं आपल्याकडील ठेवी कशा वाढतील याकडे बँकांनी लक्ष पुरविलें पाहिजे.

अनेक मोठ्या बँकांनीं, आपल्या शाखांची संख्या वाढवण्याचे धोरण स्वीकारल्यानें, गेल्या दहा वर्षांत ठेवींत वाढ होऊं शकली तथापि, भारतांतील १४०० शहरात, अद्याप एकाहि बँकेची शाखा नाहीं. भारतासारख्या अर्धविकसित देशात, बँकाचा फायदा घेण्याची जनतेला सवय लावणें हेंच महत्त्वाचें आहे. यासाठी ग्रामीण भाग व छोटी शहरे यात बँकानी आपल्या शाखा उघडल्या पाहिजेत यामुळें जनतेकडील बचत गोळा करून तिचा संघटित-रीत्या , उद्योगधंदे व व्यापार याना जास्त प्रमाणांत पतपुरवठा करण्यासाठीं वापर करता येईल

गेल्या चार वर्षांत, साध्या ठेवींपेक्षां मुदतबंद ठेवींत विशेष वाढ झाली आहे. एका दृष्टीनें हीं स्वागतार्ह अशीच घटना होय. त्यामुळें अल्प मुदतीऐवजी, मध्यम व दीर्घ मुदतीची कर्जे देणें बँकांना शक्य झालें आहे. साहजिकच, उद्योगांना जास्त पतपुरवठा होऊ लागला आहे. पण त्याचबरोबर, मुदतबद ठेवी वाढल्यानें त्यावर जास्त व्याज द्यावें लागत असल्यानें, बँकाच्या खर्चांत वाढ झाली आहे हेंही येथें नमूद केलें पाहिजे.

आतापर्यंत मोठ्या धडाडीनें व यशस्वीपणें कार्य करणाऱ्या या व्यापारी बँकावर, सतत विकास पावणारी अर्थव्यवस्था व तिचे औद्योगिक समाजांत होणारें रूपांतर, यामुळें नव्या सामाजिक जबाबदाऱ्या येऊन पडल्या आहेत देशांतर्गत व्यापाराला मदत करणें हें या व्यापारी बँकाचे सुरुवातीला कार्य होतें, पण वर सांगितल्याप्रमाणें औद्योगीकरणावर भर दिल्यानें त्या मध्यम व दीर्घ मुदतीचा पतपुरवठा करू लागल्या. विदेशी व्यापाराच्या क्षेत्रांतहि त्यानीं मोठ्या कल्पकतेनें व धडाडीनें आपला जम बसवला आहे

काही प्रमुख बँकानी, परदेशात आपल्या अनेक शाखा उघडल्या आहेत त्याच्या सहाय्यानें भारताच्या आंतरराष्ट्रीय व्यापा-

राच्या अर्ध्याहून अधिक विदेशविनिमय उलाढालीला या बँकांचें सहाय्य मिळत असतें. त्यांची ही प्रगति खरोखरीच प्रशसनीय आहे कारण सरकार किंवा रिझर्व बँक यांच्या सहाय्याविना आणि परकीय बँकांची जोरदार स्पर्धा असतानाहि, त्यांनी हें यश प्राप्त केलें आहे.

आरंभापासून चाललेल्या अंतर्गत व्यापाराबरोबरच वाढते उद्योगधंदे व विदेशी व्यापार या क्षेत्रांनाहि, यापुढें व्यापारी बँकांनी सहाय्य करावयाचें आहे. नियोजित आर्थिक विकासात व्यापार व उद्योग या दोघांच्याहि गरजा नित्य वाढत्या आहेत; त्यामुळें व्यापारी बँकांवरील जबाबदारीत विशेष भर पडणार आहे. धान्याच्या वाहतुकीसाठी, अर्थपुरवठा करण्याचें कामहि वाढणारें असेंच आहे. अशा प्रकारे शेतकी क्षेत्रालाहि पूर्वीप्रमाणेंच अप्रत्यक्षपणें मदत करावी लागणार आहे. परंतु शेतकी क्षेत्राला अर्थपुरवठा करण्याची जबाबदारी सहकारी बँकांची आहे याबाबत त्या बँकांनी केलेली प्रगति यापुढेंहि चालू राहील असा मला विश्वास वाटतो.

गेल्या दहा वर्षांत सहकारी बँकांनी भरीव प्रगति केली आहे. विशेषत: अखिल भारतीय ग्रामीण पतपाहणी अहवालातील शिफारशींची जोरदार अंमलबजावणी सुरू झाल्यापासून या बँकांची आगेकूच द्रुतगतीनें चालू आहे. शेती उत्पादन जसजसें वाढत जाईल त्याप्रमाणांत सहकारी बँकांच्या कार्याच्या व्यापातहि वाढ होईल. सहकारी बँका, बँकिंग व्यवसाय करीत असल्या तरी रचना, उद्देश व कार्यक्षेत्र यांचा विचार करता, व्यापारी बँकांहून त्यांचें वेगळेपण निश्चित ध्यानात येते.

व्यक्तिमात्राचें कल्याण साधणें हें सहकारी चळवळीचें प्रमुख उद्दिष्ट होय. " नफा मिळविणें, " हा गौण उद्देश आहे. ग्रामीण पातळीवर सहकाराची प्रेरणा वाढीस लावणें हीच सहकारी बँकांचें जाळें पसरविण्याची प्रेरक शक्ति आहे. सहकारी बँकिंग व्यवसाय हा तीन टप्प्यावर आधारलेला आहे. प्रत्येक राज्यात असलेल्या राज्य सहकारी बँका, या सहकारी बँकींगचें नियंत्रण करणाऱ्या सर्वांत प्रमुख संस्था आहेत. त्यानंतर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, या जिल्हा पातळीवर काम करतात तिसरा टप्पा आहे ग्रामीण पातळीचा. हें प्राथमिक सहकारी सोसायट्यांचें कार्यक्षेत्र आहे. प्राथमिक सहकारी सोसायट्यांचें कामकाज अद्याप सुरळितपणें चाललेलें नाही राज्य व जिल्हा पातळीवरील सहकारी बँकांचें मात्र तसें नाही. त्या बऱ्याच कार्यक्षम आहेत, याचें कारण असें की, योग्य पात्रता असलेला नोकरवर्ग नेमणें त्यांना शक्य होत असतें. असा नोकरवर्ग नेमणें प्राथमिक सहकारी सोसायट्यांना आर्थिकदृष्ट्या परवडणारें नसतें. कार्यक्षम नोकरवर्गाचा अभाव हें एक कारण सोडलें तरी आणखीहि काही उणिवा दिसून येतात. निरनिराळ्या प्रकारच्या सोसायट्यांच्या कामात एकसूत्रता नाही. एकाच क्षेत्रात अनेक सोसायट्या काम करीत असल्यानें अनिष्ट स्पर्धा निर्माण होते जसजसा अधिक अनुभव येत जाईल त्याप्रमाणात या अडचणींचें निवारण होत जाईल अशी अपेक्षा आहे. आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होतील अशाच सोसायट्या स्थापन व्हाव्या यासाठी काही नियम घालून देण्याची नितांत आवश्यकता आहे अशी सूचना करावीशी वाटते

राज्य सहकारी बँकांची आर्थिक स्थिति चांगलीच भक्कम आहे. या बँकांचें निम्म्याहून अधिक शेअर भांडवल राज्य सरकारानी भरपाई केलेलें असतें. यामुळें इतर ठिकाणाहून मोठाल्या रकमा उसनवारी घेणें किंवा ठेवी आकृष्ट करणें त्यांना सहज शक्य होतें. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचेंहि तसेंच आहे. त्यांच्या शेअर भांडवलातील बराच मोठा भाग, राज्य सरकारानी घेतलेला असल्यानें, उसनवारीची त्यांची कुवतहि वाढलेली आहे. या उलट प्राथमिक सहकारी सोसायट्यांना मात्र, बव्हंशी सभासदाकडून जमा होणाऱ्या शेअर भांडवलावरच विसंबून राहावें लागतें. त्यांच्या आधारावरच या सोसायट्या उसनवारी करूं शकतात व कर्जें देऊं शकतात सहकारी सोसायट्यांच्या शेअर भांडवलात मोठी रक्कम गुंतविणें हे छोट्या जमीन मालकाच्या आवाक्याबाहेरचें असतें त्यानें खरेदिलेल्या शेअर भांडवलानुसार त्याला सोसायटीकडून कर्ज मिळतें. यामुळें सोसायटीच्या कार्याचा व्याप वाढत नाही व ती आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होत नाही साहजिकच पूर्णवेळ काम करणारे नोकर नेमणें त्यांना शक्य होत नाही सहकारी चळवळीचें ग्रामीण विभागातील हें क्षेत्र योग्य रीतीनें संघटित झाले पाहिजे तसेंच त्याचें आर्थिक स्थैर्य सुदृढ असणें आवश्यक आहे. देशाच्या अर्थव्यवस्थेची ही एक मूलभूत गरज आहे. भारतात आज शेती व ग्रामीण विकासाच्या दृष्टीनें, ज्या विविध योजना कार्यान्वित करण्यात येत आहेत त्यांच्या फलस्वरूप, " कसवट " करणाऱ्या जमीन मालकाची परिस्थिति सुधारेल. असें झाल्यास साहजिकच प्राथमिक सहकारी सोसायट्यांना त्यांचा फायदा मिळून त्यांचें संघटन मजबूत होईल असा मला दृढ विश्वास वाटतो.

नियोजनामुळे, देशाचा जो द्रुतगतीनें आर्थिक विकास होत आहे त्याचा विचार करता, व्यापारी व सहकारी या दोन्ही प्रकारच्या बँकांचें भवितव्य उज्ज्वल आहे उद्योग व व्यापार या क्षेत्रासाठी व्यापारी बँकांना कार्य करावयाचें आहे तर शेती व कुटिरोद्योग हें सहकारी बँकांचें कार्यक्षेत्र आहे विकसनशील अर्थव्यवस्थेंत या दोन्ही प्रकारच्या बँकांचा उत्तरोत्तर उत्कर्ष होणें आवश्यक आहे याचें कारण असें की, शेती तसेंच उद्योग व व्यापार हें सर्व एकमेकांवर अवलंबून आहेत एकाची वाढ होण्यावरच दुसऱ्याचा विकास व प्रगति अवलंबून आहे

★★★








# भारतांतील सहकारी बँका व व्यापारी बँका आणि त्यांची भूमिका

हाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह बँकेचा जो सुवर्णमहोत्सव साजरा झाला त्याचें महत्त्व अशा करितां की, त्यावरून केवळ महाराष्ट्रांतीलच नव्हे तर सर्वसाधारणपणे सबंध देशातील सहकारी बँकाचा इतिहास व त्याची प्रगति याची कल्पना येते. या बँकेच्या आतांपर्यंतच्या कामावरून तिनें गेल्या ५० वर्षांत, राज्यातील सहकारी चळवळीच्या प्रगतीच्या क्षेत्रात कोणती महत्त्वाची भूमिका बजावली आणि तिनें राज्याच्या सर्वसाधारण आर्थिक व औद्योगिक विकासाला कितपत हातभार लावला याची माहिती होते. आज निरनिराळ्या राज्यांच्या सहकारी संघटनांमध्यें, ही एक सर्वांत मोठी अशी अग्रगण्य संस्था असून तिचें खेळतें भांडवल ५० कोटींच्या वर आहे. तिच्याशी संलग्न झालेल्या मध्यवर्ती सहकारी बँकांना तर ती लागणारे भांडवल साधारणपणें पुरवतेच, शिवाय महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्यांच्या वाढीला व विकासाला हातभार लावण्याची महत्त्वाची भूमिकाहि तिनें दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत बजावली आहे सहकारी साखर कारखानदारी, हें महाराष्ट्र राज्यातील सहकारी चळवळीचें मौलिक लेणें होय या व्यतिरिक्त, या बँकेनें, भात गिरण्या, तेलाच्या घाण्या, सूत कातण्याच्या गिरण्या वगैरे विविध प्रकारच्या प्रारंभिक स्वरूपाच्या सहकारी संस्था स्थापन करण्याच्या कार्यांत मदत दिली आहे या बँकेचे जें कार्यक्षेत्र आहे, त्याच्या उन्नतीसाठीं तिनें जी विविध प्रकारची मदत केली त्यामुळें राज्याच्या आर्थिक विकासामध्यें एक परिणामकारक संघटना म्हणून तिची उपयुक्तता सिद्ध झालेली आहे महाराष्ट्र सहकारी बँकेचा सुवर्णमहोत्सव नुकताच साजरा झाला अशावेळी सहकारी राज्य बँकाच्या विकासाला केवढे मोठें कार्यक्षेत्र उपलब्ध आहे, ह्या गोष्टीवर लक्ष केंद्रित करणें योग्य व सयुक्तिकच ठरेल तसेंच देशातील बँकांची जी एकदर रचना व कार्य पद्धति आहे त्यामध्यें व्यापारी बँकाच्या संदर्भात, सहकारी बँकाची भूमिका काय रहाणार आहे, त्याची वस्तुनिष्ठ पहाणी करणें देखील उचित ठरेल.

प्रस्तुत लेखाचा मुख्य उद्देश हा आहे की, सहकारी व व्यापारी बँकांच्या पतीची ( Credit ) वैशिष्ट्यें कोणती, तें ठोकळ मानानें, दिग्दर्शित करणें; या दोन्ही जातींच्या बँकांच्या कार्यक्षेत्रात, त्यांना जें सध्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे, त्याचे मूल्यमापन करणें; या दोन्ही कार्यपद्धति ज्या परिस्थितीत काम करतात, तिचा आढावा घेऊन त्यांची एक-



दर कार्यपद्धति कितपत स्पर्धेच्या अगर सहकार्याच्या स्वरूपाची आहे, याचें सापेक्ष स्वरुप ठरवून जर वस्तुनिष्ठ परिशीलन केलें, तर नियोजनाच्या गरजांप्रमाणें, भांडवल उपलब्ध करून देण्याच्या कार्य पद्धतींची पुनर्घटना करण्यास मदत होईल. आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें ह्या कामाचें महत्त्व फार मोठें आहे. अर्थपुरवठा करणाऱ्या संस्थांच्या संघटणाची एकमेकाला पूरक अशी वाढ होणें आवश्यक असते. कारण अर्थव्यवस्थेमध्यें जी आज बचतीच्या बाजूला वाढ होऊन राहिली आहे, तिच्या सर्व महत्त्वाच्या क्षेत्रात या संस्था आज कार्य करीत आहेत. तेव्हा जी बचत झालेली असेल, ती किफायत-शीर अशा गोष्टीत गुंतविणें व त्या दिशेनें, तें भांडवल खेळतें ठेवणें या गोष्टीची निकड आज निर्माण झाली आहे. भारतासारख्या विशाल देशात, व्यक्तिगत व संस्थाप्रधान स्वरूपाच्या दोन्ही प्रकारच्या ग्रामीण संस्था आहेत तसेंच संघटित संस्था देखील आहेत. मात्र बँकेच्या क्षेत्रा-तील संस्था, आधुनिक पद्धतीनें विकसित झालेल्या आहेत. सहकारी बँका आणि व्यापारी बँका या दोन्ही, जरी निरनिराळ्या कायदेशीर व्यवस्थेखाली काम करीत असल्या व त्याच्या संस्थांचे स्वरूप जरी वेगळें असले तरी प्रत्यक्ष कार्याच्या क्षेत्रात, दोन्ही पद्धतींमध्यें निश्चितच एक साम्य आहे. तसेंच काही बाबतीत त्यांचे कार्यक्षेत्र देखील एकच आहे शिवाय या दोन्ही संस्थांच्या कार्यपद्धतीचे नियंत्रण नि निरीक्षण राष्ट्रीय बँक, ' रिझर्व्ह बँक ऑफ् इंडिया ' ही एकच संस्था करीत असते.

या शतकाच्या सुरुवातीच्या काळांत, सहकारी चळवळीची आवश्यकता तीव्रतेनें जाणवायला लागली. कारण खेड्यापाड्यातून रहाणारा बहु-जन समाज हा दारिद्र्यानें गांजलेला व कर्जानें कुजलेला असा होता. त्याला त्या खोल गर्तेतून वर काढून त्याच्या प्रगतीसाठीं उत्तेजक कार्य करण्याची आवश्यकता होती तें काम सहकारी चळवळीनें केलें. तेव्हा तिचे मूळ या समस्येत आहे.

सहकारी चळवळीला प्रारंभ झाला तो काटकसर व स्वावलंबनाच्या तत्त्वाला धरून ! तिच्या सभासदांची, जी थोडीबहुत बचत होत असे ती एकत्र करणें व त्याच्या सामाजिक व आर्थिक गरजा पुरविण्यासाठी ती उपलब्ध करून देणें हाच या चळवळीचा हा लक्ष बिंदू होता सारांश-रूपानें सांगावयाचे म्हणजे सहकारी चळवळ ही मूलत च स्वयस्फूर्त व सुपीच्या सौद्याच्या स्वरूपाची होती तिचे जे सुरुवातीचे प्रवर्तक होते त्यांनी सहकारी तत्त्वाच्या कल्पनेचा प्रसार करण्यासाठी अविश्रात मेह-नत घेतली. त्याकरिता त्यांनीं बचत पेढ्या, व पतपेढ्या काढल्या, रकम कर्जाऊ देणें, परस्पराचा विश्वास संपादन करणें व सामु-दायिक जबाबदारीची भावना जागृत करणें, या गोष्टीवर विशेष भर देण्यात आला. तथापि ही चळवळ पुढें जसजशी फोफावत व पसरत गेली तसतसें तिचे स्वरूप मूळ उद्दिष्टापासून अजिबात वेगळें बनलें. तथापि ती बहुतांशी कर्जाऊ रक्कम देणारी अशीच चळवळ अद्यापहि राहिली आहे व ती खेड्यापाड्यातून कार्य करीत आहे. थोड्या प्रमाणात का होईना, या सहकारी संस्थांनी इतर कार्यक्षेत्रात देखील पदार्पण केलें आहे, अथवा इतरांशीं सहकार्य आरंभिलें आहे हीं कार्यक्षेत्रें म्हणजे नागरी बँका, सहकारी खरेदी विक्री, गिऱ्हाईकांच्या संस्था, सभासदांना बाजारपेठा मिळवून देणें, छोटे उद्योगधंदे, गृहनिर्माण वगैरे, ह्या चळ वळीचा जो एवढा प्रसार झाला त्याचे श्रेय बहुतांशी अधिकारीवर्गाला दिलें पाहिजे. स्वातंत्र्योत्तर काळांत, सहकारी चळवळीची पुनर्रचना, गेल्या अर्ध्या शतकांतील अनुभवाच्या संदर्भांत आणि नियोजनाच्या क्षेत्रातील भविष्य काळातील अनुसंधानात होणें अपरिहार्य होतें. कारण त्या वेळची पद्धति खेड्यापाड्यांतून भांडवल पुरविण्याच्या व तेथील गरजा भागविण्याच्या दृष्टीनें अगदीच अपुरी असल्याचें, परिशीलनानें आढळून आलें. कारण खेड्यापाड्यातून ज्या आर्थिक मदतीची आव-श्यकता होती, त्यापैकी अवघी ३ टक्के मागणीच या सहकारी संस्था पुरी पाडू शकत असल्याचें निदर्शनास आलें.

'रूरल क्रेडिट सर्व्हे रिपोर्ट (१९५४) च्या अहवालात, ज्या शिफारशी करण्यात आल्या त्याचा मुख्य उद्देश, शेतकऱ्यांना कर्जाऊ रकम देण्याची जी सर्वसंयोग साधणारी पद्धति आहे, तिच्या द्वारे सहकारी संस्था या अत्यंत प्रभावी अशा संस्था बनवायच्या असें नमूद करण्यात आलें आहे. हा दृष्टिकोण लक्षात ठेवून त्याबाबतच्या सर्व योजना द्वितीय पंच-वार्षिक योजनेत अंतर्भूत करण्यात आल्या होत्या राष्ट्रीय नियोजनामध्यें, सहकारी चळवळीच्या विकासाला किती महत्त्व देण्यात आलें होतें याची कल्पना दोन पंचवार्षिक योजनांत, त्या प्रित्यर्थ अपेक्षित असलेल्या खर्चा-वरून येऊ शकेल. पहिल्या पंचवार्षिक योजनेंत ती रक्कम रु. ७ कोटी ११ लक्ष रुपये होती तर दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ती ४७ कोटी होती. शेतकऱ्यांना द्यावयाच्या कर्जाच्या वाटपाचे लक्ष्य पंचवार्षिक योजनेंत पुढीलप्रमाणें होतें; अल्प मुदतीचे १ अब्ज ५० कोटी, मध्यम मुदतीचे रु ५० कोटी आणि दीर्घ मुदतीचे रु. २५ कोटी थोडक्यात सांगावयाचे म्हणजे तीन महत्वाच्या तत्त्वावर शेतकऱ्याच्या कर्जाच्या पायाची उभा-रणी करण्याचे स्पष्ट चित्र, योजनेमध्यें मांडण्यात झालें. ती तत्वें म्हणजे कर्ज देण्याच्या निरनिराळ्या अवस्थामध्यें सरकारी भागीदारी, खरेदी-विक्री व संस्करण संस्था यासारख्या आर्थिक व्यवहारात आणि कर्जाच्या संबंधात संपूर्ण समन्वय साधणें, आणि खेड्यातील जनतेच्या गरजा लक्षात घेऊन त्या भागविण्याच्या दृष्टीनें तिला साथ देऊ शकेल अशा पुरेशा कुशल नोकरवर्गाच्या हाती हा सारा कारभार सोपविणें. म्हणजे जी सहकारी चळवळ व्यक्तिगत स्वावलंबनाच्या तत्वावर आधारलेली, स्वयस्फूर्त व सुपीच्या सहकार्याची अशी चळवळ व्हावी, अशी अपेक्षा होती व त्यादृष्टीनेंच, तिचे लालनपालन सरकारनें सुरुवातीच्या काळात केलें, इतकेंच नव्हे तर ती जणू सरकारी चळवळ आहे या भूमिके-वरून तिचे संगोपन करण्यात आलें. परिणामी, आज तिला शेवटी बँकींगच्या क्षेत्रात, सरकार पुरस्कृत व सरकारी भागीदारीच्या संस्थेचे स्वरूप प्राप्त झालें आहे

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेंत असें नमूद केलें आहे की, " सार्वजनिक उद्योगधंदे व खाजगी उद्योगधंदे यांची आज वाढ होऊन राहिली आहे. यापैकी खाजगी उद्योगधंदे, हे सर्व समाजाच्या हिताच्या दृष्टीनें चाल-विले जातात अशा वेळी ज्या गोष्टी सहकाराच्या तत्त्वावर संघटित

केलेल्या असतील त्यांच्या विशिष्ट क्षेत्राच्या पलिकडेहि सहकाराचा प्रभाव पडत असल्याचें आढळून येते, जेणेंकरून सामाजिक जीवन व राष्ट्रीय अर्थव्यवस्था याच्यामध्यें एक प्रकारचा समतोलपणा साधण्यास मदत होते. त्याना योग्य दिशा मिळते आणि त्याचे महत्व सिद्ध होतें. वस्तुत: सहकारी बँकेच्या पद्धतीमध्ये केवळ कर्जाऊ रकम देणे एवढीच महत्त्वाची बाब नाहीं, तर त्यापेक्षाहि अधिक महत्त्वाची अशी कामगिरी पार पाडण्याची जबाबदारी तिच्याकडून अपेक्षिली जाते आणि म्हणून सहकारी बँकिंगच्या पद्धतीला विशेष महत्त्वाचे असे स्थान प्राप्त झालें आहे. अशा पद्धतींच्या गुणवत्तेसंबधी चर्चा न करता, सर्वसाधारणपणें आपणाला असें म्हणता येईल की सहकारी बँकिंगच्या पद्धतीशी व्यापारी बँकांचे स्वरूप व त्यांचें कार्य याची तुलना करताना, अुपरनिर्दिष्ट मूलभूत फरक लक्षांत घेणें आवश्यक आहे

पहिल्या दोन पंचवार्षिक योजनाच्या काळात, शेतकऱ्याच्या प्राथमिक सहकारी पतपेढयाच्या सभासदांची सख्या ४४ लक्षावरून १-कोटी ८० लक्षापर्यंत वाढली. म्हणजे शेतकऱ्याच्या लोकसख्येच्या प्रमाणांत ३६ टक्के वाढली. या पतपेढयानी, त्या मुदतीत दिलेलें एकूण कर्ज २३ कोटीवरून दोन अब्ज रुपयापर्यंत वाढलें आहे तिसऱ्या पचवार्षिक योजनेंत, सहकारी पतपेढयांच्या सभासदांची सख्या ३ कोटी ७० लक्षापर्यंत वाढविण्याचें निश्चित करण्यात आले आहे. म्हणजे शेतकरी लोकसख्येमध्यें हें प्रमाण ६० टक्के आहे अल्पमुदतीचे व मध्यम मुदतीचे एकूण कर्ज ५० अब्ज ३० कोटीपर्यंत वाढण्याचा सभव आहे व लाब मुदतीचे कर्ज १ अब्ज ५० कोटीपर्यंत वाढेल अशी अपेक्षा आहे. सहकारी बँकांना हा जो भक्कम पाया प्राप्त झाला आहे व त्याचे भाडवल व अनामत रवकम, यामध्यें जी एवढी सुधारणा झालेली दिसते आहे याचे कारण त्याचें संघटित नियोजन होय. हें वैशिष्टय व्यापारी बँकाच्या क्षेत्रात आढळणार नाही व्यापारी बँकाना, काही स्थायी स्वरूपाचे कायदेकानू लागू करण्यात आले आहेत, त्याना निर्धारित तत्वानुसार, क्रमप्राप्त परिस्थितीतच काम करावें लागतें. आणि सहकारी बँकाना ज्या स्वरूपाची मदत सरकारकडून मिळते तशी काही, व्यापारी बँकाना मिळत नाही.

आज सहकारी बँकाचे जें घटक स्वरूप आहे त्यामध्यें, कर्ज देणें हीच मुख्य बाब या घटकेपर्यंत आहे. सस्था म्हणून त्याची जी वाढ झाली आहे तिचें स्वरूप एकीकरणाचें आहे म्हणजे प्रत्येक राज्यात अग्रभागी मुख्य सहकारी बँक, जिल्ह्याच्या अगर मध्यम पातळींवरील मध्यवर्ती सहकारी बँका व खेडयाच्या पातळीवरील प्राथमिक स्वरूपाच्या शेतकरी पतपेढया असे हें एकत्रीकरणाचें ( Federal ) स्वरूप आहे. ज्या पद्धतीचें कर्ज या बँका देतात त्यावरून त्याचें स्वरूप ठरविण्यात येतें; उदाहरणार्थ, अल्प मुदतीचे व मध्यम मुदतीचे शेतीचे भाडवल. लांब मुदतीचे कर्ज देण्यासाठी ' सहकारी जमीन गहाणवट बँका ' सारख्या खास सस्था आहेत. आणि जेथें बिगर शेती सहकारी बँकाच्या घटक स्वरूपाचा प्रश्न येतो तेथें प्राथमिक पातळीवरील गरजा लहानमोठी गांवें व शहरे यामधील नागरी बँका अगर इतर प्रकारच्या सहकारी पतपेढया भागवितात. शेतकऱ्याच्या पतपेढया, जिल्हा पातळीवरील व केंद्राच्या ठिकाणच्या घटक सहकारी बँकाशी संलग्न असतात (१) सरकारी मदत, (२) रिझर्व्ह बँक ऑफ् इंडियाची मदत व (३) स्टेट बँक ऑफ् इंडियाची मदत. या सहकारी बँकाच्या घटनात्मक स्वरूपामधील महत्त्वाचे दुवे होत. त्यावरून त्याचे सस्थात्मक स्वरूप सुस्पष्टपणें दिग्दर्शित होत आहे.

सहकारी चळवळीच्या विकासाच्या कार्यात, सरकारने बजावलेली भूमिका, ही आरंभापासूनच अत्यंत महत्त्वाची बाब मानली गेली आहे. युद्धोत्तर काळात तर सहकारी चळवळीचे महत्त्व विशेषच वाढले. शेतकऱ्यांच्या पतपेढयाचे जे अलिकडचे सयोगात्मक स्वरूप आहे तेंच तर सहकारी चळवळीच्या विकासाचा पाया होय. अशा चळवळींचा कारभार चालण्यास मदत करणें हें तर सरकारचे कर्तव्य आहेच, परंतु अशा संस्थाच्या भाडवलाच्या उभारणीत, निरनिराळया पातळीवरून, सरकारने मदत करावी अशीहि अपेक्षा केली जाते. हेतु हा की, सरकारनें अशा संस्थाना आर्थिक मदत करावी व त्याचा कारभार व्यवस्थित चालविण्यास त्याना जरूर तें सहाय्य करावे सरकार या बँकाना शेअरच्या रूपानें भाडवल, कर्ज, अनुदान व आर्थिक मदत देऊन सहाय्य करतें. सहकारी पतपेढयाच्या विकासाच्या बाबतीतील जबाबदारी, राष्ट्रीय पातळीवर रिझर्व्ह बँक ऑफ् इंडियाच्या कक्षेत मोडते आणि सहकारी मार्केटिंग, वहातूक वगैरेचा विकास साधणें ही भारत सरकारच्या कक्षेतील बाब ठरते. आणि " नॅशनल को-ऑपरेटिव्ह डेव्हलपमेंट अँन्ड वेअरहाऊसिंग बोर्ड" याच्या सहकार्यानें भारत सरकार आवश्यक तें सहाय्य करीत असतें. १९५५ साली रिझर्व्ह बँकेच्या कायद्यात दुरुस्ती करण्यात आली. त्या दुरुस्ती अन्वयें पुढील गोष्टी साध्य झाल्या (१) राष्ट्रीय शेतकी पतपेढी (लाब मुदतीचें कर्ज देणारी) तिच्यासाठी निधी निर्माण करण्यात आला हा निधी, राज्य सरकाराना लाब मुदतीचे कर्ज देण्यासाठी उपयोगी पडतो या कर्जांतून राज्य सरकारें सहकारी पतपेढयाचे भांडवली शेअर विकत घेतात. आणि (२) राष्ट्रीय शेतकी पतपेढी ( Stablization ) निधी : हा निधी राज्यातील सहकारी बँकाना देण्यास उपयोगी पडतो. त्यामधून या बँका मध्यम मुदतीची कर्जें, व रिझर्व्ह बँकेचें लांब मुदतीचे देणें भागवितात नाहीतर प्राप्त परिस्थितीत, या बँकाना या कर्जाची फेड, अवर्षण, दुष्काळ, व इतर नैसर्गिक आपत्ती यामुळें करता येत नाही. यावरून असें दिसून येईल की, सहकारी चळवळीच्या प्रगतीमध्यें, रिझर्व्ह बँकेची भूमिका ही सुरुवातीपासूनच निश्चित स्वरूपाची आहे सहकारी चळवळीचा अधिक विकास साधण्यासाठी या बँकेला विशेष व्यापक स्वरूपाचे अधिकार व सवलती देण्यात आल्या आहेत. आणि ती सहकाराच्या क्षेत्रात, नेहमीच निधी पुरविण्याची आपली भूमिका पार पाडीत असते सहकारी बँकेच्या पद्धतीमध्यें, त्याचे खेळतें भाडवल व भाडवली स्वरूप याचे पृथ. करण केलें, तर आपल्याला असें आढळून येईल की, त्याचे खेळतें भाडवल:– विशेषेंकरून शेती सस्थाचें– साधारणत. भाग भाडवल, राखीव निधी व उसनवारी– या रूपात उभारण्यात आलेलें असतें. ठेवीचें खेळत्या भांडवलाशी प्रमाण

सहकारी बँका, बँकिंग युनियन्स (Banking unions) व औद्योगिक सहकारी बँका यांच्यामध्यें ठेवी. म्हणून जमा झालेली एकूण रक्कम १९५ कोटी रुपये आहे. उलटपक्षी व्यापारी बँकामधील (शेड्युल्ड व नॉन् शेड्युल्ड) ठेवींची रक्कम १९६० सालीं २ हजार १ (२००१ कोटी) कोटी रुपये होती' समाजांत बचत करण्याची सवय रुजत चाललेली आहे ती शिल्लक पडणारा पैसा, ठेवींच्या स्वरूपांत संकलित करून एकत्रित आणण्याकरिता आवश्यक ती साधनें व विश्वासार्ह व्यवस्था व्यापारी बँका जवळ आज उपलब्ध आहे.

व्यापारी बँकाचा व्याजाचा दर हा सहकारी बँकाच्या दरापेक्षा जास्त आकर्षक असतो. सहकारी बँकाना ठरलेल्या दराच्या कक्षेबाहेर जाता येत नाही. हा दर जें कर्ज दिले असेल व ऋणकोची पत असेल त्याच्या अनुषगाने ठरविण्यात आलेला असतो.

ग्रामीण अर्थव्यवस्थेमध्यें, सहकारी बँकांचें स्वत चे असे विशेष महत्व आहे. म्हणून ज्या ठिकाणी सहकारी बँका व्यवहार करतात, त्या ठिकाणी इतर बँकाना व्यवहार करण्यास अथवा आपले कार्यक्षेत्र वाढविण्यास प्रतिबंध असू नये. आज सहकारी बँकाना जी आर्थिक मदत मिळते, ती लक्षांत घेता व सध्याच्या विकसनशील स्थितीत अशी मदत अपरिहार्यहि आहे, हें ध्यानात घेता, बँकावरील खर्च नेहमीच जबरजस्त राहील. व त्याचा बोजा जनतेवर पडेल. अर्थात् अशा बँकाचे कार्यक्षेत्र नवविकसित अशा क्षेत्रात जलद गतीने पसरलें नाही व तेथें सुयोग्य अशा मदतीची उपलब्ध करून देण्यात आल्या नाहीत तरच हा जनतेवरील बोजा समवतो. बँकाची विभागणी, भारतामध्यें सर्व ठिकाणी अद्यापपावेतो विषम स्वरूपाची आहे. ५०५६ कचेऱ्यापैकी २१९४ कचेऱ्या एकट्या दक्षिण विभागांत आहेत. बहुतेक कचेऱ्या ५०,००० लोकवस्तीच्याच भागात आहेत. यावरुन असे दिसून येतें की, केवळ सहकारी संस्थाच कमी लोकवस्तीच्या क्षेत्रातील लोकाच्या गरजा भागवू शकत नाहीत. आणि व्यापारी बँकानीं आपल्या शाखांच्या विस्तारानें आणि अन्य हितकर मार्गांनी आपलें कार्यक्षेत्र वाढविण्याकरिता, महत्वाची भूमिका बजावणे, अगत्याचे असून इष्टप्रद आहे. जेव्हा बँका नविन कचेऱ्या उघडण्यासाठी परवानगी मागतात तेव्हा त्याच्या अर्जांचा विचार करताना, ही वस्तुस्थिति स्पष्टपणे लक्षात घेतली पाहिजे. आपण अशी आशा करूं या की, जेथें कोणत्याहि प्रकारची बँक नाही, त्या ठिकाणी बँक उघडण्यास परवानगी नाकारताना कोणत्याहि प्रकारचा भेदभाव व पक्षपात मारक ठरता कामा नये. १९६० साली ज्या ठिकाणी कोणतीहि बँक नाही, अशा २१ ठिकाणी नवीन कचेऱ्या उघडण्यास परवानगी नाकारण्यात आली. तेव्हा ज्या ठिकाणी, व ज्या क्षेत्रात, कोणत्याहि प्रकारची बँकिंगची व्यवस्था नाही, तेथील लोकसंख्या व प्रगत विकासाची शक्यता यांची पहाणी रिझर्व्ह बँकेने करावी व अशा ठिकाणी व्यापारी बँकाना आपला पसारा माडण्यास उत्तेजन द्यावें.

सहकारी बँकाची महत्त्वाची कार्यें कोणती आहेत, हे व्यापारी बँकानी लक्षात घेतले, तर त्या ग्रामीण विभागाची सेवा उत्तम प्रकारे करू शकतील, इतकेच नव्हे तर, सहकारी बँकाच्या वाढीसाठी परिणामकारकरित्या सहाय्यकहि ठरतील कार्यक्षेत्राच्या काही विभागात, सहकारी बँका आपलें उत्पन्न वाढविण्यासाठी व्यापारी बँकांकडे पाहू शकतील. तेव्हा ह्याबाबतीत आज ज्या सवलती स्टेट बँकेला मिळतात त्याच शेड्यूल्ड बँकाना देखील देण्यात आल्या म्हणजे एका बाजूला सहकारी बँका व दुसऱ्या बाजूला व्यापारी बँका याच्या कार्यक्षेत्रातील रेषा स्पष्ट होईल. भारताच्या अत्यत विकसनशील अर्थव्यवस्थेमध्यें, निरनिराळ्या प्रकारच्या सहकारी पतपेढ्याची गरज आहे. आणि या मधून पतपेढीचें जे अंतिम स्वरुप साकार होईल त्याचा उपयोग सहकारी आणि व्यापारी बँकाना आपलें कार्यक्षेत्र वाढविण्याच्या दृष्टीनें परस्परपूरक व हितप्रद होईल असा आत्मविश्वास वाटतो ! ★ ★



" मूल्यानुसार आंखणी , व्यवहारी बंठक व जागरुकता हे सहकारी चळवळीचे आधारस्तंभ होय. "

महसूल मंत्री वसतराव नाईक
१९ एप्रिल १९५९ यवतमाळ

• • •

" सहकारी चळवळ ही खऱ्या अर्थानें जनताभिमुख चळवळ झाली पाहिजे सरकार सहकारी चळवळीस केवळ सल्ला व मार्गदर्शन करील पण सर्व सहकारी संस्था ह्या स्वयचलित असल्या पाहिजेत तरच ती सहकारी चळवळ होईल. अन्यथा ती सरकारी चळवळ ठरेल "

श्री. एल्. एन् बोंगीरवार
रजिस्ट्रार सहकारी खाते.
२५ फेब्रुआरी १९६२ कोल्हापूर







# ALLOW PASSENGERS TO ALIGHT BEFORE YOU ENTRAIN



CENTRAL RAILWAY

























या शतकाच्या सुरुवातीला, सहकारी चळवळीची आवश्यकता तीव्रतेनें जाणवावयास लागली होती. आपल्या देशांतील, खेड्यापाड्यांतून राहणारा बहुजन समाज, ज्याचा मुख्य व्यवसाय " शेती " होता; हा ' सावकारी पाशांत ' सांपडून दारिद्र्यानें गांजलेला व कर्जानें कुजलेला असा कमालीचा कमकुवत व हीनदिन अवस्थेंत होता. त्याला ह्या खोल गर्तेतून वर काढून, प्रगतीसाठीं, उत्तेजक कार्य करण्याची नितांत निकड होती. सहकारी चळवळीनें हें कार्य केलें. शेतकऱ्याला योग्य समयीं पतपुरवठा करणें, जेणें करून तो कृषिउत्पादन समर्थपणें करूं शकेल, हेंच त्यावेळीं, सहकारी चळवळीचें प्रमुख उद्दिष्ट होतें. सहकारी बँकांचा उगम ह्या समस्येंतून झाला आहे. आज ह्या जिल्हा सहकारी बँका, शेतकऱ्याला निव्वळ शेतीसाठींच पतपुरवठा करीत नाहींत, तर तो समृद्ध, व समर्थ व्हावा यासाठीं सर्व प्रकारें त्याला मदत करण्यांस प्रयत्नशील असल्यानें त्या ग्रामीण विकासाच्या सूत्रधार, म्हणून सार्थ्या गौरविल्या जातात आणि श्रद्धाळू मानवाच्या जीवनात "मंदिरांना" जें महत्त्व असतें, तेंच स्थान जिल्हा सहकारी बँकांनी, अर्थजीवनांत, प्राप्त करून घेतलें आहे. शेतकऱ्याच्या समृद्धी सिद्धीची ही मंदिरेच होत ! ह्या "सहकार मंदिरां" चें हें सम्यक् दर्शन !



# सहकार मंदिरे

गीत गौरी

सहकार आजचा युगधर्म आहे.

★

सहकार म्हणजे भावना व बुद्धी,
प्रेरणा नि धारणा यांचा सुखद समन्वय !

★

विविध विचारांचा सुखद विवाद म्हणजेच सहकार.

★

समता, सद्‌भाव व सहिष्णुता यांचा समन्वय म्हणजेच सहकार.

★

सहकार म्हणजे लोकशाही जीवनाचा कळस.

★

खेड्यांची प्रगति म्हणजेच भारताची प्रगति.
या दोहोंच्या विकासाचा सोपान, सहकार होय.

★

नीति हें सामाजिक तत्व सहकाराचें अपत्य आहे.

★

एकी हा वर ! एकी हेंची वळ !!
बेकी हा शाप ! बेकी करी दुर्बळ !!

★

"सहकार हाच लोकशाही समाजवाद असून धर्मनिष्ठेनें त्याचें आचरण झालें पाहिजे".

★

आर्थिक, राजकीय व सामाजिक विषमता कमी करण्याचा लोकशाही मार्ग म्हणजेच सहकार होय

★

सर्वांच्या हितासाठी, सर्वांच्या सहकार्यानें उभारण्यात आलेलें संघटन म्हणजेच सहकारी आंदोलन.




## भंडारा को-ऑपरेटिव्ह बँक लि.
## भंडारा
(स्थापना १९११)



श्री. जे. एस्. सुभेदार

"सहकारी चळवळीचें कार्य तसे आर्थिक असले तरी ते आध्यात्मिक पण आहे. १९११ साली गरीबासाठी सहानुभूति वाटून येथील कांही चांगल्या मंडळींनी या बँकेची सुरुवात केली. तिची आजची प्रगति डोळ्यात भरण्याजोगी व खरोखरच कौतुकास्पद आहे. या बँकेची झालेली प्रगति ही, भंडारा जिल्ह्यात झालेल्या प्रगतीचा आलेख आहे." सहकारमंत्री श्री. भारदे यांनी बँकेच्या सुवर्णमहोत्सवप्रसंगी काढलेले वरील उद्गार १९०४ च्या सहकारी कायद्यानुसार १९१०-१९११ साली नोंदल्या गेलेल्या या बँकेच्या कार्याचे शिफारसपत्रच होय. प्राथमिक सहकारी पतपेढ्यांच्या, सभासद कास्तकारांच्या, शेतीगरजा भागविण्यासाठी ही बँक स्थापन झाली. कै. श्री. वझलवार हे बँकेचे पहिले अध्यक्ष होत. ५० वर्षांपूर्वी ५-७ हजारांचे कर्ज शेतकऱ्यांना देणारी ही बँक आज दीड कोटी रकमेपर्यंत कर्ज देऊ शकते व इतके कर्ज घेण्याची पत, या जिल्ह्यातील खालच्या पातळीतील लोकांची झाली आहे, हें प्रगतीचेच गमक होय. प्रथमत या बँकेचे कार्यक्षेत्र भंडारा तालुक्यापुरतेच मर्यादित होते हळूहळू बँकेचा उत्कर्ष होऊं लागला आणि तिच्या सतत प्रयत्नांना यशाची फळें लागून आज तिच्या आठ शाखा असून त्याद्वारें शेतकऱ्यांची व बँकिंगचा व्यवसाय करून, व्यापारी-वर्गाची सेवा ही बँक करीत आहे आपल्या जिल्ह्यातील औद्योगिक सहकार यशस्वी करण्याच्या दृष्टीने, ही बँक जिल्ह्यातील बहुतेक संस्थांना कर्ज पुरवीत आली असून भात शेतीच्या प्रायोगिक योजनेला तिनें केलेल्या सहाय्याचा अभिमानास्पद निर्देश केला पाहिजे कारण त्यामुळेच भंडारा जिल्ह्याला 'पॅकेज-प्लॅन' लागू करण्यात आला बँकेच्या या नेत्रदीपक यशाचे श्रेय १४ वर्षें बँकेचे आजपर्यंत अविरोध निवडून आलेले निस्वार्थी, कष्टाळू, निरलस, कार्यकुशल अध्यक्ष, भंडारा जिल्ह्याचे सहकारमहर्षि श्री. अण्णासाहेब सुभेदार यांना आहे. आजहि वयाची साठी उलटली असताहि, एखाद्या तरुणाला लाजवतील अशा उत्साहाने अण्णासाहेबांना काम करताना पाहून, त्यांच्या सहकारी संचालकमंडळ सदस्यांच्या सहकारानें, या बँकेच्या प्रगतीभास्कराचा रथ असाच पुढें जात राहील हे निःसंशय !






## दि. वर्धा सहकारी मध्यवर्ति बँक, लि. वर्धा

(स्थापना १९१२)



श्री. डब्ल्यू. टी. वसू

आर्थिक स्वराज्य मिळविण्याचा पाया सहकारी चळवळ होय. या चळवळीचे बाबतीत, लोकांचा विश्वास संपादन करून, ती प्रत्येक स्तरात पोहोचविली तरच आर्थिक स्थैर्य प्राप्त होईल. जिल्ह्यातील सहकारी चळवळ व तिनें त्या विभागांत केलेल्या प्रगतीच्या मोजमापाचे यन्त्र त्या त्या जिल्ह्यातील सहकारी बँक होय ! आजकाल सहकारी चळवळीत काम करण्याची अभिलाषा अनेकजण बाळगतांना आढळून येतात. पण त्यासाठी स्वार्थ न बाळगण्याचा दृष्टिकोण, या व्यक्तींनी कटाक्षानें पाळला पाहिजे. त्या शिवाय चळवळीची पत आणि शान वाढणार नाही. हा संकेत ज्यांनी आपल्या जीवनआत्मा मानला आहे ते श्री वामनरावजी वसू हे या बँकेचे गेलीं २५ वर्षें सतत अध्यक्ष आहेत. वर्धा जिल्ह्यातील सहकारी चळवळीच्या इतिहासात वामनरावांचे नाव सदैव चिरस्मरणीय रहावें अशीच त्यांची कामगिरी आहे. त्यांचे या चळवळीशी इतके गाढ तादात्म्य आहे की, श्री.वामनरावजी शिवाय या जिल्ह्यांतील सहकारी चळवळीच्या प्रगतीचा विचार करणें अशक्यच होय. वामनरावजी विदर्भ सहकारी बोर्डाचे चेअरमन, महाराष्ट्र राज्य सहकारी युनियनचे सेक्रेटरी असून, महाराष्ट्रातील सहकारी कार्यक्षेत्रातील कर्तबगार नेत्यात त्यांची गणना होत असून, आपल्या कार्यामुळें ते मराठवाडा व महाराष्ट्रातहि अत्यंत अल्पावधीत लोकप्रिय झाले आहेत. वर्धा जिल्हा सहकारी बँकेचे कार्यसंचालन, वामनरावजींकडे १९३८ साली आलें तेव्हापासून बँकेचा कार्यकाल हा बँकेच्या वाढत्या प्रगतीचा इतिहास होय. १९३७ साली तिचे भाग भांडवल फक्त ५१ हजार रुपये होतें, तें आता ११ लाखाच्या वर आहे. खेळतें भांडवल २ लाख ६ होतें, तें आता १ कोटी रुपयाच्या वर आहे. ठेवी २ लक्ष होत्या त्या २६ लक्षावर आहेत ही प्रगति म्हणजे श्री. वामनरावजी वसू यांच्या निरलस व अविश्रांत श्रमाचे फळ होय. आपल्या कर्तबगार पित्याचा वारसा त्यांनी सार्वजनिक व राजकीय कार्यात धडाडीनें भाग घेऊन, त्यात एकसूत्रीपणासह सातत्य निर्माण करून अभिनंदनीयरित्या पुढें चालविला आहे. सुरवातीला या बँकेच्या फक्त आठ पतपेढ्या सभासद होत्या आज त्यांची एकूण सभासद संख्या हजाराच्या वर आहे तिच्या ५ शाखा असून १९३५ च्या आर्थिक मंदीनंतर शेतकऱ्यांचा विश्वास संपादन करण्याचें स्पृहणीय कार्य तिनें केलें आहे. कास्तकाराला कर्जमुक्त करण्याच्या अनेक योजना तिच्याजवळ उपलब्ध आहेत वामनरावजींच्या अनुभवाचें संचित, सहकारी चळवळीशीं त्यांचें झालेलें तादात्म्य, हेंच या बँकेच्या यशाची गुरु-किल्ली होय !




नागपूर सहकारी सेंट्रल
बँक लि.
नागपूर
(स्थापना १९१२)



श्री. एन्. के. देशमुख

जिल्हा सहकारी बँक ही सरकारच्या खालोखाल ग्रामीण विकासाची सूत्रधार आहे तेव्हां जिल्ह्याचे आर्थिक व सांस्कृतिक जीवन सुधारण्याचे काम या सहकारी बँकेचे ! या कसोटीला संपूर्णपणे उतरून जनतेच्या आदरास पात्र झालेल्या या बँकेनें नुकताच सुवर्णमहोत्सव साजरा केला हें तिनें केलेल्या प्रगतीचे व संपादलेल्या विश्वासाचे सुलक्षण होय या बँकेचा जन्म १९१२ साली झाला. तिचे पहिले अध्यक्ष कै. सर गंगाधरराव चिटणवीस आणि सेक्रेटरी कै. सर माधवराव देशपांडे हे होते. या बँकेचे हे मोठें सद्भाग्य होय की आरंभीच तिला अशा थोर लोकांचा हातभार लागला. काळ बदलत गेला सहकारी चळवळीचे लोण आता सर्वसामान्य लोकांपर्यंत पोहचू लागले आहे. त्यादृष्टीनें, कालमानानुसार या बँकेची सूत्रे सध्याचे अध्यक्ष डॉ. ना हृ देशमुख, उपाध्यक्ष, कॉर्पोरेटर श्री. मनोहरराव खोलकुटे, कार्यवाह श्री. कप्तान व सोनक या उत्साही, सहकारी चळवळीबद्दल आस्था बाळगणाऱ्या मंडळीकडे आली असल्यास ते स्वभाविकच होय. त्यांच्या कारकिर्दीत बँकेची उत्तरोत्तर अधिकाधिक प्रगति होईल हे निःसंशय. आज या बँकेच्या १० शाखा असून ३८४ चौरस मैल क्षेत्रफळ असलेला नागपूर जिल्हा हें संस्थेचे कार्यक्षेत्र झालें आहे. जिल्ह्यातील ६४००० शेतकरी कुटुंबापैकी ४५,००० कुटुंबांना निरनिराळ्या प्रकारे संस्थेची मदत मिळत आहे तसेच विणकर व अन्य औद्योगिक सहकारी संस्था यांच्या सभासदानाहि भरीव आर्थिक मदत होत आहे. विशेषेकरून सध्याच्या बागायतीसाठी या बँकेनें तत्परतेने जी मदत दिली तिच्याबद्दल शेतकरीवर्ग सदैव ऋणी आहे सुरवातीचे शेअर भांडवल १३००० रु होते तें आज २४ लाख आहे व रिझर्व्ह फंड १० लाख आहे अर्थात् ही प्रगति करताना संस्थेला अडचणी आल्या नाहीत असें नाही श्री न्या. पुराणिक व विशेषेकरून श्री काळीकर यांनी संस्थेच्या प्रगतीच्या कार्याचें बाबतींत जी कुशलता दाखविली ती उल्लेखनीय आहे. सांप्रतच्या संचालक मंडळाच्या समयज्ञ नेतृत्वामुळें, एम्. जी. चिटणवीस ह्यांच्या व्यवस्थापकत्वाखालीं ही बँक सहकारी सेवेचा संकल्प पुरा करील अशी आशा आहे.




## अकोला को ऑपरेटिव्ह सेंट्रल बँक लि, अकोला

**(स्थापना १९०९)**



श्री. एन्. एस्. सपकाळ

सहकारी चळवळीच्या क्षेत्रात महाराष्ट्राने जे यश मिळविलेले आहे त्यात विदर्भाचा वाटा फार मोठा आहे. किंबहुना, जिल्हा पातळीवर सहकारी बँका यशस्वी करण्याची उज्ज्वल परंपरा, ही विदर्भाचीच होय. विदर्भातील अकोला को-ऑपरेटिव्ह सेंट्रल बँकेनेहि, अकोला जिल्ह्याच्या सहकारी क्षेत्रात भरीव कामगिरी पार पाडली आहे. १९०९ साली स्थापन झालेल्या ह्या बँकेचे पहिले अध्यक्ष श्री. देवराव दिगंबर आणि सचिव रामराव सानजोडे होते. १९२८ ते १९३८ ह्या जागतिक मंदीच्या काळात बँकेला मोठ्या कठिण परिस्थितीत, मोठा निकराचा सामना द्यावा लागला, बँकेच्या कर्जाची वसुली होईनाशी झाली. भारतीय स्वातंत्र्यानंतर तर ह्या बँकेचे पाऊल प्रत्यही प्रगतिपथावर पडत आहे. स्थापनेच्या वर्षी अवघे ३,७७० रु. चे भांडवल आणि १०८० रु. ठेवी असलेल्या ह्या बँकेचे आजचे भांडवल ३२००००० रु. असून ठेवीची रक्कम ५० लाखांच्या वर आहे. बँकेचे खेळते भांडवल २ कोटींच्या वर आहे. १९५९-६० साली, शेतकऱ्याकडील कर्ज वसुली (रिकव्हरी) बाबत तिने स्पृहणीय यश मिळवून मध्यवर्ति मंत्रिमंडळातील सहकार उपमंत्र्याकडून प्रशंसा मिळविली होती. या बँकेच्या १२ शाखा असून सोसायट्यांची संख्या सव्वा हजार आहे. अकोला बँकेची पीक संरक्षण योजना ही स्वयमेव अशी वैशिष्ट्यपूर्ण आहे. ह्या बँकेने जी नेत्रदीपक आणि भरीव स्वरूपाची कामगिरी आजपर्यंत केली, तिचे श्रेय जिल्ह्यातील सहकारी भावनेला जितके आहे, तितकेच ह्या बँकेचे जिल्हा परिषदेचे पहिले अध्यक्ष म्हणून निवडून आलेले तरुण चेअरमन श्री. नानासाहेब सपकाळ यांनाहि आहे. सार्वजनिक आणि सामाजिक हिताच्या कार्यात अग्रेसर असलेल्या वडिलांचा समाज सेवेचा वारसा नानासाहेब चालवीत आहेत हे त्यांना भूषणावह आहे. शेतकरी वर्गाचे जीवन, आर्थिक समृद्धीने उजळून काढण्याकरिता त्यांच्या ठायी असलेली तळमळ प्रशंसनीय आहे. त्यांच्या कुशल नेतृत्वाखाली संचालक मंडळाच्या सहकार्याने बँकेचा उत्तरोत्तर विकास होईल हे *भविष्य वर्तविण्यासाठी कोण्याहि कुडबुड्या ज्योतिषाची जरूरी नाही.*




ब्रह्मपुरी सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि. ब्रह्मपुरी चांदा.

(स्थापना १९१२)



श्री. एस्. जी. जाणी

चांदा जिल्हा हा अत्यंत घनदाट जंगलाचा आणि आदिवासी लोकांचा जिल्हा असल्यामुळें तेथें बँक काढणें, आणि त्या योजनेची यशस्वी पूर्तता करणें हें अत्यंत कठीण व जिकीरीचे काम होतें. परंतु अशा जिकिरीच्या परिस्थितीत, जनसेवेच्या तळमळीनें ग्रामीण व आदिवासी क्षेत्रातील दारिद्र्य दूर करण्यासाठी, काही सेवा भावी सामाजिक कार्यकर्ते पुढे आले व त्यांनी सहकारी आंदोलनाचा प्रसार या जिल्ह्यात करण्याच्या दृष्टीने सिरोंचा, वरोरा व ब्रह्मपुरी अशा तीन सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँका स्थापन केल्या. ब्रह्मपुरी बँकेची स्थापना १९१२ साली शेतकऱ्यांना कर्जपुरवठा करण्यासाठी करण्यात आली. पण पुढें सिरोंचा बँकेचा कारभार चालेनासा झाल्याने तिचा या बँकेंत समावेश करण्यात आला. १९४२ पर्यंत बँकेची प्रगति मंदगतीनें पण स्थैर्य राखून होत होती. १९४२ साली बँकेचा सगळा कर्जव्यवहार फक्त १९ हजार रुपये होता तो आज १। कोटीपर्यंत आहे. त्यावेळी बँकेजवळ फक्त २॥ हजार रु. ठेवी होत्या आज त्या २५ लाख आहेत. त्यावेळी ब्रह्मपुरी हेंच तिचे कार्यक्षेत्र होतें. आज तिच्या ११ शाखा आहेत. या नेत्रदीपक यशाचें श्रेय, हल्लीचे अध्यक्ष श्री. श्रीराम जाणी यानाच प्रामुख्यानें द्यावे लागेल बँकेची स्थिति समाधानकारक नसताना तिला स्थैर्य देण्याच्या भावनेने, श्री. जाणी यानी प्राध्यापक पदाचा त्याग करून अध्यक्षपदाची सूत्रे आपल्या हाती घेतली व सहकारी खात्याने पुरस्कारलेल्या सर्व कर्जबाह्य कार्यक्रमाचा स्वीकार केला याबरोबरच कृषि-संलग्न उद्योग हाती घेण्याची योजना बँकेने आखली आणि स्वतःची तांदूळ सडण्याची गिरणी काढली ही गिरणी केवळ मध्यप्रदेशातच नव्हे तर संपूर्ण हिंदुस्थानात पहिलीच होय ही गिरणी आजहि उत्तम रीतीने चालू असून तिला भरपूर फायदा होत आहे भाताच्या गिरणीप्रमाणेच व्हर्जिनिया तंबाखूच्या उत्पादनाला मदत करणारी, ही भारतातील पहिलीच बँक होय श्री श्रीराम जाणी, यांच्यासारख्या अनुभवी अध्यक्षाच्या कार्यकुशल मार्गदर्शनाखाली, व संचालक मंडळाच्या सहकार्याने, बँकेची उत्तरोत्तर अधिकाधिक प्रगति होवो ही अपेक्षा बाळगणें सयुक्तिक होय. महाराष्ट्राचे लोकप्रिय नेते कर्मवीर मा. सा. कन्नमवार यांचा हा जिल्हा सहकारी चळवळीवर त्यांची अतूट निष्ठा असल्यानें त्यांच्या सहकार्यामुळें तेजाळलेल्या ह्या स्फुल्लिंगाचे यश दुणावेल यांत नाय संशय?




## दि अमरावती सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि. अमरावती

(स्थापना १९१२)



श्री. एन्. जे. देशमुख

भारतातील शेतकऱ्याचे जीवन हे ' अस्मानी लहरी ' वर अवलंबून असल्यामुळेंच त्याला स्थैर्य व सुबत्ता क्वचितच् लाभत आली आहे. परंपरागत तो नेहमीच गरीब असतो व गरीब असत आला आहे. त्यामुळे सावकारी पाशात सापडून, कंगाल होत गेला आहे. या परिस्थितीवर तोडगा म्हणून प्रथम सहकारी बँका काढण्याच्या दृष्टीनें जें आंदोलन झाले, त्याला अनुसरन १९१२ च्या फेब्रुवारी महिन्यात ही बँक रजिस्टर करण्यात आली १९३१ पर्यंत बँकेचा कारभार सुरळीत व निर्विघ्नपणें चालू होता पण १९३५ मध्ये मंदीची लाट पराकोटीला पोहोचल्यानंतर, तिची झळ या बँकेसहि लागली. शेतकरी सभासद कर्ज-फेडीस असमर्थ ठरले. इतकेंच नव्हे तर शेतीसाठी लागणाराहि खर्च करणे, त्यांच्या शक्तीबाहेर झाले स्वत:च्या जमिनी कर्जाच्या मोबदल्यात देणे याशिवाय त्यांना मार्गच उरला नव्हता या विकट परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी बँकेचे बोर्ड तात्पुरते रद्द करण्यात आले व अॅडहॉक् कमिटी नेमण्यात आली सरकारने बँकेच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने चौकशी करून कर्जाचे निवाडे केले कर्ज फेडीसाठी हप्ते बांधून दिले व या आर्थिक कोंडीतून त्यांची सुटका केली. अशी सुटका मात्र १९४३ पासून व्हावयास सुरुवात झाली १९४७ पर्यंत बँक सर्व ठेवीदारांचे पैसे परत करू शकली त्यानंतर अॅड हॉक् कमिटीचा कारभार संपुष्टात आला; व निवडून आलेल्या संचालक मंडळाकडे कारभार सोपविण्यात आला तेव्हापासून बँकेची सतत प्रगति होत आहे आज तिच्या ७ शाखा, असून सुमारे ३५००० शेतकरी कुटुंबें व लघु उद्योग करणारे लोक, बँकेपासून भांडवल घेऊन आपला कार्यभाग पार पाडतात आज बँक प्रगतिपथावर द्रुतगतीने जी पावलें टाकीत आहे त्याचे श्रेय, बहुतांशी बँकेचे चेअरमन श्री एन् जे देशमुख यांच्या सर्वसंग्राहक कर्तृत्वाला व संचालक मंडळाचे सदस्य यांच्या उत्साही कार्यप्रवृत्तीलाच आहे. सहकारी जीवनात सामुदायिक प्रामाणिकपणाचे असलेलें महत्त्व जनमनावर आपल्या कर्तृत्वाने बिंबवून श्री एन् जे देशमुख व त्याचे सहकारी ही बँक उत्तरोत्तर भरभराटीस नेतील, हें निःसंशय.




**यवतमाळ जिल्हा सहकारी बँक लि. यवतमाळ**

**(स्थापना १९१३)**



श्री. आर्. जे. धारफळकर

'झाले बहु होतिल बहु परंतु यासम हा ।' ही मोरोपंतांची आर्या कै. दादासाहेब कोल्हे यांना अगदीं यथार्थपणें लागू पडते. केवळ यवतमाळ जिल्ह्यातच नव्हे तर महाराष्ट्र राज्यात त्यांचे स्थान एकमेवाद्वितीय असे होतें. इतकेंच नव्हे तर त्यांच्या कर्तृत्वाची शलाका ही राज्याची सीमा पार करून तिनें भारतीय क्षेत्रहि व्यापलें होतें व नॅशनल कोऑपरेटिव्ह युनियनचे उपाध्यक्षपद देवून, त्यांचा यथोचित गौरवहि करण्यांत आला होता. सन् १९१३ साली यवतमाळ सेंट्रल कोऑपरेटिव्ह बँकेची स्थापना झाली आणि तदनंतर १९१६ पासून या कार्याची धुरा दादासाहेबांनी उचलली ती थेट त्यांच्या मृत्युपर्यंत ! या दीर्घ कालात सहकारी चळवळीशी त्यांचा सातत्याने संबंध आला, व ही सहकारी संघटणा, त्यांनी एक विधायक उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून वाढविली, आणि अखिल भारतांतील सहकारी कार्यकर्त्यांकडून धन्यता मिळविली. १९३० ची मंदीची लाट, दुसरे महायुद्ध, त्यानंतर भारताने मिळविलेलें स्वातंत्र्य या सर्व संक्रमणकाळातील सहकारी युगाच्या क्रांतिप्रवण अवस्थेंत, जे स्थित्यंतर घडत होतें त्यांचे श्री. दादासाहेब हे एक कर्तबगार घटक होत. ह्या बँकेच्या स्वरूपात, त्यांची स्मृति ही दीपस्तंभा प्रमाणे असून, त्या प्रकाशात यवतमाळ जिल्ह्यातील सहकारी चळवळ, आज आपल्या ध्येयसिद्धीच्या सफलतेसाठी बद्धपरिकर झालेली आहे. ह्या बँकेचे एकूण सभासद ३ हजार असून त्यांपैकी ७१० सहकारी संस्था आहेत. तिच्या एकंदर १५ शाखा असून ग्रामीण लोकसंख्येपैकी जवळजवळ ६२ टक्के लोकांना ह्या बँकेच्या सर्व सोयी उपलब्ध आहेत. त्यादृष्टीनें विदर्भाच्या आठहि जिल्ह्यात हिचा क्रमांक अग्रेसर आहे. सहकारी वृक्ष फोफावण्यास ही भूमि अनुकूल आहे. ह्या वृक्षाने, ह्या जिल्ह्यात चांगलें मूळ धरलें असून त्याची पाळेमुळे खेड्यापाड्यात पोहोचली आहेत. कै. दादासाहेब कोल्हे यांनी सुरू केलेलें हें कार्य त्यांचे मित्र आजचे चेअरमन श्री बाबासाहेब धारफळकर, श्री जवाहरलालजी दरडा, श्री. पल्लेवार, श्री आबासाहेब पारवेकर व त्यांचे सहकारी पूर्ण करतील असा दिलासा आज तरी जनतेला वाटत आहे. श्री बाबासाहेब धारफळकर यांची अभंग लोकप्रियता व मनमिळाऊ, गोड स्वभाव व विधायक व्यक्तिमत्व ही ह्या जिल्ह्यातील चळवळीच्या यशाची निश्चिती दर्शवितात.




## जळगांव जिल्हा सेंट्रल को ऑपरेटिव्ह बँक लि, जळगांव

(स्थापना १९१६)



श्री. जे. एस. पाटील. एम्. पी

नव्या महाराष्ट्राची बांधणी आतां आपल्याला करावयाची आहे. ह्या उभारणींत सहकारी संघटनेचें स्थान फार महत्त्वाचें आहे. सहकारी वृत्ती अंगीं बाणलेला पूर्वखानदेश जिल्हा यादृष्टीनें फारच पूर्वी कामास लागला असून ह्या जिल्ह्यांतील नैष्ठिक, निरलस कार्यकर्त्यांनी सहकारी चळवळीच्या उत्कर्षासाठी व पूर्तेसाठी गेली ४५ वर्षें सतत प्रयत्न केले आहेत. त्याचें मूर्तिमंत प्रतिक ही बँक होय ! भारतांतील पहिल्या क्रमांकाची जिल्हा सहकारी बँक असा लौकिक, कित्येक वर्षें ह्या बँकेने सातत्यानें टिकवून, ही बँक मुंबई राज्याचे सतत अभिमानास्पद भूषण ठरलेली आहे. फक्त २८ संस्थांच्या व चार सभासदांच्या २६००० रु भाग भांडवलावर २७-५-१९१६ रोजीं ही बँक, जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना माफक दरानें कर्ज पुरवठा व बँकिंगची सवय लावण्याच्या दृष्टीनें, स्थापन करण्यांत आली. आज ह्या संस्थेचें भाग भांडवल जवळ जवळ ४४ लाख रुपये असून तिनें जिल्ह्यांतील सर्व सहकारी संस्थांचे व शेतकऱ्यांचे सोयीसाठी ४२ शाखा उघडलेल्या आहेत. इतक्या शाखा असलेली बहुधा महाराष्ट्रांतील ही एकच बँक असावी. प्रत्येक ५ मैलांच्या त्रिज्येंत साधारणत एक शाखा ह्या बँकेने काढलेली आहे. ह्या बँकेजवळ, आज ४ कोटींच्यावर ठेवी असून तिचें खेळतें भांडवल जवळ जवळ ६ कोटि आहे. बँकेने गेल्या हंगामाचे वेळी ४३ लक्ष रु च्या ठेवी मिळवून विक्रम प्रस्थापित केला आहे. बँकेच्या ह्या नेत्रदीपक यशाचें श्रेय, बँकेचे आजचे चेअरमन लोकसभेचे सदस्य, श्री. जुलालसिंग पाटील उपाध्यक्ष कृषिपंडित यशवंतराव पाटील व संचालक मंडळांतील त्यांचे सहकारी कार्यकर्ते यानाच आहे. ह्या बँकेचे पूर्वाध्यक्ष, श्री. वी. डी. देशमुख यांनी त्यांच्या कारकीर्दीत ह्या बँकेच्या कार्याचा जो सुदृढ पाया घातला त्यामुळें आज हें प्रशंसनीय कार्य करणें बँकेस शक्य झालें आहे. खान्देशाचा मनुष्य, कोणत्याहि मत्कार्यास, निस्वार्थ बुद्धीने सतत सहकार्य करीत आला असल्याने, ह्या बँकेच्या कार्यास खान्देशी जनतेचें संपूर्ण सहकार्य लाभेल असा आत्मविश्वास आहे. कारण जनसेवेमुळें प्राप्त आलेल्या सामर्थ्याच्या योगेंच ही बँक सदैव " भारतदेशास " भूषणभूत ठरली आहे !




## पुणें सॅट्रल को ऑपरेटिव्ह बँक लि. पुणें

(स्थापना १९१७)



श्री. एस्. एम्. काळे

राजकारणधुरंधर साहित्यकेसरी श्री. एन् सी केळकर ह्यांनी ज्या बँकेचे आरंभीचे अध्यक्षपद भूषविलें त्या बँकेनें गौरवास्पद प्रगति न केली असती तरच नवल! पूर्वींच्या पिढीत, स्वातंत्र्याच्या संग्रामात आघाडीवर असलेले नेते, महात्माजींचा विधायक कार्यक्रम अंगी बाणून, जनजीवन, समृद्ध करावयाचा कसा कसोशीने प्रयत्न करीत याचें मूर्तिमंत साक्ष ही बँक व तिचे आरंभीच्या काळाचे जे धुरीण, यानी जें कार्य केले त्यावरुन मनास सहज पटेल! ४ सप्टें १९१७ रोजी स्थापन झालेली ही बँक, श्री. तात्यासाहेब केळकर यानी आत्मीयतेनें तिची जोपासना व संगोपन केल्यानें,आज त्या लहानशा रोपटयाचे एका विशाल वृक्षात रुपांतर झाले असून त्यानें जिल्ह्याचा सर्व परिसर आपल्या ३० शाखा, ६ उपशाखा व तीन 'पे' ऑफिसेस या द्वारा व्यापिलेला आहे. आज बँकेचें शेअर भाडवल ५२ लाख रु. असून ठेवी जवळ जवळ ३॥ कोटी आहेत. यावरुन बँकेने संपादिलेला जनतेचा विश्वास व तिचे स्थैर्य याची सहज कल्पना येऊ शकेल सारा पुणें जिल्हा, आज सहकारी भावनेनें जो एकत्रित आलेला दिसत आहे त्याचे श्रेय बहुतांशी ह्या बँकेचे चेअरमन श्री, शिवाजीराव काळे,त्याचे सहकारी श्री मुगुटराव काकडे,श्री शंकररावजी भेलके आदि सहकारी संघटनेच्या कार्यास वाहून घेतलेले मित्र व मॅनेजिंग डायरेक्टर श्री.मा. ग अळतेकर, आणि मॅनेजर श्री देशमुख यानाच द्यावें लागेल श्री. शिवाजीराव काळे याचा जन्म एका सात्विक आणि प्रेमळ शेतकरी कुटुंबात झालेला आहे शेतकरी आणि कामकरी याची गंजणूक दूर करण्यास, सहकाराशिवाय अन्य मार्ग नाहीं हे जाणून त्यानी सहकारी चळवळीचा पुरस्कार व प्रचार केला आणि कळकळीने, जिल्ह्यातील सहकारी कार्यकर्त्यांचे सहकार्य मिळवून या जिल्ह्यात सहकारी औद्योगिक संस्थाचे जाळें विणले पुणें जिल्ह्यात दिसत असलेले सहकारी कारखाने व होऊ घातलेली सहकारी हिरडा फॅक्टरी हे त्याच्याच श्रमाचे अन् तळमळीचे प्रतिक होय अशा प्रकारे प्रगतिपथावर असलेल्या ह्या बँकेला, उज्वल भवितव्यासाठी, त्याच्यासारख्या प्रामाणिक कार्यकर्त्यांचे व सहकारी संचालक मंडळासह, सांप्रतचे मॅनेजिंग डायरेक्टर याचे नेतृत्व, दीर्घ काळ लाभावे अशी ह्या जिल्ह्यातील सहकारी कार्यकर्त्यांची व शेतकरी बांधवाची इच्छा असणे स्वाभाविक आहे.




## औरंगाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. औरंगाबाद

(स्थापना १९१७)



श्री. आर. सी. पाटील (नागरकर)

अत्यंत प्रतिकूल व अविकसित अशा खडतर परिस्थितीतून मार्ग आक्रमित असताना, मराठवाड्याने सहकाराची कास धरून, मराठवाडा विभागातील सहकारी चळवळीत राज्य पुनर्रचनेनंतर, येथल्या यशाच्या प्रगतीचे मूल्यमापन करताना, ह्या बँकेने केलेल्या कार्याचा नाम निर्देश प्रामुख्याने करावाच लागेल. मराठवाड्यातील सहकारी चळवळीची जोपासना करण्याचे काम, ज्या २–३ व्यक्तींनी केले आहे त्यात या बँकेचे चेअरमन श्री. रामचंद्र पाटील यांना अग्रहक्क द्यावा लागेल. रामचंद्रराव हे मुळात राजकीय व सामाजिक कार्यकर्ते. समाज-कल्याणकारी सहकारी चळवळीत ते समरस झाले ते ग्रामीण जनतेच्या उद्धाराचे ही चळवळ आजकाल प्रमुख अंग आहे म्हणूनच! स्वतः एक प्रगतिशील शेतकरी असल्यामुळे, स्वानुभवामुळे शेतकऱ्यांच्या अडचणींचे स्वरूप त्यांना अवगत होते. म्हणूनच शेतकऱ्यांना आर्थिक विवंचनेतून मुक्त करण्यासाठी, गावोगावी सहकारी संस्थांच्या स्थापण्याचा मंत्र, आपल्या सहकारी सहकाऱ्यांना त्यांनी दिला व सहकारी चळवळीबाबत उदासीन असलेला हा जिल्हा, त्यांनी सहकारमय करून टाकला. अवघ्या ३ वर्षांच्या अवधीत, जिल्ह्यातील प्रत्येक तालुका आणि महाल येथे बँकेच्या शाखा उघडून, ग्रामीण विभागातील सभासदांना कर्ज पुरविण्याची सोय उपलब्ध करून दिली. 'पीक – कर्ज' पद्धतीचा देखील यशस्वीरित्या अवलंब केला. नवीन संचालक मंडळाने सूत्रे हातात घेतल्यानंतर, ही सहकारी बँक, जिल्ह्यातील श्रमजीवी जनतेचे अर्थशास्त्र सुधारण्यासाठी, यशोदायी प्रयत्न करीत आहे. हिच्या कष्टानेच, आज सहकारी चळवळीचे लोण खेडोपाड्यातील घराघरापर्यंत पोहोचले आहे. तिच्याकडे ५० लाखांच्या वर ठेवी असून एकूण कर्जवाटप १।। कोटी व खेळते भांडवल १।।। कोटी आहे. मराठवाड्यातील उपेक्षिलेली ही सहकारी चळवळ यशस्वी करून येथील सहकारी चळवळीबद्दल असलेला पूर्वग्रह नष्ट करण्यास श्री. रामचंद्रराव पाटील यांचे करारी नेतृत्व व त्यांचे संचालक मंडळातील सहकारी श्री. काशा देशमुख, व श्री. बाबुरावजी काळे यांनाच आहे. जनहिताची तळमळ असलेले रामचंद्रराव पाटलांसारखे निग्रही, कुशल नेतृत्व व सहकारी साथीदारांचे संपूर्ण सहकार्य, या सर्वांच्या कार्याने आज ही बँक 'मराठवाड्यातील सहकारी चळवळीचे जिवंत प्रतीक' या बहुमानास पात्र झाली आहे. तिचा भविष्यकाळ उज्ज्वल असणारच असे आत्मविश्वासपूर्वक म्हणता येईल. आमचा आत्मविश्वास सार्थ करण्याचे कर्तृत्व रामचंद्ररावजी-मध्ये आहेच. आम्ही त्यांस सुयश चिंतितो!




## परभणी जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. परभणी

(स्थापना १९१७)



श्री. एस्. व्ही. कळमकर

पतिताना पावन करण्याचे सामर्थ्य असलेला, गोदानदीचा परिसर या जिल्ह्यास लाभलेला आहे इतकेच नव्हे तर ज्योतिर्लिंगापैकी "नागनाथ" हे एक ज्योतिर्लिंग याच विभागातील होय. समर्थ रामदासांपासून तर जनाबाई, नामदेव, तुकाराम या सर्व संतानी हा जिल्हा पुनीत केला आहे असा समृद्ध वारसाची पुण्याई, ज्या जिल्ह्याच्या भाग्यास लाभली आहे, तो जिल्हा शेतकरी समाजाच्या आर्थिक उत्कर्षासाठी, सहकाराचा मार्ग अवलंबण्यात अग्रेसर असल्यास नवल नाहीच नाही! परभणी जिल्ह्यात सहकारी चळवळ या शतकाच्या प्रारंभी सुरू झाली. वसमत तालुक्यातील आरळ या गावी पहिली ग्रामीण पतपेढी स्थापन होऊन सहकारी चळवळीचे बीजारोपण झाले तेव्हांपासून तो वृक्ष, या जिल्ह्यातील नैष्ठिक सहकारी कार्यकर्त्यांच्या कार्याने सारखा फोफावत जाऊन, बँकेचे चेअरमन श्री सुदरलालजी कळमकर यांच्या कुशल, सयमशील व दूरगामी नेतृत्वाने, आर्थिक विकासाच्या क्षेत्रात त्याची पाळेमुळे दृढ होऊं लागली आहेत सघसृजनशीलता व प्रामाणिकपणा ही सहकाराची अंगे होत त्याचा अविष्कार श्री मावजी यांच्या धीरोदात्त कार्यांत व त्यांनी सचालक मडळात आपल्या सहकाऱ्यांचा जो सच मिळवला आहे त्याच्या कर्तृत्वात, आढळून येतो. श्री सावजी यांनी बँकेची अधिकारसूत्रे हाती घेतल्यापासून, बँकेच्या कारभारात व्यक्तिशः लक्ष घालून, आमूलाग्र सुधारणा घडवून आणली पैशाचे व्यवहार, अत्यंत प्रामाणिक व चोख व्हावे असा त्यांचा कटाक्ष असून, बँकेच्या भरभराटीसाठी त्यांनी घेतलेले श्रम, अनुकरणीय आहेत सहकाऱ्यांचा व जनतेचा त्यांनी संपादन केलेला विश्वास ही संस्थेच्या विकासाची निश्चिती होय म्हणूनच बँकेची सर्वांगीण प्रगति होऊन, अत्यंत अल्पावधीत ठेवींची रक्कम ५० लाखापर्यंत पोहचली आहे व बँकेच्या शाखा प्रत्येक प्रमुख ठिकाणी उघडण्यात आल्या आहेत शेतकऱ्याचे कल्याण, त्याच्या मालाला वाजवी किंमत मिळवून देण्यात आहे हे हेरून सहकारी खरेदी-विक्री सघाच्या सोयी उपलब्ध करून देण्याच्या कामी मेहनत घेऊन त्या योजना कार्यान्वित केल्या तसेच हिंगोली, जिंतूर येथे सहकारी जिनींग व प्रेसिंग कारखाने काढण्यात पुढाकार घेतला श्री सावजींच्या व्यक्तिमत्वाने, ही बँक ग्रामीण जीवनाच्या समृद्धीचे उद्दिष्ट पूर्ण करीलच ही जनमनात अंकुरलेली भावना फलदायी ठरेल असा दृढ आत्मविश्वास आहे.




## दि सोलापूर जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. सोलापूर

(स्थापना १९१८)



श्री. एम्. एल्. पाटील

१९१४ साली नेमलेल्या 'मॅक् रॅगन' समितीचे शिफारशी-नुसार ८ मे १९१८ रोजी ही बँक रजिस्टर करण्यात आली तत्पूर्वी या जिल्ह्यात सुमारे १०० पतपेढ्यांची स्थापना झाली होती व त्या, शेतकऱ्यांना शेतकी माल उत्पादनाकरिता कर्जरूपाने पैसा पुरवीत होत्या हे जरी सत्य असले तरी एकंदर सहकारी चळवळीची वाढचाल अत्यंत मंद होती परंतु बँकेच्या स्थापनेनंतर, या बँकेच्या कामकाजा-मुळे व बोर्डावरील संचालक मंडळीचा तालुक्यातील कार्यकर्त्यांशी निकटवर्ती संबंध असल्याने, चळवळीची वाढ झपाट्याने झाली. आता तिचा विस्तार फार व्यापक प्रमाणावर झालेला आहे या बँकेचो चालक मंडळी, केवळ नवीन संस्थांच्या स्थापन करण्यापुरतेच आपले कार्यक्षेत्र मर्यादित न ठेवता, या नवीन संस्था सुदृढ, कार्यक्षम कशा ठरतील याहि बाबतीत जिव्हाळ्याने, जातीने लक्ष घालीत असल्यामुळे सहकारी कार्यकर्त्यांत, बँकेने अत्यंत मानाचे स्थान मिळवून दिले आहे ह्या बँकेचे हे एक आगळेच नमुनेदार अनुकरणीय वैशिष्ट्य आहे दुसऱ्या महा-युद्धाच्या वेळीं, या बँकेने केलेले कार्य अतुलनीय होय युद्धकालाच्या महागाईने, सर्वसामान्य जनता व शेतकरी वर्गाला जीवन जगणे कठीण आले होते त्यावेळी, समाजहिताच्या दृष्टिकोनाने, जीवनोपयोगी वस्तूंचे सहकारी रित्या वाटप करून शेतकऱ्यांना अवजारे व रासायनिक खते पुर-विण्यात ह्या बँकेने पुढाकार घेतला तगाई वाटपाचे कामहि केले आज या बँकेचे शेअरभांडवल सुमारे १६ लाख आहे व ठेवी १॥ कोटीच्या वर आहेत ही गोष्ट बँकेवरील जनतेच्या वाढत्या विश्वासाचेच प्रतीक होय बँकेचे खेळते भांडवल आज २॥ कोटी असून दिलेली कर्जे १॥ कोटी आहेत या बँकेच्या यशस्वीतेस अनेक सहकारी कार्यकर्त्यांचे श्रम कारणीभूत झाले आहेत विशेषेकरून खेड्यातील गरीब कुटुंबात जन्म घेतलेले पुस्तकी ज्ञानाची फारशी जोड नसलेले बँकेचे चेअरमन श्री मच्छिंद्र पाटील यांच्या कारकीर्दीत बँकेच्या कामकाजात आमूलाग्र सुधारणा होऊन, बँकेला आर्थिक भरभक्कम स्थैर्य प्राप्त झालेले आहे श्री मच्छिंद्र पाटील यासारखी निस्पृह सहकारी कार्यकर्ती मंडळी व श्री नामदेवराव जगताप व श्री वेन यासारखी सहकारी वृत्ती अंगी बाणलेले सहकारी कार्यकर्ते, तळमळीने कार्य करून या बँकेला अग्रेसरत्वाचा मान मिळवून देतील अशी अपेक्षा आहे.




## बीड जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि, बीड

(स्थापना १९१८)



श्री. एस्. एल्. कदम

मराठवाड्याचे मुंबई राज्यांत विलीनीकरण होण्यापूर्वी, या विभागातील सहकारी चळवळ ही दुर्लक्षिलेली होती. स्वतंत्र कार्याला मुळीच वाव नसल्यामुळे, सहकारी कार्यकर्त्यांना ग्रामीण जनतेंन मिसळून कार्य करण्याची जी साधनें आणि सोयी उपलब्ध असाव्या लागतात, त्याचा अभाव होता. अशा परिस्थितीत १ नोव्हेंबर १९५६ रोजी, प्रांत पुनर्रचना होऊन, मराठवाडा जेव्हा मुंबई राज्याला जोडण्यात आला तेव्हा या नवीन राज्यातील कार्यपद्धति व सहकारी चळवळीचा प्रभावी फलदायी प्रसार पाहून, या जिल्ह्यातील कार्यकर्ते स्तंभित झाले असल्यास नवल नाही किंबहुना आपण या नवीन कार्यपद्धतीशी समरस होऊन बरोबर वाटचाल करू शकू किंवा नाही याविषयी किंचित् काल ते साशंक होते. परंतु महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे संचालकांनी संपूर्ण सहकार्याचा दिलासा त्यांना दिल्यानें या जिल्ह्यातील कार्यकर्त्यांनीं हें काळाचे आव्हान स्वीकारून, या जिल्ह्यातील चळवळ स्थिर पायावर उभारण्यास आत्मीयतेनें वाहून घेतलें ग्रामीण विभागात इतस्ततः विखुरलेल्या शेतकरी समाजाच्या संपूर्ण उपयोगी पडावे म्हणून त्याला सर्व सोयीं उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने, आपली उपयुक्तता वाढावी यासाठी प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं शाखा काढल्या शेतीमालास किंमत मिळवून, शेतकरी वर्गाचा फायदा व्हावा यासाठी खरेदी-विक्री संघाचे जाळें विणण्याचें कार्यीं प्रोत्साहन दिलें सहकारी तेल गिरणी व जिनींग फॅक्टरी या दोन संस्था रजिस्टर करण्यात पुढाकार घेतला. अवघ्या ४ वर्षांत बँकेनें केलेली ही प्रगति स्पृहणीय नाही असे कोण म्हणेल ? अत्यंत अल्पावधीत, या जिल्ह्यातील सहकारी चळवळीने जें नेत्रदीपक यश मिळविलें आहे त्याला बँकेचे आजचे चेअरमन श्री श्रीपतराव कदम यांचे संयमशील व सहकारी नेतृत्व, सहकारी संचालक सभासदांची कार्यतत्परता व क्रियाशीलता ही जबाबदार आहे सेवा व सहकार अंगी बाणलेली श्री श्रीपतराव कदम यांच्यासारखी माणसें या बँकेच्या यशासाठी आत्मीयतेनें झटत असता तिचा उत्कर्ष अल्पावधीत होणें हें स्वाभाविकच होय






## नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. नांदेड

**(स्थापना १९२३)**



श्री. एस्. कदम

मराठवाडा विभागात, सहकारी चळवळ सुमारे ४० वर्षांपासून सुरू आहे परंतु निजामी राजवटीत, तिचा प्रचार व प्रसार फारसा होऊ शकला नाही. याचे कारण तिचे लोण जनतेपर्यंत पोहचविण्यास, निजामशाहीचा प्रत्यवाय होता येथील बँकांचा अध्यक्ष कलेक्टर व मॅनेजर सरकारी नोकर असायचा त्यामुळे ती जनतेप्रत पोहचूच शकली नाहीं ! बँकिंगचा व्यवहार नाममात्रच असे. कर्जवाटपाचा शिवाशी व हंगामाशी काहीहि संबंध नसे. सर्वत्र सरकारी नियंत्रण असल्यामुळे, सहकारी चळवळ ही सरकारी कामाचेच एक अंग आहे असा शेतकरी समाजाची समजूत झाली होती. तसे नसते तर, उत्तम प्रकारची काळी व सुपीक जमीन, ऊस, कापूस, भुईमुग, ज्वारी इ० अन्नधान्याची उत्तम पैदास करण्यात, अग्रेसर असलेला हा जिल्हा, सहकारी चळवळीत इतका मागासलेला राहिला नसता! राज्य पुनर्रचनेनंतर मराठवाड्यातील सहकारी चळवळीची पुनर्रचना करण्याचा सरकारने निर्णय घेतला आणि १ ऑक्टो. १९५८ पासून ही बँक आपला कारभार पाहू लागली. या बँकेचे १९६१ अखेर शेअर भांडवल १४ रु. लाख होते ठेवी ३४ लाख रु. होत्या. व दिलेल्या कर्जाची मर्यादा ३ कोटींच्या वर आहे. शेती कर्ज वाढविणे एवढेच या बँकेने आपले ध्येय ठेवले नसून शेतकऱ्याच्या मालाला चांगली बाजारपेठ मिळावी, त्याचा योजनाबद्ध निकोप विकास व्हावा, या दृष्टीने बँक प्रयत्न करीत आहे. या धोरणास अनुसरून कापूस व ऊस याचा संस्करण संस्था ( प्रक्रिया ) सहकारी तत्वावर काढण्याची योजना या बँकेचे चेअरमन श्री. शामराव कदम यांनी हाती घेतल्यापासून त्या कार्यान्वित करण्याकरिता ते अविश्रांत झटत आहेत. जनसेवेत तनमनाने सतत 'रत' असलेल्या लोकप्रिय शामरावजींच्या कर्तृत्वाची कक्षा सतत फाकत असून, नुकतेच ते महाराष्ट्र विधानसभेवर व जिल्हा परिषदेचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष निवडून आले हे त्यांचावरील जनतेच्या अलोट प्रेमाणे द्योतकच होय. मराठवाड्याचे कर्तृत्वाचा सागर असलेले, गुणवत्तेने आलङ्कृत, लोकोत्तर पुढारी व सा.प्रनचे मंत्री श्री. शंकररावजी चव्हाण याचे अविरत मार्गदर्शन हें ह्या जिल्यातील सहकारी चळवळीच्या यशाचे मर्म होय! श्री शामरावजींचे धैर्यशाली व खंबीर नेतृत्व या बँकेस लाभल्याने, या विभागातील शेतकऱ्यांच्या संसाराची घडी उत्तम रीतीने बसण्यास, फारसा विलंब लागणार नाही अशी आशा आहे.






## दक्षिण सातारा जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि, सांगली

(स्थापना १९२७)



श्री. जी. आर्. पाटील

समर्थ रामदासांनी " दुसऱ्याच्या सुखात सुख मानावें. दुसऱ्याचें दु:ख जाणून वाटून घ्यावे आणि समुदायाच्या बरेवाईटपणात सहभागी व्हावें " अशी जी शिकवण दिली तिचे प्रत्यतर सांगली जिल्ह्यातील सहकारी चळवळीत श्री वसंतराव पाटील, श्री. गुलाबराव पाटील, श्री. दप्तरदार श्री. अरवाडे यानी अहमहमिकेने व निष्ठने जनतेच्या सुखदु:खाशी समरस होअून, समाजाच्या सर्वांगीण अुन्नतीसाठी जें तळमळीनें व एकदिलानें कार्य केले त्यावरून दृष्टोपत्तीस पडते वास्तवत: सांगली स्टेट को– ऑपरेटिव्ह बँक लि, या नावानें, सांगली संस्थानचे राजे, यांच्या प्रगमनशील धोरणामुळें ही बँक २८–३–१९२७ रोजी रजिस्टर करण्यात आली पण या बँकेच्या खऱ्या कार्यास, संस्थानच्या विलीनीकरणा नंतरच विशेषत्वानें उठाव आला याच काळात, या बँकेस जिल्ह्याचे कार्यक्षेत्र प्राप्त झाले त्याचबरोबर जबाबदारीहि वाढली. आज तिचे शेअर भांडवल ३२ लाख रु. चे असून बँकेजवळ १ कोटी रु ठेवी आहेत- खेळते भांडवल २ कोटीच्या वर असून तिची स्वत:ची इमारत आहे. बँकेचा एवढा व्याप वाढण्याचे कामी, आरंभीच्या काळी सांगली संस्थानचे राजेसाहेब याचे प्रयत्न कारणीभूत झाले हे खरें असले तरी तिची उपयुक्तता विलीनीकरणानंतरच वाढली आजचे तिचे चेअरमन श्री गुलाबराव पाटील यांची प्रत्यक्ष क्रियाशीलता, "सर्वेषां हिताना ' या उद्दिष्टाच्या साध्यासाठी, सर्वांना सहकार सूत्रान गोंवण्याची हातोटी, हेच या चळवळीच्या दिवसेंदिवस वृद्धिंगत होत असलेल्या यशस्वी प्रसाराचे प्रसादचिन्ह होय ! जिल्ह्याच्या सामाजिक, शैक्षणिक, राजकीय व सहकारी क्षेत्रात अुत्कटतेने व आदरानें ज्याचा उल्लेख केला जातो असे श्री. वसंतराव पाटील यांचे बहुमोल मार्गदर्शन व श्री दप्तरदार व अरवाडे याच्यासह सहकारी क्षेत्रातील इतर कार्यकर्त्यांचे सक्रिय सहकार्य, असेच अविरत लाभल्यास ही बँक उत्कर्षाप्रत पोहोचेल हे नि:संशय व सांगली जिल्ह्याचा जो झपाट्याने औद्योगिक विकास होत आहे त्यास निश्चितच, भरीव हातभार, ही बँक सर्व सामर्थ्यानिशी लावील. ' वेअर हाऊस ' रिसीटवर शेतकऱ्यांना कर्ज देण्याची प्रथा, या बँकेने प्रथमच सुरू केली जिल्ह्यातील सहकारी खरेदी-विक्री संघ व शेतकरी सहकारी साखर कारखाना या योजना सक्रिय सहकार्याने साकार केल्या जिल्ह्याच्या उन्नतीकरिता सहकारी तत्त्वावर नवनवीन योजनांना चालना देण्याचे काम जिल्ह्यातील कार्यकर्ते करीत आहेत त्यांना ही बँक संपूर्ण सहकार्य करील हे तिच्या आजवरच्या धोरणावरून सुस्पष्टच आहे. महाराष्ट्रराज्य सहकारी संघाचे अुपाध्यक्ष असलेल्या श्री गुलाबरावजीच्या, प्रगत, व प्रभावी नेतृत्वाखाली ह्या बँकेची अुत्तरोत्तर भरभराट होवो !










## कोल्हापूर जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. कोल्हापूर

(स्थापना १९३८)

कोल्हापूर जिल्ह्यातील ग्रामीण जीवनाचा कायाकल्प करण्यास यशस्वीरित्या हातभार लावणारी ही बँक, १९३८ साली स्थापन झाली होती. परंतु त्यावेळी तिचे कार्यक्षेत्र कोल्हापूर संस्थान इतकेच मर्यादित होते. संस्थानाच्या विलीनीकरणानंतर भांडवलाचा अपुरेपणा लक्षात घेऊन या बँकेचे कार्यक्षेत्र फक्त ४ तालुक्यापुरतेच मर्यादित करण्यात आले होते. परंतु दुर्दैवानें बँकेचा कारभार अव्यवस्थितरीत्या चालत असल्यानें १९५६ मध्यें या बँकेची सूत्रें सरकारी अधिकाऱ्याकडे सोपविण्यात आली. ऑगस्ट १९५८ मध्यें, जिल्ह्यास एकच मध्यवर्ति बँक असावी या रिझर्व्ह बँकेच्या धोरणानुसार, बँकेची पुनर्घटना करण्यात आली असून, संपूर्णपणें शेती व तत्सम कामासाठी कर्जपुरवठा या बँकेकडून होत आहे. तिच्या १७ शाखा व एक 'पे' ऑफिस आहे. ग्रामीण जनतेच्या सोईसाठी आणखी ८ शाखा काढण्याचा बँकेचा निश्चय आहे. बँकेचे खपलेलें भांडवल ५४ लाखांचे वर असून एकंदर १००० सहकारी संस्था तिच्याशी संलग्न आहेत. कर्ज पुरवठ्याची ५० टक्के रक्कम खतें व तेलें या रूपानें दिली जाते. जिल्ह्यातील खरेदी–विक्री संघालाहि भांडवल-पुरवठा याच बँकेकडून होतो. एकूण कर्जपुरवठ्याची रक्कम ६० लाखापर्यंत गेली आहे. तसेंच एकंदर ठेवी २ कोटी ५८ लाख असून खेळतें भांडवल ४ कोटी ६० लक्ष आहे. शेतकऱ्याच्याशिवाय छोटे उद्योगधंदे व सोसायट्यांना ही बँक कर्ज-पुरवठा करतें. जिल्ह्यातील शेतकऱ्याच्या संपूर्ण गरजा भागविण्याचा या बँकेकडून प्रयत्न होत असून जिल्ह्यातील उत्पादन-वाढीच्या अशा ज्या जपानी व भातशेती व ऊस शेतीच्या योजना पाणी पुरवठा व साखर कारखाने यांच्या सारख्या योजना, आदि कार्यक्रमास ही बँक कर्ज पुरवठा करीत आहे. या जिल्ह्याच्या आर्थिक विकासाच्या प्रगतीसाठी सहकारी चळवळीला मदत करून ही बँक स्थैर्य प्राप्त करून देईल असा विश्वास वाटतो. सुदैवानें आजचे चेअरमन श्री. रा. रा. अप्पासाहेब चव्हाण पाटील व ह्या जिल्ह्यातील सहकार महर्षि श्री. रत्नाप्पा कुंभार व श्री. विश्वनाथराव कोरे यांचे विधायक मार्गदर्शन व सहकार्य ह्या विभागास लाभल्यानें ही बँक जिल्हा संपन्न व समृद्ध करण्यात यशस्वी होईल अशी जनतेत असलेली भावना सफल होईल अशी आशा आहे.








## दि सातारा जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. सातारा

(स्थापना १९४९)



श्री. आर्. डी. पाटील

ऐतिहासिक कालापासून सातारा जिल्ह्यानें आपलें विशिष्ट स्थान भारतीय इतिहासात नोंदविलें आहे. समाजवादी समाजरचनेच्या कार्याचे मुख्य सूत्र, आजच्या युगाचा धर्म जो सहकार, त्या सहकारी क्षेत्रातहि, तो मग कसा मागे राहील बरे? भारतातील १० खेडूतांपैकी ७ खेडूत शेतकरी असतात. या शेतकऱ्याच्या गरजाहि विविध आणि निकडीच्या असतात. शेतीप्रधान भारत देशात, शेतकऱ्याच्या या समस्या सोडविण्याचा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा होय. किंबहुना सहकारी चळवळीचा उगम व उद्दिष्ट हेंच होय. सहकारी चळवळ ही मुख्यतः कर्जपुरवणारी चळवळ आहे असें म्हटले जातें तें याच उद्देशानें. या बँकेची स्थापना करण्याचे कामी श्री. यशवंतरावजी चव्हाण व बाळासाहेब देसाई या दोन नेत्यांचे अमृतमय नेतृत्व लाभले म्हणूनच रिझर्व्ह बँक व सरकार यांजकडून जिल्हा बँक स्थापन करण्याबाबत जें सक्रिय सहकार्य अलिकडे उपलब्ध होत आहे, त्याचा पूर्णांशानें अभाव असताहि, विकट परिस्थितीत ही बँक १५ ऑगस्ट १९४९ रोजी स्थापन करण्यात आली. ही बँक स्थापन करण्यात, हल्लीचे चेअरमन श्री. रघुनाथराव पाटील व त्यांचे सहकारी कार्यकर्ते, यांनी आत्मीयतेनें जे कष्ट घेतले ते खरोखरच कौतुकास्पद होय. सातारा जिल्ह्यातील सहकारी चळवळीने अत्यंत अल्पावधीत अनुकरणीय असा तो आदर्श निर्माण केला त्याचे श्रेय श्री. यशवंतरावजी चव्हाण श्री. बाळासाहेब देसाई व श्री. रघुनाथराव पाटील या सहकार त्रिमूर्तींनाच आहे. आज या बँकेच्या १४ शाखा असून खेळतें भांडवल २॥ कोटीच्या वर आहे. ठेवी १॥ कोटीच्या वर आहेत आणि बँकेने दिलेल्या कर्जाची रक्कम सुमारे १॥। कोटी आहे. बँकेने आपल्या भांडवलाचा योग्य व पूर्ण विनियोग करण्यासाठी सहकारी साखर कारखाने, तेल व कापसाच्या गिरण्या अशा संस्करण संस्था, खरेदी–विक्री व औद्योगिक सहकारी संस्था आदींना भरपूर आर्थिक सहाय्य देऊन, उपलब्ध असलेल्या भांडवलाचा, ग्रामीण विकासाच्या दृष्टीनें वापर करता येईल अशी योजना आखल्यास सातारा जिल्ह्यातील सहकारी चळवळीचा 'सितारा' साऱ्या भारतात चमकेल. हें कार्य करण्यास आवश्यक असलेले नेतृत्व श्री. यशवंतरावजी व बाळासाहेब यांच्या रूपाने सौभाग्यानें या जिल्ह्यास लाभलें आहेच. त्यांच्या मार्गदर्शनाखाली कार्यकुशल रघुनाथरावजी, त्यांच्या सहकाऱ्यांसह, प्रगतिपथावर प्रत्यहि पावलें टाकतील असा आत्मविश्वास आहे. अलिकडे, सकस दूध पुरवठा व्हावा म्हणून दूध उत्पादकांना म्हशी घेण्यासाठी पैसा देण्याची योजनाही आखण्यात आलेली असून, कोणत्याहि जिल्हा बँकेने आजवर हाती घेतलेल्या योजनांत ही अभिनव आहे. या योजनेमुळे मुंबई येथील वरळीच्या डेअरीसही दूधपुरवठा होणार आहे. आम्ही या योजनेस यश चिंतितो!




## नासिक जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. नासिक

(स्थापना १९५५)



अगदी अलिकडोल काळांत सहकारी चळवळीचा महाराष
झपाट्यानें प्रसार आला व तिच्या विकास होऊन ि
मेडोपाडी पोहचले त्यामागील प्रेरक शक्ति श्री भाऊसाहेब हिरे।
अशा प्रकारे महाराष्ट्राच्या सहकारी चळवळीची प्रेरक शक्ति
श्री भाऊसाहेब हिरे याचे नेतृत्व, नाशिक जिल्ह्याला लाभावें
जिल्ह्याचे मोठें सौभाग्य होय भाऊसाहेब जरी राजकारणात ना
आले तरी त्याचा खरा पिंड सामाजिक आणि शैक्षणिक सेवेचा
विधायक दृष्टिकोण असलेला राजकीय कार्यकर्ता, जनहिता
त्याला प्रामाणिक तळमळ असेल, तर कोणतीहि राजकीय सत्ता न
आपल्या समाजसेवेमुळें जनतेच्या हृदयसिंहासनावर कसा आरू
ह्याचे श्री. भाऊसाहेब हिरे हे मूर्तिमत प्रतीक होत. निष्ठावत से
समाजसेवेची अनेक दालनें उघडी असतात, तळमळ मात्र हवी
भाऊसाहेबानी गेल्या पाच वर्षांत महाराष्ट्रातील सहकारी चळ
आपुलकीने भाग घेऊन, तिला जी गति आणि प्रेरणा दिली यावरून
स्पष्ट होतें. नाशिक जिल्हा बँकेची स्थापना, हें त्याच्याच प्रेरणाचे
होय २६ जाने. १९५५ रोजी स्थापन झालेल्या ह्या बँकेनें, अ
नेत्रदीपक प्रगति केली असून तिच्या २० शाखा आहेत. तिचे भाडवल
५२ लाख रु असून खेळतें भाडवल ४३६ लाख रु. आहे. ग्रामीण जी
आर्थिक स्थैर्य व सुबत्ता याची प्रतिस्थापना करण्याकरिता, भाऊ
सारखे तळमळत असल्यानें, ग्रामीण आर्थिक परिस्थितीचा पाया म
करण्यासाठी, त्यानी शेतकऱ्याच्या सोयीसाठी, विविध योजना क
न्वित केल्या इतकेंच नव्हे तर, जिल्हा समृद्ध आणि संपन्न व्हावा या
तीन सहकारी साखर कारखान्याची योजना व अनेकविध औद्यो
सहकारी मंडळ्या प्रस्थापित करण्यात स्वत- होऊन पुढाकार घेत
दाभाडी येथें चालू असलेला सहकारी साखर कारखाना, नि
येथील संकल्पित साखर कारखाना व पिंपळगांव येथील फळाच्या रसा
कॅनींग कारखान्याची योजना, ही त्याच्याच परिश्रमाचीं प्रतीकं
ह्या कामी त्याना ह्या विभागातील अर्थशास्त्राचे प्राध्यापक श्री. र
जी पुराणिक याच्याबरोबरच सहकारी क्षेत्रातील श्री अण्णासा
वैशंपायन, श्री एम् एल् जाधव, शकरराव वाजे आदि कार्यकर्त्य
साहाय्य मिळालें श्री भाऊसाहेब याच्या पुण्यप्रभावाने प्रगती पथा
असलेली ही बँक, श्री. कायदे याच्या कुशल यत्नेनें, अल्पावधीत
जिल्ह्यातील " सहकारी सत्काराचें यशोमंदिर " ठरेल असा आ
विश्वास आहे




## अहमदनगर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. अहमदनगर

(स्थापना १९५७)



श्री. एम्. के. फिरोदिया एम्. पी.

सहकारी चळवळीसारख्या देशव्यापी चळवळीत, महाराष्ट्राचे कार्य आदर्श असून अत्यंत उठावदार, सुस्पष्ट आणि देशाच्या विकासाला अनुकूल वातावरण निर्माण करणारे आहे; असा लौकिक मराठी भाषिक प्रदेशाचा सर्वत्र झालेला आहे. सहकारी चळवळीत अग्रेसर असलेल्या महाराष्ट्रात, नगर जिल्ह्याला अग्रपूजेचा मान आहे. ह्याचे श्रेय *सहकारमहर्षि श्री. वैकुंठभाई मेहता व अर्थशास्त्रज्ञ प्राध्या*पक सहकारी चळवळीचे प्रणेते, श्री. धनंजयरावजी गाडगीळ या उभयतांनी *आत्मीयतेने ह्या जिल्ह्याचा सहकारी तत्वावर विकास* करण्याकडे, जे प्रत्यक्ष लक्ष पुरविले त्यालाच आहे. त्यामुळे ३ ऑक्टो १९५७ रोजी विजयादशमीच्या सुमुहूर्तावर सुरू केलेल्या ह्या बँकेने, आज सर्वोत्कृष्ट जिल्हा सहकारी बँक, म्हणून अखिल भारतात विजयपताका फडकविली आहे. ह्यागोष्टीत आश्चर्य करण्यासारखे ते काय ? कोणत्याहि मराठी माणसाला अभिमान वाटून, त्याची छाती फुगावी असेच हे अलौकिक कर्तृत्वाचे प्रत्यंतर देणारे, सहकार मंदिराचे यशःतोरण होय ! अवघ्या ४ वर्षांच्या अवधीत ह्या बँकेने, केलेल्या नेत्रदीपक प्रगतीची साक्ष खालील आकड्यावरून येईल. आज ह्या बँकेचे शेअर भांडवल ७१ लाख रु असून डिपॉझिट जवळ जवळ ३०० लाख आहे. आणि कर्जपुरवठा जवळ जवळ ७०० लाख आहे आणि ही बँक आज 'अ' वर्गात मोडली जाते. जिल्हा पातळीवरील सहकारी बँकांना हा मान क्वचितच मिळतो. इतकेच नव्हे तर काही मागासलेल्या राज्यातील राज्य सहकारी बँकापेक्षा देखील ही बँक मोठी आहे. ग्रामीण जीवनाच्या उन्नतीसाठी ह्या बँकेने, 'ग्रामआयोजनाचा' जो अभिनव प्रयोग सुरू केला आहे त्याकडे सहकारी कार्यकर्त्यांचे मोठ्या कुतुहलाने आणि आस्थेने लक्ष आहे. बँकेचे स्वतःचे एक पाक्षिक असून लवकरच तिची स्वतःची इमारत होणार आहे. जिल्ह्यात सहकारी साखर कारखान्याव्यतिरिक्त, नानाविध सहकारी संस्कारण संस्था वाढण्यास ह्या बँकेने पुढाकार घेऊन, त्याना सर्वोतोपरी सहकार्य दिले आहे. लवकरच ह्या बँकेच्या पुढाकाराने, येथे दोन सूत गिरण्या, सॉल्व्हन्ट प्लँट यांच्या उभारणीची योजना कार्यान्वित होणार असल्याने, जिल्ह्यातील लोकांना रोजगार व शेतकऱ्याना अधिक संपन्नता साध्य करिता येईल. 'सहकाराचे नंदनवन' असा ह्या जिल्ह्याचा आज लौकिक आहे. ह्याचे श्रेय ह्या बँकेचे तरुण, उत्साही, सेवाभावी आकर्षक व्यक्तिमत्वाचे अध्यक्ष श्री. मोती भाऊ फिरोदिया व बहुजन समाजातील विधायक दृष्टीने कार्य करणारे *सहकारी कार्यकर्ते श्री. के. बी. रोहमारे व त्यांचे सहकारी साथीदार,* या सर्वांसह, बँकेचे कार्य कुशल अनुभवी मॅनेजर श्री धारप यानाच आहे.




## रत्नागिरी जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. रत्नागिरी

(स्थापना १९५७)



श्री. वी. जी. सातू

अविकसित व गरीब मागासलेले प्रदेश हे सहकारी चळवळीतील कच्चे दुवे होत. सहकारी चळवळीचा जन्म या जिल्ह्यांत १९०४ साली विजयदुर्ग येथें झाला व जरी आज सुमारे ५८ वर्षे झाली तरी या जिल्ह्यातील सहकारी चळवळ फोफावू शकली नाही याचें कारण लोकांची अतिशय गरिबी व पिकाचें अपुरें उत्पन्न. त्याशिवाय एकूण १८ लक्ष ग्रामीण जनतेपैकी ⅓ ग्रामीण जनता मुंबईस कामधंद्यासाठी येत असल्यानें या जिल्ह्याचे आर्थिक जीवन परावलंबी झालें आहे शिवाय वाहतुकीची साधनेंहि अपुरी त्यामुळे या सर्व परिस्थितीचा दृश्य परिणाम सहकारी चळवळीवर झालेला दिसत आहे. म्हणूनच २४ मे १९५७ रोजी ही बँक जेव्हा स्थापन झाली त्यावेळी ही बँक यशस्वी होईल की नाही असा यक्षप्रश्न होता व मुख्यमंत्री श्री यशवंतराव चव्हाण यानी ही गोष्ट बँकेचे चेअरमन श्री सातू यांच्याजवळ त्यावेळी बोलूनहि दाखविली होती जिल्ह्यातील सहकारी चळवळीला व सहकारी कार्यकर्त्यांना तें एक आव्हानच होतें श्री. सातू यांच्या प्रेरक आणि मार्गदर्शक नेतृत्वाखाली जिल्ह्यातील जनतेने ही बँक यशस्वी करण्याचा ठाम निश्चय केलेला आहे कोकण भागातील अत्यन्त यशस्वी अशी ' चिपळूण अर्बन को–ऑपरेटिव्ह बँक ' स्वतःच्या व्यक्तिमत्त्वावर आणि अजोड कर्तृत्वानें ज्यानी यशस्वी केली त्या श्री सातू यांच्या कुशल व मौलिक नेतृत्वाचा लाभ झाला असल्यानें, प्रतिकूल भौगोलिक परिस्थितीतहि ही बँक लवकरच अग्रेसर ठरेल, असा विश्वास सरकारला वाटत असल्यामुळेंच, सरकार आणि महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मधील सहकारी नेते, तिच्याकडे सहानुभूतीने पहात असून, बँकेच्या दृष्टीनें महत्त्वाचा असलेला तोट्याचा प्रश्न, समाधानकारकपणे सोडविण्यात त्यानी मदत केली आहे अवघ्या ४ वर्षांत अप्रगत, विचित्र नैसर्गिक व आर्थिक परिस्थितीत तिनें जी प्रगति (आज ह्या बँकेचे भागभांडवल जवळजवळ ४ लाख रुपयाचे असून खेळते भांडवल ५० लाखाचे वर आहे व ठेवी सुमारें ४० लाखाच्या आसपास आहेत) केली आहे ती प्रशंसनीय अशीच आहे या यशाचे श्रेय सर्वामार्गी चेअरमन श्री सातू, व्हाईस चेअरमन आमदार श्री पेजे व जिल्ह्यातील सर्व सहकारी कार्यकर्ते यांची आत्मीयता व प्रेरक सहाय्य यानाच आहे. श्री वी. जी. सातू यांच्या निरलस कार्यकुशल मार्गदर्शनाखाली ही बँक कोकणाच्या आर्थिक प्रगतीस गतिमय सहकार्य करून, तो विभाग सधन करून त्यात सुबत्ता नांदवील असा दृढविश्वास वाटतो




## धुळें जिल्हा सेंट्रल कोऑपरेटिव्ह बँक लि. धुळें

(स्थापना १९५७)



श्री. जे. डी. राऊळ

"तुका म्हणे निश्चयाचें बळ तेंचि एक फळ ।।" धुळें जिल्ह्यात सहकारी चळवळीचे लोण १९०७ साली पोहोचलें असलें तरी सहकारी बँकेची स्थापना मात्र १३ सप्टेंबर १९५७ रोजी झाली. तत्पूर्वी मुंबई राज्य सहकारी बँक– तिच्या शाखेद्वारे ह्या विभागातील ग्रामीण जनतेच्या गरजा भागवीत होती. प्रत्येक जिल्ह्यापुरती एक सहकारी बँक असावी या सरकारी धोरणानुसार ही बँक अस्तित्वात आली व एक एप्रिल १९५८ पासून तिनें आपला कारभार सुरू केला. या बँकेचे सुरुवातीपासूनचे अध्यक्ष श्री. राऊळ, हे पश्चिम खान्देशातील एक पुढारलेले शेतकरी असून, राजकीय व सामाजिक कार्याची त्यांना अत्यंत आवड आहे. कोणतेंहि काम एकदा अंगावर घेतलें की, तें तारुण्य सुलभ उत्साहानें पार पाडण्याची तडफ, धडाडी व संघटनाकौशल्य याचा सुखद संगम त्यांच्या ठिकाणी झालेला असल्यानेंच अवघ्या चार वर्षांत ह्या बँकेनें जी प्रगति केली ती खरोखरच श्री राऊळ यांच्या कर्तृत्वाची जागृत साक्ष तर देतेच देते पण त्याबरोबरच त्यांचे संचालक मंडळ, सहकारी क्षेत्रातील कार्यकर्ते, आणि कार्यकुशल कर्मचारी यांच्या निष्ठापूर्वक प्रयत्नांचे मनोहारी विश्लेषणहि करते. आज ह्या बँकेचे वसूल भांडवल ४१ लाख रुपये असून ठेवी १५० लाखांच्यावर आहेत व खेळतें भांडवल ३।। कोटींच्यावर आहे. सहकारी शेतीला प्रोत्साहन देण्यासाठी ह्या बँकेने दुप्पट कर्ज देण्याचा जो निर्णय घेतला आहे तो अभिनव असून त्याच्या यशाकडे सहकारी कार्यकर्त्यांचे लक्ष लागलेले आहे. अलिकडेच भारतसरकारचे वतीनें सहकारी शेतीविषयीचें शैक्षणिक शिबीर, ह्या जिल्ह्यात भरविण्यात आलें होतें त्यावेळीं, मध्यवर्ति सरकारच्या सहकार व पंचायतराज्य खात्याच्या, *उपमंत्र्यांनी* सहकारी शेतीचा प्रयोग यशस्वी होण्यासाठी जें सक्रिय सहकार्य ह्या बँकेनें केले त्याची प्रशंसा केली. श्री. राऊळ यांच्या नेतृत्वाखाली ह्या बँकेचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे, हा ह्या जिल्ह्यातील जनतेचा विश्वास *अनाठायी कसा ठरेल ?*




## उस्मानाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. लातूर (जिल्हा उस्मानाबाद)

(स्थापना १९५९)



श्री. बी. एस. चालुक्य

मराठवाड्यातील सहकारी चळवळीनें, जुलमी निजामी राजवटीतून मुक्तता झाल्यानंतर, जें बाळसे घेतलें आहे त्याचें संगोपन करण्याचें कार्य, या जिल्ह्यातील कार्यकर्ते कसोशीनें करीत आहेत. श्री. देविसिंग चौहान यांच्या सारख्या, विधायक दृष्टिकोण असलेल्या नेत्याचें मार्गदर्शनात्मक सहकार्य, या भागातील कार्यकर्त्यांना लाभत आल्यानें, हा जिल्हा सहकारी चळवळीच्या क्षेत्रात मराठवाडा विभागात नेत्रदीपक प्रगति करूं शकला आहे. श्री. देवीसिंह चौहान यांची कार्यक्षम दृष्टी, सहकारी चळवळीवरील ज्वलंत निष्ठा, निरलस निरपेक्ष काम करण्याची भावना, ही ह्या चळवळीस उपकारक ठरली आहे. १७-१२-१९५९ रोजी रजिस्टर झालेल्या या बँकेचे कार्यक्षेत्र उस्मानाबाद जिल्हा असून तिचे कार्यालय लातूर येथे आहे. पूर्वी या जिल्ह्यात दोन बँका होत्या. जिल्ह्याकरिता स्वतंत्र बँक, हें शासकीय धोरण कार्यान्वित झाल्यापासून, सहकारी कर्जपुरवठा वाढत्या प्रमाणावर देण्याचे धोरण अंगिकारण्यात आलें असून, बँकेच्या एकूण कार्याची सर्वांगीण प्रगति होत आहे. आज तिचे खेळतें भांडवल १ कोटी ३५ लाख असून ठेवी ४५ लाखापर्यंत आहेत. दिलेले *कर्ज जवळ जवळ १ कोटी रु. असून कर्ज-वसुलीचे प्रमाण ६०-६१* मध्ये ९२ टक्के होतें. अशा रितीनें शेतकऱ्यांच्या जास्तीत जास्त गरजा पुरविण्याच्या ध्येयाप्रत, ही बँक द्रुतगतीने वाटचाल करीत आहे. बँकेच्या ठेवीबाबत झालेली वाढ ही निःसंशय अभिमानास्पद असून, जनतेच्या वाढत्या विश्वासाचे द्योतक आहे. या सर्व कार्याचे श्रेय, बँकेचे अध्यक्ष श्री. भास्करराव चालुक्य यांचे कार्यकुशल तडफदार, तळमळीचे श्रद्धाशील नेतृत्व व संचालकांचे हार्दिक व क्रियाशील सहकार्य यालाच आहे. यामुळे ही बँक, स्पृहणीयरित्या प्रगति-पथावर आहे. श्री. चालुक्य यांचा जन्म शेतकरी कुटुंबात झालेला असल्यामुळे, शेतकऱ्यांच्या सुख दुःखाशी समरस होण्यात आणि त्यांना संकटकाळी मदतीचा हात देण्यात ते आत्मीयतेनें अहर्निश झटत असल्यानें, ही बँक अधिक झपाट्याने प्रगति करून मराठवाड्यात अग्रेसर ठरेल ही भावना अनाठायी ठरणार नाहीच ! *अुत्कट ध्येयनिष्ठ भास्कररावजी सतत कार्यशील राहून, ही* बँक शेतकऱ्यास सुबत्ता व स्वास्थ्य प्राप्त करून देण्यात यशस्वी होईल हे निःसंशय !




## ठाणें जिल्हा मध्यवर्ति सहकारी बँक लि. ठाणें

(स्थापना १९५७)



श्री. डब्ल्यू. टी. सावंत

अवघ्या ४ वर्षांच्या अल्पावधीत, ही बँक स्वावलंबी होण्याच्या मार्गावर आली असून, त्या दृष्टीने तिने अपेक्षेपेक्षा पुष्कळ जलद प्रगति केली आहे, याचे बहुतांशी श्रेय या बँकेच्या संचालक मंडळातील सभासदासह प्रामुख्याने, ह्या बँकेचे तळमळीचे अध्यक्ष श्री० वामनरावजी सामंत यांचा जो समाजसेवेचा स्थायी स्वभाव आहे, त्याला दिले पाहिजे विनोबाजींच्या 'सर्वोदयी' तत्वज्ञानाची छाप त्यांच्या आचार-विचारावर असल्यानें, संचालक मंडळातील सभासदांचे सहकार्य, सौजन्यशील वागणुकीनें मिळवून, कोंकण विभागातील ही बँक कौशल्यानें हाताळण्यात त्यांना जें यश मिळालें आहे, त्याची प्रेरणा निष्ठा-पूर्वक समाजसेवेच्या कार्यास वाहून घेण्याची त्यांची जी प्रवृत्ति, तिलाच आहे १४-३-१९५८ ही बँक नोंदण्यात आली १-४-५९ पासून बँकेने आपल्या व्यवहारास प्रारंभ केला. आज तिच्या १२ शाखा आहेत. सुरवातीच्या वेळी सभासदसंख्या १४५ होती ती आज ६२० आहे. दिलेली कर्जें २-३ लाख रु. होती ती आज ५० लाख आहे. खेळतें भांडवल ५५ लाख होतें ते आज ९० लाखापर्यंत गेलें आहे जिल्हा आर्थिक-दृष्ट्या मागासलेला ४० टक्के लोक आदिवासी डोंगराळ भाग व समुद्र किनारा त्यामुळें सहकारी चळवळीच्या दृष्टीनें अप्रगत. त्यामुळे 'पालें-मोंड' या सावकारी पद्धतींचा फास येथील जनतेच्या गळ्याभोंवती गुंडाळला गेला होता यात आश्चर्य कोणतें ? दूरदूर पसरलेल्या वन्य जमाती, वाहतुकीची अपुरी साधनें, अज्ञान अशा अवघड परिस्थितीतही आपल्या सहकारी कार्यकर्त्यांच्या कर्तृत्वाला हाक देऊन, परिस्थितीचें आव्हान स्वीकारून, पुष्कळशा भागात सहकारी संघटनेचें जाळें विण-ण्यात जें स्पृहणीय यश मिळविलें त्याबद्दल श्रीसामंत व त्यांच्या सहकारी कार्यकर्त्यांचा गौरव करावा तितका तो थोडाच होय ! कठिण परिस्थिती-तहि, श्री सामंत व त्यांच्या सहकाऱ्यांनी येथील आदिवासी व मच्छीमार समाज, यांना सहकारी चळवळीत सामील करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली आहे बँकेतर्फे शेतकऱ्यांच्या हितासाठी दूध-पुरव-ण्याची योजना हाती घेण्यात येणार आहे ग्रामीण विभागात, अधिक शाखा-विस्तार करून १ वर्षाच्या अवधीत बँकेच्या ठेवी पाऊण कोटी व खेळतें भांडवल १ कोटी करण्याचा श्री सामंत यांचा मानस सांप्रतचे उत्साही कार्यक्षम मॅनेजर श्री. घामणकर यांच्या सहकार्यानें सफल होवो आणि हा मागासलेला विभाग 'सहकारी चळवळीच्या माहात्म्याने' विकसित होवून संपन्नतेनें समृद्ध होवो हीच इच्छा !






## मेहकर सहकारी मध्यवर्ती बँक लि. मेहकर

(स्थापना १९१३)

"वऱ्हाडातील सहकारी कार्यकर्त्यांचे आगर म्हणजे मेहकर" असें समीकरण वऱ्हाडातील सहकारी चळवळीचे कार्यकर्ते मांडीत असतात ते कांही उगाच नाही ! वऱ्हाडचे सहकार ऋषी श्री. दादासाहेब सोमण यांच्या वास्तव्यानें पुनित झालेला हा तालुका, त्याचे कार्यप्रवण, कर्तव्यतत्पर कुशल सहकारी श्री. जी. एम् दिक्षित, श्री. आर्. व्ही देशमुख आणि एम्. व्ही देशमुख, यांच्या अविरत प्रयत्नानी 'सहकारमय' झाला असल्यास त्यात आश्चर्य ते कोणतें ? सतत पन्नास वर्षे श्री दादासाहेब ह्या चळवळीत तनमन अर्पून कार्य करीत असल्यानें , अनेक अडचणीचे दुर्धर डोंगर उल्लघून ह्या बँकेनें व जिल्ह्यातील सहकारी चळवळीनें नेत्रदीपक प्रगती केलेली आहे सुरवातीला ह्या बँकेचें भाडवल फक्त ४२ हजार रु होतें. ते आज सुमारे ९ लाख असून, तिच्याकडे असलेली ठेव अदाजे १८ लाखापर्यंत पोहोचली आहे. सभासद संख्या सुमारे १४ हजार असून त्याना दिलेल्या कर्जांची एकूण रक्कम ४० लाखाचेवर आहे. तालुका कार्यक्षेत्र असलेल्या बँकेची ही प्रगति गौरवास्पद नाही असें कोण म्हणेल ? १९१३ साली सुरू झालेली ही बँक मदगतीनें, पण दृढप्रगति करीत असताना १९३३ च्या आर्थिक मदीच्या लाटेत सापडून तिला जबरदस्त तडाखा बसला असल्यास त्यात विशेष असेंकाहीं नाही. परन्तु १९४० नतर " कॉपलोन " (शेतमालावर कर्ज) देण्याची व्यवस्था, ह्या बँकेने सुरू केल्यानतर, तिची प्रगति द्रुतगतीनें होऊ लागली. ह्या बँकेनें, शेतकऱ्याला त्याच्या मालाची वाजवी किमत मिळावी या करिता सतत कसोशीनें प्रयत्न केले असून, हे उद्दिष्ट ध्यानी ठेवून जवळजवळ ३० फार्मिग सोसायटीज् स्थापन केल्या इतकेंच नव्हे तर कांही प्रक्रिया कारखानेहि काढावे ह्या दृष्टीने ही बँक प्रयत्नशील आहे ह्या बँकेच्या उज्ज्वल यशाचे धनी श्री व्ही के सोमण, श्री जी एम् दीक्षित, श्री आर व्ही देशमुख, श्री एम् व्ही देशमुख ही जिल्ह्यातील निष्ठावन सहकारी कार्यकर्ती मडळीच होत ह्या सर्वांच्या प्रेरक प्रयत्नानी ह्या विभागात सहकारी चळवळीनें नेत्रदीपक प्रगति केली नसती तरच आश्चर्य ! मेहेकर तालुका मोठा भाग्यवान् आहे की त्याला अशा नेत्याचे नेतृत्व लाभलें ! ह्या नेतृत्वामुळें ह्या विभागाचे 'भाग्य' उजळेल असा दृढविश्वास आहे



श्री. एस्. व्ही देशमुख











## बुलढाणा को ऑपरेटिव्ह सेंट्रल ॲंड लॅंड मॉर्गेज बॅंक लि, बुलढाणा

(स्थापना १९१९)



श्री. व्ही. आर. कोर्डे

कर्तृत्वाला प्रादेशिक बंधनें नसतात हेंच खरे ! अन्यथा मुंबई येथें शिक्षण झालेले, ठाणे जिल्ह्याचे रहिवासी, विनायकरावजी कोर्डे बुलढाणा येथील सहकारी बॅंकेचे अध्यक्ष होऊन सहकारी चळवळीचा केंद्रबिंदू म्हणून लौकिकास कसे आले असते ? बॅंकेचे वैभवशाली पुनरुज्जीवन अत्यंत आल्यानंतर त्यांच्याच कर्तृत्वामुळें शक्य झालें आहे. १९१९ साली स्थापन झालेल्या ह्या बॅंकेचा मुख्य उद्देश, सोसायट्यांमार्फत शेतकऱ्यांना कर्ज देणें एवढाच होता. १९२८ च्या आर्थिक मंदीच्या लाटेत ही बॅंक सर्वस्वी बुडण्याच्या मार्गावरच होती. स्व. श्री. अण्णासाहेब पिंप्रीकर यांनी स्थापन केलेल्या ह्या बॅंकेवर शेतीमालाचे भाव घसरल्यानें मोठाच दुर्धर प्रसंग ओढवला शेतकऱ्यांची कर्जें परत करण्याची क्रयशक्ति अजिबात नष्ट झाली व बॅंकेचें अदमासे ९० टक्के कर्ज स्थगित झालें. निम्यापेक्षा अधिक सोसायट्या अवसायनाखालीं गेल्या परिणामी, ठेवीदारांच्या रकमा बॅंक परत करू शकली नाहीं व सर्व प्रकारचे व्यवहार स्थगित करण्यात आले. १९४२ ते १९५३ पर्यंत पुनर्वसन करण्याचा प्रयत्न करण्यात आला व बॅंकेची थोडीफार प्रगती झाली व ठेवीदारांना रुपयास १० आणे ९ पै पर्यंत रकमा परत देण्यात येऊन नवीन सोसायट्या काढून, सभासद संख्या वाढवून कर्जाचे व्यवहार दीड लक्षापर्यंत वाढविण्यात आले तदनंतर १९५३ पर्यंत बॅंकेचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न करण्यात आला व १९५५ पासून ही बॅंक पूर्ववत् स्वतंत्र कारभार पाहू लागली बॅंकेने अत्यंत अल्पावधीत पुष्कळच प्रगति केली। असून प्रगतिपथावर तिची पाऊलें अखंड पडत आहेत याचा कोणासहि आनंद होईल वऱ्हाडातील ह्या जिल्ह्यातील शेतकऱ्यांस पतपुरवठा करून, त्यांस सधन करण्यास ह्या बॅंकेने प्रशंसनीय कामगिरी केली आहे आणि तिचा आदर्श अनेक सहकारी संस्थांना स्फूर्तिप्रद ठरला आहे श्री. विनायकरावजी कोर्डे यांचे कार्यशाली कर्तृत्व व प्रभावीशाली व्यक्तित्व व सहकाराचे प्रामाणिक महत्कार्य सिद्धविण्याचे त्यांचे कसब ह्या भागातील सहकारी संस्थांच्या विकासास उपकारी ठरो हीच इच्छा !

# THE BULDANA CO-OPERATIVE CENTRAL & LAND MORTGAGE BANK LTD.,

## BULDANA

Regd. No. 77 ] [ Estd. 1919.

Area of operation :- Chikhali Taluq in Buldana District.

Shri V. R. Korde, B. A. LL. B,
*CHAIRMAN*

Shri Bhagwandas Gupta,
*VICE-CHAIRMAN.*

Financial position of the Bank as on 30-6-1961 :-

| | | |
|---|---|---|
| Share capital | ... | 4,65,273- |
| Reserve and other funds | ... | 1,62,300- |
| Deposits | ... | 15,19,448- |
| Loaning operation | ... | 39,38,843. |
| Working capital | . | 51,45,660- |

—: *Branches* :—

**(1) Chikhali** **(2) Deulgaon Raja** **(3) Dhad** **(4) Amdapur.**

The Bank accepts all types of deposits on attractive rates of interest. The Bank issues all types of loans to the agriculturists through the networks of co-operetives for production purposes The Bank also renders all types of banking facilities to its constituents.

**N. V. PANDE,** B. A.
Maneger.

---

# शेतकरी सहकारी संघ लि, मालेगांव (नासिक)

फोन नं ४०] स्थापना २५-१-१९५४. [तार – शेतकरी

हेड ऑफिस :– मालेगांव. रजि. नं २०२८५ सब ऑफिस :– उमराणें

**संघ करीत असलेली कामें :–**

१. शेती मालांची शेकडा ७५ नये पैसे कमीशनवर योग्य भावानें विक्री करणें व प्रसंगी माल खरेदी करणें.
२. सर्व प्रकारची शेती कामांची औजारें, स्प्रे पंप्स् यांची किफायतशीर भावानें विक्री करणें.
३. सर्व प्रकारच्या किड नाशक औषधांची विक्री करणें.
४. टिकाव, फावडे, घमेले, बादली, पहारी इत्यादी शेती उपयुक्त साधनांची विक्री करणें.
५. सर्टिफाईड कपाशी बियाणें, व इतर बि–बियाणें यांचा मोठ्या प्रमाणात पुरवठा करणें.
६. सर्व प्रकारची एंजिन तेलें व रॉकेल माफक दरानें शेतकऱ्यास पुरविणें.
७. किर्लोस्कर वॉटर पंप्स्, बेसप्लेट, स्कोडस् किर्लोस्कर इंजिन; स्प्रेअर्स व वरुणा पंप्स् यांची विक्री करणें.
८. म्यान्युअर मिक्स्चर भुईमुग पेंड व इतर नत्रयुक्त खतांचा मोठ्या प्रमाणात पुरवठा करणें.
९. रासायनिक खताचे जिल्हा होलसेलर म्हणून काम करणें.
१०. गिरणा सहकारी साखर कारखान्याच्या साखर विक्रीचें होलसेलर म्हणून काम करणें.
११. तालुक्यांतील सोसायट्यांना त्यांच्या गरजेच्या वस्तूंची होलसेल दरानें विक्री करुन त्यांच्या धंद्यास उत्तेजन देणें.
१२. माफक दरानें कापड विक्री करणें.

महाराष्ट्र स्टेट को–ऑपरेटिव्ह युनियनचें जिल्हा चढाओढीत नासिक जिल्ह्यांतील सतत दोन वर्षांपासून ढाल व रोख बक्षीस रु. ५०० संघानें मिळविलें आहे. संस्थेची आजची सांपत्तिक परिस्थिती:–

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| • वसुल झालेले भाग भांडवल | रु. | ५८,९७५ | • खेळतें भांडवल | रु. | १३,३७,५५८. |
| • एकूण फंडस् | रु. | ६,७५,६५१. | • सन १९६०–६१ चा नफा | रु. | १,४९,७४१. |

**किसन श्रीपत शेवाळे**
चेअरमन

**मंगळदास ताराचंद भावसार**
मॅनेजिंग डायरेक्टर

शेतकरी सहकारी संघ लि, मालेगांव




## दि मलकापूर सेंट्रल कोऑपरेटिव्ह अँड लँड मॉर्गेज बँक लि, मलकापूर

(स्थापना १९१९)



श्री. आर्. जी. हातवळणे

रुपये २५० चें भाग भाडवल आणि अवघ्या १४ लोकांच्या सहकार्यानें, २७ जानेवारी १९१९ रोजी, ह्या बँकेने प्रत्यक्ष कार्यास सुरुवात केली. १९२०–ते ३० चा काळ एकसारखा प्रगतीचा गेला. परंतु १९३३ चे जागतिक मंदीचे काळात बँकेची स्थिति निकृष्टावस्थेला आल्यामुळें १९४१ पर्यंत ती सरकारनियुक्त समितीकडे सोपविण्यात आली. या काळात खेडोपाडी कञ्ज्युमर्स स्टोअर्स उघडून सहकारी चळवळीची ज्योत सतत तेवत ठेवण्याचें स्पृहणीय कार्य, आज मध्यवर्ति सरकारचे सल्लागार असलेले, त्यावेळी ह्या बँकेचे मॅनेजर असलेले श्री भार्गव यानी केले १९४६ पासून बँकेला ऊर्जितावस्था प्राप्त झाली असें म्हणता येईल. १९४७ साली बँकेची व्यवस्था संचालक मंडळाकडे सोपविण्यात आली १९४९ साली बँकेला 'ब' वर्ग मिळाला आणि रिझर्व्ह बँकेमार्फत कर्ज मिळणें सुरु झालें १९४८ मध्यें भूतारण विभाग (Land morgage section) बँकेकडे तिची प्रगती पाहून सोपविण्यात आला व तेव्हापासून या बँकेला सेंट्रल अँड लँड मॉर्गेज बँक म्हणतात. १९५८ मध्यें बँकेनें स्वतःची सुंदर इमारत बांधली व राज्यपालाच्या हस्तें तिचें उद्घाटन नोव्हेंबर १९५८ मध्यें झालें. ह्या "सहकार सदनात" वऱ्हाडमध्यें कोठल्याहि सहकारी बँकेंत नसलेली अशी सेफ डिपॉझिट व्हॉल्टची सोय असून लोकाचें सहकार्य वाढतें असल्यानें ही योजना अत्यंत यशस्वी झाली असून जनतेकडून अधिकाधिक लॉकर्सची मागणी होत आहे आजच्या ह्या बँकेच्या प्रगतीचें व स्थैर्याचें श्रेय तिचे चेअरमन श्री. रामचंद्रावजी हातवळणे यांच्या सतत कष्टा-लाच आहे. पशुसंवर्धन व शेती याकडे त्याचें आरंभापासून लक्ष असून त्याबाबत त्याना प्रदर्शनात सुवर्णपदकहि मिळालेलें आहे. सामाजिक व शैक्षणिक कार्याची आवड असलेले श्री रामचंद्ररावजी गेली ३० वर्ष ह्या बँकेशी सचिव व चेअरमन म्हणून संलग्न असून, अत्यंत आपुलकीनें त्यानी ह्या बँकेच्या भरभराटीसाठी अहर्निश प्रयत्न केले. त्याचेंच फळ म्हणजे आजची बँकेची सुस्थिति होय। आज ह्या बँकेजवळ १ कोटीच्या वर ठेवी आहेत व सभासदाना कर्ज रूपाने तिनें २ कोटी-च्यावर पैसा दिलेला आहे ह्या बँकेच्या सांप्रतच्या सुदृढ स्थितीचे मानकरी चेअरमन श्री रामचंद्रराव हातवळणे हेंच सातत्याने आहेत.




पुसद सहकारी मध्यवर्ति
बँक लि. पुसद
(स्थापना १९२४)



श्री. जे. व्ही. पल्लेवार

विशाल मुंबई राज्याची स्थापना १९५६मध्यें झाली त्यावेळी सहकारमंत्री म्हणून पुसद येथील श्री वसंतराव नाईक (आजचे महसूल मंत्री) यांची निवड झाली. त्यावेळी मुंबईकर मंडळींना जरी आश्चर्य वाटलें असलें तरी, वैदर्भीय जनतेला ह्या निवडीनें अत्यंत आनंद झाला होता; कारण सहकारी चळवळीशीं वसंतरावजींचें किती तादात्म्य आहे याची वैदर्भीय जनतेला अनुभवानें माहिती होती अवघ्या आठ महिन्याच्या कारकिर्दींतहि वसंतरावजींनी मुंबईतील सहकारी चळवळीला जी चालना दिली त्यामुळें त्यांच्या कर्तृत्वाची कीर्ती राज्यभर पसरली पुसद ही वसंतरावजींची कर्मभूमि। तेथील ह्या सहकारी बँकेला त्याचें सततचें सहकार्य लाभल्यानें ही ८ मे १९२४ रोजी नोंदली गेलेली बँक जी स्पृहणीय प्रगति करू शकली त्याचें कुणासच आश्चर्य वाटणार नाही. तिच्या विकासाचा वैभवशाली इतिहास हा विदर्भातील बँकाना आदर्श ठरला आहे, व त्यामुळे वऱ्हाडातील सहकारी बँकिंग चळवळीला प्रोत्साहन मिळालें आहे. १९५० मध्यें तिनें रौप्यमहोत्सव साजरा केला हें तिनें संपादिलेल्या अभंग विश्वासाचें जणू मूर्तिमंत प्रतीकच ! यत्नवाद हा ह्या बँकेचे आजचे चेअरमन श्री जे व्ही पल्लेवार यांचा स्वभाव दिसतो ह्या प्रयत्नवादाच्या जोरावरच, गरिबी असतांहि, महत्प्रयासाने ते एम् ए एल्एल् बी ची परीक्षा उत्तीर्ण झाले तसेंच बँकेचा कारभार चोखपणे करून, जनतेचा विश्वास संपादण्यातहि पहिल्या नंबराने यशस्वी झाले ह्या बँकेनें केलेली प्रगति, त्यांच्या प्रेरक प्रयत्नवादी शक्तींचे नमुनेदार उदाहरण होय ह्या बँकेने ह्या विभागातील सर्व प्रकारच्या सहकारी चळवळीला उत्तेजन देण्यात, पुढाकार घेऊन जनमनात, चळवळीबद्दल जो विश्वास उत्पन्न केला आहे त्याबद्दल या विभागातील जनता त्यांना सदैव दुवा देत राहील केवळ शेतकऱ्याला पतपुरवठा करण्यापुरतेंच कार्यक्षेत्र मर्यादित न ठेवता, कृषीउद्योगाच्या वाढीस आवश्यक ते सर्व सहकार्य त्यांनी देऊ केले सहकारी खरेदी-विक्रीसंघ काढून, शेतकऱ्यास योग्य भाव मिळेल या दृष्टीनें प्रयत्न केले श्री वसंतरावजी नाईक यांची ही कर्मभूमि सहकारी संघटनेची वऱ्हाडातील 'पुण्यभू' ठरेल असा आत्मविश्वास, वसंतरावजींच्या सभ्यतेची कर्तृत्वामुळें वाटतो




## दि दारव्हा सहकारी सेंट्रल बँक लि. दारव्हा

(स्थापना १९३०)

'सहकार हा सहजीवनाचा आत्मा आहे' हें जरी आज सर्वमान्य सूत्र असलें तरी पन्नास वर्षांपूर्वी परिस्थिति वेगळी होती. म्हणूनच यवतमाळ येथें १९१३ मध्यें स्थापन झालेल्या सहकारी बँकेनें तिचें कार्यक्षेत्र, यवतमाळ, पांढरकवडा व वणी ह्या तालुक्यापुरतेंच मर्यादित ठेवल्यानें दारव्हा तालुक्यातील लोकांना वाईट वाटलें. त्यांच्या मनास ही गोष्ट फार लागली व दारव्हा तालुक्यातहि सहकारी संस्थेमार्फत कर्जपुरवठा करणारी एखादी मध्यवर्ती सहकारी बँक असावी ह्या कल्पनेने जनमनात मूळ धरलें ! ह्या कल्पनेला मूर्तस्वरूप ५-११-१९२९ रोजी नागरिकांनी एक सभा घेऊन देण्यात आलें. आज ह्या बँकेच्या कार्यक्षेत्रात सुमारें १२० विविध सहकारी सोसायट्या, २० औद्योगिक सहकारी संस्था, ४ गृहनिर्माण संस्था, ८ डेअरी संस्था, १ लिफ्ट इरिगेशन सोसायटी, १ सहकारी जिनिंग फॅक्टरी—यांचा समावेश होत असून तिच्या शाखा आहेत १९३० साली २७ लोकांनी एकत्र येऊन सुरुवात केलेल्या ह्या बँकेने, आज एक विशाल स्वरूप धारण केलें आहे ह्याचे श्रेय श्री. काणे, श्री. दुद्दलवार, श्री. जोगळेकर व आजचे चेअरमन श्री. बाबुरावजी पाटील यांनाच आहे श्री बाबुरावजींचे व्यवहारज्ञान, काटेकोरपणा व कार्यचातुर्य यामुळेच, त्यांच्या अध्यक्षीय कारकीर्दीत ही बँक एक आदर्श सहकारी संस्था बनली आहे ह्या बँकेचे हें मोठें भाग्य आहे की बाबुरावांसारखा धुरंधर कार्यकर्ता तिला अध्यक्ष म्हणून मिळावा व श्री दुद्दलवार वकील यांसारखा सव्यसाची सचिव लाभावा या समसमासयोगामुळेंच, आज ह्या बँकेनें नेत्रदीपक प्रगति केली असून तिचे शेअर भांडवल ८ लाखाचे व खेळतें भांडवल ५३ लाखाचे आहे. आपल्या विभागातील सहकारी सोसायट्या, खरेदी विक्री सोसायट्या, जिनींग फॅक्टरीज् वगैरेना ही बँक, आपुलकीनें साहाय्य करीत असल्यानें ह्या विभागातील सहकारी चळवळीची ही बँक केंद्रबिंदू झाली असल्यास नवल नाही तिनें केलेल्या भरीव कार्याची प्रशंसा महाराष्ट्रातील मा वसंतरावजी नाईक, श्री बाळासाहेब भारदे, श्री मधुकरराव चौधरी, श्री खेडकर ह्या प्रमुख नेत्यांनी केली असल्यास तें स्वाभाविकच होय


श्री. बी. के पाटील






## कुलाबा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. अलिबाग.

(स्थापना १९६०)



श्री. भा. य. नेने

पंधरा वर्षांपूर्वी महात्माजींच्या नेतृत्वाखाली आपल्या भारत देशावर जेव्हा स्वातंत्र्यसूर्याचा उदय झाला तेव्हा पासून भारतामधील लोक राजकीय दृष्ट्या समानतेच्या पातळीवर आले आहेत परंतु राष्ट्रपिता गांधीजींना अभिप्रेत असलेल्या समाजरचनेत आर्थिक विषमता नष्ट करून, सर्वांना सुखी करण्याचा जो विधायक कार्यक्रम होता, तो अद्याप साकार झालेला नाही सांप्रत पराकोटीला पोहोचलेली आर्थिक विषमता तशीच चालू ठेवून, समाजाचा गाडा सुव्यवस्थितरित्या चालू शकेल काय, असा फार मोठा प्रश्न उपस्थित झालेला आहे समाजाच्या निरनिराळ्या थरातील आर्थिक विषमता फक्त कराच्या साधनानें नष्ट होणार नाही असें महात्माजींप्रमाणे, गेल्या पंधरा वर्षांतील अनुभवावरून, पंतप्रधान नेहरू, अर्थमंत्री मोरारजी देसाई ,श्री टी टी कृष्णमाचारी यांना पटलें असून ते तसें आजकाल उघड बोलू लागले आहेत. 'कर लादणें" ही जी क्रिया आहे, त्याच्याहि पलिकडे जाऊन काही उपाय योजणे आवश्यक आहे, अशी राष्ट्रनेत्यांची खात्री पटली आहे आणि ह्या प्रश्नाची सोडवणूक "सहकारी" तत्वाचा सर्व क्षेत्रात अवलंब केल्यानें, पुष्कळ प्रमाणात होईल, असा विश्वास राष्ट्रनेत्यांना वाटू लागला आहे शेतकऱ्यांना शेतकी उत्पादनासाठी कर्ज देण्यासाठी, पन्नास वर्षांपूर्वी सुरू झालेल्या ह्या चळवळीचें, आज तेवढेच मर्यादित क्षेत्र राहिले नसून, तिनें प्रत्येकाच्या क्षेत्रात स्पृहणीय प्रगति करून, नेत्रदीपक कार्य केल्याचें महाराष्ट्राच्या काही जिल्ह्यात दिसत असले तरी, मागासलेल्या कोंकण विभागात, विशेषत कुलाबा जिल्ह्यात, तिची प्रगती अगदीच मंद होती, हें मान्यच करावें लागेल मागासलेला भाग, आदिवासी अज्ञ लोक, दळणवळणाची अत्यंत अपुरी साधनें ही या गोष्टीला मुख्यत्वें करून जबाबदार होत परंतु अलिकडेच स्थापण्यात आलेल्या जिल्हा सहकारी बँकेनें, परिस्थितीशी झुंज देऊन यश मिळविण्यासाठी सातत्यानें प्रयत्न करण्याचा चंग बांधलेला आढळून येतो याचें श्रेय पहिल्या लोकनियुक्त संचालकमंडळाचे चेअरमन म्हणून निवड झालेले श्री भाऊसाहेब नेने यांना आहे श्री नारायणरावजी हे पेण येथील एक निष्ठावान, कार्यकर्ते असून, स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेऊन त्यांनी राष्ट्रसेवा केली आहे जिल्हा विकास मंडळाचे मंडळाचे चिटणीस, जिल्हा सहकारी औद्योगिक संघ, पेण अर्बन को-ऑपरेटीव्ह बँकेचे चेअरमन, अशा विविध क्षेत्रात ते जनतेची सेवा करून लोकप्रिय झाले आहेत त्यांच्या मार्गदर्शनाखाली, संचालक मंडळाच्या सहकारी सदस्यांच्या सहकार्यानें व श्री तोनडे यांच्या योग्य व्यवस्थापकत्वाखाली ही बँक जिल्ह्यातील जनतेच्या उत्कर्षास भरीव मदत करील असा आत्मविश्वास वाटतो



भारत देश स्वतंत्र झाल्यानंतर, सर्वसामान्य माणसालाहि सुखी, समृद्ध आणि समाधानाचे जीवन जगतां यावे यासाठीं, योजनाबद्ध विकासाच्या नियोजनाचा कार्यक्रम, राष्ट्र नेत्यानी निर्धारित करून, पंचवार्षिक योजनांची आखणी केली. समाजवादी समाजवादाचे स्वप्न साकार करण्याचे कार्यांत 'सहकारी संघटनेला' फार मानाचें स्थान देण्यांत आले. जेणेंकरून, सहकारी चळवळ ही आता केवळ, पतपुरवठ्याची चळवळ न राहतां, श्री. वैकुंठभाई मेहता व डॉ. धनंजयरावजी गाडगीळ, यांची प्रेरक प्रेरणा व जिव्हाळ्याचे जातीचे प्रयत्न यामुळें तिनें कारखानदारीच्या क्षेत्रात प्रवेश केला. डॉ. गाडगीळ यांनी प्रवरानगर येथें पहिला सहकारी साखर कारखाना प्रस्थापित करून ह्या सहकारी संस्करण कारखानदारीचा 'श्रीगणेशा' करून प्रक्रियात्मक कृषि अुद्योगाची मुहूर्तमेढ ह्या "भगीरथां"नी रोवली व "सहकार समृद्धीची गंगा" महाराष्ट्रांत वाहूं लागली. हा प्रयोग इतका यशस्वी झाला कीं, तदनंतर महाराष्ट्रात जवळजवळ वीस सहकारी साखर कारखाने निघाले, व भारतांतील सहकारी संघटनेचा हा सफल प्रयोग पाहण्यांस, देशविदेशचीं मंडळी, ह्या 'सहकारा तीर्थावर' नित्य येत असतात व पुण्यशील मार्गदर्शन व अनुभवाचे संचित संपादित असतात. अशा ह्या "सहकारतीर्थाचे" हे संक्षिप्त समालोचन....



# सहकारतीर्थ









## प्रवरा सहकारी साखर कारखाना लि. प्रवरानगर

(स्थापना १९४८)





श्री. व्ही. ई. विखेपाटील

मे १५, १९६१ रोजी, सहकारी साखर कारखानदारीच्या क्षेत्रात इतिहास घडला ! भारताचे पंतप्रधान नेहरु यांनी, महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतीय सहकारी चळवळीत क्रांति केलेल्या प्रवरा सहकारी साखर कारखान्यास भेट देऊन, तेथें भरभराटीस आलेल्या सहकारी संस्करण संस्थेची पाहणी करुन "अति उत्कृष्ट आदर्श" ह्या शब्दात गौरव करुन महाराष्ट्रातील सहकारी चळवळीचा सन्मान केला ! हा कारखाना म्हणजे महाराष्ट्रातीलच नव्हे तर भारतीय सहकारी चळवळीचे अध्वर्यू डॉ धनजयराव गाडगीळ याच्या तपश्चर्येचे रसाळ फळ होय ! लोकशाही समाजवादी समाजरचनेचीं सामाजिक आणि आर्थिक उद्दिष्टें साध्य करण्याचें सहकारी चळवळ हें प्रभावी साधन आहे हें ज्यांनी प्रत्यक्ष कार्यानें सिद्ध केलें त्या डॉ. नानासाहेब गाडगीळांची प्रेरणा व सहकार महर्षि श्री. वैकुंठभाई मेहता याचे मौलिक मार्गदर्शन हींच ह्या कारखान्याच्या यशस्वितेची सूत्रें होत ! श्री. धनंजयरावजी तर ह्या संस्थेच्या आद्य संस्थापकांपैकी प्रमुख आहेत. १९६० पर्यंत, १२ वर्षे ते सतत चेअरमनहि होते. सत्तास्थानी चिकटून बसण्याचा त्यांचा स्वभाव नसल्यानें जनतेचा आग्रह असताहि त्यानी त्याचे सहकारी, त्याच भागातील प्रमुख बागाईतदार, सहकारी चळवळीतील कार्यकर्ते श्री विखे पाटील यांच्याकडे अधिकारसूत्रें सोपविली. आजहि ते कारखान्याच्या महत्वाच्या प्रश्नात बारकाईनें लक्ष घालून सल्ला देत असतात. प्रवरा कारखान्याची स्थापना १९४८ साली झाली.

श्री विठ्ठलरावजी विखे पाटील, कै यशवतराव टेकावडे, श्री शंकरराव धुमाळ व या सर्वांचे सहकारी शेतकरीबंधू पुढे आले व त्यांनी, हा कारखाना स्थापण्याचे कामी डॉ. गाडगीळ यानी सर्वतोपरी सहकार्य करण्याचें कामी पुढाकार घेतला. कारखान्याचे सभासद सुमारे १५०० असून ४१ गावाचा समावेश या कारखान्याच्या कार्यक्षेत्रात केलेला आहे जुन्या मुंबई राज्य, व हल्लीच्या महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेनें, प्रथमपासून या कार्यास चालना देण्यास फार मदत केली व परिश्रमपूर्वक या कारखान्याचा पाया मजबूत केला कारखान्याची कार्यपद्धती संपूर्ण लोकशाही तत्त्वावर आधारलेली असून भारत सरकारच्या कृषिविभागाचे पार्लमेंटरी सेक्रेटरी श्री. अण्णासाहेब शिंदे व समाज सेवक डॉ काकडे याचें सहकार्य संचालन मंडळास आरंभापासून लाभत आहे प्रवरा कारखान्यानें यशस्वी संचालनानें कल्पनातीत यश मिळविल्यानें, महाराष्ट्रातील सहकारी चळवळीला उत्तेजन मिळालें असून तिची भरभराट व प्रसार वेगानें होत आहे. प्रवरा कारखान्यानें मुदतीच्या आधीच कर्जफेड करून एक आदर्श निर्माण केला आहे. डॉ. गाडगीळ याच्या प्रेरणेने पुनित झालेला हा प्रवरेच्या परिसरातील कारखाना, श्री विखे पाटील व श्री अण्णा साहेब शिंदे याच्या संचालनाखाली सहकारी चळवळीचा 'मानबिंदू' ठरल्यास नवल तें कोणतें ?

## मा. यशवंतरावजी चव्हाण यांचे मननीय विचार

"शेतकरी हा फक्त शेतकरी राहून अुपयोगी नाहीं तर तो व्यापारी व कारखानदार झाला पाहिजे त्याशिवाय त्याचा सर्वांगीण विकास होणार नाही. सहकारी चळवळ केवळ मुखवस्तूंच्या मालकाची न होता ती दीन दुबळयाच्या मालकीची झाली पाहिजे."

श्री यशवंतरावजी चव्हाण
८ ऑगस्ट १९६२ कोपरगांव

* * *

"विकासाची प्रतिज्ञा करून सहकारी कारखानदारीचा जन्म झालेला आहे. या सहकारी कारखान्यानी, ग्रामीण, सामाजिक, आर्थिक व मानवी स्थित्यंतराच्या तत्त्वाकरितां झगडले पाहिजे."

* * *

"लोकशाहीत सहकाराचे सामर्थ्य असावे लागते. सहकारी संस्थातील लोकशाही सुदृढ करण्याकरितां आरोग्यमापन करण्याचें यंत्र आपली आजची सहकारी कारखानदारी होय. प्रगतीशील संस्थेचे सहकार हे प्रतीक होय."

मा. यशवंतरावजी चव्हाण
१६ जून १९६१ कोल्हापूर

* * *

"सहकारी शेतीचा प्रयोग आपणाला लोकाच्या संमतीने व क्रमाक्रमाने अमलांत आणावयाचा आहे. त्यासाठीं शेतीच्या क्षेत्रात अनुकूल असे वातावरण प्रथम निर्माण केलें पाहिजे. या दृष्टीनें पहिली पायरी म्हणून सहकारी सेवासघ स्थापन करण्यास चालना देण्याचें योजिलें आहे. याचा अर्थ असा की, बियाणे, खते व अवजाराची खरेदी, जमीनधारण व पाणीपुरवठा यासारख्या योजना आणि शेतीमालाची विक्री ही शेतीची अनुषंगिक कामें, सहकारी संघ प्रथमतः हाती घेतील आणि याप्रमाणे क्रमाक्रमानें सहकारी शेतीप्रत जातील. सहकारी शेतीमुळे समाजात खरेदी विक्री भावना वाढीस लागून, सहकारावर अधिष्ठित असलेल्या समाजवादी समाज रचनेचे अंतिम ध्येय गाठण्यास मदत होणार आहे.

* * *

"सहकारी शेतीच्या योजनेत अभिप्रेत असल्याप्रमाणे भूमिहीन शेतमजूर वा छोटे जमीन मालक यानी आपले सहकारी सघ स्थापन केले म्हणजे जमिनीचे संचलित विभाग विस्तृत होऊन कसपतीसाठी मोठे क्षेत्र मिळेल, व त्यानें शेतीचे उत्पादन वाढविण्याचे आपले अंतिम ध्येय साध्य होण्यास मदत होईल शिवाय बी, बियाणे, व उपजाराची खरेदी, भू-संरक्षण, पीक सरक्षण, पाणी पुरवठयाच्या सोयी यासारख्या उपाययोजना, आणि शेतीमालाची विक्री या गोष्टी अनेक व्यक्ति एकत्र येऊन जेवढया कार्यक्षमपणें करु शकतील तेवढें एका व्यक्तीला कधीच जमणार नाही. हा सहकारी शेतीचा साधा व सरळ हिशेब आहे"

श्री. यशवंतरावजी चव्हाण




**दी सासवड माळी**
**शुगर फॅक्टरी लि.**
**माळीनगर**
**(स्थापना १९३२)**



श्री. ह. ब. गि रमे

"महाराष्ट्रांतील मानाचा पहिला सहकारी साखर कारखाना म्हणून सासवड माळी शुगर फॅक्टरीचा गौरव केला पाहिजे. ऊस तयार करणाऱ्या शेतकऱ्यांच्याच प्रत्यक्ष व्यवस्थेखालीं चाललेला हा कारखाना, विचार आणि व्यवहार या दोन्ही दृष्टींनी सहकारी कारखाना आहे. पहिला सहकारी कारखाना म्हणून लोणीच्या कारखान्याचा कागदोपत्री उल्लेख असला तरी त्याला प्रेरणा मुळात सासवड माळी शुगर फॅक्टरी-पासूनच मिळालेली आहे. सहकारी कारखाना उभारणे आज सोपें आहे पण तो चालविणें मात्र कठीण आहे. सहकार हा संपत्ती, यंत्र वा ऊंस यात होत नसून कारखाना चालविणाऱ्या माणसाच्या मनात असावा लागतो या कारखान्याच्या चालकाच्या रक्तातच ही सहकार्याची भावना रुजलेली आहे. त्यामुळें व्यवहारामध्यें सहकारी कारखाना कसा चालवावा याचा आदर्श म्हणून माळीनगरकडे पाहिलें पाहिजे. साधी राहाणी, कर्तृत्व, नवीन प्रयोग करण्याची उमेद आणि चांगल्या कामाला मदत करण्याची दानत असे विविध गुण सासवड माळी शुगर फॅक्टरीच्या संचालक मंडळात एकवटलेले आहेत. एकेकाळी फुलमाळी असलेला हा समाज आज ऊसमाळी म्हणूनहि गाजतो आहे. गिरमे-बोरावके वगैरे मंडळी ही शेतीच्या इतिहासातील सौंदर्यस्थळें मानली पाहिजेत ही मानाची नांवे आहेत. त्यांना मुजरा केला पाहिजे."...
असे उद्गार सासवड माळी शुगर फॅक्टरीच्या रौप्यमहोत्सवाचे वेळी ता १८।११।१९५९ रोजी मुख्यमंत्री श्री यशवंतरावजी चव्हाण यांनी काढले. सहकार्यानें मातीतून सोनें पिकविणाऱ्या पहिल्या साखर कारखान्याची मुहूर्तमेढ १७ नोव्हेंबर १९३२ रोजी रोवली गेली व महाराष्ट्रात सहकाराच्या एका मोठ्या प्रयोगास सुरुवात झाली. धैर्य, हिंमत, चिकाटी, दीर्घोद्योग, व सहकाराचे पोटी जन्मास आलेली आपुलकी याच्या निष्ठेवर २८ वर्षांपूर्वी ह्या फॅक्टरीचा समार सुरू झाला तो आजपर्यंत सर्व संकटाशी झुंज देत देत, यशस्वी झाला इतकेंच नव्हे तर त्याने महाराष्ट्रात एका नवीन सहकारी युगाचा पायंडा घातला सर्वकुशल, कार्यक्षम, मितभाषी, साधे, प्रसिद्धिपराङ्मुख संचालक श्री. हरिभाऊजी गिरमे यांनी आपल्या प्रेमळ स्वभावानें, ह्या कार-खान्यात जें आपुलकीचें व स्नेहाचें वातावरण निर्माण केलें आहे तें अत्यंत सुखद व उत्तेजक आहे या कारखान्यात लोकांच्या सोयीसाठी शिक्षणशाळा, व्यायामशाळा, क्रीडांगणें, जिमखाना, लायब्ररी, सहकारी पतपेढी, अशा सर्व आधुनिक सुखसोयी व दवाखाना वगैरेंची सोय आहे. श्री हरिभाऊ गिरमे यांनी अखिल भारतात सहकारी साखर कार-खान्याची जन्मोत्री असलेल्या ह्या कारखान्याची फडकविलेली ही 'यशोमाला' अशीच अधिकाधिक उन्नतीनें अविरत फडकत राहो आणि महाराष्ट्राची परंपरा उज्ज्वल करो हीच इच्छा !




## दि कोपरगांव सहकारी साखर कारखाना, लिमिटेड गौतमनगर, कोपरगांव

(स्थापना : १९५३)



श्री. एस्. डी. काळे.

शेतकरी कारखानदार होईल ही गोष्ट स्वप्नात तरी कधी शक्य होती का ? पण हें स्वप्न सहकाराने ज्यानी साकार केले, त्यात श्री दादासाहेब अवताडे याचा इतका पुढाकार होता की, नगर जिल्ह्यातील जनतेने त्याना आदराने ' सहकार-महर्षि ' ही पदवी बहाल करून त्याचा गौरव केला नगर जिल्ह्यामध्ये साधारणतः पाऊस बराच कमी पडतो, परंतु सरकारने, बागायती पीकाना पाणी पुरवठ्याची सोय केल्याने तेथे ऊसाची लागवड हळूहळू जास्त प्रमाणात होऊ लागली. शेतामध्ये रात्रंदिवस १२ महिने कष्ट करणाऱ्या शेतकऱ्यास त्याच्या श्रमाचा योग्य मोबदला मिळत नव्हता, याची या जिल्ह्यातील सहकारी चळवळीतील कार्यकर्त्यांना नुसती जाणीवच होती असें नव्हे तर खंतहि वाटत होती. त्यावर उपाय म्हणून सहकारी तत्त्वावर साखर कारखाना काढण्याच्या विचाराना १९४४–४५ साली चालना मिळाली; अर्थात् ह्या कार्यासाठी जरुर ती प्रेरणा, मार्गदर्शन, व सर्वतोपरी सहाय्य श्री वैकुंठभाई मेहता, डॉ गाडगीळ, श्री व्ही.पी. वर्दे आदिनी दादासाहेब अवताडे व त्याच्या सहकाऱ्याना दिले, म्हणूनच ४ जून १९५३ रोजी रजिस्टर झालेला हा कारखाना डॉ गाडगीळाच्या शुभ हस्तें १२ फेब्रु १९५६ रोजी सुरु होऊ शकला पहिल हगाम, अनेक अपरिहार्य अडचणीमुळें फायदेशीर झाला नाही त्यामुळे सहकारी तत्त्वावर सुरु झालेला हा दुसरा साखर कारखाना असल्याने सहकारी कारखानदारीला विरोध असणारानी, एकच गिल्ला केला पण दुसऱ्याच हगामात उत्तम प्रगति करून ह्या कारखान्यानें विरोधकाची तोंडे बद केली. आज ह्या कारखान्याने केलेली प्रगति व आर्थिक स्थैर्य हे सचालक मंडळाच्या सतत परिश्रमाचे व दादासाहेब अवताडे याच्या मार्गदर्शनाचे फळ होय हा कारखाना उभारणीच्या कार्यात श्री अवताडे याना बँकेचे श्री कल्याणपूरकर व आजचे चेअरमन श्री. शकररावजी काळे याचे आरभापासूनच सहकार्य लाभले श्री शकरराव हे धडाडीचे तरुण कार्यकर्ते असून अभ्यासू वृत्तीचे शेतकरी आहेत. नुकतेच ते जिल्हा परिषदेचे पहिलेच अध्यक्ष म्हणून निवडून आले आहेत त्याच्या कुशल नेतृत्वाखाली हा कारखाना शेतकऱ्याच्या व कामगाराच्या हिताच्या दृष्टीने अहोरात्र झटत आहे श्री शंकररावजी व त्याचे सहकारी मित्र याच्या परिश्रमाच्या पुण्याईनें हा परिसर सुखी आणि समृद्ध होईल असे म्हणणें, हें वस्तुस्थितीला धरूनच होईल।






## श्रीराम सहकारी साखर कारखाना लि. फलटण

(स्थापना : १९५४)



श्री. व्ही. के. नाईक निंबाळकर

सहकारी साखर कारखानदारीचा प्रयोग आता प्रयोगावस्थेतून बाहेर पडला असून तो इतर सहकारी तत्वावरील धंद्यांना स्फूर्तिदायक ठरत आहे हे जरी आज सत्य असले तरी साखर कारखानदारी महाराष्ट्रात यशस्वी होईल की नाही अशी साधार भीति जेव्हा १९३० साली व्यक्त करण्यात आली होती, अशा काळी, सर्वतोपरी सहकार्य करण्याचे आश्वासन देऊन, प्रत्यक्ष मदतीने 'फलटण' येथे श्री. आपटे मफतलाल यांचा साखर कारखाना यशस्वी व्हावा म्हणून ज्यांनी प्रत्यक्ष स्वतः प्रयत्न केले तेच त्यावेळचे फलटणचे राजे श्री. मालोजीराव नाईक–निंबाळकर हे या कारखान्याचे योजना-प्रवर्तक होत. आपल्या संस्थानची समृद्धी, औद्योगीकरणामुळे करून, स्वतःची संपन्नता वाढवावी, हा त्यावेळचा दृष्टीकोण बदलून जनहितार्थ, सहकारी संस्थांच्या उभारणीसाठी स्वतः कष्ट करणारा हा संस्थानिक म्हणजे भारतात लोकशाही कशी यशस्वी होत आहे याचे मूर्तिमंत प्रतिक होय ! काळ बदलला आणि वंशपरंपरागत राजेपद नष्ट होऊन शेतकरी-कामकरी हा राजा झाला ! आणि ज्यांच्यावर राज्य केले अशा लोकांचा हा एक काळचा राजा, राजेपद नष्ट झाल्यावर त्यांच्या आर्थिक स्थैर्यासाठी, नवनवीन योजना कार्यान्वित करण्यासाठी प्रयत्न करू लागला हा कालाचाच महिमा म्हणायचा ! त्या प्रेरणेचे स्फूर्तिप्रद फळ म्हणजे हा कारखाना होय. हा कारखाना २४–७–१९५४ रोजी रजिस्टर करण्यात आला त्याचा परिसर १५ मैलांचा असून त्याचे कार्यक्षेत्र ५९ गावांत सामावलेले आहे. कारखान्याचा गळिताचा पहिला हंगाम आमचे भारताचे अर्थमंत्री श्री मोरारजीभाई देसाई यांच्या हस्ते विजयादशमीच्या दिवशी १३ ऑक्टोबर १९५७ मध्ये सुरू झाला. या कारखान्याचे चेअरमन श्री विजयसिंह मालोजीराव नाईक-निंबाळकर हे मालोजीरावांचे द्वितीय चिरंजीव. विश्वविद्यालयीन शिक्षण अमेरिकेत घेऊन B Sc ची (शेतकी.) ची पदवी त्यांनी संपादन केली. कारखान्याच्या संचालक मंडळाचे सुरुवातीपासूनचे प्रेरक चेअरमन, सहकारी तत्त्वावर आर्थिक जीवनाचा पाया उभारण्याच्या कल्पनेस मूर्त स्वरूप प्राप्त करून देण्यासाठी सतत झटणारे असे हे कर्तबगार, कार्यकर्ते असल्याने संचालक मंडळाच्या सभासदांचा विश्वास, सहकार्य व प्रेम त्यांनी संपादन केले असून, श्री शंकररावजी दाते यांचे उपयुक्त मार्गदर्शन व मॅनेजिंग डायरेक्टर श्री. पंत यांच्या मदतीने श्री. शिवाजीराजे हा कारखाना उत्तरोत्तर अधिक नावारूपास आणतील यात काय संशय !




## राहुरी सहकारी साखर कारखाना लि. राहुरी
## श्री शिवाजीनगर
(स्थापना - १९५४)



श्री. बी. बी. तनपुरे एम्. एल्. ए.

स्वातंत्र्य वृत्तीची आवड, बेताचेच शिक्षण आणि घरची गरिबी असतांहि अगदी हुशारी, प्रामाणिकपणा, कुशाग्रबुद्धि, कोणत्याहि संकटकाळाला झुंज देण्याचे मानसिक सामर्थ्य व कणखरपणा या गुणसमुच्चयामुळें ज्यानी आपले जीवन यशस्वी केले आहे अशी जी बोटावर मोजण्याइतकी मंडळी आज या सहकारी संघटनेच्या क्षेत्रात आढळतात त्यात श्री. बाबुरावजी तनपुरे यांचा क्रम बराच वरचा असेल. ते जसे शेती व व्यापारात लवकर पुढें आले तसेच सर्वसाधारण जनतेची सेवा करण्यातहि अग्रेसर राहून त्यानी पुढाकार घेतला त्यांचा शांत आणि धिमा स्वभाव, चिकाटी, सचोटी व कार्याची तळमळ याचा परिपाक म्हणजेच ४३ गावाच्या परिसरात उभारण्यात आलेला हा कारखाना होय! हा कारखाना काढण्याचा विचार मुख्यतः श्री. बाबूराव तनपुरे यांचाच होय. आमसभातील शेतकरी व बागाईतदार याना कारखान्याचे महत्व पटवून देऊन, त्यांची संघटना करून, अत्यंत अल्पावधीत आवश्यक भाडवल गोळा केलें परंतु नेमके याचवेळी अनपेक्षित असें सुवेझ कालव्यावाबतच्या वादाचें संकट आलें आणि कालव्याची उभारणी लांबणीवर पडली प्रे. नासर यानी सुवेझ कालव्याचा प्रश्न नाकेबंदी करून बिकट केल्यानें मशिनरी कार्यस्थळावर वेळींच येऊ शकली नाहीं, त्यामुळें कारखाना २ वर्षें उशिरा सुरु झाला, खर्चाचा बोजा वाढला; तरी सभासदानी तक्रार केली नाही हें जनतेच्या, त्यांच्या वरील गाढ प्रेमाचे द्योतकच होय गेल्या चार वर्षांत, या साखर कारखान्यानें उत्पादन व उत्कृष्ट यंत्रणा यादृष्टीनें, कारखान्याचा मान अभिमानास्पदरीत्या उच ठेवली असून राष्ट्रीय प्रगतीच्या कार्याला सक्रीय हातभार लावला आहे १९४२ च्या चळवळीत भाग घेतलेल्या, शेती व सहकारी क्षेत्रातील अनुभव, सामाजिक कार्याची निष्ठा व शेतकरी वर्गाच्या हिताची तळमळ असलेल्या आमदार बाबूरावजींकडून, ह्या परिसराचे भाग्य उदयाला येईल, हा त्या भागातील जनतेचा जो विश्वास आहे तो सार्थ नाही असें आम्ही कसें म्हणावें? शेतकरी सुखी अन् समृद्ध करण्यासाठी अहोरात्र परिश्रम करण्याची तयारी बाबूरावजींची असल्यानें, ईश्वर त्याना यश देईल यात काय संशय?




## अशोक सहकारी साखर कारखाना लि. अशोकनगर (जिल्हा नगर)

(स्थापना : १९५४)



श्री. बी. एस. गलांडे

"ह्या देशात जर लोकशाहीची यशस्वीरित्या उभारणी करावयाची असेल तर खेडें हा पाया मानला पाहिजे" असें राष्ट्रपिता महात्मा गांधी नेहमी म्हणत असत. लहानलहान खेड्यामधून रहाणाऱ्या आणि प्रामुख्यानें शेतीवर अवलंबून असलेल्या लाखों लोकांची आर्थिक स्थिति सुधारणें हें भारतातील सहकारी चळवळीचें ध्येय आहे. शेतमालावर सहकारी पद्धतीनें प्रक्रिया करून त्याच्या विक्रीची व्यवस्था करणें याबाबतचें आदर्श उदाहरण म्हणजे महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखाने होत.

नगर जिल्ह्यानें साखरेच्या धंद्यात भारतात मानाचें स्थान मिळविलें आहे. निर्यात करून, परदेशीय चलन मिळण्याचें साधन म्हणून ह्या धंद्यापासून मोठ्या अपेक्षा आहेत. ग्रामीण जीवनातील जीवनमान सुधारून त्याचा विकास करणारा हा धंदा आहे. साखर धंदा ग्रामीण भागात विखुरलेला असल्यानें साहजिकच स्थानिक हेवेदावे, खोट्या समजुती, आपसातील दुही ह्या गोष्टींचा धंद्यास मोठा उपसर्ग होतो. या सहकारी कारखान्याचे चेअरमन श्री भास्करराव गलांडे पाटील यांनी, ह्या सर्व विरोधी सुरातून सहकाराचे संगीत निर्माण केले म्हणूनच आज हा कारखाना नगर जिल्ह्यात अग्रेसर समजला जात आहे. सर्वसाधारण जनतेची कामें करण्यात त्यांना अत्यानंद वाटत असतो. त्यांची राहाणी अगदी साधी पण वृत्ति व विचार मात्र फार मोठे, कोणतीहि गोष्ट आकलन करणारी त्यांची बुद्धि अति कुशाग्र असल्याने एकदा अंगिकारलेले कार्य ते आत्मविश्वासाने पार पाडू शकतात. चांगले कार्य हाती घेऊन ते यशस्वी करण्यासाठी, इतर लोकांचा विरोध सोडून, सहकाऱ्यांचे प्रामाणिक सहकार्य मिळविण्याची त्यांची हातोटी हा विरळाच ! उत्पादक सभासद शेतकऱ्यांचे सोयीसाठी कारखान्यातर्फे स्वल्पदरात ऑईल एंजिन्स, जंतुनाशक औषधे, बोअरिंग मशीन, दुरुस्तीसाठी कुशल कारागिर यांची योजना, हें ह्या कारखान्याचे वैशिष्ट्य होय. संचालक मंडळाचा त्यांनी संपादन केलेला विश्वास व मॅनेजिंग डायरेक्टर श्री. उपाध्याय यांचे सहकार्य ह्या संगमाच्या संयोगानें, हा सहकारी साखर कारखाना आसमंतातील सामाजिक जीवनात सुधारणा घडवून, शेतकऱ्यांचे संसार सुखी करण्यास हातभार लावील अशी आमची धारणा असण्यास नवल नाही !






## दि माळेगांव सहकारी साखर कारखाना लि. माळेगांव (बारामती)

(स्थापना : १९५५)



श्री. व्ही. सी. जाधवराव

आदर्श कृषीपंडित म्हणून महाराष्ट्रातच नव्हे तर पाश्चिमात्य राष्ट्रांनी देखील ज्याच्या कर्तृत्वाचे कौतुक करुन यथोचित गौरव केला त्या महाराष्ट्रभूषण कै. दादासाहेब शेंबेकर यांचे साकार झालेलें स्वप्न ... म्हणजेच हा सहकारी साखर कारखाना! पुणें जिल्ह्यात बारामतीपासून ६ मैलावर शिवनगर येथें उभारण्यात आलेल्या ह्या कारखान्याच्या कार्यक्षेत्रांत निरा लेफ्ट बँक कॅनॉलने भिजणारी १५ गावें येत असून त्याची स्थापना २४–२–१९५५ रोजी करण्यात आली. वयाची साठी ओलांडली असताहि, नवतरुणांनाहि मागें टाकतील अशा तडफेनें, कै. दादासाहेब, अगदी प्रारंभिक तयारीपासून, ह्या कारखान्याच्या उभारणीकडे, स्वतः लक्ष देत होते ह्या कारखान्याची वाढ आणि जोपासना दादासाहेब शेंबेकर यांच्या नेतृत्वाखाली होत असलेली पाहून ह्या विभागातील ग्रामीण जनता मोठी उत्साहित होऊन, सर्व प्रकारचें सहकार्य देत असल्यानें, कारखान्याची उभारणी द्रुतगतीनें होत होती. पण नियतीच्या मनात काही वेगळेंच होतें! ३१।८।५५ ला परमेश्वरानें दादासाहेबाना माळेगावच्या कार्यकर्त्यांना पोरके करुन इहलोकांतून उचलून नेलें! ह्या आकस्मित आघातानें ही सर्व मंडळी दिग्मूढ झाली. तथापि कै. दादासाहेबांच्या निःस्वार्थी आणि प्रेरक शक्तीची शिकवण डोळ्यासमोर ठेवून, हिंमत न हारता, संचालक मंडळांतील कार्यकर्त्यांनी कारखान्याच्या उभारणीचें काम अंगावर घेतलें व महाराष्ट्राचे आदर्श शेतकरी कै. दादासाहेब शेंबेकर यांचें स्वप्न साकार केलें! ह्या कारखान्याचे उत्पादक सभासदांची संख्या १७१४ असून कारखान्याचे कार्यक्षेत्रांतील उंसाचें क्षेत्र ३,५०० एकर असून पहिला गळिताचा हंगाम १९५७ मध्यें सुरु झाला कै. दादासाहेब यांच्या आशिर्वादानें उत्तेजित झालेल्या ह्या संचालक मंडळीतील तरुण मंडळींनी ज्या एकोप्यानें, एकदिलानें, तडफेनें, व कार्यकुशलतेनें ह्या कारखान्याचें संचालन केलें आहे त्याची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे कै. दादासाहेबांचे कर्तृत्ववान चिरंजीव श्री द ग शेंबेकर, त्यांचे सहकारी मित्र श्री वी च जाधवराव, श्री शि म हिरेमठ, श्री. शंकरराव दातें यांनी चिकाटीनें परिश्रम करुन संकटांना न डगमगता कुशलतेनें व्यवहार करुन कारखाना भरभराटीस आणला इतकेंच नव्हे तर १९६०–६१ व १९६१–६२ ह्या दोन्ही गळित हंगामात, "उंसाची रिकव्हरी" काढण्यात भारतात उच्चांक मिळवून महाराष्ट्रातील सहकारी साखर धंद्याची यशोपताका देशभर फडकविली. ह्या यशाचें श्रेय, हल्लींचें संचालक मंडळ व त्यांचे साध्या राहणीचे पण उच्च विचारसरणीचे, दीर्घोद्योगी, दुर्दम्य आशावादी चेअरमन श्री. वीरसिंहजी जाधवराव यांच्या "वीरा"स शोभणाऱ्या कर्तृत्वाचाच आहे!




## गणेश सहकारी साखर कारखाना लि. गणेश-नगर, रांजणगांव खुर्द

(स्थापना : १९५५)



श्री. एच्. टी. शेळके

'एकमेका करू सहाय्य । अवघे धरूं सुपंथ ॥' या सहकारी तत्त्वाचे नगर जिल्ह्यात जे बिजारोपण झालेले आहे त्याला जी रसाळ, मधुर आणि गोमटी फळे आलेली दिसत आहेत त्यातील विलोभनीय फळ म्हणजे नेहमी प्रेमळ, हसतमुख, सतत समाधानी, निस्पृह, अविरत कार्यरत अशा आकर्षक व्यक्तिमत्त्वानें अलंकृत असलेले श्री. हरिभाऊ त्रिंबकराव शेळके यांचा गणेश सहकारी साखर कारखाना होय! प्राथमिक शाळेपुरते मर्यादित शिक्षण असताहि व्यवहारचतुरता व अभ्यासी वृत्तीमुळे, हरिभाऊंनी जी लोकप्रियता मिळविली आहे, तीच बव्हंशी या कारखान्याच्या यशस्वीततेचा गाभा होय. या गणेश सहकारी साखर कारखान्याचा श्रीगणेशा २६ जून १९५४ रोजी करण्यात आला व आद्य प्रवर्तक म्हणून श्री. बाबूरावजी कडू व शंकरराव बोरावके यांची निवड करण्यात आली यावेळी, आर्थिक मंदीच्या लाटेत शेतकरी सापडला असताहि इच्छित ध्येय पूर्तीसाठी या व्यक्तींनी व त्यांच्या इतर सहकाऱ्यांनी अविश्रांत श्रम घेऊन अवघ्या १५ दिवसात शेअर भांडवल जमा केले ह्या आर्थिक विवंचनेच्या वेळी, केवळ ह्याच कारखान्यास नव्हे तर इतर सर्व कारखान्यांना प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष सहकार्य देण्यात, *महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेची जी उदारता दिसून* आली, त्यामुळेच महाराष्ट्रातील सहकारी साखर कारखान्याच्या यशाचे श्रेय सहकारी क्षेत्रातील कार्यकर्ते मंडळी व शेतकरी समाज, प्रामुख्याने ह्या बँकेस आत्मीयतेने देत असताना आढळतात ३–३–१९५५ रोजी नोंदविल्या गेलेल्या ह्या कारखान्यास साखर निर्मितीचा परवाना महत्प्रयासाने मिळविण्यात डॉ. गाडगीळ यांचे अमोल सहकार्य मिळाले २२–११–१९५७ रोजी या कारखान्याचा पहिला गळित हंगाम सुरू झाला आणि तेंव्हापासून शेतकऱ्यांच्या जीवनात स्थैर्य निर्माण करण्याचे व ग्रामीण जनतेचा सहकारी चळवळीवरील विश्वास द्विगुणित करण्याचे कार्य, ह्या कारखान्यानें उत्तमरीत्या पार पाडलें आहे सहकार हा ज्यांचा जीवनाचा स्थायीभाव आहे असे शिरडी ह्या पवित्र ठिकाणी *जन्माला आलेले श्री हरिभाऊ शेळके या विभागातील जनतेचा सर्वांगीण* विकास घडवून आणतील असा विश्वास असल्यानें तेथील जनतेचे नेतृत्व स्वाभाविकच त्यांच्याकडे आलेलें आहे.




**कृष्णा सहकारी साखर कारखाना.**
**रेठरे (बु.) कराड.**
(स्थापना : १९५५)



यशवंतरावजी चव्हाण, मुंबई राज्याचे मुख्यमंत्री, मोठ्या धर्मसंकटात सापडले होते ज्यांच्या कर्तृत्वाच्या कीर्तिशलाकेने अत्यंत अल्पावधीत भारतीय क्षितिज व्यापले अशा सामर्थ्याचा 'मेरुमणि' संकटात सापडावा हेहि नवलच नव्हे काय ?– पण हे सत्य आहे. त्याचे असे झाले : मा. श्री. वैकुंठभाई मेहता व डॉ. धनंजयरावजी गाडगीळ, या उभयतांच्या तपश्चर्येने महाराष्ट्रात सहकारी साखर कारखानदारी यशस्वी होऊन 'प्रवरेच्या सहकार सुगाला' सुरवात झाली होती. सातारा जिल्ह्यातील शेतकरी कामकरी पक्षाचे हुशार, आणि सतत कार्यरत असलेले तरुण पुढारी, आमदार श्री० यशवंतरावजी मोहिते, यांनी रेठरे ( बुद्रुक ) येथे सहकारी साखर कारखाना काढण्यासाठी भाडवल गोळा करून, तो रजिस्टर केला ही सर्व जुळवाजुळव होत असतानाच साखरेचे अधिक उत्पादन, परदेशी चलनाची टंचाई व विदेशातील मागणीचा अभाव ह्यामुळे नविन साखर कारखान्यांना परवाना न देण्याचे मध्यवर्ति सरकारचे धोरण जाहीर करण्यात आले शेतकरी कार्यकर्ते यांचा मोठाच विरस होऊन ते निराश झाले अशा परिस्थितीत एक आश्चर्य घडले नगर जिल्ह्यातील एका कारखान्याला, अनेक खटपटीनंतर परवाना मिळाला तेव्हा रेठरे येथील लोकांना असे वाटले की, नगर जिल्ह्याच्या लोकांना परवाना मिळू शकतो तर मुख्यमंत्र्यांच्या जिल्ह्यातील सबन्धित कारखान्यास तो का मिळू नये ? यशवंतरावांच्यास मनात नसावे कारण ह्या कारखान्याची सूत्रे विरोधी पक्षाचे नेते श्री० यशवंतरावजी मोहिते यांच्या हातात होती–आणि असल्यावर आधारलेला हा प्रचार विरोधकांनी सुरू केला यशवंतरावजींच्या मनात हा विचार शपथपूर्वक कधी शिवणे अशक्यच ! यशवंतरावजी धर्मसंकट जाणतात ते कमरेखाली वार करणार नाहीत या धर्म संकटातून बाहेर पडण्याकरिता, नागपूर काँग्रेसचे अधिवेशन चालू असता, आपल्या एका जिल्हाळ्याच्या मित्राकरवी त्यावेळचे अन्नमंत्री श्री जैन यांना V. I. P. रूममध्ये बोलवून, ह्या कारखान्याच्या शिष्टमंडळासमोर, परवाना मिळविण्यासाठी स्वतःची सर्व पुण्याई पणास लावून त्यांनी परवाना मिळवून दिला. भारतीय घटनेच्या सत्र सामुग्रीचा हा पहिलाच कारखाना असून, रिकव्हरी १२·७३ आहे सांगतात त्याची दुसरा नंबर आहे व दर १ लाख ७० हजार पोती साखर तयार झाली शेतकरी व कामगारांसाठी विविध सुधारणांची योजना करण्यात येईल सचोटीने काम कार्यरत आहे कारखान्याच्या यशाचे श्रेय,अनुक्रमाने प्रवर्तक श्री० यशवंतरावजी मोहिते, आजचे चेअरमन जयवंतरावजी भोसले, उपाध्यक्ष श्री० पांडुरंगराव मोहिते, कार्यकारी मंडळाचे सदस्य व मॅनेजिंग डायरेक्टर डॉ रामचंद्रराव यांनाच आहे




**श्री छत्रपति शिवाजी सहकारी साखर कारखाना लि.**
**भवनीनगर सणसर जि. पुणें**
**(स्थापना : १९५५)**

सहकारी क्षेत्रातहि, पुणें जिल्हा प्रगतिपथावर आहे याची साक्ष श्री छत्रपति शिवाजी सहकारी साखर कारखाना, सतत देत राहील. सुरवातीचे प्रवर्तक श्री. साहेबराव जाचक, श्री. माणिकराव जाचक, यानी अविश्रांत श्रम घेऊन कारखाना अल्पावधीत उभारण्यात, जी तडफ आणि कार्यकौशल्य दाखविले त्यावरुन सहकारी चळवळीशी त्याचे तादात्म्य व कोणतेंही कार्य निष्ठेनें पूर्ण करण्यासाठी त्याचे तळमळीचे सातत्य ह्या गोष्टीच दृग्गोचर होत आहेत या कारखान्याची स्थापना ६ ऑगस्ट १९५५ रोजी झाली. आणि कर्मवीर भाऊराव पाटील याच्या हस्ते १३ मे १९५६ रोजी भूमिपूजन झाल्यानतर, अवघ्या आठ महिन्यात, १७ जानेवारी १९५७ रोजी साखर निर्मितीस सुरुवात करुन कार्यक्षमतेचा जो आदर्श या सणसरच्या सचालकानी निर्माण केला त्याचा हेवा वाटून, इतराना अनुकरण करावेंसें वाटल्यास त्यात आश्चर्यजनक असें कांहीच नाही ! अल्पावधीत कारखाना उभारणी व निर्मिती याबाबतीत ह्या कारखान्याची अद्यापही कोणी बरोबरी करु शकलें नाही. या कारखान्याच्या परिसरात फक्त १५ गांवांचा समावेश होत असून उसाखालील एकूण क्षेत्र २२०० एकर आहे. आज सभासद सख्या ७७१ असून गळिताच्या पहिल्याच वर्षी १२.०३ असा साखरेचा उतारा या कारखान्यात आढळून आला, याचे श्रेय सचालक मडळाच्या कार्यक्षम कारभाराला आहे या कारखान्यातील ५ वर्षातील भरभराटीची प्रगति कारखान्याचे प्रवर्तक श्री साहेबराव जाचक, आजचे चेअरमन श्री माणिकराव जाचक, सचालक मडळ, कार्यकारी सचालक, आणि कार्यप्रवण कामगार-वर्ग याच्या सहकार्यालाच आहे आज पहिली मशिनरी अपुरी पडत असून, नविन, अधिक अुस गाळणाऱ्या मशिनरीसाठी परवानगी मागण्यात आली आहे. ती लवकरच मिळेल असा आत्मविश्वास आहे सहकारी भावनेने प्रेरित झालेली ही मडळी कार्यकुशलतेने "श्री छत्रपतीचे" या कारखान्याला दिलेलें नाव सार्थ करतील हें नि:सशय !



श्री. एम्. एस्. जाचक




## गिरणा सहकारी साखर कारखाना, लिमिटेड. मालेगांव जि. नाशिक

(स्थापना : १९५५)



श्री. टी. आर्. पवार

महाराष्ट्राची पार्श्वभूमि सहकारी चळवळीस अनुकूल अशीच आहे आज सहकारी चळवळीने यशोमंदिराकडे जी नेत्रदीपक घोडदौड चालविली आहे तिचे श्रेय " श्रद्धा हाच सहकारतेचा प्राण आहे " अशा भावनेने सहकारी चळवळीला ज्या निस्वार्थी व निरलस कार्यकर्त्यांनी वाहून घेतले त्यानाच आहे, हे निर्विवाद सत्य आहे. मराठी माणूस हा कलहप्रिय आहे ही जी सर्वसाधारणत. सर्वमान्य समजूत आहे तिला आक्षेप घेऊन अधिक्षेप करणारी विधायक वृत्तीही महाराष्ट्रीय समाजातील काही लोकात आढळून येते. ह्या व्यक्तीच्या निरलस कार्यानेच आज महाराष्ट्र काही क्षेत्रात भारतात नावारूपास येऊन लौकिकास प्राप्त झाला आहे महाराष्ट्रातील सहकारी चळवळ हा भारताचा मानबिंदु आहे आज ती महाराष्ट्रात प्रबळ व प्रभावी झाली आहे ह्याचे श्रेय श्री. वैकुंठभाई मेहता, डॉ. गाडगीळ याच्यासह श्री. भाऊसाहेब हिरे यानाहि आहे शेतकऱ्याच्या सुखी संसाराचे स्वप्न साकार करण्याकरता सहकार हाच एकमेव मार्ग आहे यावर त्याची निनात श्रद्धा होती. सहकाराच्या सहाय्यानें शेतकऱ्याचा संसार सुखी संपन्न आणि समृद्ध व्हावा यासाठी गेली १० वर्षे ते अविरत, अविश्रांत प्रयत्न करीत होते आणि गेली ५ वर्षे तर त्यांनी ह्याच चळवळीला वाहून घेतलें होते त्याचे जीवन सहकारमय झालें होतें श्री भाऊसाहेब हिरे याचा वरदहस्त, ह्या कारखान्याच्या पाठीवर नसता तर ह्या कारखान्याची मुहूर्तमेढ रोवलीच गेली नसती. त्याच्याच प्रयत्नेकरून संचालक मंडळ, संकटानी खचून न जाता दुर्दम्य उत्साहाने, हे ध्येयशिखर गाठू शकलें व मालेगाव व बागलाण भागातील ३३ खेड्यातील कृषियोग साधणाऱ्या हलधराच्या तपश्चर्येला, वरदान ठरलेला हा साखर कारखाना, १९५५ च्या ऑगस्टमध्ये नोंदण्यात आला १९५८ मध्ये गळिताच्या हंगामाला शुभारंभ झाला असून आजवर त्याने केलेली प्रगति आशादायक आहे मालेगावापासून ५ मैलावर दाभाडी येथें असलेला कारखाना—याचे आद्य संचालक श्री. श्री. भाऊसाहेब हिरे व प्रवर्तक श्री व्ही. पी वर्दे, व आजचे चेअरमन श्री पवार व कुशल व कार्यक्षम मॅनेजिंग डायरेक्टर श्री मोघे व संचालक मंडळाचे सदस्य या सर्वांच्या सहकार्यानें यशोमंदिराकडे द्रुतगतीने वाटचाल करील हा तेथील जनतेचा विश्वास रास्त ठरावा अशी आम्ही आशा बाळगतो.






## श्री वारणा सहकारी साखर कारखाना लि. वारणानगर, कोल्हापूर

( स्थापना : १९५५ )

'क्रियासिद्धी सत्त्वे भवति महतां नोपकरणें' हे सुभाषित म्हणजे वारणा सहकारी साखर कारखान्याचा मानदंड होय. कृषि व औद्योगिक क्षेत्रात सहकारी विभागाद्वारे विकास घडवून आणण्याची सहकार महर्षि वैकुंठभाई मेहता व डॉ० धनंजयराव गाडगीळ यांच्या तपश्चर्येने जी अपूर्व अशी यशःपरंपरा निर्माण होत आहे त्या प्रेरणेचे सार्थ, साकार स्वरुप म्हणजेच श्री वारणा सहकारी साखर कारखाना होय. वास्तवतः या भागात समृद्ध ऊस-उत्पादनाची अनुकूलता असताहि, दारिद्र्य-पीडित अशा या भागातील अल्प शेतीच्या, निष्कांचन शेतकऱ्यांचा,कायाकल्प करण्यासाठी, देशाच्या उद्धारातच आपला उत्कर्ष आहे, हें ओळखून, विद्यार्थीजीवनापासूनच राजकारण व समाजकारण यासाठी करावा लागणारा त्याग व झीज सोसून आदर्श शेतकरी म्हणून नांवारुपास आलेले श्री तात्यासाहेब कोरे यांनी १९५२ साली सुरुवात केली होती. दोन महिन्यांच्या अल्पावधीत दीड-दोन लाख रुपये सहकारीभाडवलहि गोळा केलें होतें. परंतु सरकारचे असहकारी धोरण व अधिकाऱ्यांचे औदासिन्य यामुळे तो नाद सोडून द्यावा लागला. परंतु वारणा खोऱ्याच्या भागात पाणी, सकस जमीन, कष्टाळू शेतकरी ह्या सर्व रीतीने संपन्नता आणून देणाऱ्या गोष्टी असताहि, येथील शेतकरी निष्कांचन रहावा, त्याचा संसार भकास असावा हें शल्य तात्यासाहेब कोरे यांना स्वस्थ बसू देईना ! १९५४ साली सरकारचे धोरण अनुकूल असल्याची चाहूल लागताच त्यांनी आपल्या सहकाऱ्यांनिशी पुन्हा या प्रश्नात लक्ष घातले व अनेक खडतर समस्याशी झुंजारपणे लढत देऊन वारणा सहकारी साखर कारखान्याचे स्वप्न साकार करुन या भागातील ग्रामीण जनतेच्या सर्वांगीण भाग्योदयाची गुरु-किल्ली तेथील शेतकऱ्यांच्या स्वाधीन करुन जनसेवेच्या घेतलेल्या व्रताचे यशस्वी-रित्या उद्यापन केले! कोल्हापूर जिल्ह्यातील पन्हाळा, हातकणंगले व सांगली जिल्ह्यातील वाळवाव व शिराळा यातील ५० गावें सप्टेंबर १९५९ मध्यें रजिस्टर झालेल्या ह्या कारखान्याचे क्षेत्रात असून एक नोव्हेंबर १९६० रोजी दिवाळीच्या मंगल मुहूर्तावर कारखान्याचा पहिला गळिताचा हंगाम सुरू झाला गेल्या ५–६ वर्षांच्या अत्यंत अल्पावधीत या भागाचा सर्वांगीण विकास व समाजकल्याण साधण्यासाठी श्री कोरे यांच्या संचालकत्वाखाली श्री कोरे व त्यांचे सहकारी यांनी जें कार्य केलें आहे ते या भागाच्या भाग्योदयाचे आदिपर्व ठरेल !



श्री. व्ही. ए. कोरे




## श्री पंचगंगा सहकारी साखर कारखाना लि. इचलकरंजी

(स्थापना १९५५)



श्री. आर्. बी. कुंभार. एम्. एल्. ए.

सहकारी चळवळीला निःस्वार्थी व निष्ठावंत कार्यकर्ते हवेत. सहकारी संस्थांचे खरेखुरें यश, सभासदांची श्रद्धा व निष्ठा यावरच अवलंबून आहे "प्रत्येकानें सर्वांसाठी व सर्वांनी प्रत्येकासाठी" हें सहकारी चळवळीचे घोषवाक्य सातत्यानें जर कोणत्या साखर कारखान्यात साकार झालेलें दिसत असेल तर तें श्री पंचगंगा सहकारी साखर कारखान्यातच होय सहकारी चळवळीचे हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं अहोरात्र जर कोणी झटलें असेल तर ते शिरवल तालुक्यातील निमशिरगाव या लहान खेड्यात बलुतेदार शेतकऱ्याच्या कुटुंबात जन्माला आलेले श्री. रत्नाप्पा कुंभार ! अवघ्या चार वर्षांतच मॅट्रीकची परीक्षा पास होऊन १९३३ साली पदवीधर होण्यापूर्वीच, महात्माजींच्या आदेशानुसार १९३० च्या चळवळीत भाग घेतलेल्या रत्नाप्पांनी, ' भारत-छोडो 'च्या ४२ च्या आंदोलनात जे महान कार्य केले त्यामुळें त्यांचें नाव महाराष्ट्रात सर्वत्र झाले. स्वातंत्र्यानंतर संस्थानें विलीन करण्याच्या चळवळीतील त्यांचे नेतृत्व अपूर्व आणि अमोघ असें होतें कराची काँग्रेसला सार्वजनिक जीवनाची पहिली नांदी ह्या राजकीय व्यासपीठावरून निनादिली गेली. सतत तीस वर्षे राजकीय आंदोलनातील सर्व हाल-अपेष्टांचे सांगता झाल्यानंतर स्वातंत्र्योत्तरकाळी एक राजकीय कार्यकर्ताहि विधायक मार्गाला शुद्ध बुद्धीनें वाहून घेऊन यशस्वी होऊं शकतो, हे अलिकडच्या त्यांच्या जीवनात सामाजिक सुधारणेच्या उद्दिष्टानें प्रेरीत होऊन, त्यांनी सहकारी चळवळीचे जें जाळें विणलें आहे, त्यावरून सिद्ध होईल. पंचगंगा सहकारी साखर कारखाना हा त्या चळवळीचा केंद्र-बिंदू होय कारखान्याच्या उभारणीच्या कामास १९५४ मध्यें सुरवात झाली. सहा-सात वर्षांच्या कष्टमय प्रयत्नाने त्याची पूर्तता झाली. दहा-अकरा मैलाच्या त्रिज्येत कारखान्याच्या कार्यक्षेत्रात ८३ गावे असून, ५ हजार लोकांच्या घरामध्यें कायमच्या सुखाचा नंदादीप उजळ रीतीने तेवत आहे दोन वर्षांपासून साखर उत्पादनास सुरवात झाली आहे या कामी संस्थेचे व्हाईस चेअरमन श्री. मुल्तानपुरे व सेक्रेटरी श्री. गरगटे व संचालक मंडळाचे सभासद यांचें अत्यंत अटूट सहकार्य हीच कारखान्याच्या यशस्वितेची साक्ष !






## दि भोगावती सहकारी साखर कारखना लि. परते, जि. कोल्हापूर

( स्थापना : १९५५ )

महाराष्ट्रात सहकारी साखर कारखान्यांनी एक नवीन दिशा ग्रामीण जीवनाला दाखवून दिली आहे. ऊस-उत्पादक हे केवळ शेतीतून ऊस निर्माण करून थांबले नाहीत तर उसावर प्रक्रिया करून साखर निर्माण करण्यात ते सहभागी झाले आहेत. कारखाना काढावयाचा म्हटला म्हणजे एका वेळी कोटी–दीड कोटी भांडवल पाहिजे महाराष्ट्रात एकरकमेने ही रक्कम जमणें वा मिळणें शक्य होणार नाही त्या दृष्टीने महाराष्ट्रात आज असलेले इतके सहकारी कारखाने कसे उभारले गेले ? आर्थिक प्रश्न कसा सोडविला गेला ? संचालन व्यवस्था कशी योजण्यात आली ? याचा विचार करूं जाता, या कामी ज्यांचे नेतृत्व पूर्णपणें उपयोगी पडलें त्या श्री. वैकुंठभाई मेहता, डॉ धनंजयराव गाडगीळ यांच्यावरोबरच श्री वामनराव वर्दे यांचाहि प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. श्री. वर्दे हे मुंबई-राज्य सहकारी बँकेचे मॅनेजिंग डायरेक्टर असताना सहकारी साखर कारखान्यांचा आर्थिक पाया व यशस्वी संचलनाची इमारत उभारून त्यांनी सहकारी तत्त्वावर चालणाऱ्या संस्करण संघटनाची यशस्वी सांगता केली श्री. वामनरावजींचा सहकारी क्षेत्रातील अनुभव आणि व्यासंग अत्यंत दांडगा असून, त्यांनी सहकारी चळवळीस अंतःकरणपूर्वक वाहून घेतले आहे किंबहुना १९४७ पासून पुढील दहावर्षें त्यांनी सहकारी चळवळीच्या निकोप वाढीसाठी जें प्रयत्न केलें ते महाराष्ट्रांतील सहकारी चळवळीच्या इतिहासात अपूर्वच होत ! आरंभीच्या काळात, श्री वामनरावजी अध्यक्ष असलेला हा साखर कारखाना १८–१०–१९५५ रोजी नोंदण्यात आला १९५८–५९ मध्यें प्रथम साखर काढण्यास सुरुवात झाली। कारखाना चालू केल्यामुळें या भागात ऊसाचे क्षेत्रात वाढ झाली असून गुळापेक्षा अधिक रक्कम शेतकऱ्यास मिळत आहे अधिक उत्पादन कसें वाढवावे याबाबत संशोधनात्मक सर्व माहिती शेतकऱ्यास पुरवण्यात येत असून इतर जोडधंदे करून,उत्पन्न वाढविण्यास साधने उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न संचालक मंडळ करीत आहे या कारखान्याच्या यशस्वीतेत श्री वर्दे यांना त्यांचे सहकारी आजचे चेअरमन् श्री० डी वें पाटील, मॅनेजिंग डायरेक्टर श्री० आर. एम् देशपांडे व संचालक मंडळाचे सर्व सदस्य यांचे संपूर्ण सहकार्य लाभत असल्यानें तो निश्चित प्रगति करील हें निःसंशय !






## शेतकरी सहकारी साखर कारखाना लि. सांगली

( स्थापना : १९५६ )

पुणें आणि कोल्हापूर नंतर महाराष्ट्रामध्यें सांस्कृतिक आणि शैक्षणिकदृष्ट्या पुढारलेलें व प्रसिद्धीस आलेलें असे शहर म्हणजे सांगली. अशा या सांगली शहरात पदवी परीक्षा पास न झालेलाहि एक तरुण सेवाभावनेने अविरत कार्य करून, अमाप लोकप्रियता मिळविण्यांत कसा यशस्वी होतो, याचें श्री० वसंतराव पाटील हे एक आदर्श उदाहरण होय. वसंतरावदादा म्हणजे सतत सेवा, सचोटी आणि शिस्त यांचे मूर्तिमंत प्रतीक ! शेतकरी सहकारी साखर कारखाना हें त्याच्याच प्रेरणेचें फळ होय. बालवयापासून भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत आघाडीवर असलेल्या दादांनी आपली कार्य-प्रेरक आणि कार्यप्रवीण शक्ति स्वातंत्र्योत्तरकाळी शेतकरी व कामकरी यांचे जीवन सुखी आणि समृद्ध करण्याचे कार्यांत कारणी लावण्याचे ठरवून ग्रामीण अर्थव्यवस्थेच्या विकासाचे एक महत्त्वाचें अंग जी सहकारी चळवळ, तिला वाहून घेतलें वास्तविक सांगली शहर आणि त्याचा परिसर हा काही ऊस-पिकाचा विभाग नव्हे परंतु परिस्थितीवर यशस्वी-रित्या मात करणें, हीच तर वसंतरावांची हातोटी! त्यांनी ऊस-उत्पादन वाढीसाठी वेगवेगळ्या लिफ्ट इरिगेशन योजना हाती घेऊन त्या कार्यान्वित केल्या व आज इतका ऊस उत्पादित होत आहे की, अधिक साखर-उत्पादनासाठी नवीन यंत्र-सामुग्रीची आवश्यकता भासू लागली आहे. एक काळ असा होता की, सांगली—माधवनगर रस्त्यावरील उजाड माळावर खुरट्या झुडपांशिवाय काहीच नव्हतें आज या वैराण माळाचे एक सुंदर औद्योगिक नगरीत रूपांतर झाले असून शेतकऱ्यांच्या मालकीचा, शेतकऱ्यांनीच चालविलेला, त्यांची आर्थिक व सामाजिक उन्नति करण्यास समर्थ असलेला, शेतकरी सहकारी साखर कारखाना डौलाने उभारलेला दिसत आहे त्याचा परिसर १२ चौ मैलांचा असून कार्यक्षेत्रात ७६ गावें येतात ८–१०–१९५६ रोजी तो रजिस्टर झाला १७–१२ १९५८ रोजी श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या शुभहस्तें कारखान्याच्या प्रथम गळिताच्या हंगामास सुरुवात झाली. शेतकऱ्यांचे हें स्वप्न साकार करण्यास वसंतरावजींना श्री आबासाहेब खेबुडकर व संचालक मंडळातील सभासदांचे संपूर्ण सहकार्य लाभलें म्हणूनच कारखान्याचे उद्दिष्ट साध्य होऊन, तो प्रगति-पथावर घोडदौड करीत आहे.



श्री. व्ही. बी. पाटील एम्. एल्. ए.




## दि. संजीवनी (टाकळी) सहकारी साखर कारखाना लि. कोपरगांव

( स्थापना : १९६० )



श्री. एस्. जी. कोल्हे

अपयशाने हिंमत न हरू देता, उलट संकटांशी सतत झुंज देत यशस्वीतता प्राप्त करण्यात सहकारी साखर कारखानदारीत ज्या मंडळींनी यश मिळविलें आहे त्यांत श्री. शंकररावजी कोल्हे यांच्या भागीरथ प्रयत्नांना तोड असली, तरी जोड नाही. कारण ह्या कारखान्याच्या उभारणीस अनेकविध हितसंबंधियांचा विरोध होता ती कथा ऐकतांना कुणालाहि अरबी भाषेतील सुरस चमत्कारिक गोष्टींचीच आठवण होईल. परंतु ह्या सर्व विरोधास न जुमानता, राज्यमंत्र्यांपासून तो भारताच्या पंतप्रधानांपर्यंत, या विभागातील साखर कारखान्याची आवश्यकता नेटानें मांडण्यात श्री. शंकररावजींच्या बरोबर श्री. के. बी. रोहमारे. श्री. वाय्. एस्. गिरमे यांनी जें धैर्य दाखवून स्पृहणीय यश मिळविलें त्याचेंच 'रसाळ' फळ म्हणजे हा संजीवनी कारखाना होय ! या कामी सहकार्य तत्पर सहकारीमंत्री श्री. बाळासाहेब भारदे, डॉ. पंजाबराव देशमुख व नगर जिल्ह्याचे सहकारमहर्षि श्री. दादासाहेब अवताडे यांनी जातीनें लक्ष घातलें म्हणूनच वरील मंडळींच्या प्रयत्नांना यश आलें. हा कारखाना २८ ऑक्टो. १९६० रोजी रजिस्टर झाला. तत्पूर्वी १५ ऑक्टोबर रोजी श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्तें, जिल्हा बँकेंत या कारखान्याचे खाती १॥ लक्ष रुपये जमा करण्यात आले होते. या कारखान्याबाबत स्थानिक शेतकरीवर्गांत किती आस्था होती हें अत्यंत अल्पावधीत (आजपर्यंत कोणत्याहि कारखाना एकाचवेळी जमा न करू शकलेली एवढी मोठी) ३६ लाखांची रक्कम जमा करून विक्रम प्रस्थापित केला आहे. हा विक्रम म्हणजे ह्या भागातील सहकारी चळवळीस सळमळीने वाहून घेतलेल्या कार्यकर्त्यांवरील जनतेच्या विश्वासाची पावतीच होय ! या भागातील शेतकरी बांधवांचा दुर्दम्य उत्साह व शिस्तबद्ध कार्यपद्धती पाहून, भारत सरकारचे उपकृषिमंत्री श्री. थॉमस यांनी 'ज्यांना सहकार व शेती यांच्या मुळाशी सुयशाचे दर्शन घ्यावयाचे असेल त्यांनी ह्या भागास भेट द्यावी' असे प्रशंसोद्गार नुकतेच ह्या भागास भेट दिली असतां काढिले. लवकरच सुरू होणारा हा साखर कारखाना टाकळी विभागातील समाज जीवनास 'संजीवनी' प्राप्त करून देऊन श्री. शंकररावजी कोल्हे, श्री. के. बी. रोहमारे, श्री. बी. के. देवकर, श्री. वाय. एस्. गिरमे आदिंचे श्रम सार्थ करील असा आत्मविश्वास आहे !

# दि संजीवनी (टाकळी) सहकारी साखर कारखाना लि.

## कोपरगांव

卐

महाराष्ट्राच्या औद्योगिक क्रांतीत
मौलिक भर घालणारा
अहमदनगर जिल्ह्यांतील बारावा
व कोपरगांव तालुक्यातील सहावा
सहकारी साखर कारखाना.

| | | |
|---|---|---|
| शेतकऱ्यांचे शेअर भांडवल : | रु. | ३५,००,०००–०० |
| महाराष्ट्र राज्य सरकारने गुंतविलेले भांडवल : | रु. | १५,००,०००–०० |

साखरेच्या १००० टन कपॅसिटीच्या मशीनरीची ऑर्डर मे. वालचंदनगर इंडस्ट्रीज लि., वालचंदनगर यांचेकडे दिली असून मशिनरीची डिलिव्हरी ता. १ जानेवारी १९६२ ला सुरू झालेली असून संपूर्ण मशिनरीची उभारणी डिसेंबर १९६२ अखेर पूरी होईल.

कारखान्याची जागा कोपरगाव रेल्वे स्टेशन नजिक असून मशिनरीची उभारणी, कॉलनीची रचना, राहण्याच्या जागा वगैरे अद्यावत पद्धतीने बांधल्या जाणार असून त्यामध्ये जरूर त्या सुखसोयींची व्यवस्था केली जाणार आहे. या कारखान्याच्या उभारणीमुळे कोपरगांव शहराचे व तालुक्याचे औद्योगिक विकासात मोठी भर पडणार असून शेतकऱ्यांची व बहुसंख्य जनतेची आर्थिक उन्नति होण्यास मदत होणार आहे.

जय सहकार!

शंकरराव गेणजी कोल्हे.
चेअरमन




## श्री सोमेश्वर सहकारी साखर कारखान लि. निरा

( स्थापना : १९६० )



श्री. एम् एस् काकडे देशमुख

" तेथे असावे अधिष्ठान भगवताचे !" परंपरागत महाराष्ट्रातील समाज या श्रद्धेने कार्य करीत असतो. तेव्हा नीरेच्या परिसरातील शेतकरी वर्ग आणि त्याचे कर्तबगार म्होरके श्री. मुकुटरावजी काकडे यानी, मकल्पित सोमेश्वर सहकारी साखर कारखान्याची जागा नीरेपासून चार मैलावर करजे गावच्या समोर, मुलुड गावच्या हद्दीत, टेकडीच्या सपाटावर, कालव्याच्या वरील बाजूस जी शोधली तिचे कारण आसमतात असलेले श्री सोमेश्वराचे जागृत स्थान नसेलच असे म्हणता येणार नाही ! कारण येथील सहकारी साखर कारखान्याची मूळची कल्पना, पूर्वी कै. लल्लूभाई सामळदास व माननीय वैकुंठलाल मेहता यानी माळेगाव येथे निरा व्हॅली साखर कारखाना निघाला त्यावेळी कार्यान्वित करण्याचा प्रयत्न केला होता पण तो अयशस्वी झाला. त्यावेळी कारखान्यास स्वत:चा ऊस असला पाहिजे तरच तो यशस्वी होईल असा निष्कर्ष सिद्धांती निघाला. पूर्वी आलेल्या अपयशाने घाबरून न जाता, उलट अधिक उत्साहाने व तडफेने, संकटावर मात करण्याच्या जिद्दीने श्री मुगुटरावजी काकडे, श्री श्रीपादराव उपळेकर, व या परिसरातील कार्यकर्ते कामास लागले. विशेषत: श्री. मुगुटराव काकडे यांच्या चिकाटीमुळे, कार्यपद्धतीमुळे अनेक अडीअडचणी आल्या असताहि जनतेचे सहकार्य मानत्याने टिकवून या कारखान्याला मूर्त स्वरूप देण्याची ध्येयसिद्धीच्या तळमळीची योजना प्रत्यक्षात उतरविण्यात आली आहे. ह्या कारखान्यापासून निरा हे स्टेशन ३–४ मैलावर आहे. महाराष्ट्राची कोयना विद्युत् योजना जवळूनच जात असल्याने या कारखान्यास त्याचा फायदा होणार आहे साखरेच्या धंद्यास लागणारा ४१९ ऊस उत्तमरीतीने पिकविण्यात येथील शेतकरीवर्ग मशहूर आहे व त्यातील काहींनी तर ऊस उत्पादनात राष्ट्रपतीचे सोन्याचे पदक मिळविले आहे जवळच पाडेगाव हे ऊस संशोधनाचे स्टेशनहि आहे संशोधनाच्या सहाय्याने ऊस उत्पादन केल्यामुळे ऊसात साखरेचे प्रमाणहि उत्तम राहते. अशा रीतीने उत्तम ऊस, कार्यक्षम एकदिलाचे कार्यकर्ते, कष्टाळू शेतकरी, नैसर्गिक सोयीस्कर जागा, अशा आर्थिक व नैसर्गिक पायावर उभारण्यात येत असलेला हा कारखाना श्री मुगुटरावजी काकडे, त्याचे सहकारी संचालक सभासद व मार्गदर्शक मित्र श्री श्रीपादराव उपळेकर या सर्वांच्या प्रयत्नेकरून नीरेच्या परिसरात नंदनवन निर्माण करील यात शंका नाही !




**यशवंत सहकारी साखर कारखाना लि: अकलूज**

**(स्थापना : १९५५)**

"नगर म्हणजे सहकाराचे आगर !" सहकारी साखर कारखानदारीचा उगम अहमदनगर जिल्ह्यात झाला. तिचा प्रसार नाशिक, पुणे, सातारा, कोल्हापूर या सभोवतालच्या जिल्ह्यात झाला त्याने जे यश मिळविले ते पाहून सहाजिकच सोलापूर जिल्ह्यातील सहकारी क्षेत्रात कार्य करणाराना, स्वतःच्या जिल्ह्यात सहकारी तत्त्वावर कार्य करण्याची प्रेरणा मिळावी हे स्वाभाविकच होय या भागातील आमदार श्री. शंकररावजी मोहिते, कै. श्री सदाशिवराव माने व सध्या अस्तित्वात असलेल्या संचालक मंडळाचे सदस्य आदि मंडळींनी परिश्रमपूर्वक या कारखान्याच्या स्थापनेची सुरुवात २० फेब्रुवारी १९५५ रोजी केली.. परंतु मध्यंतरी नवीन सहकारी साखर कारखान्याला परवानगी न देण्याच्या सरकारच्या धोरणाने ही योजना बारगळण्याचे भय निर्माण झाले होते व शेतकरी समाजात नैराश्य पसरले होते. त्यातून भारतात साखरेचे अधिक उत्पादन होऊन त्या साखरेला, महागड्या किंमती• मुळे, जगाच्या बाजारात गिऱ्हाईकही मिळेनासे झाले परंतु ५–६ वर्षांच्या परिश्रमाना यश येऊन २०–६–६० रोजी हा कारखाना रजिस्टर झाला सांप्रत यंत्र-उभारणीचे काम चालू असून, पुढील हंगामात साखर गाळण्यास सुरुवात होईल एकूण साठ खेड्यातील, २२०० शेतकऱ्यांनी या कारखान्यात आपले भांडवल गुंतवले असून अगदी गरीब शेतकऱ्यांना भागीदार होता यावे म्हणून अर्धाएकर ऊसाचा एक शेअर करण्यात आलेला आहे हे ह्या कारखान्याचे वैशिष्ट्य होय. अकलूज येथील, शिवपार्वतीच्या देवालयाचे पायथ्याचे परिसरात, पसरलेला हा कारखाना, अनुभवी, उत्साही व कार्यक्षम, नोकरवर्ग, मूर्तिमंत उत्साह व कार्यक्षम, कर्तृत्व याचे प्रतीक असलेले श्री. शंकररावजी मोहिते यांच्या संचालकत्वाखाली, संचालक मंडळ व मॅनेजिंग डायरेक्टर यांच्या सहकार्याने १९६२–६३ च्या हंगामात साखर निर्मिती करून प्रगतिपथावर यशस्वी वाटचाल करू लागेल व नावाप्रमाणे "यशवंत" ठरेल असा आत्मविश्वास आहे.












मराठी भाषिक प्रदेश हा खरोखरी अत्यंत भाग्यशाली प्रदेश आहे कारण, त्याला भारतीय सहकारी संघटनेचा आत्मा असलेले, श्री. वैकुंठभाई मेहता व डॉ. धनंजयरावजी गाडगीळ, यांचे पुण्यशील, प्रेमळ नेतृत्व लाभले. ह्या उभयतांच्या प्रेरक मार्गदर्शनाखाली, सहकारी चळवळीच्या क्षेत्रात, आज महाराष्ट्र, सर्व देशात अग्रेसर आहे. आपल्या राज्यांत सहकारी संघटना केवळ, शेतकऱ्यास कर्ज पुरवठा करणारी संस्था राहिली नसून, तिनें सहकारी कारखानदारीची प्रस्थापना करून यशस्वी संचलनानें, ह्या प्रक्रियेच्या प्रयोगांस प्रतिष्ठा प्राप्त करून देऊन महाराष्ट्रांतील सहकारी चळवळीचा झेंडा गौरवानें देशांत फडकविला आहे. याशिवाय तिनें सहकारी घरबांधणी, खरेदी विक्रीसंघ, सहकारी सूतगिरणी, अशा विविधोद्देशी संघटनांचे यशस्वी संचालन करून, समाजजीवनांत मानाचें स्थान मिळविलें आहे. त्यापैकीं कांहीं वेंचक " सहकारी राउळांचे " हें त्रोटक पण वेधक संकलन ! . . .






" सहकारी चळवळीला, योग्य त्या योजना आंखून सरकारनें मदत करावी. पण सहकारी चळवळीत, संस्थाच्या अंतर्गत प्रश्नात, सरकारनें ढवळाढवळ करण्यास माझा विरोध असून, हा हस्तक्षेप, सहकारी चळवळीच्या प्रगतीच्या मार्गातील धोंड होय !"...

पंतप्रधान जवाहरलालजी नेहरु
२४ ऑक्टोबर १९६१ मुंबई

* * *

"सहकार हा जीवनधर्म आहे. त्यात कांही जादू नाही ! भारतांतील जनतेत सहकार्याचा अभाव असल्यानें आपणाला तळापासूनच बांधणी केली पाहिजे. म्हणजेच आपणांस एका समानध्येयाने प्रेरित होऊन सहकारच्या मार्गावरुन, सुखी आणि संपन्न जीवनाचा प्रवास करणें सुकर होईल."

ना. मा. सा. कन्नमवार

* * *

" ग्रामीण विभागांतील पैसा गोळा करून त्याचा विकास कार्याकडे उपयोग करण्यास सहकार्य करणे व त्याद्वारेच ग्रामीण विकास साधण्यास मदत करणें हा सहकारी बँकांच्या कार्याचा गौरवशाली भाग आहे."

अर्थमंत्री स. गो. बर्वे
२१ डिसेंबर १९६१ पुणें

* * *

" सहकारी संस्थांमध्ये अनेक लोकांचे हितसंबंध गुतलेलें असल्यानें ह्या संस्था चालविणाऱ्यांवर त्या प्रामाणिकपणे चालविण्याची जबाबदारी येऊन पडते. ह्या जबाबदारीस पात्र होणें, म्हणजेच सहकारी चळवळ यशस्वी करण्यास हातभार लावणे होय."

सहकार मंत्री केशवराव सोनावणे.

* * *

" सहकारी चळवळ ही जीवनव्यापी अहिंसक क्रांति आहे."

उपसहकार मंत्री बी. जे. खताळ

* * *

" देशातील सहकारी संस्थाचें स्वायत्तस्वरूप कायम ठेवून पंचायती व सहकारी-संस्था यामध्ये निकट सहकार्य राहणे अत्यावश्यक आहे. ग्रामपंचायत हा लोकशाहीचा मूळ-आधार बनणार असून सहकारी जीवन त्याचा आत्मा राहील."

ग्रामीण विकासमंत्री बी. जी. खेडकर

* * *

" समाजवादी समाजरचना आणि कल्याणकारी राज्य या दोन्ही कल्पना सहकारी चळवळीच्या माध्यमानेच साकार होऊ शकतात

" भारतातील आर्थिक विकासामध्यें सामाजिक परिवर्तनाना विशेष महत्त्व असल्यामुळे सर्व आर्थिक व्यवहार सहकारी तत्त्वानुसार करण्यास विशेष वाव आहे भारताच्या नियोजित आर्थिक विकासाच्या कार्यक्रमांत सहकारी क्षेत्राची निर्मिती हा अशा रीतिनें राष्ट्रीय धोरणाचाच एक महत्त्वाचा भाग आहे "








" मुंबअी राज्य सहकारी लँड मॉर्गेज बँक लि."
मुंबअी
(स्थापना १९३५)



















श्री. दो. ज. झुझारराव

"क्रिया सिद्धीःसत्वे भवति महतां नोपकरणे" भगवंतानी कर्मयोगाची महति सांगताना जें हें प्रतिपादन केलें आहे तें आजही सत्य असल्याची साक्ष, ह्या संस्थेच्या इतिहासाचें परिशीलन केलें असता, आपणास कर्मवीर श्री भाऊसाहेब हिरे यानी जें कार्य केलें, ते पाहून पटते ! शेती हा भारतीय अर्थव्यवस्थेचा कणा होय व म्हणूनच धान्योत्पादनाच्या प्रश्नाला अग्रस्थान हवे. ह्या सर्व उद्दिष्टाच्या परिपूर्ततेचें एक साधन म्हणजे " भूतारण बँक " होय ! पण ही बँक स्थापन होऊन पंचवीस वर्षाचा काळ पुरा होत आला असताही, तिच्या उपयुक्ततेचा ओघ,शेतकऱ्याप्रत न पोहचल्यानें ती निष्क्रिय ठरली होती ! तिच्यात खरें चैतन्य आलें असेल तें श्री. भाऊसाहेब हिरे यानी त्या बँकेची सूत्रें आपल्या हातात घेतल्यावर ! भाऊसाहेबानी तिला जिवतच केली असें नव्हे तर, शेतकऱ्यास तिचा लाभ अधिकात अधिक प्रमाणात उपलब्ध करून देता यावा ह्यासाठी त्यानी तिच्या कार्यपद्धतीत आमूलाग्र बदल करून, उद्दिष्टपूर्तिसाठी, मूलगामी विचारसरणीचा विधायक कार्यक्रम आखून, अत्यंत अल्पावधीत तो कार्यान्वित करण्यासाठीं कळकळीनें कार्यास सुरवात केली. त्यानी योजिलेल्या विधायक कार्याला गति मिळावी, व त्याचा प्रत्यक्ष फायदा शेतकऱ्यास तात्काळ मिळावा यासाठीं, रिझर्व्हबँकेतील एक कार्यक्षम अधिकारी डॉ हाटे यांची सेवा उपलब्ध करून घेतली उच्चपदस्थ सरकारी नोकर, आपल्या कर्तृत्वावर, सहकारी संस्थाचा कारभार दीर्घोद्योगानें, कार्यक्षम आणि चोख ठेवून, तिचा लौकिक वाढवून अल्पावधीत तिला स्थैर्य व प्रतिष्ठा करवून देतात हे महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे मॅ डायरेक्टर डॉ. दाते व ह्या बँकेचे मॅ डायरेक्टर डॉ हाटे यानी सप्रमाण सिद्ध करून सहकारी चळवळीतील कार्यकर्त्यांकडून जी प्रशंसा मिळविली त्यावरून अपवादानें का होईना पण सत्य ठरतें आहे ह्या बँकेनें प्रगतिपथावर ही जी घोडदौड केली त्याचे श्रेय, श्री भाऊसाहेब यांच्यानंतर, डॉ हाटे यांच्याबरोबरीनें श्री नीळकंठराव कल्याणी व श्री झुझारराव यानाहि देणें सयुक्तिकच ठरेल राज्यसरकारनें तगाईसाठी, विहिर खुदाई व दुरुस्तीसाठी कर्ज देण्याचे काम १९५८–५९ पासून ह्या बँकेकडे सोपविल्यापासून कार्यक्षेत्र फारच वाढला असून, आजपर्यंत सिर्फ ६॥ कोटी रुपयांचे येणें कर्जदाराकडे बाकी आहे ह्या बँकेवरील जनतेच्या वाढत्या विश्वासाचें प्रतीक म्हणजे तिनें काढलेल्या 'रूरल डिबेंचर्सना' जनतेनें सहकार्यानें प्रतिसाद दिला शेती विकासावर राष्ट्राचे उज्ज्वल भवितव्य अवलंबून असल्यानें ही बँक, अध्यक्ष श्री कल्याणी, उपाध्यक्ष श्री झुझारराव, व कार्यकुशल मॅनेजर डॉ हाटे यांच्या कारकीर्दित, राष्ट्रसेवेचा आपला स्पृहणीय वाटा, प्रशंसनीय कार्यानें उचलील असें वाटतें !







## महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटीव्ह मार्केटींग सोसायटी लि. मुंबओ

(स्थापना: १९५९)



श्री डी. बी. कोटव.

सहकारी चळवळ म्हणजे पतपुरवठा करून, शेतकऱ्याची पिळवणूक थांबविणारी चळवळ असें आज तिचें स्वरूप राहिलेलें नाहीं. शेतकऱ्याचाच नव्हे तर ग्रामीण जीवनाचा संपूर्ण कायापालट करून, त्याचें जीवन समृद्ध करणें हें आता तिचें उद्दिष्ट झालें आहे. ह्या ध्येयसिद्धिची पूर्णता करण्याचे साधन म्हणून सहकारी मार्केटींग सोसायट्यांचे स्थान अभूतपूर्व असून त्यांनी आपल्या कार्यानें सहकारी चळवळींत एक नवीन दालन उघडलें आहे. ह्या सत्याची उपयुक्तता, "आमच्या शेतकऱ्यांचें दुर्दैव असें की, शेतांत पीक उभें राहायच्या आधीच त्याची विक्री होते म्हणजे ज्या पिकासाठी अहोरात्र घाम गाळावयाचा, त्याचा सारा नफा व्यापाऱ्यानें खायचा आणि शेतकरी मात्र भुकेकंगाल रहायचा." ह्या शेतकऱ्याच्या दुःस्थितीचें अचूक वर्णन करणाऱ्या यशवंतरावजींच्या चाळीसगाव येथील भाषणांत सार्थपणे प्रतिबिंबीत होत आहे. कर्ज-पुरवठा, उत्पादन, आणि मालविक्री यांचा योजनाबद्ध मेळ बसविणें हें शेतकऱ्याच्या व सहकारी संघटनेच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक आहे. बाजाराचें परिणामकारक नियंत्रण करण्याचें सामर्थ्य मार्केटिंग सोसायट्यांनी संपादिलें तर सुखी आणि संपन्न शेतकऱ्याचें स्वप्न साकार होण्यास फारसा कालावधि लागणार नाहीं! ह्या दृष्टीकोनातून, अवघ्या तीन वर्षांच्या काळात, 'महाराष्ट्र राज्य सहकारी मार्केटिंग सोसायटीनें' नेत्रदीपक प्रगति करून, महाराष्ट्रातील सहकारी चळवळीच्या यशस्वीततेंत जी मोलाची भर घातली त्याचें श्रेय ह्या सोसायटीचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री० वाय्. बी. गायतोंडे यांनाच आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचें आजचें यशस्वी स्वरूप साकार करण्यास त्यांचे श्रम पुष्कळअंशी कारणीभूत आहेत. तेथील अनुभवाचें संचित व शेतकरी व सहकारी संघटन यांच्या समृद्धीची आंतरिक ओढ, निरलस, कार्यप्रेरक यशस्वी संचलन, सतत सेवा, सचोटी व नियोजनबद्ध योजना आखणें या श्री गायतोंडे यांच्या गुणामुळेंच ही सोसायटी विविध क्षेत्रांत कार्य करून महाराष्ट्रातील शेतकऱ्याच्या समृद्ध जीवनाची संजीवनी ठरेल असें वाटतें. आज तिचें वसूल भांडवल १४ लाखांचे वर असून सुमारे ८०० संस्था तिच्या सदस्य आहेत. शेती उत्पादनाबरोबरच फळें, भाज्या, बटाटे, कापूस, ऊस, तेलबियांची अवजारें, कृमिविनाशक जंतुनाशक औषधें इत्यादि क्षेत्रें तर तिनें व्यापिली आहेतच पण त्याचबरोबर इंडियन ऑईल कंपनीची रॉकेल तेलाची सोल-एजन्सीहि तिनें घेतली आहे व रशिया, जपान, इराण वगैरेशी करार करून, रशियन सरकारला केंद्री पदार्थांचिया निर्यात करून परकीय चलन मिळवून दिलें व आता रशियाला केंद्री निर्यात करण्याचा कार्यक्रम हातीं घेतला आहे. ह्या संस्थेच्या यशावरच सहकारी चळवळींच्या यशाचें मूल्यमापन होणार असल्यानें आम्ही या संस्थेचे चेअरमन श्री. डी. बी. कोटर, कार्यप्रवण उपाध्यक्ष श्री. आर्. टी. पाटील व यशस्वी संचालक श्री. गायतोंडे यांना शुभेच्छा चिंतितो.




## सारस्वत को-ऑपरेटीव्ह बँक लि. मुंबई

(स्थापना. १९१८)


श्री. एस् व्ही संझगिरी

"सारस्वत बँकेकडे असलेल्या भरपूर ठेवी, बँकेच्या लोकप्रियतेची, बँकेवर असलेल्या लोकविश्वासाची व सामान्य जनतेत, बचतीची सवय दृढमूल करण्यासाठी, व्यवस्थापक मंडळानें केलेले कल्पक व अविरत श्रम याच्या निदर्शक आहेत". या शब्दात सारस्वत बँकेचा गौरवपूर्ण उल्लेख रिझर्व्ह बँकेने १९५७–५८ साली केलेल्या नागरी सहकारी बँकांची पहाणी करून जो अहवाल १९६१ साली प्रसिद्ध केला त्यामध्यें केला आहे. ह्या गौरवाचे श्रेय, ह्या बँकेचे चेअरमन, महाराष्ट्रातील बँकींग व्यवसायाचे प्रणेते श्री वामनरावजी वर्दे, व सध्याचे अर्थशास्त्रज्ञ तज्ञपत्रकार श्री गोविंदरावजी लाड याच्या द्रष्टेपणाला असले तरी कर्तव्यतत्पर, कार्यकुशल, कल्पक, सेक्रेटरी, समर्थ श्रद्धाशील सचलनानें काय किमया करू शकतो याचे ही बँक मूर्तिमंत प्रतीक होय! ह्या बँकेच्या शिस्तबद्ध, सुसूत्र सचलनाचे प्राण असलेले, निरहंकारी पण प्रेमळ, प्रत्येक सदस्याची आपुलकीनें चौकशी करून, त्याला सहकार्याचा हात देण्यास सदैव तत्पर असलेले सेक्रेटरी श्री संझगिरी याच्या कार्याची प्रशंसा, सारस्वत बँकेतील सभासद सदस्य मोठ्या आत्मीयतेनें करीत असताना आढळून येतात यातच ही बँक व श्री संझगिरी यानी संपादिलेल्या अभूतपूर्व यशाचे मर्म आहे! श्री. वर्दे, श्री. लाड व श्री संझगिरी याच्या कार्यकर्तृत्वाचा हा जो त्रिवेणी संगम ह्या बँकेच्या व्यवस्थापनात झालेला आढळतो त्यामुळेंच समृद्धीच्या "सरस्वती" ची वसति ह्या बँकेच्या सिद्धीमत्वात आढळते. भारतामध्ये नागरी सहकारी बँकात अग्रगण्य समजल्या जाणाऱ्या १९१८ साली सुरू झालेल्या ह्या बँकेत, सुरवातीस फक्त ३६ सभासद होते ती सख्या आज सुमारे ७ हजारावर गेली असून, तिचे आजचें शेअर भांडवल ९ लाख ५५ हजार, रिझर्व्ह १० लाख ९० हजार, ठेवी ३ कोटी ४ लक्ष, खेळतें भांडवल ३ कोटी ३४ लक्ष असून, सरकारी कर्ज रोख्यातील गुंतवण १ कोटी ८१ लक्षाची आहे. हें आकडे, सचालकानी, काळजीपूर्वक दक्षतेने पण व्यवहार कुशलतेनें केलेल्या कार्याचेच निदर्शक होत. भागदार, ठेवीदार आणि कर्जदार ह्या सर्वांच्या वाजवी हिताचा मेळ घालणें हे ह्या बँकेचे वैशिष्ठ्य आहे. हे सर्व घटक, परस्परविरोधी नसून, एकमेकास पोषकच आहेत हें ह्या बँकेच्या धोरणाचें सूत्र आहे. बँकेची स्वत:ची इमारत असून, पुणें, बेळगाव यासह तिच्या आठ शाखा असून, महिला शाखा ही तिची विशेषता आहे. सामाजिक, शैक्षणिक संस्थाना ही बँक नफ्यातून देणग्या देत आली असून तिनें त्याच्या कार्यास हातभार लाविला आहे. गरिब, मध्यमवर्गीयाच्या, आर्थिक अडचणी व लहान व्यापारी आणि लहान उद्योगधंदे याच्या उन्नतीसाठी कार्य करण्याचा जो सफल प्रयत्न ह्या बँकेनें आजवर केला तो, भारतीय अर्थव्यवस्थेचें भूषण म्हणून गौरविला गेला आहे. म्हणूनच महाराष्ट्रातील नागरी अर्थव्यवस्थेचें भूषण असलेल्या ह्या बँकेचा सर्वत्रास अभिमान वाटत असल्यास नवल तें कोणते ?




## महाराष्ट्र को-ऑपरेटीव्ह हाऊसिंग फायनान्स सोसायटी
### मुंबई
(स्थापना : १९६०)



निवारा ही माणसाच्या मूलभूत गरजांपैकी एक अत्यंत महत्त्वाची गरज आहे. मानवाची बुद्धि जसजशी प्रगत होत गेली आणि समाज जीवनाशी तो समरस होऊ लागला, तसतशा त्याच्या अपेक्षा स्वाभाविकपणें ऊचावत गेल्या! प्रत्येकाला वाटते की, आपलें स्वतःचे घर असावे–किंबहुना अतृप्त जीवनाची पूर्तता करणारें एक साधन–म्हणजे मनासारखें निवाऱ्याचे घर हेंच होय! जीवनाच्या सुखद फलश्रुतीच्या समाधानाची फुलबाग फुलविणारें–मातीतून, दगड विटांद्वारा साकार झालेलें काव्य म्हणजेच घर होय! गरीब आणि मध्यमवर्गातील लोकांचे "स्वतःचे घरकुल" बांधावयाचें स्वप्न–सरतेशेवटी 'स्वप्नच' ठरणार काय? शेतकऱ्यांचे आर्थिक प्रश्न सोडविण्यास कारणीभूत ठरलेली सहकारी चळवळ सामाजिक जीवनाच्या सर्व आगोपागात प्रवेश करती झाली असून, घरबांधणीच्या क्षेत्रातही महाराष्ट्रात तिनें मानाचे स्थान मिळविलें आहे आणि आपल्या कार्यानें तिनें सबंध देशाचे लक्ष वेधून घेतलें आहे. जुन्या मुंबई राज्यात, "बॉम्बे को–ऑपरेटिव्ह हाऊसिंग फायनान्स सोसायटी" ही संस्था सहकारी घरें बांधणाऱ्या संस्थांना, घरें बांधण्यासाठी, कर्ज पुरविण्याचे काम करीत असे. महाराष्ट्र राज्य स्थापनेनंतर, महाराष्ट्रातील सहकारी चळवळीचे, तळमळीचे पाईक सहकारमंत्री श्री भारदे, यांच्या प्रयत्नाने १५।८।१९६० रोजी "महाराष्ट्र को– ऑपरेटिव्ह हाऊसिंग फायनान्स सोसायटी" स्थापण्यात आली असून, तिचे अधिकृत भांडवल १ कोटी असून आतापर्यंत तिचे ७५ लाख रुपयांचे भांडवल विकले गेले आहे. सक्रीय सहकार्याच्या भावनेनें महाराष्ट्र सरकारनें २० लाखांचे भांडवल घेतलें आहे. सहकारी गृह निर्माण संस्थांना त्यांच्या सभासदांसाठी, राहण्याचे गाळे बांधण्यास, शक्य तितक्या कमी व्याजाचे दराने, व लांब मुदतीचे कर्ज देणें हा संस्थेचा मुख्य उद्देश असून, गेलेल्या काळापासून सहकारी गृहनिर्माण संस्थांना, विशेष सवलती देऊन, कर्ज देण्यास ह्या संस्थेचे, कार्यकुशल, अध्यक्ष श्री राजारामबापू पाटील व कार्यतत्पर मॅनेजर श्री० बी. जी. कनंर उत्सुक आहेत. अत्यंत अल्पावधीत त्यांनी ३॥ हजार गाळे बांधण्यासाठी ३। कोटींचे कर्ज मंजूर केले असून, जवळ जवळ दीड कोटी रुपयांची रक्कम वाटली आहे. श्री भाऊजी पागे, डॉ. बी. जी. घाटे, श्री जवाहरलाल दर्डा या मान्यवरांचे अनुभवी मार्गदर्शन ह्या सोसायटीस लाभत असल्याने ती उत्तरोत्तर प्रगति करील हें निःसंशय. श्री राजारामबापू या सांगलीच्या, सेवाव्रत, सचोटीचा, तळमळीचा नेता, आणि शिस्तबद्ध, दुर्दम्य आशावादी मॅनेजर श्री बी. जी. कनंर, यांच्या प्रयत्नांतून निर्माण झालेलें सहकारी घर बांधणीचे सुरवातीचे यश, नेत्रदीपक प्रगतीनें सर्वांना मनोहारी होईल अशी आशा आहे!




## सातारा जिल्हा को - ऑपरेटीव्ह लँड मॉर्गेज बँक लि०
## कराड
(स्थापना : १९३५)



श्री. नी. आ. कल्याणी

भारतीय शेतीच्या विकासासाठी सर्वांगीण प्रयत्न व्हावयास पाहिजेत हा सिद्धांत आता सर्वमान्य झालेला आहे भारताच्या अर्थव्यवस्थेत शेतीच्या आर्थिक विकासाला महत्त्वपूर्ण स्थान आहे. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचा उद्देश 'स्वयपूर्ण अर्थरचना' (Self generating Economy) हा असल्याने शेतीला सर्वांत अधिक प्राधान्य देण्यात आलें आहे आपल्या राष्ट्रीय अर्थव्यवस्थेत शेतीला जें महत्त्वाचे स्थान आहे, त्याची जाणीव ठेवून, तिसऱ्या योजनेंत ठरवून दिलेली शेतकी उत्पन्नाची उद्दिष्टें पार पाडण्यासाठी पराकाष्ठेचे प्रयत्न होणे अत्यावश्यक आहे. या दृष्टीने, कराड येथील सातारा जिल्हा को–ऑपरेटिव्ह लँड मॉर्गेज बँकेचे चेअरमन श्री नीलकंठराव कल्याणी, यांनी यशवंतरावजींच्या स्फूर्तिप्रद प्रेरणेनें, सहकार्यासाठी सदैव तत्पर असलेले, जनमानसात मिसळल्याने अल्पावधीत लोकप्रिय झालेले, सातारा जिल्ह्याचे कार्यतत्पर कलेक्टर श्री एम् ए. देशमुख यांच्या सहकार्याने, ह्या बँकेच्या कार्यास सक्रीय चालना देण्याचे हेतूनें, जे कार्य केलें ते नुसते नमुनेदारच आहे असें नाही तर इतर भूतारण बँकांनी त्यापासून स्फूर्ति घेऊन, आपल्या क्षेत्रात अनुकरण करावे इतके स्फूर्तिप्रद व आदर्श आहे. शासन आणि सहकारी संघटन यांच्या संयोगातून साधिक प्रयत्नातून ही जी " अभिनव क्रांति " ह्या बँकेने करून दाखविली ती येथील जनहितदक्ष, उत्साही कलेक्टर श्री देशमुख, जनसेवेचा वडिलाचा आदरणीय वारसा पुढे चालविण्याची प्रतिज्ञा केलेले बँकेचे चेअरमन श्री नीलकंठराव कल्याणी व व्यवस्थापक श्री पुटाणी यांच्या शिस्तीत तयार झालेला नोकरवर्ग, या सर्वांच्या सामूहिक प्रयत्नाचे मधुर फळ होय ह्या अभिनव क्रांतिमुळें,–लँड मॉर्गेज बँकेकडून कर्ज मिळण्यास जो बराच कालावधि लागत असे, तांत्रिक अडचणींची ' लालफितशाही ' सर्वांवर स्वार होऊन शेतकऱ्याच्या गळ्याला फास लावीत असे–तिचे बंद तावडतोब तोडण्यात आले व शासनाधिकारी, त्यांचा अधिकारीवर्ग, बँकेचा चालकवर्ग, व अर्जदार शेतकरी जनता–ह्यांच्या समक्ष, अर्जांची छाननी करण्यात येऊन कर्जमंजुरी देण्यात आली १९।११।६१ ते ७।१२।६१ च्या दरम्यान अवघ्या अठरा दिवसात सर्व जिल्ह्यात दौरा करून, नव्याविहिरी, जुन्याविहिरींची दुरुस्ती, इंजिन खरेदी आदिकरितां १०४४ तगाईदारांना २० लाख ४१ हजाराचे कर्ज मंजूर झाले. खरोखर ह्या आदर्शाचा पायंडा इतरत्र गिरविण्यात आला तर शेतकरी वर्गाचा दुवा मिळून त्यांच्या समृद्धीसह राष्ट्राचे उत्पादनहि वाढेल !



## इण्डस्ट्रीयल अॅब्रेसिव्ह को-ऑपरेटिव्ह सोसायटी लि. मोरा-अुरण जि. कुलाबा.

(स्थापना : १९५९)



श्री. एन् एस जिराडकर

"वाईटातून चागले निघते " असे म्हणतात इण्डस्ट्रीयल अॅब्रेसिव्ह सहकारी सोसायटीच्या निर्मितीची कथाही अशीच मनोरंजक तशीच उद्बोधक आहे त्याचे असे झाले, "ग्राइंडवेल अॅब्रेसिव्ह" नावाची एक जुनी कंपनी कित्येक वर्षापासून मुंबई जवळ मोरा-उरण येथें 'ग्राइंडींग व्हील्स' च्या उत्पादनाचे कार्य करीत आहे जानेवारी १९५९ मध्यें तेथे मजूराचा संप झाला व त्या संपाचे पर्यवसान ३५० मजूराना कामावरून काढून टाकण्यात आले आता या बेकार मजूराच्या व त्याच्या कुटुंबियाच्या पोटापाण्याची सोय कशी करावी हा मोठाच प्रश्न होता आजकाल मजूर चळवळीत जें राजकारण घुसले आहे, त्यामुळे तिच्यात ज्या विध्वंसक, आणि अनिष्ट प्रवृत्ती, चुकीच्या नेतृत्वानें बाहीस लागून, उद्योगधंद्याची आणि राष्ट्राची हानि होताना प्रत्यही दिसून येते– त्याचा संसर्ग सुदैवानें येथील कामगार पुढाऱ्याला झाला नव्हता त्याची वृत्ती विधायक होती त्या नेत्यानें विचार केला की, कोणताही कारखाना काढण्यास मुख्यत' दोन गोष्टीची प्रामुख्यानें आवश्यकता असते . (१) भांडवल (२) कसबी कामगार. तेव्हा त्यापैकी " कसबी कामगार " तर हे बेकार झालेले कामगार स्वत आहेतच राहाता राहिला भांडवलाचा प्रश्न त्याने कमी करण्यात आलेल्या कामगाराची सभा घेतली व त्याना पटवून दिलें की, " जुन्या कंपनीशी व्यर्थ झगडण्यात शक्तीचा अपव्यय करण्यापेक्षा, आपण स्वत च एक सर्वांची मिळून सहकारी सोसायटी काढून ग्राइंडींग व्हील्स् चे उत्पादन सुरू करू या कसब तुमच्या जवळ आहेच भांडवलाची व्यवस्था मी करितो " मजूरालाच मालक करण्याच्या ह्या कल्पनेचें सर्वांनी स्वागत केलें मुंबई राज्याचे सहकार मंत्री श्री भारदे व मुंबई राज्य सहकारी बँकेचे सक्रीय सहाय्य व मार्गदर्शन यामुळे अवघ्या सहासात महिन्यात – सप्टेंबर १९५९ मध्ये, २ लाख ६० हजार भांडवलाची ही कंपनी रजिस्टर करण्यात आली व तिने नोव्हेंबर १९६० मध्यें उत्पादनास सुरुवात केली कंपनीत तयार होणारा माल इतक्या उत्तम प्रतीचा आहे की, उत्पादनास सुरुवात केल्यापासून अवघ्या एका वर्षात, तिचा भारतात तिसरा क्रमांक असून, देशाच्या कानाकोपऱ्यातून तिच्या मालाला सतत मागणी येत आहे आज ह्या फॅक्टरीत १५० कामगार असून तिचे वार्षिक उत्पादन नऊ लाखाचे आहे, सर्व कामं मजूर स्वत च सांभाळतात विधायक नेतृत्वाचा हा विलास, भारतीय मजूर व सहकारी चळवळीचा मानबिंदू होय ! ह्याचे सारे श्रेय, ह्या मजूरांचे आवडते नेते, ज्याची विधायक दृष्टी, संघटना कौशल्य, व सतत श्रम ह्या सोसायटीच्या निर्मितीस व सुयशास कारणीभूत झाले आहेत ते श्री ना स जिराडकर हे असून तेच आज प्रमुख संचालक आहेत आम्ही त्यास सुयश चिंतितो !






## गोदावरी प्रवरा कॅनॉल सहकारी खरेदी विक्री संघ लि. कोपरगांव

( स्थापना : १९३२ )



श्री. के. बी. रोहमारे एम. एल् ए.

प्रभु रामचंद्राच्या पदस्पर्शानें पुनित झालेला हा तालुका, पौराणिक, ऐतिहासिक व औद्योगिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा तर आहेच, परंतु आजच्या सहकारी युगात देखील, तो अग्रेसर असून आघाडीवर आहे त्याचे कार्यक्षेत्र जरी लहान असले तरी सहकारी क्षेत्रामध्यें देशहिताच्या दृष्टीनें, सेवाभावी वृत्तीनें अगदी लहानसें गाव देखील, सहकारी चळवळीचे प्रणेते श्री वैकुंठभाई मेहता, डॉ. गाडगीळ, श्री. वर्दे, यांचे अचूक मार्गदर्शन लाभल्यामुळें, सहकारी प्रयत्नानें, कार्याचा हिमालय, कसे उभारूं शकते, ह्याचा ह्या ल्हानशा गावातील ही संस्था आदर्श, उदाहरण आहे.! ह्या संस्थेच्या २५ वर्षांच्या इतिहासाची पानें सहकारी चळवळीत अविश्रांत श्रम व चिकाटी, एकजूटीची भावना, कडवा विरोध व तीव्र स्पर्धा याला प्रत्युत्तर देण्यासाठीं करावे लागणारे भगीरथ प्रयत्न, यांनी भरलेली आहेत ही संस्था म्हणजे सहकारी संस्थामधील सभासदातील वैचारिक जागृति व एकोपा, व्यक्तिगत स्वार्थ व समाजाचे हित याचा सुंदर मिलाफच होय. ' सहकारी संघराज्य ' हा महान् मंत्र राष्ट्रनेते जनतेला सांगत असताना, ह्या संघातील कार्यकर्त्यांनी ह्या कार्यास तळमळीनें वाहून घेऊन, जी साथ दिली आहे ती खरोखरच आदर्श आहे १९३२ साली स्थापन झालेल्या या संघाचे खेळते भांडवल, आज जवळ जवळ २१ लाख रु असून सभासदसंख्या १८०० आहे स्वतःची इमारत असून, शेतकऱ्यांना आवश्यक असलेलें सर्व प्रकारचे साहाय्य ही संस्था करीत आहे ही संस्था भरभराटीस आणण्यास ज्याचे श्रम मुख्यतः कारणीभूत झाले आहेत ते श्री. वोरावके, श्री हाराळकर, श्री बापूसाहेब जगताप, श्री गणपतराव जी औताडे ह्या सहकारी चळवळीतील निष्ठावंत कार्यकर्त्यांनी ध्येयनिष्ठेने कार्य करून संस्थेच्या उज्ज्वल यशाचा पाया रचिला ! अलिकडे ह्या संघाने अधिक संपन्नतेकडे जी वाटचाल चालू केली आहे त्याचे श्रेय हल्लीचे चेअरमन आमदार श्री. के बी रोहमारे, त्याचे सहकारी श्री शंकरराव कोल्हे, श्री. मोतीभाई फिरोदिया यांना असून ह्या संघाचा अधिक उत्कर्ष होण्याचे, दृष्टीनें ते सतत प्रयत्न करीत असल्यानें हा संघ शेतकरी वर्गाच्या जीवनात क्रांति घडवून आणील व त्याचे जीवन संपन्न करून शेतकरी बंधूंची बहुमोल सेवा करील हे निसंशय ! ह्या 'आदर्श' खरेदीविक्री संघास आम्ही उत्कर्ष इच्छितो.

जय सहकार !

महाराष्ट्र राज्यातील सहकारी चळवळ भारतामध्यें आघाडीवर ठेवणाऱ्या

महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई यांचे

## सुवर्ण महोत्सव शुभदिनीं

हार्दिक अभिनंदन व बँकेची अशीच भरभराट होवो ही शुभेच्छा !

# गोदावरी प्रवरा कॅनॉल सहकारी खरेदी विक्री संघ लि.

र. नं. ७१२२] **कोपरगांव** [स्थापना - १३-४-१९३२

मुख्य कचेरी :- कोपरगांव

शाखा :—श्रीरामपूर, बेलापूरगांव, राहुरी, संगमनेर

डेपो :—राहाता, कोल्हार, कोळपेवाडी, पुणतांबा

उभारलेलें भांडवल रू. ३००००००

वसूल भांडवल रु. १,६१,५१५ — गंगाजळी रु. २,६६,९५०

सरकारचे-परत फेडीचे रु. २५,००० — इतर निधी रु. ६,३६,५५१

खेळते भांडवल रु. २८,१३,६५९

सन १९६०-६१ चा नफा रु. २,४५,११२

### -: संघाची वैशिष्ठ्यें :-

- शेतकऱ्याच्या शेतात तयार होणारे मालाची विक्री बाजार भाव कसोशीनें कमी खर्चात करणें.
- शेतकऱ्यांना लागणारी पेण्डवगैरे सारखी खते खात्रीची व फायदेशीर पुरविणे
- शेतकऱ्यांना लागणाऱ्या बी-बियाणांचा उत्तम व खात्रीशीर किफायतशीर-भावानें पुरवठा करणें.
- संघाकडे बर्मा-शेल कंपनीची एजन्सी असून त्या कंपनीचे डिझेल, क्रूडाईल व-ल्युब्रीकेटिंग ऑईल घर पोहोंच फायदेशीर पुरविली जातात.
- संघास सरकारकडून नैट्रोजनयुक्त खतांची जिल्हा होलसेल एजन्सी मिळाली असून सरकारी धोरणानुसार ती पुरविली जातात
- संघाकडे निरनिराळ्या एंजिनच्या एजन्सीज असून एंजीन्सचे स्पेअरपार्टस् फायदेशीर पुरविले जातात.
- शेतकऱ्यांना संघानें तयार केलेली "लक्ष्मी छाप" मिश्रखते गॅरंटीने व फायदेशीर पुरविली जातात. ती शेतकऱ्यांना फायदेशीर ठरलेली आहेत.

इ. के. देशमुख — मॅनेजर

के. बी. रोहमारे एम् एल् ए. — चेअरमन




## श्री शिवाजी टेक्सटाईल वर्कर्स को-ऑपरेटीव्ह स्पिनिंग मिल लि. भोर (जि. पुणें)

( स्थापना : १९६० )

प्रक्रियेच्या क्षेत्रांत, प्रवरा येथील अभिनव प्रयोगाने, महाराष्ट्रातील सहकारी चळवळीनें जरी चारच वर्षापूर्वी पदार्पण केलें होतें तरी त्याच्या यशाविषयी तशी शंका नव्हती कारण त्याच्या उभारणीमागें श्री वैकुंठभाई मेहता व डॉ धनंजयरावजी गाडगीळ यांची तपस्या उभी होती ! ह्या सहकारी कारखानदारी पासून स्फुरण घेवून संकटांशी सतत झुंज घेण्याची महाराष्ट्राची जी अस्मिता, तिचे प्रतिक असलेले राजाभाऊ पाटणकर, यांनी अडचणींचा डोंगर उभा असताहि, महाराष्ट्रातील पहिल्या सहकारी सूत गिरणीची योजना १० जानेवारी १९६० रोजी कार्यान्वित केली बंद पडलेली गिरणी जिवंत केली. मजूराला मालक केलें त्याचें असें झालें; भोर येथें लक्ष्मी टेक्स्टाइल मिल या नावाचा सूताचा कारखाना होता. तो १९५३ पासून बंद पडला होता ही बंद पडलेली गिरणी कामगारांनी सहकारी सोसायटी काढून चालवावी अशी कल्पना श्री. पाटणकर, श्री. मोहोळ, श्री. भेलके यांना एप्रिल १९५८ मध्यें सुचली. २४ मे रोजी याबाबतची योजना सहकारमंत्री श्री. भारदे यांना सादर करण्यात आली. पण दुर्दैवानें ऑक्टोबर १९५८ मध्यें सदर योजना सहकारी खात्यानें नामंजूर केली. पण मजूरमंत्री श्री. शांतिलाल शहा यांनी गिरणीस भेट देऊन, प्रत्यक्ष परिस्थितीची पाहणी केली व मुख्यमंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण यांना शिफारस केली. मध्यंतरीच्या काळात, कामगारांनी शेअर घेऊन रु २०,००० भांडवल गोळा करून २१ जानेवारी १९५९ साली सोसायटी रजिस्टर केली. श्री. शांतीलालजींच्या सहकार्यानें ,जुलै १९५९ मध्यें सोसायटीस,पांच लाखाचे सरकारी कर्ज मंजूर झालें व १७ डिसेंबर रोजी गिरणीचा लिलाव सोसायटीचे नावें मंजूर झाला आज गिरणीत दोन पाळ्या चालू असून तिचे यश शुक्लेन्दुप्रमाणें वाढत असल्यानें, कार्यकर्त्यांचा विश्वास, व पाठबळ वाढतें असून, गिरणीच्या वाढीची योजना संचालक मंडळानें हाती घेतली आहे ग्रामीण भागास नवजीवन देणारा हा सहकारी क्षेत्रांतील नवा प्रयोग, सहकारी कारखानदारीचा मनु स्थिर करून, जनतेच्या समृद्ध जीवनाचें महत्त्वाचें साधन ठरेल असा आत्मविश्वास, श्री राजाभाऊ पाटणकर, जिल्हा काँग्रेसचे अध्यक्ष व आमदार श्री मोहोळ तसेंच जिल्हा भूतारण बँकेचे अध्यक्ष व आमदार श्री भेलके ही मंडळी, जी अहर्निश यासाठी झटत आहेत, त्यावरून व्यक्त करावासा वाटतो.








## पुणें जिल्हा सहकारी खरेदी विक्री संघ लि, पुणें
(स्थापना : १९४५)



श्री एस्. एम्. उपळेकर.

शेतकऱ्याचे सहकारी तत्त्वावर चालविलेले खरेदी-विक्री संघ हीं सहकारी चळवळीतील एक अत्यंत क्रांतिकारी घटना होय. सहकारी चळवळीत ह्या संघटनाचें एक महत्त्वाचे स्थान आहे. शेतकऱ्याला त्याच्या मालाची योग्य किंमत मिळण्यावरच त्याची सुबत्ता अवलंबून आहे. शेतकऱ्याला त्याच्या अडचणीचा फायदा घेऊन कोंडीत पकडणारे व्यापारी, यांच्यामुळे शेतीमालाला कमी किंमत येऊन, शेतकऱ्याचें जीवन दुःखमय होत असे व तो कर्जबाजारी बनून निराश होत असे. ह्या दुहेरी पाशांतून त्याची सोडवणूक करण्याचें प्रभावी साधन म्हणजे हे सहकारी खरेदी विक्री संघ होत. त्यांची उपयोगिता शेतकऱ्यांना तारक व उपकारी ठरली आहे. डॉ. धनंजयराव गाडगीळ यांची प्रेरणा व पुण्याचे परिसरातील सहकारी कार्यकर्ते यांच्या पुरस्कारानें १९४५ च्या एप्रिल महिन्यात हा संघ स्थापन करण्यात आला. शेतकऱ्यांच्या सर्व प्रकारच्या गरजा : बी-बियाणें, खतें व शेती माल विक्री व्यवस्थेची. या संघाची यंत्रणा खरोखरच आदर्श आहे. शेतकऱ्यांच्या मालास हुकुमी गिऱ्हाईक मिळवून देण्याच्या दृष्टीनें, पुणें येथें ह्या संघानें एक शीतगृहहि बांधलें आहे. शेतकऱ्यांच्या मालास परदेशांत गिऱ्हाईक मिळवून देण्याचे दृष्टीनें, संस्थेचे चेअरमन श्री मुगुटराव कावडे व कार्यकुशल संचालक श्री श्रीपादराव उपळेकर हे प्रयत्न करीत आहेत. त्यांनी प्रत्यक्ष उत्पादन करणाऱ्या शेतकऱ्यास नफा तोट्यांत भागीदारी देण्याची, आंबेमोहोर तांदुळा-बाबत अमलात आणलेली योजना अत्यंत हितप्रद असून अनुकरणीय व अभ्यसनीय आहे. नवनवीन कल्पनांच्याद्वारे श्री. कावडे, श्री. उपळेकर व त्यांचे सहकारी भागीदार, हा संघ शेतकऱ्यांच्या संपन्नतेस सक्रिय सहकार्य करण्याचे कामात आघाडीवर राहील असा आत्मविश्वास व दिलासा त्यांच्या आजवरच्या कार्यानें ग्रामीण जनतेला वाटत आहे. सोळा वर्षांत संघानें केलेलें कार्य खरोखरच स्पृहणीय व अविस्मरणीय असेंच आहे






## अहमदनगर डिस्ट्रीक्ट अर्बन सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि. अहमदनगर

( स्थापना : १९१० )



श्री. एस. व्ही. निमळ

भारत देशाच्या सहकारी चळवळीच्या इतिहासात, ह्या बँकेचें स्थान एकमेवाद्वितीय आहे. नागरी व्यवहारासाठी जिल्हा कार्यक्षेत्र असलेली अशी दुसरी कोणतीहि नागरी मध्यवर्ती सहकारी बँक आज अस्तित्वात नाहीं आज समृद्ध समजला जाणारा नगर जिल्हा एकेकाळी दुष्काळी होता म्हणून जिल्ह्यातील शेतकऱ्याना माफक दरानें कर्ज पुरवठा करता यावा या उद्देशानें नगर येथील सहकार महर्षि श्री. ग. पु. चितळे यानी आपल्या सहकाऱ्यांच्या साहाय्यानें १०-४-१९१० रोजी या बँकेची स्थापना केली. श्री. भाऊसाहेब चितळे यानी २० वर्षे यशस्वी कारभार पाहिला. परंतु दुष्काळी परिस्थिति व रोगाच्या साथी याचे प्रमाण फार वाढल्याने १९२७-२८ साली तिचे रूपांतर नागरी बँकेंत झालें. श्री. कुंदनलालजी फिरोदिया यानी आपल्या १० वर्षांच्या कारकीर्दीत, ह्या बँकेच्या कारभारात आमूलाग्र सुधारणा करून, तिला आजचे स्वरूप प्राप्त करून दिलें व आर्थिक पाया मजबूत केला. तदनतर श्री. मोतीभाऊ फिरोदिया यांची अध्यक्षीय कारकीर्द हें ह्या बँकेच्या प्रगतिमय कालखंडाचें प्रसादचिन्ह होय. हल्लीचे अध्यक्ष डॉ. निमळ, हेहि अत्यंत दक्षतेने कारभार पाहात असून त्यांच्याच अध्यक्षतेखाली या बँकेचा सुवर्ण महोत्सव श्री. यशवंतरावजी चव्हाणांच्या हस्तें नुकताच साजरा झाला. नगर म्युनिसिपालटीचे अनेक वर्षे सतत अध्यक्ष असलेले श्री. नवनीत बार्शीकर ह्यांचेहि अनुभवी सहकार्य ह्या बँकेला लाभत आहे हें शुभसूचकच होय ! बँकेच्या मालकीची इमारत असून तिच्या ५ शाखाद्वारा, ती सर्व संस्थाना, विविध प्रकारचें औद्योगिक कर्ज देत असते. शेतीप्रधान भारत देशात लघु उद्योगांचे महत्त्व फार मोठें आहे त्या दृष्टीनें नागरी बँकाना, ह्या ग्रामीण छोट्या उद्योगांना सढळ मदत देऊन, राष्ट्रोन्नतीस मोठाच हातभार लावता येईल, हा दृष्टिकोन लक्षात ठेवून, ह्या बँकेनें नगर जिल्ह्यातील जनतेच्या सर्वांगीण प्रगतीस सक्रिय सहकार्य करून मोलाची मदत केली आहे आज तिची सभासद संख्या ८६६५ असून, शेअर्स भांडवल ९१ लाख रु. आहे, आणि ठेवी ७७ लाख रु. पर्यंतच्या आहेत जिल्ह्यातील प्रभावी व्यक्तींचे नेतृत्व व तसेंच मार्गदर्शन, संचालक मंडळाच्या सभासदांचा एकोपा व सहकार्य यामुळें ही बँक उत्तरोत्तर अधिक प्रगति करील असा विश्वास वाटतो.




## महाराष्ट्र राज्य मच्छीमार सहकारी संस्था लि० मुंबओी
(स्थापना : १९५०)



श्री. एन्. सी कोळी

अरबी समुद्राच्या किनाऱ्यावर, महाराष्ट्र राज्यात, कोंकणपट्टीत लाखो मच्छीमार लोक पिढानपिढ्या मासेमारीचा धंदा करून आपली गुजराण करीत आले आहेत दुसरे महायुद्ध सुरू होऊन, अन्न-धान्याची टंचाई जाणवेपर्यंत, मासेमारीच्या धंद्याकडे पूरक अन्न म्हणून, कोणाचेच विशेष लक्ष गेलें नाही- ह्या पार्श्वभूमिवर पाहिले असता, दुसऱ्या जागतिक युद्धाची सुरुवात, हा ह्या धंद्याच्या योजनाबद्ध विकासाचा विचार करण्यास चालना देणारा प्रेरक काळ होय ! भारत स्वतंत्र झाल्यावर, ह्या धंद्याच्या सर्वांगीण प्रगतिसाठी नित्य नवनवीन कल्पनांची आखणी करण्यात येऊन, त्या कार्यान्वित करण्या-साठी कसोशीचे प्रयत्न सुरु झाले. भारतात साधारणतः पाच-लक्ष कुटुंबें मच्छीमारांची आहेत महाराष्ट्रात सुमारे ३५० खेडयां-तून कोळी लोक आपला धंदा चालवितात मच्छिमार धंद्यामध्यें जगात भारताचा सातवा क्रमांक असून येथें दरवर्षी १४ लक्ष टन मासे पकडले जातात. त्यापैकी एकट्या महाराष्ट्रात, १ लक्ष, ७० हजार टन मिळ-तात देशात महाराष्ट्राचा दुसरा क्रमांक आहे समुद्र किनाऱ्याबरोबरच, चांदा, भंडारा जिल्ह्यात, तळी व विहरी याठिकाणी मच्छिमारी धंद्यास नविन क्षेत्र उपलब्ध झालें असून, एकूण १२ जिल्ह्यात हा धंदा चालतो एवढ्या मोठ्या प्रमाणावर हा धंदा चालत असला तरी, मच्छीमारीचा धंदा करणारांची अवस्था फारच शोचनीय आहे. त्यांच्यामधील संघट-ितपणाचा अभाव व अडाणीपणाचा फायदा, व्यापारी व दलाल घेऊन स्वतः गबर झाले पण बिचारा, जीव धोक्यात घालून मासे पकडणारा कोळी समाज, दरिद्रीच राहिला ! ह्या दुःखद स्थितीचा अंत करण्याच्या अुद्देशाने, ह्या समाजातील सर्व थरातील धुरीणांची एक परिषद १९४५ साली श्री नारायणराव कोळी यांच्या प्रयत्नानें, मुख्यमंत्री श्री बाळासाहेब खेर यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आली व कोळीजनांचे दैन्य नाहीसें करण्याकरिता संघटित प्रयत्न करण्याचें ठरलें– आजची महाराष्ट्रराज्य मच्छिमार संस्था ह्याच विचार-मंथनाचे मधुर फळ होय ! तिची स्थापना १९५० साली करण्यात आली व आज तिचे ३० हजारावर सभासद असून, १२२ हून अधिक संस्था कार्य करीत आहेत प्रतिवर्षी २५ लक्ष रुपयाची मासळी विकली जाते. अभिमानाची गोष्ट अशी की, अमेरिकेसह इतर देशात गोठविलेले पॉम्फ्रेट व इतर जातीचे मासे पाठविण्यात ह्या संस्थेनें पुढाकार घेतला, ह्या संस्थेचे चेअरमन व मॅनेजिंग डायरेक्टर श्री. नारायणराव कोळी यांच्या व्यक्तिमत्वानें व अविरत कार्यानें मच्छीमार समाजाला मिळालेलें नवें नेतृत्व हें फार आशादायक व उत्साहवर्धक आहे. त्यांच्या संघटना कौशल्यानें मच्छीमार समाजाचा सत्वर भाग्योदय होऊन कोळी लोकांचे जीवन सुखी व संपन्न व्हावे हीच शुभेच्छा !




## विदर्भ को-ऑपरेटीव्ह मार्केटींग सोसायटी लि.नागपूर

(स्थापना : १९४८)



श्री. टी एम् बखरे

ग्रामीण अर्थव्यवस्थेची घडी नीट बसविण्यासाठी, शेतीकामास्तव शेतकऱ्यास पतपुरवठा करण्यासाठी, सहकारी चळवळीस प्रारंभ झाला हें जरी खरे असलें, तरी आजच्या गतिमान युगात, फक्त एवढें केल्यानेंच, ग्रामीण अर्थव्यवस्थेची घडी नीट बसून, शेतकरी सुखी होऊ शकत नाही पतपुरवठा संघटनेकडून मिळणारा पैसा शेती उत्पादनासाठी वापरून, धान्य वा इतर पिकाचे उत्पादन केल्यानंतर त्याच्या मालाला, वाजवी किंमत व योग्य बाजारपेठ मिळाली नाही तर तो नाडला जातो–त्यामुळें सनागारिंचे पीक येऊनहि–शेतकऱ्यास पुरेसा पैसा मिळत नाही–ज्यासाठी तो भरपावसात सतत कष्ट करीत असतो,त्याचा सारा नफा, व्यापारी व दलालाच्या घरात गेल्यानें, कसणारा कास्तकार अखेर दरिद्रीच राहतो यासाठींच त्याच्या मालाला योग्य ती किंमत मिळवून देऊन, त्याची फसवणूक व पिळवणूक बंद करण्याचे उद्दिष्ट उराशीं बाळगून खरेदी–विक्री संघाची स्थापना करण्यात आली आहे " विदर्भ को–ऑपरेटिव्ह मार्केटिंग सोसायटी लि. नागपूर. " ही त्यापैकीच एक संस्था होय. अर्थात् ह्या संस्थेची प्रेरक शक्ती–विदर्भातील नामवंत, सहकारी अग्रणी श्री दादासाहेब कोल्हे हेच होत त्यांनी ह्या संस्थेचे संगोपन व संवर्धन, अगदी " मरणाच्यादारी " जाईपर्यंत केले. ही संस्था १५ ऑगस्ट १९४८ रोजी स्थापण्यात आली ह्या संस्थेचे स्वरूपच व्यापारी असून, शेतकऱ्याचे मालाला योग्य प्रमाणात भाव मिळवून देण्याचें हेतूनेच तिची स्थापना करण्यात आली आहे शेतीला नित्य लागणारे सामान, उदा० खतें, मशिनरी, पंप, कृमिविनाशक औषधें, वगैरे योग्य भावात मिळवून देण्याचे दृष्टीने ही संस्था अत्यंत उपयोगी ठरली असून, श्री बखरे यांच्या कार्यकुशल, समयज्ञ संचालनाखाली तिनें भरीव प्रगतिद्वारा स्थैर्य प्राप्त करून, विदर्भातील ग्रामीण जनतेचा अढळ विश्वास संपादिला आहे पतीच्या व बिनपतीच्या सहकारी संस्थांची सांगड घालण्याचे दृष्टीनें महत्त्वाची कामगिरी बजावल्यानें, ती आज विदर्भाचे ' भूषण ' ठरली आहे शासनानें ह्या संस्थेला २ लक्ष रुपयाचे भाग भांडवल व २० लक्ष रुपये व्यापाराकरिता कर्ज देऊन सक्रीय सहकार्य केले आहे विदर्भातील शेतकऱ्याचे प्रमुख उत्पादन जें 'कापूस', तो परदेशात निर्यात करण्यासाठी दरसाल ५ ते १० हजार ' गाठीचा कोटा ' ( Quota ) मिळविण्यात श्री दादासाहेब कोल्हे यांच्या परिश्रमानें यश मिळाल्यानें वऱ्हाडच्या शेतकऱ्यास परदेशी बाजारपेठ उपलब्ध झाली व त्याची सांपत्तिक स्थिती सुधारली ह्या सोसायटीची स्वतःची इमारत असून, ती विदर्भातील शेतकऱ्याचे आशास्थान ठरली आहे सांप्रतचे चेअरमन श्री भोकरे व मॅनेजर श्री बखरे यांच्या कारकिर्दीत तिची उत्तरोत्तर प्रगति होऊन ती अधिकाधिक गौरवास प्राप्त ठरो हीच इच्छा !










## सोलापूर जिल्हा इंडस्ट्रीअल सहकारी बँक लि॰ सोलापूर

(स्थापना : १९४९)



श्री. आर. व्ही. वेत

शेतमालाचे अधिकाधिक उत्पादन हें आपल्या अभ्युदयाचें प्रमुख अंग आहे हे जरी सत्य असले तरी तेवढ्यानेंच काही सर्वांगीण विकास साधता येणार नाही आपली अर्थव्यवस्था कृषिप्रधान असल्यानें, लघु-उद्योग व ग्रामोद्योग याना आपल्या नियोजनात, योजनाकारानी जें महत्वाचे स्थान दिलें आहे तें सर्वथैव रास्तच होय शेती व ग्रामोद्योग याची समतोल वाढ होणे हितप्रद आहे ग्रामोद्योग म्हणजे औद्योगिक विकेंद्रीकरण होय. राजकीय, व आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण, आर्थिक विषमतेचे निर्मूलन, शोषण रहित समाजरचनेची स्थापना, हें जे समाज-सत्तावादी समाजरचनेचे उद्दिष्ट आहे ते ग्रामोद्योग व लघुउद्योगातून साध्य होण्यासारिखें आहे शेतीबरोबरच ग्रामीणविभाग, औद्योगिक दृष्टीनें प्रगत होऊन, शेतकऱ्याला, व कारागिराला जर रोजदारी त्याच्या गावातच उपलब्ध झाली तर त्याचे आर्थिक दैन्य नष्ट होण्यास फारसा कालावधि लागणार नाही ह्या मूलभूत विधायक दृष्टीकोनातून, ग्रामीण विभागातील औद्योगिकरणास सहाय्य करून उत्तेजन देणारी, महा-राष्ट्र राज्यात सध्या ही एकच बँक सोलापूर येथें आहे. तिची स्थापना ३० मार्च १९४९ रोजी झाली असून सुरुवातीचे तिचे भाडवल फक्त ११,९०० रुपये होते ते तिच्या उपयोगितेची खात्री पटल्यामुळें, दोन वर्षात १ लाखावर झाले व आज तर ते ४ लक्ष ५९ हजार असून त्यात २ लक्ष २५, ००० हजारचे शेअर सरकारने घेऊन तिच्या कार्यास सक्रीय सहाय्य केले आहे या बँकेचा उद्देश छोट्या व ग्रामीण धंद्याच्या कक्षें-तील वैयक्तिक कारागिराना, व त्याच्या सहकारी संस्थाना पैसा पुर-विणे व त्याच्यात काटकसर व सहकारितेची वाढ करणे हा आहे. मध्य-तरी ५२–५३ च्या सार्वत्रिक मदीच्या वेळी ह्या बँकेची स्थिती जरा खालावली होती पण १९५४ नतर, श्री वेत याच्या कार्यक्षम, कुशल, कुशाग्र बुद्धीच्या निरलस नेतृत्वाखाली तिनें नेत्रदीपक प्रगति केली असून, आज तिच्याकडे ११ लाखाहून अधिक ठेवी असून, १९६१ मध्यें झालेला नफा ४७ हजार रुपयाहून अधिक होता या बँकेचा कार्य-विस्तार वाढविण्याचे दृष्टीनें, राज्यसरकारकडून सहकारीसंस्थाना पतपुरवठा करण्यासाठी 'सेसफड', 'ब्लॉक फड,' व रिझर्व्ह बँकेकडून ३॥ लाख रुपयाचे कर्ज मिळविण्यात जें यश मिळालें त्याचे श्रेय चेअरमन श्री. वेत यानी जो चोख व्यवहार करून, जनमानसात बँकेबाबत अढळ विश्वास निर्माण केला, त्या त्याच्या कार्यकर्तृत्वालाच आहे. आम्ही त्याना सुयश इच्छितो. ही बँक प्रामुख्याने विणकर सहकारी सोसायट्या, पॉटरीज्, विटा, भांडी, दोर आदि उत्पादन करणाऱ्या अनेक संस्थांना कर्जपुरवठा करते.




## ऑल बॉम्बे कंझुमर्स को-ऑपरेटीव्ह सोसायटीज् फेडरेशन लि. मुंबई.

(स्थापना १९४८)



श्री आर. एन. नाईक

समाजोपयोगी संघटनाचे कार्यक्षेत्र सीमित रहातच नाही—त्या संघटनेच्या यशस्वितेची साक्ष पटल्यावर, समाजाच्या विविध क्षेत्रात व्यापक प्रमाणात तिचा प्रसार होत असतो सहकारी चळवळीचे असेच झाले. शेती उत्पादनाच्या गरजा भागविण्यापुरतेच आज तिचे क्षेत्र मर्यादित राहिले नसून ती समाजजीवनाच्या सर्व अंगोपांगात प्रवेश करती झाली आहे. व ग्रामीण जीवनाबरोबरच नागरी जीवनातही ह्या संघटनेने अत्यंत महत्वाचे व मानाचे स्थान मिळविले आहे. ग्राहक सहकारी संघ हा सर्वसामान्य जनता व सहकारी संघटना यांना सांधणारा जिव्हाळ्याचा दुवा होय. नागरी जीवनात, व्यापारी लोकांच्या अडवणूक व बेफाम नफेबाजीपासून सामान्य गिऱ्हाइकाचे संरक्षण करण्यासाठी ग्राहक सहकारी संघ एक प्रभावी साधन ठरलें आहे. दैनंदिन उपयोगाच्या वस्तूंची टंचाई निर्माण होते तेव्हा ग्राहक सहकारी संघाची उपयुक्तता अधिक तीव्रतेने भासते. वस्तूंची टंचाई सुरू झाली की, व्यापारी साठेबाजी करू लागल्याने, वस्तू बाजारातून नाहीशा होतात. ह्या बेफाम भाववाढीपासून गिऱ्हाइकांचे संरक्षण करून, योग्यभावानें आणि न्यायपूर्ण रीतिनें गिऱ्हाइकाला वस्तू मिळतील अशी जी व्यवस्था तिला 'ग्राहक सहकारी संघ' म्हणतात. परदेशातही ही चळवळ फारच प्रगत झालेली असून, अद्याप आपल्याकडे तिचा व्हावा तितका प्रसार झालेला नाही. तरी पण महाराष्ट्रराज्यात, तिनें समाधानकारक प्रगति केली असून, मराठी भाषिक प्रदेशात १११६ ग्राहक स्टोअर्स असून त्यांची सभासद संख्या १,७०,००० आहे. या संस्थांची सेळनें भांडवल सुमारे १। कोटी रुपयांचे असून, धान्य व साखर वाटपाचे काम ह्या संस्थांकडे सोपविण्याचे सरकारी धोरणामुळे, ग्राहक-संस्थांच्या कार्यास जोरानें चालना मिळाली आहे. 'संघटनेचे साक्षात् '**ईश्वर**' असा सार्थ गौरव ज्यांचा भारतांत करण्यांत येतो, ते श्री. अप्पासाहेब—स. का. पाटील, हे ह्या संस्थेचे प्रमोटर, सूत्रधार संचालक असावेत हे ह्या संघटनेचे मोठेंच सौभाग्य ! योजनाबद्ध आखणी करून, सिद्धहस्त व्यक्तिमत्व लाभल्यानेंच १९४८ सालीं स्थापन झालेली ही मुंबईतील संस्था भारत देशात सर्वांत अग्रेसर असून प्रथितयश ठरली आहे. हे फेडरेशन ही सहकारी ग्राहक संस्थांची एकत्रित शक्ती आहे. उत्पादक आणि ग्राहक यांना सार्वत्रिक सामाजिक हितासाठी सतत जोडणारी ही साखळी आहे. त्यामुळे समाजाचे शोषण कमी होते. त्यादृष्टीनें ह्या फेडरेशनचे कार्य अत्यंत उपयुक्त ठरलें असून, आजचे चेअरमन, श्री नाईक, ह्यांच्या कार्यकुशल, कार्यरत, सेवाभावी, कर्तृत्वालाच, सर्वस्वी त्याचे श्रेय आहे. यांच्या कारकिर्दीत, सहकारी ग्राहक संघाचे जाळें, महाराष्ट्रात खेडोपाडी पसरून, समाजशोषण कमी होईल अशी आशा व्यक्त करितो.






**मराठा मार्केट पीपल्स को–ऑपरेटिव्ह बँक लि. मुंबई**

( स्थापना : १९५४ )



'फळा फुलाची बँक ' असे ह्या बँकेस म्हटले तर ते सयुक्तिकच ठरेल पुणे जिल्ह्यातील, जुन्नर आणि आंबेगाव तालुक्यातील, फळें व फुलें यांचा व्यवसाय करणाऱ्या, क्रॉफर्ड मार्केटमधील काही मंडळींनी एकत्रित येऊन श्री. भास्करराबजी जाधव यांच्या मार्गदर्शनानें १९५३ साली हिची स्थापना केली. त्यावेळी मार्केटमध्ये व्यवसाय करीत असलेले बहुतेक व्यापारी, सावकारी पाशात अडकलेले होते. ही पिळवणूक बंद करण्यासाठीच ह्या बँकेचा जन्म झाला. आज ह्या बँकेचें अधिकृत भाडवल १ लाखाचे असून, ते पूर्ण वसूल झालें असून बँकेचें खेळतें भाडवल सुमारे १० लाख आहे व व्यवहार १ कोटीच्या वर आहे. राष्ट्रीयदृष्ट्या फळाफुलांचे उत्पादन, तसेंच पुरवठा, यांची सहकारी पातळी वरून देवघेव करणारी, कदाचित् ही पहिलीच बँक असावी. तिनें घातलेला हा आदर्श इतर राज्यातील फळें व फुलें यांच्या उत्पादकांना व व्यापाऱ्यांना अनुकरणीय वाटून उपकारक ठरेल अशी आशा आहे. फुलें व फळ बागायतदारांचे खरेदीविक्रीसंघ असतील, परंतु त्यांची स्वतःची अशी बँक, ही एकमेवच असावी. मुंबई सारखे वाढतें कार्यक्षेत्र ह्या बँकेस लाभले असल्याने ती अधिकाधिक बलवत्तर होईल असा विश्वास वाटतो. मध्यतरी अफरातफरीचे एक गडांतर ह्या बँकेवर आले, परंतु श्री. मनसुख यांच्या सारखे धैर्य-चिकाटी व अभ्यासू वृत्तीने कार्य करणारे मॅनेजिंग डायरेक्टर ह्या बँकेस लाभल्यानें तिचे भवितव्य उज्ज्वल आहे आपल्या कार्यक्षम कारभाराने अफरातफर प्रकरणी अपहरण झालेले रुपये त्यांनी वसूल केले असून बँकेला स्थैर्य तर मिळवून दिलेंच पण जनमनात विश्वासाचे व आदराचे स्थानहि मिळवून दिलें श्री. मनसुख यांचा मनमिळाऊ स्वभाव व कार्यकौशल्य यांची जोड, बँकेचे चेअरमन श्री भगवंतरावजी ढोबळे, श्री. मळीबुवा, श्री ढोले, ह्या संचालक मंडळींतील सभासदांना लाभली असल्यानें, तिची उत्तरोत्तर प्रगति होईल असा आत्मविश्वास आहे. ही फळा फुलाची बँक अशीच सदाफुलीसारखी सतत फुलो आणि फलसभारानें बहरो अशीच आपणा सर्वांची इच्छा असणार !




























## कऱ्हाड खरेदी विक्री सहकारी सोसायटी लि. कऱ्हाड

( स्थापना : १९३४ )



श्री. भ. रा. जाधव.

महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण याच्यामुळें जरी आज कऱ्हाडचें नांव राजकीय क्षेत्रांत सर्वतोमुखी झालें असले तरी, कऱ्हाडचा लौकिक हा कांहीं तेवढ्यापुरताच मर्यादित नाहीं. फार पूर्वीपासून कऱ्हाड हें महाराष्ट्रांतील महत्त्वाच्या बाजारपेठापैकी शेतीमाल विक्रीचे प्रमुख केंद्र आहे. कऱ्हाडची बाजारपेठ अन्नधान्याच्या विक्रीसाठी, सातारा जिल्यातील शेतकऱ्याला, परंपरागत मोठीच सोयीची वाटत आलेली आहे. शेतकऱ्याला त्याच्या मालाची योग्य किंमत मिळवून देण्याच्या सद्हेतूनें, २५ वर्षांपूर्वी, २६-११-१९३४ रोजी वरील संस्था रजिस्टर करण्यात आली. आरंभीच्या काळात श्री. व्यंकटरावजी पवार व श्री. गणपतरावजी चव्हाण ह्या धुरंधर नेत्याचें नेतृत्व तिला लाभल्याने, तिची स्थिर पायावर उभारणी करणें आजचे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. भगवानरावजी जाधव याना शक्य झालें आहे. श्री. भगवानरावाकडे जेव्हा ह्या संस्थेची सूत्रें १९४६ साली आली त्यावेळी हीं संस्था, एका पत्र्याच्या शेडमध्यें आपलें काम करीत होती व तिचें कार्यक्षेत्रहि मर्यादित होतें. आज २ लाख रु. च्या इमारती, ३ शाखा, ३ डेपो, एक वेअर हाऊस, ३ दुकानें, तेल-खतें-लोखंड याच्या एजन्सीज इतका तिचा पसारा वाढलेला आहे व तिची स्वतःची ऑईल मिलहि आहे. सातारा जिल्ह्यात स्वातंत्र्य संग्रामात अग्रभागी असलेल्या व्यंकटराव पवारानी बीजारोपण करून जोपासना केलेल्या ह्या संस्थेचा हा पसारा सातारा जिल्ह्यातील कार्यकर्त्यांच्या कर्तृत्वाला साजेसा असाच आहे. हा संस्थेच्या आजच्या प्रगतीचा विशाल टप्पा श्री. भगवानराव जाधव याच्या कुशल व्यवस्थापकत्वाची ग्वाही होय! आज ह्या संस्थेचे एकूण ४२०० सभासद असून विक्री ५० लाखापर्यंत गेलेली आहे व तिच्या कार्याच्या गुणवत्तेबद्दल तिला लागोपाठ बक्षिसें व ढाल मिळत गेली आहे. माननीय यशवंतरावजींचे मौलिक मार्गदर्शन या संस्थेला लाभत आलें आहे हें तिचे सद्भाग्यच होय. श्री. भगवानरावजीचे, सर्वांचे सहकार्य संपादन करण्याचे कौशल्य, चिकाटी व सचोटी व त्यामुळें त्यानीं जनमनात निर्माण केलेला विश्वास, ही ह्या संस्थेला प्रगतिपथावर नेण्यास उपयोगी पडली आहेत. तिची उत्तरोत्तर प्रगति होत राहणार हें सुनिश्चितच !




## स्टेट इन्डस्ट्रिअल को-ऑपरेटीव्ह असोसिएशन लि. मुंबई.

(स्थापना १९४६)



श्री. म. शं. मुखेडकर

खासगी क्षेत्र, आणि सरकारी व सहकारी क्षेत्र याच्या विकासाला चालना देण्याबाबत, सांप्रतचे सरकार सापत्नभाव दाखविते अशी भावना आजकाल औद्योगिक व्यवसायातील काही विभागात ऐकू येत असली तरी, विशेष म्हणजे सोळा वर्षापूर्वी औद्योगिक सहकारी-संस्था स्थापन करण्याचे कार्यांत, पुढाकार घेणारे मुबईचे भारतविख्यात प्रतिष्ठित उद्योगपति होते ! श्री. वैकुंठभाई मेहता याच्यापासून प्रेरणा घेऊन, श्रीयुत धरमसी खटाऊ, आणि औद्योगिक क्षेत्रातील इतर मान्यवर सहकारी यानी २८ ऑक्टोबर १९४६ रोजी ही संस्था प्रातीय पातळीवर रजिस्टर केली. सहकारी तत्वांवर, लघुउद्योग सुरुं करण्यात यावेत, ह्याकरिता मुंबई राज्याच्या विविध विभागात सहकारी सोसायट्या स्थापन करण्याचे कार्यी पुढाकार घेऊन, त्याना हितप्रद मार्गदर्शन व तात्रिक सल्ला देण्याचे कार्य ह्या मातब्बर लोकानी केले म्हणूनच आरंभाला ह्या असोसिएशनमध्यें जरी २५ सोसायट्या संलग्न होत्या तरी पुढें त्यांची सख्या हजाराच्याहिपुढें पोंहचली व सुरुवातीचा तिचा व्यवहार ६४ हजाराचा होता तो अवघ्या दोन वर्षांत ३ कोटी ४५ लक्ष इतका झाला. तिसऱ्याच वर्षी सुमारे दोन लक्ष व चवथ्या वर्षी दीड लक्ष नफा होऊन सस्थेला स्थैर्य प्राप्त झालें. तिच्यावरील जनतेचा विश्वास द्विगुणित झाला. ह्याचे सारे श्रेय, सुदैवानें ह्या संस्थेस, सुरुवातीस सूत्रधार संचालक म्हणून कर्तृत्ववान् उद्योगपति श्री. धरमसी खटाऊ याचे जें नेतृत्व लाभले त्यालाच आहे. परतु दुर्दैव असें की, श्री. धरमसी खटाऊ, याच्यासारख्या कुशल, चतुर, उद्योगपतिचे धुरीणत्व या संस्थेला दीर्घकाळ लाभू शकलें नाही– तदनतर या असोसिएशनची इतकी दुर्दशा झाली की, ती १९५९ मध्यें ' नादारीत ' काढावी लागली. महाराष्ट्रात लहानलहान गावातून, छोट्या प्रमाणांत उद्योग करणारे जे कारागिर वा त्याचे सघ आहेत, त्याच्या उन्नतिसाठी ह्या सस्थेचे पुनरुज्जीवन करण्याची निकड सहकारमंत्री भारदे ह्यानी ओळखून, ही सस्था त्यांनी पुन सघटित केली व आज तिचे चेअरमन, सहकारी क्षेत्रात, आपल्या कार्यानें, अग्रेसर येत असलेले श्री० मोतीलालजी फिरोदिया असून, मॅनेजिंग डायरेक्टर, व्यवहारतज्ञ, समयज्ञ श्री म श मुखेडकर आहेत ह्या दोघानी अत्यत अल्पावधीत यशस्वी कार्य सचलन करून, तिची व्यवसायातील पत वाढविली व तिला पुन' प्रतिष्ठा प्राप्त करवून दिली हे त्याना भूषणावह आहे. ह्या कार्यी त्याना, महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेचे मॅ. डायरेक्टर, व असोसिएशनचे उपाध्यक्ष डॉ सी डी दाते याचे मौलिक सहाय्य व मार्गदर्शन लाभले हे सौभाग्यच होय आज तिची सभासद संख्या १४१५ असून भागभांडवल ८ लाख १८ हजार आहे सस्थेची मुबईत सहा दुकानें आहेत.




## पूर्व खान्देश जिल्हा सहकारी मार्केटिंग सोसायटी लि. जळगांव

( स्थापना : १९६० )



बॅ. निकम. एम्. एल. ए.

शेती उत्पादनाबरोबर त्या उत्पादनाचा योग्य मोबदला शेतकऱ्याच्या पदरात पडला नाही तर त्याची आर्थिक स्थिती सुधारणार नाही व पर्यायाने तो उत्पादनाचा वेगहि वाढवू शकणार नाही. कर्जपुरवठा, उत्पादन आणि मालविक्री याचा योजनाबद्ध मेळ बसला तर शेतीचे व शेतकऱ्याचे उत्पादन वाढण्यास मदत होईल, आणि या दृष्टीने हा खरेदी-विक्री संघ एक महत्वाची राष्ट्र-सेवा, या संघाचे कर्तबगार, तरुण अध्यक्ष बॅ दादासाहेब निकम यांच्या मार्गदर्शनाखाली करीत आहे. अलिकडे पूर्व खानदेश म्हणजे 'गोड, मधुर केळयाचा जिल्हा' म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहे. खानदेशची केळी दूरवर, दिल्ली सिमला येथेच मिळतात असे नाही तर ती भारताच्या बाहेरही निर्यात होऊं लागली असून त्याच्या वैशिष्टयपूर्ण गुणामुळे ती लोकप्रिय ठरली आहेत. त्याना परदेशांतून वाढती मागणीही आहे. आणि आतां तर ती रशियात देखील भरपूर प्रमाणांत निर्यात करण्यात येणार असून, भारतास परकीय चलन उपलब्ध करण्यांत उपयोगी ठरणार आहेत. श्री. निकम यानी, जळगाव जिल्ह्यात विहिरींच्या पाण्यावर जी भरपूर प्रमाणात केळीची लागवड होते, त्या फळावर शास्त्रीय संशोधनाद्वारे प्रक्रिया करून तिची चिरकाल टिकणारी पावडर तयार करण्याकरितां कारखाना उघडण्याची कल्पना काढली असून हा जिल्हा संपन्न करण्याचा त्याचा इरादा आहे ह्या जिल्ह्याच्या वैभवाची ही मुहूर्तमेढच होय। असल्या प्रकारचा हा भारतातील पहिलाच कारखाना ठरेल व अशा तयार मालालाहि परदेशात मागणी असल्याने भारताला परदेशी चलन मिळवून देण्याचे कामी तो उपकारी ठरेल. या योजनेची आखणी करण्यात, या संस्थेचे कार्यकारी संचालक, श्री बा ग पाटील यांनी जें बहुमोल सहकार्य केलें त्याचाहि उल्लेख केला पाहिजे या कारखान्याचा कोनशिला समारंभ श्री यशवंतरावजी चव्हाणांच्या हस्तें २८ जून १९६१ रोजी पार पडला व उत्पादनास २६ जानेवारी १९६३ रोजी सुरुवात होईल बॅ. निकम यांचे उत्साही कुशल संचलन हें ह्या खरेदी-विक्री संघाचे वरदानच होय स्टेट ट्रान्सपोर्ट कॉर्पोरेशनचे सरकार नियुक्त सभासद व आमदार म्हणून निवडून हे आलेलें आहेत.




## दि औरंगाबाद जिल्हा सहकारी मार्केटिंग सोसायटी लि० औरंगाबाद

(स्थापना: १९५८)



श्री काका देशमुख एम्. एल्. ए

सहकार हा समृद्धीचा राजमार्ग आहे, त्याचा अवलंब करण्यातच, लोकशाही वर विश्वास असलेल्या भारतासारख्या कृषिप्रधान देशाची संपन्नता अवलंबून आहे अशी राष्ट्रातील व विचारवंताची धारणा असल्याने, सर्व देशाचे जीवन सहकार-मय करण्याचे प्रयत्न ते कसोशीनें करीत आहेत सहकाराचा संदेश, ग्रामीण भागातून शेतकऱ्याच्या घराघरात पोहचवून त्याचे जीवनमान ऊंचविण्याचा प्रयत्न, महाराष्ट्रातील सहकारी संस्थेतील कार्यकर्त्यांच्या बरोबरीनें मराठवाड्यांतील मंडळीहि करीत असल्याचे आढळून येत आहे महाराष्ट्रातील प्रगत सहकारी चळवळीची तिनें कास धरली त्या स्फूर्ति स्फुलिंगाच्या प्रकाशात सफल मार्गक्रमण करण्याचा तिचा प्रयास आहे. ह्या पार्श्वभूमीवर औरंगाबाद जिल्हा सहकारी मार्केटिंग सोसायटीनें, राज्यपुनर्रचनेंनंतर केलेली प्रगति स्पृहणीय आहे उत्पादन व वितरण ह्यामध्यें सुदृढ सहकार साखळी निर्माण करण्यात ह्या संस्थेने थोडयाबहुत प्रमाणात यशहि मिळविलें आहे जिल्ह्यातील सहकारी खरेदी विक्रीचा पाया दृढमूल करणे हीच तर ह्या संघटनेच्या कार्याची कसोटी आहे. शेतकरी व विभागीय मार्केटिंग सोसायटयाशी प्रत्यक्ष संबंध ठेवणें हें ह्या संस्थेचे उद्दिष्ट असून आपल्या साखर विभाग, अडतविभाग, खतविभाग, आयर्न, स्टीलविभाग, मशीनरीविभाग, ह्याद्वारे विक्री व पुरवठा याच्या समन्वयानें शेतकरी व ग्राहकाच्या सर्वांगीण उन्नतीस हातभार लावण्याचे अवघड कार्यात सफलता मिळविण्यासाठी ही सोसायटी सतत प्रयत्नशील आहे. ह्या ध्येयाप्रत पोहचण्यासाठी, आवश्यक ते अनुभवाचे संचित कार्यकर्त्यांना उपलब्ध व्हावे म्हणून ह्या सोसायटीतर्फें एका अभ्यासयात्रेचा अभिनव कार्यक्रम आखण्यात आला होता ह्या संस्थेच्या यशस्वितेंत जिल्हा सहकारी बँकेचा भरपूर वाटा असून, बँकेच्याच सहकार्याने या संस्थेच्या भावी कार्याची मुहूर्तमेढ सुदृढ पायावर उभारली गेली बँकेचे चेअरमन श्री रामचंद्र पाटील याच्या अविरत सहकार्यानें व मार्गदर्शनानें, ह्या संस्थेची प्रगति झपाटयानें होऊ शकली जिल्ह्यात, प्रक्रिया संस्था (विशेषत भुईमूग व कापूस) काढण्याचा ह्या संस्थेचा प्रयत्न असून, त्यादृष्टीने पुढचे पाऊल टाकण्याची पूर्वतयारी झालेली आहे वैभवा प्रत द्रुतगतीने वाटचाल करीत असलेल्या ह्या संस्थेचे सारथ्य श्री बाबासाहेब देशमुख करीत असत व त्याना सहकारी क्षेत्रातील त्यांचे मित्र, श्री बाबूरावजी काळे, श्री एस् के जगताप, आदिंचे सतत सहकार्य लाभले आहे ह्या विभागातील नेते श्री भगवंतरावजी गाढे व विनायकरावजी पाटील याच्या प्रेरणेंनें ह्या सोसायटीचा उत्कर्ष होवो हीच आमची इच्छा !




## महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखानदार संघ पुणे

( स्थापना : १९५६ )



श्री अण्णासाहेब शिंदे, एम्. पी.

शेतकऱ्याची आर्थिक दैना, हीच सहकारी चळवळीला चालना देण्यासाठी, मुख्यतः कारणीभूत झाली. मराठी शेतकरी वर्षानुवर्षे सावकारशाहीच्या वरवंट्याखाली चिरडला जात होता. ही पिळवणूक महाराष्ट्रातील शेतकऱ्याला सहन होईना शेवटी १८७२ मध्ये महाराष्ट्राच्या शेतकऱ्यांनी सावकारशाहीच्या जुलूमाविरुद्ध बंडाचा झेंडा उभारला. सरकार खडबडून जागे झाले व त्यानें एक चौकशी कमिशन नेमले आणि त्या कमिशननें सहकारी पतपेढ्या काढण्याची व त्या वाढविण्याची शिफारस केली. अशा रीतीनें सहकारी चळवळीचा उगम महाराष्ट्रांत झाला आज ती केवळ पतपुरवठ्याची चळवळ न राहता तिनें ग्रामीण अर्थव्यवस्थेची सर्व अंगे व्यापिली आहेत. सहकारी संघराज्य हेंच आपलें उद्दिष्ट भारत देशानें ठरविले आहे. सहकारी चळवळ एक प्रभावी शक्ती असल्याने, उद्योगधंदे व व्यापार या क्षेत्रातही तिचा प्रसार करण्याचा शास्त्रशुद्ध प्रयत्न करण्यात येत आहे. महाराष्ट्रांतील सहकार क्षेत्रातील थोर महर्षि श्री वैकुंठभाई मेहता व डॉ धनजयराव गाडगीळ यांच्या विधायक मौलिक मार्गदर्शनाखाली, महाराष्ट्रातील शेतकरी आता कारखानदार झाला आहे. ही सहकारक्रांति श्री. वैकुंठभाई, डॉ. धनजयराव गाडगीळ व सहकारी शेतकऱ्यांचे निर्धारपूर्वक सहाय्य या त्रिवेणी संगमांतून उद्भवली ! सहकारी पद्धतीवर महाराष्ट्रांत निघालेले हे साखर कारखाने म्हणजे एक यशस्वी व स्फूर्तिदायक प्रयोग आहे. या कारखान्यांनी नवा इतिहास घडविला आहे इतर व्यवसायासाठी नवा आदर्श निर्माण केला आहे. शेतमालावर सहकारी पद्धतीनें प्रक्रिया करून त्याच्या खरेदी-विक्रीची व्यवस्था करणे, याचे महाराष्ट्रांतील सहकारी साखर कारखानें आदर्श उदाहरण होत आज येथें १६ कारखाने निघाले असून, एकदर २० कारखान्यांना परवाना मिळाला आहे. सहकारी साखर कारखानदारीचे क्षेत्र अधिकाधिक विस्तृत होत गेल्यानें, त्यांचे प्रश्न, व अडचणी संघटित स्वरूपात विचार विनिमय करून सोडविण्यासाठी, एक संघटना आवश्यक असल्याचे वाटल्यावरुन डॉ धनजयराव गाडगीळ यांच्या प्रेरणेनें, सहकारी साखर कारखानदारांनी वरील संघ स्थापन केला आरंभीचे काळी, कारखानदाराच्या आग्रहाखातर डॉ धनजयराव गाडगीळच संघाचे चेअरमन होते ह्या संघाला स्थैर्य प्राप्त झाल्यावर ते त्यातून निवृत्त झाले असून आज त्यांचे चेअरमन, भारत सरकारचे कृषि विभागाचे पार्लमेंटरी सेक्रेटरी श्री अण्णासाहेब शिंदे असून उपाध्यक्ष सांगलीचे वसंतराव पाटील आहेत तांत्रिक सल्ला, तांत्रिक तज्ञांची नेमणूक, लागणाऱ्या मालाची खरेदी व त्यावर देखरेख यासारखे प्रश्न सोडवून सहकार्य करण्यात येते. मॅनेजिंग डायरेक्टर श्री घाटगे यांच्या कार्यकुशल संचलनाखाली हा संघ आपली उपयोगिता अधिकाधिक वाढवील असा विश्वास वाटतो.




## महाराष्ट्र राज्य सहकार युनियन मुंबई

( स्थापना : १९१८ )



श्री. एन्. एस. पंडीत

सहकाराचा मार्ग हा विकासाचा मार्ग असल्याने, सहकारी चळवळ वाढीस लागणे स्वाभाविकच होय. सहकार संघटनेच्या वटवृक्षाची पाळेमुळे महाराष्ट्रांत खोलवर रुजली असून ग्रामीण जनतेचे सर्व जीवन ह्या चळवळीनें व्यापिलें आहे. समाजवादी समाजरचना निर्माण करण्यासाठी जें वातावरण तयार व्हावें लागतें तें वातावरण सहकारी चळवळीच्या प्रयत्नातून निर्माण करण्याचा राष्ट्रनेत्याचा प्रयत्न असल्याने, ह्या चळवळीने राष्ट्रोन्नतीच्या कार्यांत अग्रहक्काचे स्थान मिळविण्याचा मान संपादिला आहे. सहकारी संघटनेचा विकास असा द्रुतगतीनें होत असता, तिची उभारणी निर्दोष पायावर करून तिला चिरस्थायी करणें हें अत्यंत महत्त्वाचे कार्य होय. याची जाणीव सहकारी चळवळीच्या विधायक नेतृत्वाचे प्रणेते श्री० वैकुंठभाई मेहता, व डॉ. धनंजयराव गाडगीळ, श्री. आर्. जी. सरैय्या, श्री वर्दे याना प्रारंभापासूनच असल्यानें, मुंबई राज्यातील सहकारी चळवळीला योग्य व इष्ट तो आकार देऊन तिलाउद्दिष्टपूर्तिसाठी कार्यक्षम करण्याच्या ध्येयानें प्रेरित होऊन, ' महाराष्ट्र राज्य सहकार युनियन ' च्या कार्यास, तनमनानें वाहून, कार्यप्रवण करण्याचा त्यानी आजवर कसोशीनें प्रयत्न केला. सहकाराची तत्वे समजून न घेता सहकार मंदिराची उभारणी झाली तर तो खरा सहकार नव्हे— म्हणूनच ह्या चळवळीतील कार्यकर्त्यांना, मोठ्या प्रमाणावर सहकारी तत्त्वांचे शिक्षण देणें हे अत्यंत अगत्याचे असून ' युनियन 'च्या कार्याचा ते " आत्मा "च होय ! १९४७ मध्ये पुणें येथे स्थापन झालेल्या पुणे सहकारी विद्यालयातून प्रशिक्षणाची व्यवस्था करण्यात आली आहे. सहकारी शिक्षण हे मिशनरी पद्धतीचे कार्य असून प्रत्यक्ष शिक्षण व प्रचार साहित्याद्वारे तें अधिकाधिक परिणामकारी करिता येईल या युनियनद्वारे परिषदा व परिसंवाद आयोजित करण्यात येऊन, सहकारी संघटनेचा प्रसार राज्यातील सर्व विभागात करण्यात येऊन, सहकारी संघटनेच्या वाढीस अनुकूल अशी मनोभूमिका करण्याचे कार्य केले जाते. १९४५ साली डॉ. गाडगीळ यांच्या मार्गदर्शनाखाली, शेतकऱ्याच्या कर्जबाजारीपणामुळे उद्भवणाऱ्या परिणामाची पहाणी करून जो रिपोर्ट तयार करण्यात आला, तो भारतीय सहकारी संघटनेचे ' भूषण ' ठरला व तदनुसार १९४८ साली सहकारी इन्शुअरन्स सोसायटी स्थापण्यात आली. राज्यातील व देशातील सहकारी चळवळीला योग्य वळण लावण्याचा अधिकार ह्या संस्थेचा आहे. हल्लीचे अध्यक्ष श्री मोतीलालजी फिरोदिया हे ह्या उद्दिष्टपूर्तिसाठी आपले सहकारी श्री० गुलाबराव पाटील व वामनरावजी वसू यासह सतत प्रयत्नशील आहेत. युनियनचे आजचे प्रमुख अधिकारी श्री. एन. एम्. पंडित याची काम करण्याची तडफ, निष्ठा, तसेंच उदंड अनुभवाचे असून, व चतुरस्त्र, कार्यकुशलता यामुळें ह्या संस्थेचे सुयश सुनिश्चित झालें आहे!



श्री. व्ही. एम्. साठे



श्री. बी एस्. कल्याणपूरकर



श्री. वी. पी. शेन्डे



डॉ. बा. घु. धीधीमल



डॉ. वि. द. वाते



श्री. व्ही. अेम्. जोगळेकर

## यशस्वी कार्यकारी संचालक

व

गौरवशाली सहकारी सेवेच्या

समर्थ सुलब समन्वयाचे

सप्तमंडळ !

*



डॉ. एम्. जी. भगत



श्री. जे. डी. शुक्ला

# सहकारी संघटनेतील व्यक्ति विशेष



श्री. के. अच्युत रेड्डी
अध्यक्ष : हैद्राबाद, को-ऑपरेटिव्ह बँक लि.,



श्री. मगनभाओ देसाओ
अध्यक्ष : गुजरात स्टेट को-बँक लि.,



श्री. अब्बास
अध्यक्ष : ओरिसा स्टेट, को-बँ. लि.,



श्री. दादासाहेब सोमण



कै. दादासाहेब कोल्हे



श्री. जी. एम. लाड
संपादक-'फायनान्सियल एक्सप्रेस'














"पाणी, खड्डा भरल्याशिवाय ज्याप्रमाणें पुढे सरकत नाहीं, त्याप्रमाणें लोकांच्या अुणीवा भरून काढून पुढे जावे … …"



"एकमेकां करूं सहाय्य
अवघे धरूं सुपंथ !"



"[illegible]"

